











**श्रीहरी व्ही. दामले, भंडिहोळे (कर्नाटक)**

प्र : नाणे ही वस्तु कशी सुरू झाली ?

उ : मानव जेव्हा रानटी अवस्थेत होता तेव्हा त्याची धनसंपदा म्हणजे अन्न वस्त्र त्याला निसर्गाकडूनच मिळे. मनुष्य कंद मुळे, फळे खाई, नाहीतर शिकार करी. त्या स्थितीत कातड्याचा उपयोग वस्त्रासारखा किंवा घराला आच्छादनासारखा होई. परंतु क्रमक्रमाने माणसाने आपल्या गरजा भागविण्यासाठी उत्पादन सुरू केले. कृषी व पशुपालनाची वृद्धी होत गेली व एका माणसाच्या श्रमाने दहा माणसांची पोटे भरणे शक्य झाले. म्हणजे मनुष्य स्वतःच्या गरजेपेक्षा जास्त उत्पादन करू लागला. अशातऱ्हेने समाजातल्या अनेक व्यक्ती अन्नोत्पादनाच्या कामातून मुक्त होऊन सुतार, लोहार, कुंभार हस्तव्यवसाय, आभूषणे तयार करणे इत्यादि कामे शिकून अनेक विध संपत्ती वाढविण्यास कारणीभूत झाले. परिणामीं मानव समाज स्थिर होऊ लागला. असे अनेक समूह व समाज स्वतःच्या गरजेपेक्षा जास्त उत्पादन करू लागले, सर्व समाज एकाच तऱ्हेच्या वस्तू तयार करीत नसल्यामुळे वस्तूंची देवघेव होऊन सभ्यता एका संघातून दुसऱ्या संघात पसरू लागली.

परंतु फक्त वस्तुसंपदेची देवघेव विशिष्ट स्वरूपातच परिमित अवस्थेपर्यंतच शक्य असते. त्याहून जास्त व्यापार केल्याने पुष्कळ जास्त फायदा मिळणे शक्य होते. उदाहरणार्थ एका शेतकऱ्याकडे त्याच्या गरजेपेक्षा पुष्कळ जास्त धान्य उरले आणि एका कुंभाराकडे मडकी उरली. त्यांची जवळपास देवघेव करणे शक्य नसेल अशा स्थितीत एक व्यापारी त्या शेतकऱ्या जवळून त्याच्याकडचे उरलेले धान्य एकत्र करून ते त्याची गरज आहे तेथे नेऊन ते विकू शकेल. खरेदी विक्रीसाठी निरनिराळ्या वस्तूंचा दर ठरविण्याला काही उपाय असला पाहिजे. त्यासाठीच नाणे हवे. (धातूची नाणी येण्यापूर्वी नैसर्गिक पैसा कवड्या वगैरेंच्या रूपे मान्य असे) तांबे, चांदी व सोने या धातूची नाणी करून हा पैसा लहान रूपात असवून ठेवणे शक्य होते. दर महिन्याला एक चांदीचे नाणे खरेदी करून कमीत कमी पैशापासून शंभर महिन्यांचा पैसासुद्धा जमवून रुपयाच्या शंभर नाण्यांची किंमत असलेली वस्तु खरेदी करणे शक्य झाले.

नाणे रूपे पैसा नसता तर सभ्यतेचा विकास होऊ शकला नसता असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही.




[ ६५ ]

कोल्हा म्हणाला ते ऐकून लंबकर्णाच्या मनात तीव्र इच्छा उत्पन्न झाली आणि तो त्याच्याबरोबर जायला तयार झाला. कोल्हा त्याला सिंहाजवळ घेऊन गेला. गाढव मोठ्या उत्साहाने येत असलेले पाहून सिंहाने उतावळ्यासारखा होऊन त्याला ठार करण्यासाठी त्याच्यावर इतकी जोराने उडी मारली की तो गाढवाच्या पलीकडे जाऊन आदळला. तो आधीच थोडा घायाळ होता आणि आता खूपच जोराने आदळल्यामुळे तो काही वेळ जागच्या जागी पडून राहिला, हाललासुद्धा नाही.

सिंहाने जी उडी मारली ती उडी होती की आणखी काही गाढवाला कळले नाही. त्याच्या शेजारी वीज कडाडून पडावी तसे झाल्यासारखे त्याला भासले. म्हणून तो पळाला आणि दुरून मागे वळून पाहिले तर त्याला एक विचित्र जनावर दिसले, लाल डोळे, मानेवर मोठी आयाळ आणि भयंकर सुळे. म्हणून गाढव गावात पळून गेले. सिंहाचे अवसान नाहीसे झाले होते. तो गाढवाचा पाठलाग करू शकला नाही.

कोल्हा सिंहाला म्हणाला—"हे काय केलेत तुम्ही? तुमचं शौर्य, साहस व बुद्धिमत्ता काय ती कळली मला!"

"मी उडी मारायला तयार नव्हतो रे! आनंदाच्या भरात देहभानच विसरून गेलो होतो. मी जर तयार असतो ना मग हत्तीलासुद्धा...!" सिंह म्हणाला.

"तरमग तुम्ही आतापासूनच तयार रहा. मी त्याला पुन्हा आणतो." कोल्हा म्हणाला.

"अरे मित्रा! त्याने तर मला उघड्या डोळ्याने पाहिले आहे. भिऊन पळून गेले-



त्याला परत ये म्हटलं तर येईल का? आणखी एखाद्या प्राण्याला आण." सिंह म्हणाला.

"त्याची काळजी तुला कां? मी पाहून घेतो." असे सांगून कोल्हा गाढव गेले होते त्या वाटेने गेला आणि गाढव तलावाच्या काठी चरत असलेले त्याने पाहिले.

कोल्ह्याला पाहून गाढव म्हणाले–"अरे माझ्या भाच्या! तू मला त्या सुंदर हिरव्या गार प्रदेशात घेऊन गेला होतास खरा! परंतु मी मोठ्या भाग्यानेच वाचलो!"

कोल्हा जोराने हसला व म्हणाला– "मामा, अहो, मी म्हटलं ना त्यापैकी ती एक गाढवीण होती. तिला ओळखायला आलं नाही. तुम्ही कोण हे. ती तिसरीच एक गाढवीण होती. ती दोघींना बाजूला सारून नवऱ्याला पाहून त्याला आलिंगन करण्यासाठी इतक्या जोराने धावली की तुमच्या पलीकडे जाऊन पडली. आनंदाच्या भरात तिला देहभानच राहिले नाही. तुम्ही इतका भ्यालात आणि दूर पळून गेलात. तुम्हांला लाज वाटायला हवी. म्हणून आता पुन्हा चला. तिने तुमच्यासाठी खाणेपिणे सोडले आहे. लंबकर्णाशी आपला विवाह झाला नाही तर आपण काही खाणार नाही व पिणार नाही व विहिरीत उडी टाकणार नाहीतर स्वतःला जाळून घेणार. ते जमलं नाहीतर विष खाऊन जीव देणार असं म्हणाली. निष्कारण एका मुलीचा जीव कां घेतां? ते फार मोठे पाप आहे! कामदेवसुद्धा तुम्हांला क्षमा करणार नाही. त्यानंतर तुम्हांला जीवनसंगिनी मिळणार नाही. स्त्री जातीचा अपमान करून कामदेवाला ज्या कोणी क्रुद्ध केले त्यांना वैरागी होऊन आयुष्य कंठावे लागले आहे. जटा वाढवून, हातात कमंडलू घेऊन व भगवी वस्त्रे घालून हिंडावे लागलं आहे!"

कोल्हा म्हणाला ते सर्व गाढवला खरे वाटले. ते मूर्ख गाढव कोल्ह्याबरोबर गेले. पाहारा करायला बसविले व स्वतः आंघोळीला नदीवर गेला.

कोल्ह्याला खूप भूक लागलेली होती. गाढवाचे कान व काळीज काढून खावे असे त्याला वाटले. त्याने मनाला खूप आवरण्याचा प्रयत्न केला व शेवटी न आवरू शकल्याने त्याने खाऊन टाकले. सिंहाने स्नान करून आल्यावर गाढवाचे कान व काळीज नसलेले पाहिले व रागाने विचारले– "लबाडा, कान व काळीज खाऊन मला हे तुझे उष्टे खायला ठेवलेस का?"

कोल्हा नम्रपणे म्हणाला–"प्रभो, असं म्हणू नका. माझ्या कंठाशपथ सांगतो, या जनावराला कान व काळीज नसतात. नाहीतर तुम्हांला पाहून पळून गेलेले जनावर पुन्हा परत आले असते का? त्याला कान नाहीत म्हणून तर आपली गर्जना त्याला ऐकायला आली नाही आणि आपण उडी मारलीत तेव्हा जो आवाज झाला त्याला ऐकू आला नाही. त्याला काळीज नाही, म्हणून आपले भयंकर रूप पाहून तो भ्याला नाही. काळीज नसल्यामुळे त्याला भीती ही गोष्ट माहीत नाही. ते इकडे आले आणि तेव्हां पळाले होते त्याला निराळे असे कारणच काही नव्हते. म्हणून तर मी त्याला पुन्हा इकडे बोलावून आणू शकलो."

सिंहाला कोल्ह्याचे म्हणणे खरे वाटले. सिंहाबरोबर कोल्ह्यानेसुद्धा गाढवाच्या शरिरावर ताव मारला.



माकडाने मगरीला गाढवाची गोष्ट सांगितली व म्हणाले–"मूर्खा! तू मला फसवायला निघाला होतास, परंतु युधिष्ठिर नावाच्या कुंभारासारखे चुकून तू खरे सांगून टाकलेस.

लबाडी करायला निघाला असतां खरे सांगणाऱ्या त्या युधिष्ठिरासारख्या मूर्ख व्यक्तीला शेवटी दुःखीच व्हावे लागते."

मगरीने ती गोष्ट सांगायला आग्रह केला. तेव्हा माकड गोष्ट सांगू लागले.

### वीरकुंभाराची गोष्ट

एकादा एक कुंभार खूप पिऊन झिंगून आपल्या घराच्या परसात पळत येऊन पडला तेव्हां एका खापरावर त्याचे कपाळ

आपटले व मोठी जखम झाली. खूप रक्त वाहले वेळेवर औषधपाणी न झाल्यामुळे जखमेत पू झाला. पुष्कळ दिवसांनंतर जखम भरली, परंतु जखमेच्या जागी मोठा वण राहून गेला.

पुढे काही दिवसांनी तो कुंभार राही त्या प्रदेशात दुष्काळ पडला. म्हणून आपलं गाव सोडून कुंभाराला दूरच्या गावी एका राजाच्या पदरी नोकरीसाठी जावे लागले.

त्या राजाने जखमेचा तो मोठा वण कपाळावर पाहून विचार केला, हा कोणी तरी शूर पराक्रमी असावा. हा तळहातावर प्राण घेऊन शत्रूच्या गोटात शिरून युद्ध करायला गेला असणार. म्हणून तलवारीचा वार लागल्याने जी जखम झाली तिचा वण असला पाहिजे. याच्या तोंडावर आणखी दुसरा कोणताही वण दिसत नाही. याला पाहिला तर रणांगणाला कधी याने पाठ दाखविली असेल असे वाटत नाही. हा आपल्या पदरी राहण्यालायक एक शूर पराक्रमी आहे. म्हणून राजाने कुंभाराला सैन्यात मोठ्या

वगैरे देऊन त्याचा सत्कार केला.

राजाने कुंभाराच्या बाबतीत जी आपुलकी व आदर दर्शविला तो क्षत्रिय-वीरांना आवडला नाही. त्यांच्या मनात हेवाच वाढला. पण कोणी काही बोलून दाखविले नाही. कारण एक तर राजाला राग येईल दुसरे कदाचित् तो खरोखरच कोणी शूर क्षत्रिय असावा असेही त्यांना वाटले.

कुंभाराला आपल्या पदरी नेमल्यावर काही दिवसांनी राजाला शत्रूशी युद्ध करण्याचा प्रसंग आला. त्याने अश्वसैन्य व गजसैन्य तयार करविले व रणांगणावर कोणाकोणाला पाठवायचे त्यांची निवड केली. राजाने आपल्या सैन्याची पाहणी करीत असतां त्यावेळी कुंभाराला पाहून विचारले—"हे क्षत्रिय वीर पुरुषा! तुझं नाव काय रे? तू कोणत्या जातीचा? तुझ्या कपाळावरचा हा वण कोणत्या युद्धात पडलेल्या जखमेचा?"





# भल्लूक मांत्रिक

[५]

[जितकेतू राजाला दंड देण्याच्या हेतूने भल्लूक मांत्रिक कालीवर्मा व इतर लोकांबरोबर राजधानीच्या दिशेने निघाला. तेव्हां राजा दुर्मुखाच्या सैनिकांनी त्याला अडविले. नंतर मांत्रिक दुर्मुख राजाकडे गेला आणि त्याने चांडालाच्या अंगाला आपल्या मंत्रदंडाने स्पर्श केला मात्र तो अस्वल होऊन हातातला परशू फिरवीत दुर्मुखाच्या अंगावर धावला. पुढे–]

चांडाळाने एकाएकी अस्वल होऊन आपल्या तळापत्या परशूने दुर्मुख राजावर हल्ला केला तेव्हां दुर्मुख क्षणभर थक्क होऊन पहात राहिला. त्यावेळी राजाचे अंगरक्षक त्याच्या रक्षणाला पुढे सरसावले. भल्लूक रूपात असलेल्या चांडाळाने त्यांना लाथ मारून बाजूला ढकलले आणि वेगाने दुर्मुख बसला होता तिकडे निघाला. तोपर्यंत दुर्मुख स्वत:ला सावरून ओरडला—"अरे, आपले सैनिक कोठे आहेत? अंगरक्षक कोठे नाहीसे झाले? या अस्वलाला अडवा आणि ठार करा." असे म्हणत दुर्मुख आपल्या आसना-वरून खाली उतरून पळाला आणि चटदिशी आपल्या घोड्यावर जाऊन बसला. त्याच्या पाठोपाठ एक अंगरक्षक देखील दुसऱ्या एका घोड्यावर उडी मारून बसला.

अंगरक्षक दुर्मुखाला म्हणाला—"महा-राज या क्षणी आपण येथून पाय काढणेच



हिताचे होईल. आपले सैनिक नदीकाठी तंबूत व खेम्यांत आराम करीत आहेत. येथली बातमी कळून इकडे यायला त्यांना बराच वेळ लागेल. ते यायच्या आत हा मांत्रिक या अस्वलाच्या मदतीने आपणां सर्वांना लोळवील."

अंगरक्षक हे सर्व सांगत असता राजा दुर्मुखाने त्याच्यावर धावून येत असलेल्या अस्वलाला पाहिले आणि घोड्याला टांच मारली. घोडासुद्धा अस्वलाला पाहून बिथरला आणि लगामाला झटका देऊन जोराने पळू लागला.

राजा दुर्मुख व त्याचा अंगरक्षक दोघे

झाल्यासारखा मांत्रिकाला म्हणाला–"गुरुवर्य! या प्रांतातील दोघां शासकांपैकी एक तर आपल्या हातात आलाच आहे व दुसरा निसटला. आपले अस्वल त्याचा पाठलाग करून त्याला धरू शकेल असे नाही मला वाटत."

भल्लूक मांत्रिक दुर्मुखाच्या घोड्या पाठोपाठ पळणाऱ्या अस्वलाकडे पाहून समाधान झाल्यासारखी मान हलवून म्हणाला–"कालीवर्मा! दुर्मुख आपल्या चांडाळाच्या परशूने मेला नाही तर तू व मी पुढे काय करावयाचे त्याचा विचार करू."

नंतर तेथे दुर्मुखाचा मंत्री व सल्लागार थरथर कापत उभे होते त्यांच्याकडे करड्या नजरेने पहात भल्लूक मांत्रिक म्हणाला–"काय रे, तरमग तुम्ही आता हे सांगा नगरावर स्वारीला निघाला आहां ना? की तुम्ही चंद्रशिला पण तुमचं सैन्य वगैरे कोठे आहे?"

त्या प्रश्नाचे उत्तर दुर्मुखाच्या सल्लागारापैकी एकाने घाबऱ्या आवाजात दिले–"आम्ही काय सांगणार? आपण तर महामांत्रिक आहां. आतांपर्यंत आपल्याला आमचे सैन्य कोठे आहे, हे नक्कीच कळले असणार! परंतु आपण विचारलेतच म्हणून सांगतो. आमचे सैनिक नदीच्या काठी

त्याचबरोबर आपली शस्त्रास्त्रे पाजळवून सज्ज करीत आहेत."

ते उत्तर ऐकून भल्लूक मांत्रिक खदखदां हंसू लागला. जवळच जीवगुप्त चकित होऊन ते सर्व दृश्य पहात उभा होता त्याला मांत्रिक म्हणाला–"काय रे चंद्रशिला नगराच्या मंत्र्या! तू दुर्मुखाचा सल्लागार म्हणाला ते सर्व ऐकलेस ना?"

"होय, सर्व ऐकले. मला हे सर्व दृश्य पाहून असे वाटू लागले आहे की मला आतां वेड लागणेच उरले आहे!" जीवगुप्त म्हणाला.

"अस्सं! मी व कालीवर्मा हा प्रदेश सोडून हिमालयात व त्याच्या पलीकडे जाण्यापूर्वी आणखी काही घमेंडखोरांची घमेंड उतरून त्यांना वेड लागावे असे आम्हांला वाटते आहे. काय रे महामंत्र्या, मी म्हणतो ते बरोबर आहे ना?" भल्लूक मांत्रिक आपला मंत्रदंड जमिनीवर आपटीत म्हणाला.

"ती आपली मेहेरबानी!" मंत्री जीवगुप्त मान खाली करून म्हणाला. भल्लूक मांत्रिक पुढे काही बोलणार इतक्यात कालीवर्मा एका आमराईकडे पहात म्हणाला–"गुरुवर्य! पुष्कळसे सैनिक भाले व तलवारी घेऊन याच बाजूला येत असलेले दिसत



उपसली आणि जवळ उभे असलेल्या जितकेतूच्या सैनिकांना त्याने तयार रहायला सांगितले.

राजा दुर्मुखाचे सल्लागार आतांपर्यंत तसेच घाबरलेल्या अवस्थेतच होते. भल्लूक मांत्रिक त्यांना म्हणाला–"अरे ए! तुमच्यापैकी एक जण त्या सैनिकांकडे जाऊन, तुमच्या राजाची काय दुर्गत झाली हे त्यांना जाऊन सांगा. त्यांनी मूर्खपणाने आमच्यावर हात टाकलाच तर मी तुम्हांला वाघ आणि त्यांना हरण करून टाकून तुम्हांलाच त्यांच्यावर सोडीन."

"हे महामांत्रिक करू शकतील हे मी



स्वतःच्या डोळ्यांनीच नाही का पाहिलेत की ह्यांनी त्या चांडाळाला एक अस्वल करून तुमच्या राजाच्या अंगावर कसे सोडले ते ?" जीवगुप्त ने दुर्मुखाच्या सल्लागाराने समजावून सांगितले.

राजा दुर्मुखाच्या मंत्र्यांनी व सल्लागारांनी एकदां परस्परांकडे पाहिले. त्यांच्या पैकी एकजण तेथून निघाला आणि त्यांच्या बाजूला येत असलेल्या सैनिकांच्या जवळ जाऊन म्हणाला– "आपले महाराज जिवंत परत येईपर्यंत आपण या मांत्रिकाबरोबर वितुष्ट होईल असे काही करतां कामा नये. यांतच आपले सर्वांचे हित आहे."

ते ऐकून त्या तुकडीच्या नायक चिडल्यासारखा होऊन आपल्या तुकडीतल्या सुमारे पन्नास लोकांकडे वळून म्हणाला–"तुम्ही हे म्हणताहेत ते ऐकलेत ना? परंतु ही सर्व जादू आहे. आपण सर्व मिळून एकदम हल्ला केला तर त्या मांत्रिकाला आणि त्याच्या साथीदाराला ठार करणे आपल्याला शक्य नाही का?"

"परंतु तेवढ्या अवधीत तो मांत्रिक आपल्यापैकी काही जणांना हरण आणि काही जणांना वाघ करून टाकील व हरणांना वाघ खात असलेले पाहून टाळ्या वाजवून गंमत पाहील त्याचे काय? तोसुद्धा विचार नको का करायला?" सैनिकांपैकी एकजण पुढे होऊन सर्वांकडे पहात म्हणाला.

"नायक साहेब! आम्ही महाराज दुर्मुख यांचे मीठ खातो आहो. तेव्हा वेळ पडल्यास त्यांच्या रक्षणासाठी प्राणोत्सर्ग करावा लागला तरी आपण तयार राहिले पाहिजे. परंतु आतांच आपण जें काही ऐकले त्याप्रमाणे विचार केला तर महाराज अजून जिवंत असतीलच याची तरी काय शाश्वती? समजा, त्या भयंकर अस्वलाने आपल्या परशूने महाराजांचा शिरच्छेद केला असेल तर आपली राजभक्ती व शौर्य फुकटच गेल्यासारखे नाही का?" आणखी एका सैनिकाने पुढे होऊन दलनायकाला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला.

ते ऐकल्यावर नायकाच्या मनात दुसराच विचार आला. त्याने एकदा चहूकडे नजर फिरवून पाहिले व विचार करू लागला– 'जर हे लोक म्हणतात तसा आपल्या महाराजांचा शिरच्छेद झाला असेल तर आपण स्वतः गादी बळकावण्याचा प्रयत्न करून कां पाहू नये?' नंतर आपल्या सैनिकांकडे वळून म्हणाला–"बरोबर आहे, तुमचे म्हणणे. तूर्त चंद्रशिला नगरीवर स्वारी करण्याऐवजी उदयगिरीला परत जाणेच जास्त हिताचे होईल."

भल्लूक मांत्रिकाने बाजूलाच असलेल्या कालीवर्माकडे वळून डोळ्याने खूण करीत म्हटले–"कालीवर्मा! मी तुला दुर्मुख राजाच्या सैनिकांचा प्रमुख म्हणून नेमतो. तू त्या तुकडीच्या नायकाला विचारून तर पहा की तो आपल्या हातातली तलवार तुला द्यायला तयार आहे की नाही?"

कालीवर्माने लगेच पुढे जाऊन त्या दलनायकाला दरडावून विचारले–"तू आमचे गुरुवर्य म्हणाले ते ऐकलेस की नाही? तेव्हा तू काय तो विचार कर व काय ते उत्तर दे, तू आपली तलवार मला द्यायला किंवा जमिनीवर टाकायला तयार आहेस का?"



दलनायकाने कालीवर्मा व भल्लूक मांत्रिक दोघांकडे फक्त एकदांच पाहिले. त्याने तलवार धरली होती खरी, परंतु त्याचा हात थरथर कापत होता. तो खालच्या आवाजांत म्हणाला–"मी आपली तलवार आपल्याला देऊन टाकली तर दुर्मुख महाराजांविरुद्ध राजद्रोह करायला तयार झालो, असा त्याचा अर्थ होणार! आपल्यासारख्या थोर शाहण्या माणसांनी आम्हांला राजद्रोह करण्यास उद्युक्त करणे रास्त होईल का?"

"ती गोष्ट शाहणपणाचीच समजली जाईल. परंतु तू हे सांग की तुमच्या महा-



तुम्हां सर्वांना धोक्यात सोडून पळून जाणे तरी एका राजाला शोभते का?" असे म्हणत भल्लूक मांत्रिक दलनायकाच्या बाजूला उभा असलेल्या एका सैनिकाला त्याने स्वतःकडे पाठमोरा उभा करून त्याच्या पाठीला आपला मंत्रदंड स्पर्श करून म्हणाला—"ये, पहा, मी याच्या पाठीवर एक लेप लावतो आहे. तू व तुझे सर्व अनुयायी येऊन पहा, तुमच्या महाराजांची काय दुर्गत झाली आहे ती."

दुसऱ्या क्षणाला त्या सैनिकाच्या पोशाखाच्या पाठीकडची बाजू काळी झाली. त्यात आरशासारखे स्पष्ट दिसू लागले. त्याच एका जंगलात घोडे भरधाव पळवीत दुर्मुख व त्याचा अंगरक्षक जात असलेले दिसले. त्यांचा पाठलाग करीत अस्वल धावत होते. दुर्मुखाचा घोडा पुढे होता. पाठीमागून वळून पाहून राजा दुर्मुख मोठ्याने किंकाळी फोडून आपल्या अंगरक्षकाबरोबर दिशा बदलून पळू लागला.

आता अचानकपणे दुर्मुखाचा पाठलाग करीत येणारे अस्वल समोर येताच हत्ती त्याला सोंडेने उचलणार तेवढ्यात अस्वलाच्या रूपात असलेला चांडाळ कर्कश आवाजात ओरडला आणि त्याने त्याच्या परशूचा प्रहार हत्तीच्या सोंडेवर केला. सोंड मध्येच अर्धवट तुटली व लोंबकळू लागली. हत्ती किंचाळत मागे सरकू लागला. परंतु त्याच वेळी अस्वल त्याच्या पाठीवर चढले आणि त्याच्या गंडस्थलावर परशूच्या दांड्याने प्रहार करून ओरडला—"तो दुष्ट दुर्मुख कोठे आहे? त्याचा शिरच्छेद करणार आहे मी!"

मध्यंतरी राजा दुर्मुख जंगलात पुष्कळ दूर निघून गेला होता. त्याला अशी भीती वाटू लागली होती की अस्वलाबरोबर हत्तीसुद्धा त्याचा पाठलाग करतो आहे. अंगरक्षकाने दुर्मुखाला सावध करीत म्हटले—"महाराज! आपण वाट चुकून आपल्या राज्याच्या हद्दीबाहेर कोठेतरी चाललो आहो, असे मला वाटते आहे."

ते ऐकून दुर्मुखाला राग आला. तो म्हणाला—"मूर्खा! स्वतःच्या जिवापेक्षा राज्याची हद्द मोठी आहे का?" असे म्हणत त्याने आपल्या घोड्याला जोराने एक चाबूक ओढला.

तिकडे भल्लूक मांत्रिकाने सैनिकाच्या पाठीवर मंत्रदंडाचा प्रहार केला. तो सैनिक मंत्रदंडाचा वार असह्य होऊन मोठ्याने ओरडला. तेव्हा मांत्रिक त्याला म्हणाला—"मी या सैनिकाच्या पाठीवर जो लेप लावला होता, तो ह्याने बिघडवून टाकला. काही हरकत नाही. तुम्ही स्वतःच्या डोळ्यांनी आपल्या राजाला पळून जात असलेला पाहिलेत ना? मग तुम्हांला काय म्हणायचे आहे?" मांत्रिकाने दलनायक व त्याच्या सैनिकांना विचारले.

भल्लूक मांत्रिकाच्या शक्तीची आतां चांगली ओळख झाली असल्या कारणाने दुर्मुखाचे सर्व सैनिक एक स्वरात म्हणाले—"आपणच सांगावे, आम्ही काय करावे?"

"तरमग तुम्ही सर्व माझ्याबरोबर चंद्रशिला नगरीकडे चला. तिथल्या जितकेतू राजाचे डोके ठिकाणावर आणायचे आहे. तरमग ऐका, या क्षणापासून तुमचा पुढारी कालीवर्मा आहे." भल्लूक मांत्रिकाने आज्ञा केली.

त्यानंतर सर्व चंद्रशिला नगरीकडे वळले. त्यावेळी तिकडे जंगलात दुर्मुख व त्याचा अंगरक्षक दोघांना झाडावर लपून बसलेला



लुटारूंचा पुढारी नागमल्ल याने पाहिले. म्हणाला–"समोरच्या घोड्यावर बसून येणाऱ्याच्या पोशाखावरून असे वाटते आहे की हा कोणी तरी श्रीमंत घराण्यातला असावा. त्याच्या पाठीमागून येणारा त्याचा नोकर असावा. आपण त्या दोघांना जिवंत धरले तर त्यांची सोडवणूक करून घेणाऱ्याकडून मोठी रक्कम काढता येईल."

त्यावेळी नागमल्लचा एक अनुयायी आपल्या हातातील दोरी हलवीत म्हणाला– "मालक, समोर जाऊन त्याना जिवंत धरणे सोपं नाही. त्यांच्या हातात तलवारी आहेत. म्हणून दोरीचा फास टाकून त्यांच्यापैकी पुढल्याला धरणे बरोबर नाही का होणार?"

"वाहवा! तू तर फारच चांगली युक्ती सुचविलीस. पहा, ते इकडेच येताहेत. तर मग तू फास टाकून पुढे येणाऱ्याच्या कंबरेला फास बसेल असा पकड आणि त्याला वर ओढून घे. दुसऱ्याला आम्ही दोघे पाहून घेऊ."

राजा दुर्मुख व त्याचा अंगरक्षक दोघांना कल्पनाच नव्हती की त्यांच्यावर कोणते संकट ओढवणार आहे. त्यांना वाटत होते की भल्लूक मांत्रिकाने सोडलेले फक्त अस्वलच त्यांच्या अंगावर येत आहे व तेवढाच धोका त्यांच्या जिवाला आहे. म्हणून दोघे त्या अस्वलापासून जितके दूर पळता येईल तितके दूर पळण्याच्या फिकीरीत होते.

दुर्मुख आपल्या घोड्यावर बसून लुटेरे होते त्या झाडाखालून जाऊ लागला तेव्हा नागमल्लाच्या अनुयायाने आपला फास त्याच्यावर फेकला आणि फास कंबरेला कसून बसल्यावर त्याने वर त्याला ओढून घेतले. घोडा पळत होता म्हणून पुढे निघून गेला. दुर्मुखाला कल्पनादेखील नव्हती की त्याच्यावर हे नवे संकट अचानक कोठून येत होते. त्याच वेळी नागमल्ल व त्याचा एक साथीदार आपापल्या तलवारी उपसून अंगरक्षकाच्या घोड्यासमोर उड्या टाकून उभे राहिले. (क्रमशः)



# पाप्याची पुण्याई

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजा! तू काहीतरी महापातक करून त्यातून मुक्ती मिळावी म्हणून इतके श्रम करीत आहेस का? कारण पापमुक्ती मिळावी म्हणून मागे शंभू असेच एक व्रत करून कष्ट सहन करीत होता. मी तुला त्याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

शंभू हा एका कोट्याधीशाचा मुलगा होता. बाप वारल्यावर पैशाने जो काही भोगविलास भोगणे शक्य आहे तो सर्व त्याने अनुभवला. सुखोपभोग घेण्यासाठी सर्व पापे केली. त्याने न केलेले असे अनीतीचे काम उरलेच नव्हते. अशातऱ्हेने देवा

धर्माची भीती न बाळगता शंभूने सर्व आयुष्य घालविले खरे, परंतु वार्धक्य येऊ लागले तसे त्याला आपल्या गत आयुष्याबद्दल दुःख वाटू लागले. तो विचार करू लागला की अगदी दीन दरिद्रीसुद्धा त्याला शक्य होईल तेवढे पुण्य कार्य करून परलोकात सुखप्राप्तीसाठी प्रयत्न करतो. परंतु आपण सर्व आयुष्य, सर्व साधनसंपत्ती प्राप्त असूनही फुकट घालविले आणि एकदेखील पुण्यकार्य केले नाही. तो पश्चात्ताप करू लागला.

त्याच्या जीवनात एकदम पालट होऊ लागला. भोगविलासापासून त्याचे मन विटले. उरलेले आयुष्य दानधर्म करण्यात घालवायचे त्याने ठरविले. शंभू म्हणजे महापापी असे समजणारी सर्व गावकरी मंडळी त्याच्यात हा बदल झालेला पाहून चकित झाली. त्याला दान धर्म व देवकार्य करीत असलेला पाहून लोक त्याला देवमाणूस मानू लागले. त्याच्या हातून दान घेणारे गरीब लोकदेखील आश्चर्य करू लागले. परंतु त्याच्या मुलांना मात्र शंभूचे हे काम मुळीच पसंत पडले नाही. त्याच्या बायकोला व मुलांना त्याला बुद्धिभ्रम तर झाला नाही असे वाटू लागले. त्यांना वाटे तो असाच दानधर्म करीत राहला तर घरातली सर्व संपत्ती तर जाईलच शेवटी राहते घरसुद्धा जाईल. म्हणून मुलांनी वाटे करून घ्यायचा आग्रह धरला. शंभूने त्या गोष्टीस नकार दिला नाही. पापमुक्ती हवी असेल तर ती स्वतःच्या मिळकतीचे दान करूनच मिळविली पाहिजे. असे त्याला वाटू लागले.

त्याने आपल्या इस्टेटीचे वाटे करून त्याचा म्हणून जो वाटा होता तो सर्व दानधर्म करण्यात खर्च करून टाकला. शेवटी राहते घरसुद्धा विकून टाकले, नंतर उरलेले आयुष्य तीर्थ यात्रा करीत घालविण्याचे ठरवून तो घरून निघाला.

तो अरण्यमार्गे जात असतां एक ब्रह्मराक्षस त्याची वाट अडवून म्हणाला—"तू कोणीतरी चांगला देवमाणूस दिसतो आहेस. माझ्यावर थोडी कृपा करशील का ?"

शंभू त्या ब्रह्मराक्षसाला पाहून थोडादेखील भ्याला नाही. त्याने विचारले—"काय, काय म्हणालास ?"

"मी आपल्या आयुष्यात अनेक पापकर्मे केली, म्हणून ब्रह्मराक्षस झालो. तुम्ही मला आपली पुण्याई दान करून मला पापमुक्ती द्यावी." तो ब्रह्मराक्षस म्हणाला.

"करतो, मी तुझ्या इच्छेप्रमाणे तुझ्या मनासारखे करतो." असे सांगून शंभूने अखेरच्या जीवनात जे पुण्य संपादन केले होते ते त्या ब्रह्मराक्षसाला दान केले.

परंतु ब्रह्मराक्षसाचे रूप पालटले नाही. तो हताश होऊन म्हणाला—"तू पुण्याई कमावली तरी होतीस का दान करायला ?"

परंतु तेवढ्यात आकाशातून एक दिव्य विमान उतरले. ब्रह्मराक्षस त्यात बसायला निघाला. परंतु सारथ्याने ब्रह्मराक्षसाला





बाजूला ढकलून विमानात शंभूला बसविले. ब्रह्मराक्षस पहात राहिला. विमान आकाशात उडता उडता अदृश्य झाले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, शंभूने आपले सवस्व दानधर्म करण्यात खर्च केले असूनही त्याला पुण्यप्राप्ती कशी काय झाली नाही? त्याने केलेल्या सर्व पापांपासून त्याला मुक्ती मिळण्यापुरता दानधर्म केला नव्हता का? किंवा त्याने स्वार्थ बुद्धीने दानधर्म केला म्हणून? त्याहून आश्चर्य म्हणजे ब्रह्मराक्षसाला मुक्ती मिळाली नाही आणि शंभू स्वतः स्वर्गलोकी गेला. या सर्व शंकाचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"शंभूला पुण्य-प्राप्ती झाली नाही असा विचार करणेच मुळात चूक. आपल्या पूर्वीच्या जीवनाबद्दल पश्चात्ताप करू लागला त्या क्षणापासून त्याने पुष्कळ पुण्य संपादन केले. त्याच्या मनातल्या कोणत्याही कोपऱ्यात स्वार्थ उरला नाही. तसे नसते तर त्याने त्याच्या बायकापोरांच्या वाट्याची इस्टेट सुद्धा स्वतः पुण्य संपादन करण्यासाठी खर्च केली असती. याहून जास्त महत्वाचा पुरावा म्हणजे, त्याच्या सारखीच पापकर्मे करून ब्रह्मराक्षसाचा जन्म ज्याला मिळाला होता त्याला पापमुक्त करण्यासाठी कमावलेली पुण्याई दान करायला तो तयार झाला. परंतु ब्रह्मराक्षसात स्वार्थबुद्धी राहून गेली होती. तो दुसऱ्याच्या पुण्याईवर स्वतःची मुक्ती करून घ्यायला तयार झाला होता. म्हणून त्याची इच्छापूर्ण न होता तो ब्रह्मराक्षसच राहला. या उलट तिळमात्र स्वार्थ न राहल्यामुळे शंभूसाठी देवांनी विमान पाठविले, त्यात आश्चर्य करण्यासारखे काही नाही."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# विधिलिखित घडलेच नाही!

मणिपूरचा राजा चंद्रसेन याचा ज्योतिषशास्त्रावर फार विश्वास होता. त्याने शेजारच्या राज्यावर स्वारी करायचे ठरवून ज्योतिष्याला भविष्य वर्तवण्यास सांगितले.

ज्योतिष्याने राजाची जन्मकुंडली पाहिली व म्हणाला–"महाराज! या वर्षी आपली ग्रहदशा चांगली नाही. शत्रूकडून पराभवाची लक्षणे आहेत."

राजाने कोणाला ते कळविले नाही व कोठेही स्वारीवर गेला नाही.

एक वर्ष लोटले. मंत्र्याने राजाला ज्योतिष्याने वर्तवलेल्या भविष्याची आठवण करून दिली न म्हणाला–"महाराज, आपण ज्योतिष्यांवर कधी विश्वास करू नका. गेल्या वर्षात आपला शत्रूकडून पराभव होईल असे भविष्य ज्योतिष्याने वर्तवले होते. परंतु आपण युद्धच केले नाही आणि आपला पराभवही झाला नाही.

तेव्हांपासून राजाचा ज्योतिषशास्त्रावरचा विश्वास उडाला.





# नुसता गोंधळ

विद्यावती आळशी नव्हती, परंतु तिला कोणतेही काम करावयाचे झाले की ती गोंधळून जाई तिला वाटे की तिला एक डोंगरच उचलावा लागणार आहे.

तिचा नवरा राजाच्या पदरी नोकरी करीत असे. सकाळी कामावर जाई तो रात्रीच परत येई. तो कामावर गेल्याबरोबर ती आपल्या शेजारपाजारच्या घरी गप्पा मारायला निघून जाई. ती आली म्हणजे सर्वांना गप्पा मारायला बरं वाटे. ती आली म्हणजे सर्व बायका तिला 'बसा हो, काय गर्दी आहे" म्हणत आणि आग्रहाने बसवून घेत.

"कसं बसा म्हणता हो? ते येतील त्याच्या आधी सैपाक नको का करायला?" असे सांगून तिच्या डोक्यावर जणुकाही फार मोठे काम येऊन पडल्याचा आव आणून ती बोले.

"सैपाक काय हो? तुम्ही दोघंच की!" असं म्हणत एक बाई तिला वाटीभर भाजी देई. दुसरी एकादी चटणी देई. तरी नवरा यायच्या आधी भात उकडणे तरी शक्य होईल का, असं तिला वाटे आणि नवरा आला की त्याच्या मदतीने तिचे काम पुरे होई.

कोणी तिला मदतीला बोलाविले की म्हणे—"अहो, आज त्यांचे कपडे धुवायचे आहेत हो!" म्हणून किंवा अजून भांडीसुद्धा घासली नाहीत म्हणून सांगे. सर्वांना तिच्या स्वभावाची चांगली ओळख झाली असल्याने कोणी तिला मदतीला बोलवीत नसे की तिच्या मदतीला जात नसे.

विद्यावतीला दोन नणदा होत्या. दोघींची लग्ने झाली होती व त्या सासरी नांदत होत्या. विद्यावतीच्या नवऱ्याचे बहिणींवर फार प्रेम होते. दोघींना भुइमुगाचे दाणे आणि लाह्या फार आवडत. त्यांच्या सासरच्या गावी त्या दोन वस्तू मिळत नसत.

विद्यावतीचा नवरा बहिणींसाठी एक डबा भरून शेंगा आणि एक डबाभर भात घेऊन आला आणि बायकोला म्हणाला—"माझ्या बहिणी येणार आहेत. त्या यायच्या आत तू या शेंगा सोलून आणि या भाताच्या लाह्या करून ठेव. त्या आल्यावर तुझ्या कामसूपणाची प्रशंसा करतील व आमची वहिनी किती मायेची आहे, म्हणतील. नुसती बसून तर असतेस एवढे काम तरी तू कर!"

विद्यावतीने होकार दिला खरा, परंतु कवढे मोठे कामाचे ओझे डोक्यावर येऊन पडल्यासारखे तिला वाटले. त्या कामाचीच गोष्ट तिला गोंधळून जायला पुरली. कोणाच्या घरी गेली की ती म्हणे—"माझ्या नणदा येणार आहेत हो. डबाभर शेंगा निवडावयाच्या व भाजून ठेवायच्या आहेत. डबाभर भाताच्या लाह्या करावयाच्या आहेत." ती कोणाला कधी मदत करीत नसे म्हणून कोणी मदतीला यायला उत्साह दाखविला नाही.

दररोज हे काम आज सुरु करावयाचे आहे असा ती विचार करी व कामाला हात घालण्या ऐवजी केवढं काम आहे हो, असा विचार करून हिंमत हारून बसे.



"केवढं काम आहे बाई! सुरू केले तर होऊन जाईल म्हणा!" असा विचार करी आणि गप्पा मारायला शेजारी पाजारी निघून जाई. परंतु स्वस्थपणे कोठे ही बसत नसे. सर्वांना सांगत सुटे की नणदा येणार आहेत व केवढी कामे पडलेली आहेत!

नणदा यायला आणखी आठदहा दिवसच उरले आहेत असा विचार करून विद्यावतीने कोणाच्या घरी बसायला जायचे बंद केले. बिचारीच्या डोक्यावर केवढी कामे येऊन पडली आहेत, म्हणून सर्व मैत्रिणी तिच्यावर कीव करीत. काही जणींना ती आली म्हणजे वेळ जायला बरे वाटत असे.

म्हणून त्या तिला बोलवायला जात. परंतु विद्यावती कामाच्या गर्दीत आहे असे दाखवून त्यांना अंगणातूनच निरोप देई.

एके दिवशी दुपारी एक गारुडी आला. गल्लीतल्या सर्व बायका गंमत पहायला धावल्या, परंतु विद्यावती त्या बाजूला फिरकलीसुद्धा नाही. "अहो, माझ्या नणदा यायच्या आहेत ना, पुष्कळ कामे आहेत." ती म्हणाली.

त्याच प्रमाणे काशीहून एक कासार आला किंवा कांचीपुराहून कोणी रेशमी लुगडी घेऊन आला तरी त्याच्याशी बोलायला किंवा भाव करायला सुद्धा विद्यावती घराबाहेर येत नव्हती. "नणदा येणार आहेत आणि एका क्षणभराची ही फुरसत नाही हो" असे सांगून सर्वांना पाठवून देई. नणदा बऱ्याच डोईजड असल्या पाहिजेत तर असे सर्वांना वाटे. तिच्या नणदा कशा आहेत, पाहिलं पाहिजे बाई, असा विचार करून त्या केव्हां येतात याची त्या वाट पहात होत्या.

[illegible] आल्या. त्या विद्यावतीशी कसे बोलतात, कशा वागतात पाहण्यासाठी गल्लीतल्या सर्व बायका विद्यावतीच्या घरी गेल्या. पहिल्याने डोकावून पाहून व नंतर घरात जाऊन व तिथले दृश्य पाहून थक्क झाल्या.

तिच्या नणदांपैकी एक शेंगा सोलीत बसली होती तर दुसरी लाह्या भाजीत बसली होती. विद्यावती इकडून तिकडे गर्दीने हिंडत होती.

गंमत पहायला आलेल्या बायकांपैकी एक म्हणाली "बाई बाई! इतके दिवस ही बाई एवढ्याच करता का घर डोक्यावर घेत होती आणि घराच्या बाहेर सुद्धा पडली नाही!"

"कामाचं नाव काढलं की माझे हातपाय गोठून जातात बाई! म्हणून मी घराच्या बाहेर पडले नाही." विद्यावती म्हणाली.

"आमची वहिनी म्हणजे नुसता गोंधळ हो!" नणदा सर्व कथा ऐकल्यावर म्हणाल्या आणि हंसू लागल्या.



# कर्जफेड

एकदा शिवूने बाजारात एक बकरी विकत घेण्यासाठी व्यंकूकडून दहा वराह कर्ज मागून घेतले. ती बकरी घरी गेल्यावर शिवू लौकरच मेली. म्हणून शिवूने कर्ज फेडण्याचे टाळायचे ठरविले. कर्ज मागायला जेव्हां जेव्हां व्यंकू येई तेव्हां तेव्हांची बायको 'घरात नाहीत हो,' म्हणून सांगे.

शिवूच्या घरासमोर गणू रहात असे. त्याने शिवूला धमकावले, "कायरे घरात राहून बायको करवी घरात नसल्याचे सांगतोस काय? मी व्यंकूला सांगतो बघ!" शिवूने त्याला एक वराह देऊन त्याचं तोंड बंद केले. परंतु तेवढ्यावर गणूचे तोंड बंद झालं नाही. तो कित्येक वेळा धमकावून एकेक वराह घेत गेला.

एके दिवशी व्यंकूची व शिवूची गाठ पडली. तेव्हां शिवू व्यंकूला म्हणाला–"मी लौकरच तुझे कर्ज फेडतो बाबा!"

"गणूने वसूल करून दिले की रे, तू नको आणखी द्यायला!" व्यंकू म्हणाला.





# कुचकामाचा मंत्री

एका मूर्ख राजाच्या दरबारात दोन मंत्री होते. त्यांच्यातला रंजन हा समजूतदार व शाहाणा होता व भंजन हा महामूर्ख होता. भंजन त्याच्या सारखाच मूर्ख होता म्हणून राजा नेहमी त्याच्याच सल्ल्याप्रमाणे वागे. त्यामुळे प्रजेला अनेक प्रकारचे कष्ट सहन करावे लागत. या दोघांच्या मुळे होणाऱ्या त्रासातून कसे मुक्त व्हायचे हा प्रश्न सदा सर्वांसमोर उभा असे.

चाणाक्ष नावाच्या एका तरुणाला एक उपाय सुचला. त्याने त्याला, राजकन्येशी त्याचा विवाह झाल्याचे स्वप्न पडले असल्याचे सांगायला सुरवात केली. ती बातमी राजाच्या कानावर पोचली. राजाने चाणाक्षला बोलावून विचारले–"कायरे, राजकन्येशी तुझे लग्न झाले असल्याचं तुला स्वप्न पडलं म्हणे? तू सर्वांना सांगत सुटला आहेस?"

"होय, दोन्ही गोष्टी खऱ्या आहेत! मला स्वप्न पडलं ही गोष्ट खरी आणि मी ती गोष्ट सर्वांना सांगितली ही गोष्ट ही खरी. माझ्या स्वप्नात ते होऊ देऊ नका महाराज, नाहीतर राजाचा जावई होणे मोठीच गोष्ट नव्हे का?" चाणाक्ष म्हणाला. राजाने आपल्या दोघां मंत्र्यांना सल्ला विचारला.

"महाराज, त्याला, राजकन्येशी त्याचा विवाह झाला असल्याचं स्वप्न पडलं त्यात काही चूक नाही. परंतु त्याने ती गोष्ट सर्वांना सांगत सुटणे ही गोष्ट दंड करण्यालायक आहे!" रंजन म्हणाला.

"एका सामान्य माणसाने राजकन्येशी विवाह करणे म्हणजे राजद्रोह आहे! याला फाशीची शिक्षाच दिली पाहिजे!" भंजनने सल्ला दिला. लगेच चाणाक्षची चौकशी करण्यासाठी जाहीर सभा झाली. गुन्ह्याची चौकशी पहायला लोकांची मोठी गर्दी जमली. चाणाक्षने जाहीरपणे कबुली दिली की स्वप्नात त्याचे लग्न राजकन्येशी झाले असल्याची गोष्ट खरी आहे. ते ऐकल्यावर राजा त्याच्यावर ओरडून म्हणाला–"काय रे, स्वप्नात राजकन्येशी विवाह करायला तू निघालास, तुझे हे धाडस?"

"महाराजांनी मला क्षमा करावी! यांत माझी चूक काहीच नाही. राजकन्येचे जोडे पुसायची लायकीही माझी नाही, हे मला कळते महाराज! मी 'नको नको' म्हणून कितीदा विनविले तरी तिकडे दुर्लक्ष करून आपल्या शेजारच्या राज्याचे अधिपती भल्लूकवर्मा यांनी माझा व राजकन्येचा विवाह समारंभ उरकून घेतला! आतां मी तरी काय करू महाराज? आपणच सांगावे!" चाणाक्ष म्हणाला.

ते ऐकून राजा संतापून म्हणाला–"त्या भल्लूकवर्माची चरबी चढलेली दिसते आहे. ती उतरविलीच पाहिजे. रंजन मंत्री, काय वाटतं तुम्हांला?"

"महाराज, अहो ते स्वप्नच होते नाही का? विनाकारण शेजारच्या राजाशी वैर करून घेण्यात राज्याचं हित नाही. महाराजांच्या गौरवाला कलंक लावणाऱ्या या चाणाक्षाला आपण काहीतरी शिक्षा करावी, एवढे केले की पुरे." रंजन म्हणाला.



"भंजन मंत्री, या बाबतीत आपण काय करावं?" राजाने विचारले.

"महाराज, या भल्लूकाला क्षमा केली तर आपल्याला भितरा, कापुरुष म्हणतील! त्याचं डोकं उडवावं!" भंजन म्हणाला.

राजा सेनापतीकडे वळून म्हणाला–"सेनापती, तावडतोब सैन्याला सज्ज व्हायला आज्ञा करा आणि राजपुरोहिताला विचारून स्वारीसाठी चांगलासा मुहूर्त सांगायला सांगा. सर्व गोष्टी लौकर झपझप झाल्या पाहिजेत!"

चाणाक्ष मध्येच म्हणाला–"महाराज, आपण माझ्या स्वप्नाची गोष्ट पुरी पुरी ऐकली नाहीत. भल्लूकवर्माने माझं लग्न

कसं लावून दिलं, वाटलं आपल्याला? तो पहिल्याने आपल्या राज्यावर ससैन्य चालून आला व या रंजन व भंजन मंत्र्यांच्या समोरच आपला वध केला. तेव्हा आपल्या-वरच्या पूर्ण विश्वासामुळे रंजन मंत्री म्हणाला–'देवासारखे आमचे महाराजच गेले, तर मी जिवंत राहून तरी काय करणार?" असा विचार करून रंजन मंत्रीवर्यांनी आत्महत्या करून घेतली."

ते ऐकून राजाने आनंदाने रंजन मंत्र्याला आलिंगन करून विचारले–"त्या वेळी भंजन मंत्री काय करीत होते?"

चाणाक्ष डोळे पुशीत म्हणाला–"सर्व प्रजा आपल्या विरहाने दुःखी होऊन रडत असता भंजन मंत्रीवर्य 'मी शरण मागतो आपल्या चरणांजवळ म्हणत भल्लूकवर्माच्या पायां पडले. भल्लूकवर्माने त्यांना आपला मंत्री करून घेतले. भंजन मंत्रीवर्य भल्लूक-वर्माचा जयजयकार करू लागले.

राजाचे डोळे आणखी लाल झाले. म्हणाला–"इतका विश्वासघातकी आहे का हा [illegible] च्छेदाचीच शिक्षा करायला हवी!"

"शिव शिव!" रंजन मंत्री म्हणाला.

"तुम्हांला काय वाटतं रंजन मंत्री?" राजाने विचारलं संवयीप्रमाणे.

राजाच्या मूर्खपणाची चांगली ओळख असल्या कारणाने भंजन मंत्री थरथर कापत म्हणाला–"महाराज! कीव करावी, दया करावी महाराज! जिवंत सोडलात तर आपल्या अनुज्ञेने कोठेतरी दूर निघून जाईन, सुखाने आयुष्य घालवीन."

भंजनाने त्याच दिवशी राज्याबाहेर पलायन केले. तो राज्यसभेतून निघून गेला त्या दिवशीच राजाने रंजनमंत्र्याला विचारले–"या चाणाक्षाला काहीतरी चांगलंसं इनाम द्यावं म्हणतो आहे!"

"बदनामी व्हायची ती झालीच आहे, याच्याशीच राजकन्येचा विवाह करून द्यावा!" रंजनमंत्री म्हणाला. त्यावेळी तो कृतज्ञता दर्शवीत चाणाक्षकडे पहात होता.



# स्वकीय-परकीय

एका गावी एक सोनाराचे आणि एक लोहाराचे अशी दोन दुकाने शेजारीशेजारी होती. एकदा सोनार आपल्या लहानशा हतोडीने सोन्यावर ठोकीत असता सोन्याचा एक कण उडून लोहाराच्या दुकानात जाऊन पडला.

तो कण जेथे पडला, त्याच्या शेजारीच एक लोखंडाचा कण पडला होता. तो सोन्याच्या कणाला म्हणाला–"काय रे छोटू तू आपलं दुकान सोडून असा इकडे का आलास?"

"काय सांगू रे दादा? मला निखाऱ्यात घालून खूप तापवून ठोकतात! ते असह्य झाल्यामुळे इकडे उडून येऊन पडलो. आणखी कष्टदायक हे वाटलं की मार बसतो तो आपल्या स्वकीय सजातीयाकडून नसून दुसऱ्याच एका जातीच्या कडून!" सोन्याचा कण म्हणाला.

"मला जे कष्ट सहन करावे लागत आहेत ते मी कोणाजवळ बोलून दाखवीत नाही. मला विस्तवात घालून तापवितात आणि माझा ताप कमी व्हायच्या आधीच घणाचे घाव माझ्या डोक्यावर घालतात. ते घाव दुसऱ्या जातीच्याकडून पडले असते तरी मी सहन केले असते; परंतु माझा स्वकीयच माझ्याशी द्रोह करतो!" लोखंडाचा कण म्हणाला.



# जयपराजय

कीर्तिवर्माच्या मनात सर्व जग जिकण्याची महत्वाकांक्षा होती. राजाचे मन पालटणे आपल्याला शक्य नाही, हे ओळखून प्रधानाने राजाला सावध करून सुचविले–"आपले कुलगुरु राजर्षीचा सल्ला घ्यावा, हे बरं होईल."

कीर्तिवर्माने कुलगुरूच्या आश्रमात जाऊन आपल्या निश्चयाची गोष्ट सांगितली.

कुलगुरू म्हणाले–"राजा, तू आपल्या क्रोधाला जिंकू शकलास तर नक्कीच सर्व जग जिंकू शकशील. तू क्रोधावर प्रथम जय मिळव आणि त्यानंतर मला भेटायला ये. जग कसे जिंकायचे हे मी तेव्हा सांगेन."

एका पंधरवड्यानंतर कीर्तिवर्मा पुन्हा कुलगुरूच्या दर्शनाला जाऊन म्हणाला–"गुरुवर्य! मी क्रोधावर जय मिळविला आहे. आतां जग जिंकायचा मार्ग दाखवा!"

"राजा, क्रोध जिंकणे तुला शक्य नाही हे ओळखूनच मी तुला तसे सांगितले होते. वास्तविक जगाला जिंकण्याचा मार्ग मला मुळीच माहीत नाही." कुलगुरू म्हणाले.

कीर्तिवर्माने संतापून तलवार उपसली व म्हणाला–"माझ्याशी थट्टा करतां?"

"थांब, राजा! म्हणजे तू क्रोधाला जिंकू शकला नाहीस, जगाला जिंकणे शक्य होईल का?" कुलगुरू म्हणाले.





# दशावतार

परमात्मा त्रिमूर्तीचे रूप घेऊन सृष्टी, स्थिती व लय करतो. ब्रह्मा होऊन जगाची सृष्टी करतो; विष्णू होऊन पोषण करतो आणि महेश होऊन लय करतो आणि नवी सृष्टी होण्यास संधी देतो. सृष्टीचा क्रम चालू रहावा यासाठी विष्णू मधून मधून अवतार घेतो. एकदा प्रलय झाला आणि सर्व जग बुडाले तेव्हां विष्णूने मत्स्यावतार घेऊन मनूला, सप्तर्षींना आणि इतर प्राण्यांना वाचविण्यासाठी ते ज्या नावेवर बसले होते ती नाव हिमालयाच्या शिखरावर पोचती केली. मनूने मनुष्य प्राण्यांची पुन्हा सृष्टी केली.

एका राक्षसाने वेद चोरून नेऊन समुद्रात लपवून ठेवले तेव्हा मत्स्यावताराने त्या राक्षसाचा वध करून ते वेद मनूला आणून दिले.





मंदारपर्वताची रवी करून आणि सर्पराज वासुकीची दोरी करून अमृतप्राप्तीसाठी देव व दानवांनी समुद्रमंथन केले तेव्हां मंदारपर्वत पाण्यात बुडू लागला. तेव्हां विष्णूने कूर्मावतार घेऊन तो पर्वत आपल्या पाठीवर घेतला व बुडू दिला नाही.

आणखी एकदा हिरण्याक्ष नावाच्या राक्षसाने पृथ्वीला गुंडाळले आणि समुद्रात बुडविले. तेव्हां विष्णूने वराह अवतार धारण करून त्या राक्षसाचा वध केला आणि भूदेवीचा उद्धार केला.





हिरण्याक्षचा धाकटा भाऊ हिरण्यकशिपु हा विष्णूचा द्वेष करी. परंतु त्याचा मुलगा प्रल्हाद थोर विष्णुभक्त होता. विष्णू हा सर्वव्यापी आहे असे प्रल्हाद म्हणे. ते खोटे आहे हे दर्शविण्यासाठी हिरण्यकशिपूने एक खांब तोडला. त्या खांबातून विष्णूने नरसिंह रूपें प्रगट होऊन हिरण्यकशिपूचा वध

जिंकला आणि देवांना स्वर्गातही उभे रहायला जागा ठेवली नाही. परंतु तो थोर दानी होता. कोणी काहीही मागितले तरी देत असे. विष्णूने वामन रूपे येऊन बलीजवळ तीन पावले जागा मागितली. बलीने दिली. वामनाने एका पावलाने पृथ्वी व्यापिली, दुसऱ्या पावलाने आकाश व्यापले व तिसरे पाऊल ठेवायला जागा नव्हती म्हणून बलीच्या मस्तकावर पाऊल ठेवून त्याला पाताळात पाठवून दिले.





एकदां क्षत्रियांना त्यांच्या पराक्रमाचा मद चढला. ते ऋषीमुनींना त्रास देऊ लागले. तेव्हां विष्णूने परशुरामाचा अवतार धारण करून ऋषिकुमार रूपे क्षत्रियांचा संहार केला.

त्यानंतर रामाने अवतार घेतला आणि आदर्शपुरुष म्हणून आयुष्य घालविले. त्याने पितृप्रेम, भ्रातृप्रेम यांच्या आदर्शाबरोबर एक आदर्श राजा म्हणून प्रसिद्धी मिळविली. तो पराक्रमीही होता.





त्यानंतर विष्णूने कृष्णावतार घेऊन असत्याचा पराजय आणि सत्याचा जय प्रत्यक्ष दाखविला. त्याने अर्जुनाला सांगितलेली गीता पुढे सर्वांना मार्ग-दर्शन करू लागली.



विष्णूने बुद्ध रूपे अवतार धारण केला व प्रजेला मुक्तीचा मार्ग दाखवून अहिंसेचा उपदेश केला. जीवनात जी दुःखे भोगावी लागतात ती कशी सहन करावयाची हे बुद्धानेच दाखविले.



मानवातील पैशाचिक वृत्ती अद्याप नष्ट झाली नाही. विष्णूने कल्कीचा अवतार घेऊन मानवातील दुष्ट शक्तींचे निर्मूलन करून पृथ्वीवर आदर्श जीवन स्थिर केले.



## राज्याचे क्षेमकुशल

सूर्यवर्मा नावाचा एक राजा काशीचा राजा होता. त्याला मूलबाळ काही नव्हते. परंतु ईश्वरकृपेने बरेच दिवसांनी एक मुलगी झाली. राजाने तिला लाडात वाढविले. मुलगी मोठी झाली तेव्हां तिचे लग्न करणे आवश्यक होते. राजाच्या नातेवाइकात कित्येक सरदार मंडळी होती. त्यांच्या घराण्यातल्या तिघांनी राज-कन्येला मागणी घातली. त्या तिघांची नावे अनुक्रमे अजयकुमार, विजयकुमार व सुधीरकुमार अशी होती. राजकन्येचे नाव रूपवती होते.

सूर्यवर्मा तिघांना भेटायला बोलावून म्हणाला–"तुम्ही एक वर्षभर देशाटन करून राज्याच्या हिताच्या दृष्टीने कोणती तरी विद्या शिकून या. ज्याची विद्या मला सर्वोत्तम वाटेल त्याच्याशी मी रूपवतीचे लग्न करून देईन."

तिघे निरनिराळ्या मार्गांनी तीन दिशांना देशाटन करून एका वर्षाने परत आले. राजाने तिघांची उतरण्याची व्यवस्था तीन निरनिराळ्या जागी केली. त्याने तिघांना एकेकट्याने बोलावून त्यांनी कोणत्या विद्येत प्राविण्य संपादन केले आहे ते विचारले."

अजय म्हणाला–"मी एक अद्भुत मंत्र शिकून आलो आहे. त्या मंत्राचा जप केला की भूकंप होतो. शत्रूने कधी स्वारी केली तर शत्रूचा नाश करणे शक्य होईल."

"गरज भागल्यावर भूकंप थांबविण्या-साठी तो मंत्र परत कसा घ्यायचा?" राजाने विचारले. अजयचे तोंड उतरले. कारण त्याच्या जवळ उत्तरच नव्हते.

विजयनेसुद्धा एक अद्भुत मंत्र शिकून आल्याचे सांगितले. त्या मंत्राच्या बळाने अतिवृष्टी करता येते, म्हणे, नद्यांना प्रलयासारखा पूर येतो.

"तो मंत्र परत घ्यायचा झाला तर?" राजाने विचारले, तेव्हा विजयने ते त्याला माहीत नसल्याचे सांगितले.

सुधीरने कोणतीही अपूर्व विद्या संपादन केली नव्हती. परंतु तो एका गोष्टीची चांगली माहिती काढून घेऊन आला होता. राजाने विचारतां तो म्हणाला–"महा-राजांच्या राज्यव्यवस्थेत कोणकोणते दोष आहेत, हे मी प्रजा आपसात बोलत असतां टिपून घेतले आहे. राज्यात सुख व शांतता नांदावी यासाठी हे दोष प्रथम दूर केले पाहिजेत असा माझा सल्ला आहे."

ते ऐकून राजा संतापला आणि त्याने सुधीरला तुरुंगात टाकले. नंतर त्याने अजय व विजय दोघांना बोलवून घेतले व म्हणाला–"तुम्ही शिकून आलां आहां ती विद्या खरोखरच अद्‌भुत आहे, यात शंका नाही. तुमच्या पैकी एकाची निवड रूपवती करील." असे सांगून त्याने त्या दोघांना स्वत: बरोबर दारू प्यायला बोलाविले.

आपल्या समोर ठेवलेला मद्याचा प्याला पीतच अजय व विजय दोघे मरून पडले. त्या दारूत विष कालवलेले होते. मंत्री ते सर्व पहात होता. म्हणाला–"महाराज, हे केवढे घोर कृत्य केलेत?"

राज्याचे कल्याण व हित होईल अशी एखादी विद्या शिकून यायला या दोघांना सांगितले होते तर हे दोघे हिरण्याक्ष व हिरण्यकशिपूपेक्षाही जगाला तापदायक होईल अशी विद्या शिकून आले. यांचा काटा काढून टाकला तर त्याने जगाचं जे हित होईल." ते इतर कोणत्याही कृतीने होणार नाही.

त्याने सुधीरला कैदेतून आणायला सांगितले व त्याला म्हणाला–"तू म्हणालास तेच बरोबर आहे. माझ्या राज्यव्यवस्थेत अनेक दोष आहेत होते. तू राज्यव्यवस्था कशी सुधारावी हे शिकून आलास. यावरून तूच राज्यव्यवस्था करण्यास योग्य आहेस. मी तुझ्याशीच रूपवतीचे लग्न करून देतो."

त्यानंतर रूपवती व सुधीरचा लग्न समारंभ थाटामाटाने झाला.



# प्रेमात लबाडी

रामू व श्यामू दोघे मित्र होते. दोघांची मिळकत समानच होती तरी श्यामूला जे समाधान होते ते रामूला नव्हते. एकदा श्यामूने रामूला दहा रुपये देऊन आपल्याजवळ ठेव म्हणून सांगितले.

एक वर्ष लोटल्यावर त्याला पैशाची गरज भासली म्हणून श्यामूने रामूला त्याचे पैसे परत द्यायला सांगितले. श्यामूने पैसे दिले तेव्हा कोणी साक्षीदार नव्हते हे सांगून रामू म्हणाला–"तू मला पैसे केव्हां दिलेस ते मला आठवत नाही बुवा! कोणी साक्षीदार असेल तर बोलावून घेऊन ये."

रामूच्या मनातला दुष्ट हेतू ओळखून श्यामूने गावच्या पाटलाकडे फिर्याद केली. पाटलाने रामूला बोलावून विचारले तेव्हा रामू म्हणाला–"मला श्यामूने पैसे दिलेच नाहीत. खोटे बोलतो आहे."

"श्यामूने तुला पैसे दिले तेव्हा तेथे वीसजण होते ते पहायला." पाटील म्हणाला.

रामू आश्चर्यचकित होऊन म्हणाला–"असे कसं म्हणतां हो! मी श्यामूकडून पैसे घेतले तेव्हा तेथे एकजणही नव्हता." आणि आपोआप त्याची लबाडी बाहेर पडली.





# आईचे हृदय

कांतूला व तिच्या नवऱ्याला संक्रांतीला या म्हणून तिच्या वडिलांनी निरोप पाठविला. कांतूच्या नवऱ्याला ऑफिसची कामे फार होती म्हणून त्याला जाणे जमले नाही. म्हणून तो कांतूला म्हणाला–"मला येणे जमणार नाही. तू एकटीच जाऊन ये. तुझ्या दुसऱ्याबहिणी येतील, सर्वांना बरं वाटेल." म्हणून कांतू लग्न झाल्यानंतर चार वर्षांनी एकटीच माहेरी निघाली.

कांतूचा पती सदाशिव गरीब होता. कांतूच्या सर्व मोठ्या बहिणी श्रीमंत घराण्यात पडल्या होत्या. लग्न झाल्यानंतर अगदी पहिल्यानेच ती माहेरी जात होती, म्हणून तिने वडिलांसाठी एक धोतर जोडी व आईसाठी एक खण विकत घेतला.

ती माहेरी पोचल्यावर आईने पुढे येऊन तिला मायेने पोटाशी धरले नाही. फक्त एवढेच म्हणाली–"ये, आत्तांच आलीस होय?" आणि आपल्या कामाला लागली. तिच्या मोठ्या बहिणी आईच्या चारी-बाजूला घोळका करून त्यांच्या गावातल्या गमतीजमती तिला सांगत होत्या. त्यांनी कांतूला पाहून विचारले–"काय ग कांतू? आमच्या मेहुण्यांनी प्राप्ती काही वाढविली का ग? की तुला उपाशी ठेवताहेत?" आणि हसू लागल्या.

कांतूला ते ऐकून जीव द्यावासा वाटला. परंतु हसण्याचा आव आणून त्यांना उत्तर देऊन हातपाय धुतले आणि घरात येऊन बसली. हे आपले माहेर! याचा एवढा अभिमान बाळगून मी आले, अगदी चूक केली.

सर्व जेवायला बसले तेव्हा मोठ्या बहिणी निःसंकोचपणे लाडू वगैरे पक्वान्न मागून हसत खिदळत खूप खात होत्या. परंतु कांतूला तेवढा मोकळेपणा वाटला नाही. तिने मागितले नाही, एक तऱ्हेने हेच बरे झाले. कारण तिच्या आईने मोठ्या बहिणींना मात्र आग्रह कर करून वाढतांना म्हटले की "तुला नाही का वाढणार का ग?" आणि कांतूला येऊन विचार-पूसही केली नाही.

रात्री मोठ्या बहिणींना झोपायला खाटांवर अंथरुणे घातली, परतु कांतू आपला पदर पसरून त्यावरच रात्रभर पडून राहिली.

भोगीच्या दिवशी सर्वांची न्हाणी झाली व त्यानंतर कांतूने विचार केला उरलेल्या रीठ्याच्या फेसाने आपण न्हाऊन घ्यावे आणि न्हाऊन घेतले.

नंतर तिने वडिलांसाठी आणलेली धोतर जोडी काढून इतर सर्वजण पहायला नव्हते तेव्हां वडिलांना म्हणाली–"बाबा, हे मी तुमच्यासाठी आणलं आहे." आणि त्यांना दिले.

कांतूच्या वडिलांनी जास्त काही चौकशी न करतां ती धोतरजोडी घेतली व दोरीवर टाकून म्हणाले–"इतर सर्वजण जेवायला बसल्या आहेत वाटतं, तुसुद्धा जाऊन जेव." म्हणत बाहेर निघून गेले.

कांतू निराश होऊन दोरीवरच्या धोतराकडे पहात असतां तिकडे तिची आई आली. तिच्यासाठी आणलेला खण तिला द्यावा असा ती विचार करीत असतां कांतूच्या आईच्या हातात तिला रेशमी साडी दिसली. कांतूच्या आईने आपली पेटी उघडून तीत ती साडी नीट घडी करून ठेवली.










"आई, हा मी तुझ्यासाठी आणला आहे ग!" म्हणत कांतूने बरोबर आणलेला खण आईच्या हातात दिला. आईने तो घेतला व मुलीकडे मायेने एकदां पाहिले सुद्धा नाही व दोरीवर पडेल असा टाकला. तिने आणून दिलेला खण आईने परटिणीला आणि वडिलांसाठी आणलेले धोतर आणखी कोणालातरी देतांना कांतूने पाहिले.

त्या घरात आपण पूर्णपणे परके आहो, असे कांतूला वाटले. तिला तेथे राहणे असह्य झाले आणि संक्रांतीच्या दुसऱ्याच दिवशी आईवडिलांचा व मोठ्या वहिणींचा निरोप घेऊन ती आपल्या सासरी निघाली.

आपल्या पतीला भेटतांच तिचा दुःखावेग वाढला. तिने रडतरडत तिला माहेरी जो अपमान सहन करावा लागला तो सांगितला.

सदाशिवने विषय बदलला व बायकोचे सांत्वन करून तिने बरोबर आणलेले बोचके सोडले. त्यात कांतूच्या कपड्याच्या खाली रे[illegible] बरोबर एक चिट्ठी होती. चिट्ठीत लिहिलेला मजकूर असा होता :

"कांतू, माझे आई! मला क्षमा कर! गेली चार वर्षे पीक चांगले न निघाल्याने प्राप्ती फार कमी झाली. तुझ्या मोठ्या बहिणी त्यांच्या नवऱ्यांना व सासरच्यांना काही कळविल्याशिवाय आमचा सर्व खर्च भागवीत आल्या. तुझ्या बहिणींच्यासारखाच तुझा आदर सत्कार आम्ही केला असता तर आम्हांला त्यांचा जो आज आधार आहे तोही जाईल अशी भीती वाटली आम्हांला. तू तुझी स्थिती चांगली नसूनही माझ्यासाठी खण व आपल्या बाबांसाठी धोतर आणलेस यावरून तुझे मन किती मोठे आहे हे कळतं! परंतु तुझ्या बहिणींचं मन राखण्यासाठी ते कापड कोणाकोणाला देऊन टाकल्याचं नाटक मी केलं. त्या गेल्यावर त्यांनी ते आम्हांला परत आणून दिलं. तुम्ही जेथे असाल सुखासमाधानाने रहा."

—तुझी सौ. आई





# चोर सापडला

रुद्रपूरचे महाराज जयपाल यांची बायको रूपमती हिच्याजवळ एक अत्यंत सुंदर अशी गुलाबी रंगाची एक मोत्याची माळ होती. ती नेहमी झोपते वेळी तो काढून आपल्या उशीच्या खाली ठेवून देत असे. तो हार तिला फारच आवडे.

जयपाल फार मोठा भाग्यशाली होता. त्याची बायको रूपलावण्यवती होती. त्यांचा मुलगा शक्तिपाल दहा वर्षांचा होता तो सुद्धा रूपवान होता. प्रजेला आपल्या राजाबद्दल फार अभिमान वाटे. राज्यात सर्वदा सुखशांती नांदत असे.

एकदां जयपाल आपल्या लव्याजम्यासह राणीला बरोबर घेऊन शिकारीला गेला. त्या दिवशी आपत्काळाला सुरवात झाली. दुपारपर्यंत शिकार फार उत्तम तऱ्हेने चालू होती. पण ऐन दुपारच्या वेळी सर्व विश्रांती घेत असतां एकाएकी फार मोठे तुफान आले. शिकारीसाठी म्हणून बरोबर आणलेले हत्ती व घोडे आवरणे अशक्य झाले. राजा ज्या रथात बसला होता तो रथ एका झाडाला टक्कर लागल्याने त्याचे एक चाक मोडले. जयपाल लगेच एका घोड्यावर बसला. घोडा बिथरला व वाट फुटेल तिकडे पळू लागला. एका झाडाची फांदी खाली वाकलेली होती तिच्यावर डोके आपटून राजा खाली पडला, परंतु उठून हळूहळू चालत एका ओढ्यापर्यंत गेला. मुसळधार पाऊस पडत असल्याने ओढा तुडुंब भरून वहात होता. राजाला चांगले पोहता येत होते, तरी बरेच रक्त वाहून गेल्यामुळे क्षीण वाटत होता. म्हणून तो ओढ्याच्या धारेत बेशुद्धावस्थेत वहात चालला होता.

तो शुद्धीवर आला तेव्हा त्याच्या डोक्याची जखम थोडी दुखत होती. तो काळवत्री दगडाने बांधलेल्या एका घरात













होता. सामान्य कपडे घातलेली एक सुंदर मुलगी त्याचे पाय चेपीत होती.

त्याने डोळे उघडलेले पाहून आनंद झाल्यासारख्या स्मित वदनाने तिने विचारले–"पुन्हां तू या जगात आलास म्हणायाचा! गेले चार दिवस आम्ही तुझ्यासाठी फार काळजीत होतो. आमच्या घाटावर तुला आम्ही पाहिले तेव्हां, तू अगदी शेवटच्या अवस्थेत होतास. आतां तू आहेस तो राजवाडा सोनपूर अरण्याचा राजा फकीरा याचा आहे. मी राजवैद्यांची मुलगी आहे. माझे नाव मंजरी. तुझी तब्येत चांगली सुधारायला कमीत कमी एक महिना तरी लागेल. माझ्या बाबांनी जी मुळी दिली आहे तिच्या मुळे तू चांगला बरा होशील. मी तुझ्या सेवेला रात्रंदिवस राहीन. कोणत्या कारणाने नकळे, तुला पाहिले त्या क्षणापासून माझे मन तू हरण केले आहेस. म्हणून मी स्वतः तुझी सेवा-शुश्रूषा करीत आहे. परंतु तू कोण आहेस, हे मला माहीत नाही. तू कोण तुझे नाव काय हे कळलं असते तर तुझ्या नातेवाइकांना कळविले असते."

मंजरीचा बाप आला. तो म्हणाला–"तुझा चेहरामुहरा पाहून व तुझा पोशाख पाहून तू कोणी कुलीन घराण्यातला दिसतो आहेस. तू कोण हे आम्हांला कळलं तर तुला तुझ्या घरी पोचते करूं."

आपली खरी ओळख दिली तर त्यात धोका असे आहे वाटल्याने जयपाल म्हणाला–"माझे बाबा विक्रमपूरचे एक व्यापारी आहेत. मी एका कामानिमित्ते जात असतां वाटेत माझ्यावर हा प्रसंग गुजरला."

तो म्हणाला ते सर्व त्यांना खरे वाटले. मंजरी त्याच्या सेवेत जास्त लक्ष घालू लागली. तिने केलेल्या सेवेबद्दल त्याचे हृदय कृतज्ञतेच्या भावनेने भरून गेले. तिच्या या ऋणातून कसे मुक्त व्हायचे हे त्याला कळेना. आपण येथून पळून जायचे झालं तर मंजरी एकटीच आपल्याला मदत करील. तिचे त्याच्यावर अपार प्रेम जडले असल्याचे अनेक दाखले त्याला स्पष्ट दिसत होते. म्हणून त्याने पळून जायचे ठरविले तर मंजरीच्यामुळे त्याला स्वतः धोक्यात पडण्याची भीती वाटत होती. परंतु मंजरीला हरकत नसेल तर तिला बरोबर रुद्रपूरला नेता येईल. त्यांच्या दोघांच्या विवाहास, सर्व परिस्थितीचा विचार करून रूपमती विरोध करणार नाही.

जयपाल त्याची प्रकृती चांगली सुधारल्यावर मंजरीला म्हणाला–"माझं जीवित निराळ्या प्रकारचे आहे. तुमच्या येथील जीवनात कायम राहणे मला शक्य नाही. मी गेले पाहिजे. मला तुझ्या मदतीची गरज आहे. मी निघून गेल्यावर सर्व तुझी निंदा करतील. तुला कशी शिक्षा करतील त्याची कल्पना करवत नाही."

"माझा वधच करतील. परंतु ती शिक्षा मी आनंदाने सहन करीन. मी तुझ्यावर प्रेम केले. तू आपल्या लोकांबरोबर सुखी व्हावे, हे मलाही वाटते." मंजरी म्हणाली.

"मी माणूसच आहे, पशू नाही. तुझं जसं माझ्यावर प्रेम आहे तसं माझं तुझ्यावर आहे. माझ्या परवानगीने आमच्या देशात चल. तू माझ्याबरोबर मोठ्या बायकोच्या परवानगीने मी आमच्या पद्धतीने तुझ्याशी लग्न करीन. तुला काही हरकत आहे का मंजरी?" जयपालने तिला विचारले.

मंजरी आनंदाने कबूल झाली.

एके दिवशी काळोख्या रात्री दोघं निघाली. पुष्कळ दिवस प्रवास करीत दोघं





रुद्रपूरला येऊन पोचली. जयपाल म्हणाला—"इतके दिवस मी तुला सांगितले नाही त्याबद्दल तू क्षमा कर, मंजरी मी रुद्रपूरचा राजा आहे."

"मी ते माहीत नसल्याने काही चूक केली असेल तर मला त्याबद्दल क्षमा करा." मंजरी म्हणाली.

रुपमतीला आवडले नाही तरी तिने परवानगी दिल्यावर जयपाल व मंजरीचा विवाह झाला.

मंजरी सभ्य कुटुंबात कसं रहायचं हे लौकरच शिकली. ती सर्वांशी प्रेमाने वागे. राजकुमार शक्तिपाल हा तिला आईसारखा मानू लागला व ती त्याला स्वतःच्या मुलासारखी मानू लागली. आपल्या पेक्षा मंजरीचा आदर राजवाड्यात व अंतःपुरात वाढत चाललेला पाहून रूपमतीच्या मनात ईर्ष्याग्नी पेटू लागला. एक दिवशी सकाळी ती जागी झाली तेव्हा तिची मोत्यांची माळ कोणीतरी काढून नेली असा तिने ओरडा सुरू केला. तो आरोप मंजरीवर लावण्याच्या हेतूनेच तिने तो डाव टाकला होता.

राणी सरकारांची मोत्याची माळ हरवल्याचे कळताच पाहारेकरी घाबरून गेले. परंतु मंजरी म्हणाली—"मी चोराला पकडते. मी जंगलातून आले नाही का? आम्हांला कित्येक मंत्र येतात. चोराला पकडण्यापूर्वी मी आजच आपल्या मंत्रबळाचे प्रदर्शन करते. सर्वांनी राजवाड्याच्या दिवाणखान्यात यावे.

त्या दिवशी संध्याकाळी तिने आपल्या पतीला ती काय करणार आहे हे सांगितले. दुपारनंतर दिवाणखान्यात लोकांची गर्दी जमली. मंजरी डोळ्यांवर एक पट्टी बांधून आली. राजासमोर एका मोठ्या टेबलावर अनेक वस्तू ठेवलेल्या होत्या—लहान मोठ्या पंचवीस एक असतील. मंजरीने सांगितल्या-प्रमाणे राजाच्या कुटुंबांतील एकाने पुढे येऊन एकेका वस्तूला हात लावला? कोंबडीचं अंडं, छत्री की पेला?"

मंजरी म्हणाली—"पेला!" उत्तर बरोबर होते.

आणखी एकदां विचारले—"मंजरी, हात लावलेली वस्तू कोणती? पंखा, पिशवी, पेला, अंडे ग्लास, दौत की मेणबत्ती..., आणि...?"

"मेणबत्ती!" मंजरी म्हणाली. ते बरोबर होते.

अशातऱ्हेने मंजरी बरोबर उत्तर देत गेली. सर्व तिचे मंत्रबळ पाहून चकित झाले.

"उद्या संध्याकाळपर्यंत चोरी गेलेली मोत्यांची माळ सापडली नाही तर मी चोर पकडून देईन. आतापर्यंत माझे मंत्रबळ तुम्ही पाहिलेतच. असेच मला चांगले मंत्र माहीत आहेत." मंजरी म्हणाली.

त्या दिवशी संध्याकाळी रूपमती मंजरी-कडे गुप्तपणे गेली व म्हणाली—"आपल्या पतीची शपथ घेऊन, मी सांगते ती गोष्ट तू कोणाला सांगणार नाहीस असे कबूल केलेस तर मी तुला ती गोष्ट सांगेन."

"मी घेते शपथ, सांग काय ते!" मंजरी म्हणाली.

"मला क्षमा कर, मीच चोर आहे. तुझा हेवा वाटून तुझ्यावर चोरीचा आळ यावा, यासाठी मी हे केले. मला माझी चूक कळली. तुझ्यासारख्या थोर मनाच्या बाईचा मी मत्सर करण्यात मूर्खपणाच केला." रूपमती म्हणाली. दोघींनी परस्परांना मिठी मारली व परस्परांवर प्रेमाचा वर्षाव केला.

मंजरीने जादू केली त्यात खुबी कोठे होती? कोणी कोणत्याही वस्तूला हात लावला की राजा वस्तूंची नावे घेऊन खऱ्या वस्तूच्या नावाचा उल्लेख करण्यापूर्वी एका काळ्या वस्तूचे नाव घ्यायचे. हे मंजरी व राजा दोघांनी परस्परांशी बोलून ठरविले होते. त्याप्रमाणे राजाने 'पेला' म्हणण्यापूर्वी 'छत्री' म्हटले....मेणबत्ती... म्हणण्यापूर्वी 'दौत' म्हटले.

आपली मोत्यांची माळ सापडल्याचे रूपमतीने जाहीर केले.





# भेटवस्तू

चिंतामणी स्वत: करिता पुष्कळ खर्च करी, परंतु इतर कोणासाठी खर्च करण्याची वेळ आली की त्याचा जीव जाई. मुख्य करून कोणा नातेवाइकाच्या घरी काही शुभकार्याचे निमंत्रण आले की तो किती जवळचा नातेवाईक असला तरी काही तरी अहेर करावा लागेल किंवा एखादी भेट वस्तू द्यावी लागेल म्हणून चिंतामणी स्वत: जात नसे. बायकोला व मुलांना फक्त पाठवून देई.

"चिंतामणी नाही आला?" म्हणून कोणी विचारले की त्याची बायको म्हणे– "काही तरी भेटवस्तू आणायला गेले आहेत. इतक्यात येतीलच!"

कार्य संपले तरी त्याचे तोंड पहायला मिळत नसे.

त्याची बायको म्हणे–"ह्यांचं हे नेहमी असंच!" असे म्हणे आणि कंटाळा आल्याचं सोंग करून मुलांसह जेवण वगैरे उरकून आणि पतीसाठी पक्वान्नं बांधून घेऊन घरी निघून जात असे.

हे सर्व नाटक असल्याचे सर्वांना चांगले माहीत होते. म्हणून सर्व प्रत्यक्षपणे किंवा परोक्षपणे चिंतामणीची थट्टा करण्यास कधीच चुकत नसत.

एकदा चिंतामणीच्या अगदी जीवश्च-कंठश्च अशा मित्राच्या मुलीचे लग्न होते. आता चिंतामणीला सुटका मिळणे शक्यच नव्हते. बायको व मुलांना पाठवून भागणे शक्य नव्हते, कारण कोणा नातेवाइकाकडचे लग्न नव्हते.

"माझा मित्र दोन दिवस तरी आधी मदतीला ये म्हणतो आहे. लग्नाच्या आधी नाहीं तर निदान लग्नाच्या वेळी तरी गेलेच पाहिजे, गेलो नाही तर बरं होणार नाही, परंतु काहीतरी अहेर करावा लागणार. काय करावं?" चिंतामणीने बायकोचा सल्ला विचारला.

"त्यात काय हो? रिकाम्या पेटीला रंगीत कागद गुंडाळून ती नेऊन दिली की झालं, नाही का? लग्नाच्या घाईगर्दीत कोणी काय दिलं, कोणाला कळणार? तुम्ही काहीतरी दिलंत एवढंच सर्वांच्या लक्षात येईल." बायको म्हणाली.

तो सल्ला चिंतामणीला पसंत पडला. लग्नाला निघताना त्याने एका कागदाच्या खोक्यात झाडाचा पाला कोंबला व त्यांच्या मध्ये एक मोठे मोगऱ्याचे फूल खोचून खोक्याला रंगीत कागद गुंडाळला आणि मोठ्या थाटाने आपल्या मित्राच्या मुलीच्या लग्नाला गेला.

परंतु चिंतामणीच्या बायकोला वाटलं होतं तसं झालं नाही. कधी कोणत्याही लग्नाला न जाणारा चिंतामणी या लग्न समारंभाला एक भेटवस्तू घेऊन आलेला पाहून सर्वांची नजर त्याने बरोबर आण-लेल्या डब्यावर होती. कारण चिंतामणी काही भेट देणार ही एक अद्‌भुत गोष्ट होती.

सर्व लग्नविधी आटोपल्यावर सर्व मंडळी जेवायला बसली. एक मोठं ओझं उतरल्या-सारखा चिंतामणी एका पानावर बसला. त्यावेळी त्याला लाडवांच्या वासाशिवाय दुसरं काही सुचत नव्हते.

चिंतामणी बसला होता त्या पंक्तीत बसलेला एक मित्र चार जणांना ऐकू



जाईल इतक्या मोठ्याने व्यंग्योक्ती करीत म्हणाला–"चिंतामणी इतकी चांगली भेट देणार आहे हे माहीत असते तर मी आपल्या मुलीचे लग्न केव्हाच केले असतं!"

चिंतामणी त्याच वेळी लाडू फोडीत होता. ते ऐकून त्याच्या मनांत 'चर्र' झालं. म्हणजे याने आपण आणलेली भेट उघडून पाहिली आहे की काय? कोणीतरी थोबाडीत मारल्यासारखं चिंतामणीला झालं. हा सल्ला बायकोने दिला होता, म्हणून त्याला त्याच्या बायकोचा भयंकर राग आला.

"चिंतामणीने काय दिलं हो?" एका दोघांनी कुतूहलवश विचारले.

"आणून दाखवितो!" असं म्हणत तो मित्र उठून गेला व चिंतामणीने दिलेली पेटी घेऊन आला.

चिंतामणीचा चेहरा उतरला. सर्वांसमक्ष आपली इभ्रत चव्हाट्यावर आणल्यासारखं त्याला वाटलं. सर्व आपली 'छी, थू' करणार. दहा जणांसमोर असा अपमान होणार हे माहीत असतं तर लग्नाला आलोच नसतो!

चिंतामणीला त्याच्या हातात जो लाडू होता त्याला कसला तरी घाण वास येत असल्यासारखं वाटलं.

"पहा हो, चिंतामणीने वधूला किती मूल्यवान हिऱ्याची अंगठी भेट म्हणून दिली आहे!" असे म्हणत त्या मित्राने गारुड्यासारखी पेटीतून एक अंगठी बाहेर काढली.

चिंतामणीच्या पोटातून एक मोठी किंकाळी वर येण्याच्या बेतात होती, परंतु त्याने ती दाबून टाकली. ही तर आपल्या हातची अंगठीच! पाला कोंबून ठेवीत असतां बोटातून निसटून पानांबरोबर पेटीत राहून गेली होती तर! ते त्याच्या लक्षात तेव्हां आले नव्हते.

आपलं केवढं मोठं नुकसान झालं या दुःखाबरोबर दहाजणांसमोर खाली होणारी आपली मान ताठ राहू शकली याबद्दल चिंतामणीला आनंदच झाला.





# देवी भागवत

सूत बोलत होता, परंतु श्रोते मुनी त्याला मध्येच अडवून म्हणाले–"आम्ही असं ऐकलं आहे की ब्रह्मा, विष्णू व महेश हे सृष्टीचे कर्ता, धर्ता व हर्ता आहेत. तरी या तिघात विष्णूच श्रेष्ठ आहे. असा विष्णू जेव्हा योगनिद्रेत असतो तेव्हां त्याची शक्ती व तेज ही कोठे जातात? आदिशक्तीला विष्णूपेक्षा जास्त शक्ती कशी काय प्राप्त झाली? नारदासारख्या थोर मुनींच्या म्हणण्याप्रमाणे विष्णू हाच सर्व कार्याला कारण असतो, परंतु तू तर आदिशक्तीच सर्व कार्यांच्या मुळाशी कारणभूत असते असे म्हणतोस. खरं काय हे स्पष्ट कर."

सूत त्याचे उत्तर देत म्हणाला–"मुनींनो! नारद वगैरे मुनीं आदिशक्तीचा प्रभाव बरोबर ओळखूच शकले नाहीत, आणि विष्णूलाच सर्व शक्तिमान मानून बसले. याच प्रमाणे काही लोक शंकराला सर्वात थोर देव मानू लागले. काही लोक सूर्याला तर काही अग्नीला, काही चंद्राला तर काही इंद्रवगैरेंना मानून, किंवा आणखी कोणा-कोणाला मानून भ्रमात पडले आहेत. कोणी काय वाटेल ते प्रमाण सांगो, परंतु सर्व प्रमाणांच्या पलीकडे किंवा अतीत अशी पराशक्ती एकच एक आहे. ती विष्णूत, शंकरात, सूर्यात, वायूत आणि अग्नीत दृष्टिगोचर होते."

अशा आदिशक्तीच्या कृपेने योग-निद्रेतून जागा होऊन विष्णूने ब्रह्मदेवाला पाहून विचारले–"वत्स! तू तपश्चर्या



करायचे सोडून इकडे कसा काय आलास?"

"यापुढे तपश्चर्या करणे शक्य नव्हते म्हणून! तुझ्या कानातून दोन राक्षस मधु व कैटभ हे जन्मून मला त्यांनी युद्धाला आव्हान केले आहे." ब्रह्मदेव म्हणाला.

"एवढ्याशा कारणाने इतका भ्यालास? मी कित्येक राक्षसांचा वध केला हे तुला माहीत असून ही?" असे विष्णू सांगत असतां ते राक्षस धावत तेथे आले व ब्रह्मदेवाला म्हणाले—"तू इकडे येऊन लपला आहेस का? तुला आम्ही हुडकू शकणार नाही, वाटलं का? तू तर मरणारच आहेस, तुझ्याबरोबर याला सुद्धा ठार करू म्हणतोस होय? तू वीर असशील तर युद्धाला समोर उभा रहा, नाहीतर, आमचा दास आहेस हे मान्य कर."

विष्णूने ब्रह्मदेवाला त्याच्या पाठीमागे उभे रहायला खूण केली व राक्षसांना म्हणाला—"तुमची मस्ती वाढलेली दिसते आहे. मी ती उतरणार आहे." असे म्हणत विष्णू युद्धाला सिद्ध झाला.

देवी आकाशांतून ते दृश्य पाहू लागली. विष्णू व मधु राक्षसाचे द्वंद्व युद्ध सुरू झाले. समुद्र उसळला. मधूला दमू लागलेला पाहून कैटभ पुढे आला. त्याने विष्णूशी मल्लयुद्ध सुरू केले. दोघां राक्षसांशी द्वंद्व करीत राहल्यामुळे विष्णू थोडा दमला. काय करावे त्याला सुचेना. राक्षसांना कसे जिंकायचे त्याला कळेना.

विष्णू या विचारात असतां दोघे राक्षस म्हणाले—"आमच्याशी युद्ध करायला तुझी शक्ती पुरेशी नसेल तर तू आमचा दास होऊन आमच्या पायां पड. नाहींतर तुझा वध करून नंतर ब्रह्मदेवाचा वध करू."

ते ऐकून विष्णू म्हणाला—"जे दमलेले आहेत, ज्यांनी रणांगणाला पाठ दाखविली आहे, जे भ्यालेले आहेत आणि जे युद्ध करीत असतां जमिनीवर कोसळले आहेत त्यांच्याशी दोन हात करायला सिद्ध होणे शूरांचा धर्म नाही. शिवाय तुम्ही दोघे आहा व मी एकटा आहे. मी क्षणभर दम घेऊन पुन्हा युद्ध करतो."

"ठीक. तू दम घे, आम्हीसुद्धा थोडावेळ दम घेतो." दोघे राक्षस म्हणाले.

तेव्हां विष्णूला दिव्य दृष्टीने कळले की त्या दोघांनी वर मिळविले आहेत. म्हणून विचार करू लागला, या दोघांना स्वेच्छा-मृत्यूचा वर प्राप्त आहे. यांचा वध माझ्या हातून कसा होणार? असा विचार करून विष्णूने जगदंबेला आळवले—"माते! तुझ्या मदतीशिवाय मी या राक्षसांचा संहार करू शकणार नाही. तूच ह्यांना इच्छा मृत्यूचा वर दिला आहेस. तेव्हा यांचा मृत्यू कसा होईल याला मार्ग तूच सुचव."

विष्णूला नम्रपणे प्रार्थना करतांना पाहून देवी स्मित करून म्हणाली—"मी या राक्षसांवर आपली माया टाकते. तू यांचा पराभव कर."

त्याच वेळी राक्षस विष्णूला हिणवत म्हणाले—"अरे, तू हिंमत हारून कां बसला आहेस? पराक्रमी माणसाला जय-पराजय प्राप्त होतातच. तुझ्या हाती कित्येक राक्षसांना पराभव सहन करावा लागला नव्हता का?"

**मधुकैटभांशी युद्ध**

ते ऐकून विष्णूला राग आला. आणि तो राक्षसांवर तुटून पडला. ते रक्त ओकीत



होते आणि विष्णूवर वार करीत होते. विष्णू बेशुद्ध झाल्यासारखा झाला. त्याच्या अंगातून रक्तस्राव होत होता. त्या स्थितीत त्याने डोळे उघडून आकाशात देवीला पाहिले.

त्याचवेळी देवीने कामदेवाच्या बाणां-सारख्या तीक्ष्णदृष्टीने राक्षसांना पाहिले. आणि मग काय, ते युद्धाची गोष्ट पार विसरून गेले आणि मोहपाशात अडकले. तेव्हा विष्णू त्यांना म्हणाला—"मी युद्ध-विद्येत तुमची बरोबरी करू शकणारा एकही राक्षस पाहिला नाही. तुमचे युद्ध कौशल्य पाहून माझ्या मनाचे समाधान झाले. तुमच्या मनात काही इच्छा असेल तर सांगा, मी पुरी करतो."



देवीच्या मायेने देहभान विसरून राक्षस घमेंडीत विष्णूकडे तुच्छ दृष्टीने पहात म्हणाले–"ओहो, आम्ही तुझ्याजवळ मागणार आणि तू वर देणार? छान! तूच माग हवा तो वर, आम्ही तुला देतो."

लगेच विष्णूने हा वर मागितला–"तुम्ही जर माझ्याशी युद्ध करण्यात खूष असाल तर माझ्या हाती मरा!"

दोघे राक्षस दचकले. परंतु थोडा विचार करून म्हणाले–"तू जर आपले दिलेले वचन पुरे करणार असशील तर तू आम्हांला वर मागायला सांगितलेली गोष्ट आठवून तू अशा विस्तीर्ण जागी आमचा वध कर

ते ऐकून विष्णू स्मित करून आपल्या मांड्या पसरवीत म्हणाला–"राक्षस हो या आता!"

राक्षसांनी आपले देह विष्णूच्या मांड्यांहून मोठे केले दोघांमध्ये चढाओढ सुरू झाली. विष्णूने मांड्या व राक्षसांनी देह वाढवायला सुरवात केली. शेवटी राक्षसांच्या देहांहून विष्णूच्या मांड्याच जास्त विस्तीर्ण झाल्या. त्या वेळी विष्णूने आपल्या सुदर्शन चक्राचे स्मरण केले. चक्राने येऊन राक्षसांच्या माना कापल्या. त्यांचा मेंदू पाण्यात पडला. त्याचा मोठा उंच डोंगर तयार झाला. तेव्हां पासून भूमीला 'मेदिनी' म्हणू लागले आणि माती खाऊ नये असा नियम झाला.

### व्यासाची तपश्चर्या

येथवर कथा ऐकल्यानंतर मुनींनी सूत मुनीला विचारले–"संदर्भाने आम्ही इतर गोष्टी पुष्कळ ऐकल्या, परंतु पुत्रप्राप्तीसाठी व्यासाने तपश्चर्या केली होती, ती गोष्ट तशीच राहून गेली."

तेव्हा सूत सांगू लागला.

"नारदाने जो मंत्र सांगितला त्या मंत्राचा जप करीत व्यासाने सुवर्णगिरीवर कर्णिकार वनात तपश्चर्या सुरू केली. त्याने आदिशक्तीचे स्मरण करून तपश्चर्या करीत

इंद्र देवांना बरोबर घेऊन शंकराकडे धावला व म्हणाला–"व्यास घोर तपश्चर्या करीत आहे. मोठे संकट येण्याची शंका वाटू लागली आहे. आमचे रक्षण कर!"

शंकर म्हणाला–"तपश्चर्या करणाराला कष्ट होईल असे काही करता कामा नये. तो कोणाचा अपकार करीत नाही. व्यास पुत्रप्राप्तीसाठी शक्तीसह माझे स्मरण करून तपश्चर्या करतो आहे." असे इंद्रादि देवांना समजावून सांगून शंकराने व्यासाला दर्शन दिले आणि त्याची इच्छा पूर्ण होईल असा वर दिला. व्यासाने शंकराचा निरोप घेतला व आपल्या आश्रमात परत आला.

त्याने अरणीच्या सहाय्याने अग्नी तयार केला आणि विचार करू लागला, या अग्नीसारखा तेजस्वी पुत्र मला देऊ शकेल अशी कोणी स्त्री आहे का? परंतु स्त्री ही सर्व तऱ्हेची विघ्ने आणणारी असते! त्याच वेळी व्यासाला आकाशात घृताची दिसली. तिच्या शेजारी कामदेवसुद्धा दिसला.

कामदेवाचा प्रभाव त्याच्या मनावर झाला असूनही व्यास विचार करू लागला, ही मला फसवायला आली असावी. हिच्या संगतीत काही काळ सुखोपभोग करून घेण्यात काही नुकसान नाही. परंतु ही आपल्याकडे राहली तर मुनी कदाचित नावे ठेवतील. त्यांनी नावे ठेवली म्हणून



आपले काय जाते, म्हणा! तिचे माझ्यावर प्रेम राहील का? ती मला सुख देईल का? किंवा प्राचीन काळी ऊर्वशी पुरुरवाला विरहदु:खात सोडून जशी निघून गेली. तशीच ही तर जाणार नाही?

तेव्हा मुनी सुताला मध्येच अडवून म्हणाले–"हे महामुने, तुम्ही पुरुरवा म्हणालात तो कोण होता?" सूताने पुढील कथा सांगितली.

### बुधजन्म

बृहस्पतीच्या बायकोचे नाव तारा होते. ती एक अपरूप सुंदरी होती. ती एकदा चंद्राच्या घरी गेली. चंद्र तिच्या सौंदर्यावर मोहित झाला. तारासुद्धा चंद्रावर भाळली.



म्हणून तारा बरेच दिवस चंद्राच्या घरीच राहिली. तारा बराच काळ परतली नाही तेव्हां बृहस्पतीने आपल्या एका शिष्याला तिला बोलावून आणायला पाठविले. परंतु ताराने त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून त्याला परत पाठविले. त्यानंतर बृहस्पतीने कित्येकांना चंद्राकडे पाठविले. परंतु निरुपयोग. शेवटी खूप संतापून बृहस्पती स्वतःच चंद्राच्या घरी आला. त्याला आलेला पाहून चंद्र हसू लागला.

तेव्हा बृहस्पती चंद्राला खूप बोलला. म्हणाला–"दुष्ट गृहस्था! गुरुपत्नी मातेसमान असते. ब्राह्मणाचा वध करणारा, दारुड्या, सोन्याची चोरी करणारा, गुरुपत्नीला वाईट नजरेने पाहणारा आणि या चौघांपैकी कोणाशीही मैत्री करणारा असे हे पंच महापातकी होत. तुला स्वर्ग मिळणे शक्य नाही. इंद्र तुला दंड करील."

चंद्र थोडा देखील रागावला किंवा दुःखी झाला नाही. तो शांतपणे म्हणाला–"ब्राह्मणाने राग करणे उचित आहे का? तारा तर उद्यां परवां येथून जाणारच आहे. ती सर्वकाळ माझ्याबरोबर राहणार आहे का? या एवढ्याशा गोष्टीसाठी तुम्हांला एवढे रागावण्याचे किंवा दुःखी होण्याचे कारणच काय?"

बृहस्पती चंद्राच्या या प्रश्नांची उत्तरे काय देणार? तो लगेच घरी परतला, आणि आणखी काही काळ त्याने बायको परत येण्याची वाट पाहिली. परंतु तारा परतली नाही. बृहस्पतीला काय करावे, सुचेना. तो पुन्हा चंद्राच्या घरी गेला. या खेपेस पाहारेकऱ्यांनी त्याला घरात पाऊल टाकू दिले नाही. तेव्हा बृहस्पती मोठ्याने ओरडून म्हणाला–"अरे दुष्टा! तू हा काय खेळखंडोबा मांडला आहेस? मला माझ्या बायकोला भेटू देत नाहीस का? माझी बायको तुझ्याकडे राहू लागली आणि मी दूर गप्प बसून पहात राहू काय? मी तुला शाप देतो."

ते ऐकून चंद्र म्हणाला–"तुम्ही वारंवार आपल्या बायकोचे नाव कशाला घेता

आहां? सौंदर्याची सर्व लक्षणे असलेली ही सुंदरी तारा तुमच्या सारख्या दरिद्र गृहस्थाच्या घरी राहण्या लायक आहे का? तुम्हांला बायकोच हवी असेल तर योग्य निवड करून तिच्याशी लग्न करून घ्या आणि सुखी व्हा. तुम्ही सर्व शास्त्रांचा अभ्यास केला आहे, परंतु काय उपयोग? तुम्हांला एवढेसुद्धा कळू नये का की स्त्री तिला पसंत पडेल त्या पुरुषाबरोबरच संसार करते व जो तिला आवडत नाही त्याला सोडून देते. मी ताराला सोडणार नाही. आता तुम्ही आलात तसे चालू लागा. ईर्ष्यावश तुम्ही मला जो शाप द्याल त्याचा माझ्यावर काही एक परिणाम होणार नाही. तुम्हांला ते माहीत आहेच. काय वाटेल ते करा."

शेवटी बृहस्पती इंद्राकडे गेला. इंद्राने त्याला आदरपूर्वक बसायला सांगून येण्याचे कारण विचारले.

बृहस्पती म्हणाला–"चंद्राने माझ्या बायकोचे अपहरण केले आहे. मी तिला आ [illegible] दिला. आपण मला माझी बायको परत मिळवून द्यावी!"

इंद्र म्हणाला–"गुरुवर्य! आपण काळजी करू नये! मी तिला सोडवून आणून देतो! चंद्राने जर हट्ट केला तर वज्रायुधाने मी त्याचा गर्व परिहार करीन. त्याने हे नीच काम केले आहे का?" असे सांगून इंद्राने आपल्या एका दूताला सर्व गोष्टी नीट समजावून सांगून चंद्राकडे पाठविले.

इंद्राचा दूत चंद्राकडे गेला आणि अनेक प्रकारे त्याला समजावून सांगू लागला. उपदेश करून ताराला परत पाठवायला सांगितले. ते ऐकून संतापून जाऊन चंद्र म्हणाला–"मला माहीत आहे की इंद्राने नीतीचे किती पालन केले आहे? ताराचे माझ्यावर प्रेम आहे, मी तिला जरी जायला सांगितले तरी ती आपल्या पतीकडे जाईल याची काय खात्री? तू इंद्राला जाऊन सांग की मला प्राणत्याग करावा लागला तरी मी तयार आहे, परंतु ताराला सोडणार नाही."



# वशिला

वज्रगिरीच्या राजाचा मेहुणा जंग बहादूर फार घमेंडखोर होता. त्याने एकदा राजाच्या पुरोहिताच्या मुलाला बडविले. त्या मुलाने नगराच्या कोतवालाकडे राजाच्या मेहुण्याविरुद्ध तक्रार नोंदविली. ते कळल्यावर जंग बहाददुर आपल्या अक्काकडे म्हणजे राणीकडे गेला व वाचवायला गयावया करू लागला म्हणून राणीने कोतवालाला भेटून आपल्या भावावरचा गुन्हा काढून घ्यायला सांगितले.

"आपणच म्हणतां आहां, म्हणून मी तसं करतो, राणीसरकार!" कोतवाल म्हणाला. राणीने खूष होऊन कोतवालाला आपला कंठहार इनाम म्हणून देण्यासाठी गळ्यातून हार काढू लागली. तितक्यांत पाठीमागून कोणीतरी येऊन तो कंठहार तिच्या हातातून हिसकावून घेतला आणि पळून गेला. राणीला भयंकर राग आला. म्हणाली–"चोराला पकडून कडक शिक्षा करा, कोतवाल!"

महाराणी, तो चोर मोठा वशिलेबाज आहे." कोतवाल म्हणाला.

ते ऐकून राणीचे डोके ठिकाणावर आले व तिने धाकट्या भावाच्या गुन्ह्याची चौकशी करून त्याला योग्य शिक्षा करण्यास कोतवालाला सांगितले. लगेच कोतवालाच्या मुलाने पुढे येऊन राणीचा हार परत केला.





# लोभी व बहुरूपी

**त्या** गावात गुरुनाथ नावाचा एक फार श्रीमंत माणूस होता. परंतु तो मोठा चिक्कूपण होता.

एकदा त्या गावी एक बहुरूपी संन्याशाचा वेष करून–"भवती, भिक्षां देही!" म्हणत गुरुनाथाच्या घरासमोर येऊन उभा राहिला.

गुरुनाथाला त्याचा आवाज कर्णकठोर वाटला. त्याने बाहेर येऊन संन्याशाकडे डोळे वटारून पाहून विचारले–"तुला काय झालं रे? तू लंगडा आहेस की आंधळा?" असे म्हणत त्याने घरात जाऊन दार बंद केले.

दुसऱ्या दिवशी बहुरूपी आंधळा होऊन आला व ओरडू लागला–"ताई, आंधळ्याला दान करा." आणि गुरुनाथाच्या घरासमोर उभा राहिला.

त्याला पाहून गुरुनाथ संतापून म्हणाला–"कायरे भीक मागायला तू लंगडा लुळा आहेस की मुका आहेस? जा पुढे!"

तिसऱ्या दिवशी बहुरूपी मुक्याचे सोंग करून घंटा वाजवीत आला. गुरुनाथ त्याला म्हणाला–"तुला काय झालं रे?"

बहुरूप्याने तोंड उघडून मुका असल्याचे खुणेने सांगितले.

"मुका आहेस का? मग काय झालं? हात पाय सर्व चांगले आहेत की रे! काम करायला येत नाही?" गुरुनाथ म्हणाला आणि दार बंद करून घरात गेला.

चवथ्या दिवशी उजाडल्यावर गुरुनाथाच्या बायकोला सैपाकघरात साप दिसला. ती धावत बाहेर ओटीवर येऊन ओरडली–"अगो बाई, साप, नागसाप!"

गुरुनाथ लगेच घरात गेला व मडक्यांच्या आड फिरत असलेल्या सापाला पाहून "साप, साप!" असा ओरडत बाहेर आला.

जवळपासचे लोक धावले व विचारू लागले–"साप कोठे आहे? कोणत्या जातीचा साप आहे? रंग कसा आहे?" सर्व प्रश्नच करीत राहिले, पण कोणी घरात पाऊलही टाकले नाही. इतक्यात तेथे एक गारुडी आला. गुरुनाथाला जिवात जीव आल्यासारखे झाले. तोंडावरचा घाम पुशीत तो गारुड्याला म्हणाला–"अरे ए! सैपाक घरात साप शिरला आहे, त्याला घर आणि आम्हांला वाचव बाबा!"

"नागसाप आहे का? दिसतो आहे का?" गारुड्याने विचारले.

"नाही रे बाबा! दिसत नाही. गाडग्या-मडक्याआड तो कोठेतरी लपला आहे!" गुरुनाथ म्हणाला.

"मग कठिणच की हो! हा साप मोठा बाईट बाराबारा वर्षे डूक धरून राहतो. एक वार चुकला तर धोकाच की हो!" गारुडी म्हणाला.

"तूच असं म्हणू लागलास तर आमच्या सारख्यांनी काय करायचं रे? मी तुझ्या उपकाराची फेड करीन! काळजी करू नकोस!" गुरुनाथ म्हणाला.

शंभर रुपयाचा भाव ठरवून गारुडी सैपाकघरात गेला व सर्व घर शोधून पाहिले, परंतु साप सापडला नाही. परंतु गारुड्याने आपली पुंगी वाजविल्याबरोबर साप भिंतीच्या भोकातून बाहेर येऊन फडा करून डोलू लागला. गारुड्याने चटदिशी त्याची मान धरून



त्याला बुट्टीत ठेवले व बुट्टीला झांकण लावले.

गुरुनाथाला पुनर्जन्म झाल्यासारखे वाटले. परंतु शंभर रुपये काढून गारुड्याला देतेवेळी पुन्हा जीव गेल्यासारखी त्याची केविलवाणी अवस्था झाली. परंतु गत्यंतर नव्हते. गारुडी पैसे घेऊन गुरुनाथाची प्रशंसा करीत निघून गेला.

नंतर चौकशी करिता कळले की तो गारुडी म्हणजे बहुरूपीच होता आणि त्याने आपला पाळलेला साप गुरुनाथाच्या सैपाकघरात सोडला होता. गुरुनाथाच्या सर्वांगाचा जळफळाट झाला. पाटलाकडे जाऊन त्याने बहुरुप्याने फसवून लुबाडल्या बद्दल तक्रार केली, आणि पैसे परत देवविण्यासाठी विनंती केली.

पाटलाने बहुरुप्याला बोलावून विचारले. त्याने घडले ते जसेच्या तसे सांगून विचारले–"गुरुनाथांसारखे श्रीमंत लोकच आमच्या सारख्या गरिबांवर कृपा करत नाहीसे झाले तर आम्ही तरी काय करायचे?"

"तू आपली कला दाखवून पैसे मिळविलेस तर कोणी तुला दोष देणार नाही. परंतु तू गुरुनाथांना फसविले आहेस. मुकाट्याने त्यांचे पैसे त्यांना परत दे कसा." पाटील म्हणाले.

बहुरुप्याने गुरुनाथाला त्यांचे पैसे परत दिले.

पाटील गुरुनाथाला म्हणाले–"फळं लागलेल्या झाडालाच लोक दगड मारतात. ज्याच्याजवळ आहे अशा लोकांसमोरच ज्याच्याजवळ नाही असा गरीब हात पसारतो. पोटावर पट्टी बांधून तो तुमच्या घरासमोर आला. तुमच्यासारख्यांनी त्याला काही दानधर्म करणे तुमचे कर्तव्य होते. तुम्ही त्याला पंचवीस रुपये तरी द्यावेत."

गुरुनाथाने एक शब्द न बोलता बहुरुप्याला पंचवीस रुपये दिले आणि त्याने जो त्याला धडा दिला तो गिरवून आपला चिक्कूपणा सोडला.



# बापाला सर्व मुलेसारखीच

रघू व लखू शेजारीशेजारी रहात होते. रघू लक्षाधीश होता लखू अगदी गरीब. रघूकडे पैशांचा पाऊस पडे, पण त्याला मूलबाळ नव्हते. लखूला गरीबी होतीच, बरोबर चार मुलगे होते.

रघूला मूल होईलहोईल म्हणून पुष्कळ वाटले. शेवटी ती आशासुद्धा सोडावी लागली. त्याने कोणाच्यातरी मुलाला दत्तक घेण्याचा विचार केला लखूच्या चार मुलांपैकी एकाला दत्तक घ्यावे असे त्याच्या मनात आले.

त्याने ती गोष्ट लखूजवळ काढली. आपली सूचना ऐकून लखूला फार आनंद होईल असे रघूला वाटले होते. परंतु लखू आपल्या चौघांपैकी एकालाही दत्तक द्यायला तयार झाला नाही.

म्हणून रघूने थोडक्याशा रागाच्या स्वरात लखूला विचारले–"काय रे, तुझा मुलगा लक्षाधीश होऊन सुखाने आयुष्य भोगू लागलेला तुला आवडत नाही का?"

"नाही आवडणार. माझ्या सर्व मुलांच्या अंगात माझे रक्त खेळते आहे. त्यांच्यापैकी एकजण लक्षाधीश व्हावा व इतर गरीबच रहावेत हे मला कसे आवडेल? माझ्या अंगात रक्ताचा एक थेंब असेपर्यंत मी सर्वांना सारखे सुखी ठेवीन. त्यानंतर देवाची इच्छा!" लखू म्हणाला.





# प्रश्नोत्तरे

**सुधाकर 'बंधु', अजमीर (राजस्थान)**

**प्र. :** या वैज्ञानिक युगात चंद्राचे (चंदामामाचे) वास्तविक रूप कळल्यानंतर त्याचा प्रभाव "चांदोबा" वर कितपत पडला, कळवू शकाल का?

**उ. :** खगोलज्ञानाच्या उदयापासूनच खरोखरी चंद्राच्या वास्तविक स्वरूपाची कल्पना प्राप्त झाली आहे. तरी पुराणांत चंद्र हा एकाद्या माणसासारखाच मानला गेलेला आहे. आपला "चांदोबा" हे एक नाव, संकेत रूपे आहे. "सुधाकर" हे चंदामामाचे नाव आहे. परंतु तुमचा व चंदामामाच्या वास्तविक रूपाचा परस्पर काही संबंध आहे का?

**के. जी. सरलाकुमारी, के. जी. हेमलता, कुप्पम (आंध्र)**

**प्र. :** चंद्राहून नक्षत्र किती मोठे आहे? चंद्रमंडल आणि नक्षत्रमंडल या दोहोंत किती अंतर आहे?

**उ. :** कोणीतरी त्याला हवे तसे एकाच तऱ्हेचे साच्यात काढल्यासारखे गोलाकृती सूर्य (नक्षत्र) व चंद्र या पृथ्वीवर आपल्याला दिसतात; परंतु वास्तविक पाहिले तर सूर्य हा चंद्राच्या ३०० पटीपेक्षा जास्त मोटा आहे. म्हणजे सूर्याला एक नक्षत्र मानून तुलना केली तर चंद्राचा आकार ९० हजारांत एक होईल. आणखी सूर्याहून हजार पटीने, लक्षपटीने मोठी नक्षत्रे आकाशात आहेत.

चंद्र आपल्यापासून २,४०,००० मैल अंतरावर आहे. काही वैज्ञानिकांच्या मते चंद्र हा भूमीचा उपग्रह असून भूमी व चंद्र दोघे सूर्याचे उपग्रह आहेत. म्हणून पृथ्वीचे व चंद्राचे एकच मंडल म्हणता येईल. नक्षत्रमंडल नावाचे मंडल कोठेच नाही. नक्षत्रे परस्परांपासून फार दूर असतात. सूर्य हे आपल्याला सर्वात जवळचे नक्षत्र. पृथ्वी व चंद्र हे सूर्याच्या वातावरणात आहेत. सूर्यासोबत



# लब्ध प्रणाश

[ ६६ ]

राजा म्हणाला ते ऐकून कुंभार त्याला म्हणाला—"महाराज, मला युधिष्ठिर म्हणून हाक मारतात. मी कुंभार जातीचा आहे. हा जो व्रण आहे, तो तलवारीचा वार लागल्याने झालेला नाही. एकदां मी खूप पिऊन झोकांड्या खात चालत असतां एका खापरावर पडलो. तेव्हां मला जखम झाली तिचा हा व्रण आहे."

"माझं कर्म! मी किती मूर्खपणा केला? याचा बलिष्ठ देह आणि मोठा थोरला व्रण पाहून फसलो!" असा विचार राजाने करून त्याला हाकलून दिले.

तेव्हां कुंभार म्हणाला—"महाराज! मला हाकलून देऊ नका. युद्धात माझं शौर्य साहस पारखून घ्या!"

"तू किती बलवान बहाद्दर असलास तरी तुला हाकलून दिलाच पाहिजे! मागे एका गोष्टीत म्हटल्याप्रमाणे 'तू किती मोठा साहसी, सर्व शास्त्रांत पारंगत, सुंदर तरणाबांड असलास तरी', असं सिंहीण एका कोल्ह्याला म्हणाली होती, 'तुमच्या जातीत जन्मलेला हत्तीला मारू शकणार नाही', ते विसरून कसे चालेल?" राजा म्हणाला.

"आपण म्हणालात ती गोष्ट कोणती?" असे कुंभाराने विचारल्यावर राजाने गोष्ट सांगितली.

**सिंहाने वाढविलेला कोल्हा**

एका अरण्यात एक सिंहीण व एक सिंह रहात असत. सिंहीण नुकतीच व्यायली होती. तिला दोन छावे झाले. सिंह दररोज शिकार करून एक प्राणी आणून सिंहिणीला आहार आणून देत असे.

एकदां सिंह काळोख पडेपर्यंत शिकार शोधीत राहिला, परंतु शिकार सापडली



नाही आपल्या गुहेत परत येत असतां त्याला वाटेत एक कोल्ह्याचे पिल्लू दिसले. ते कोवळे पिल्लू पाहून सिंहाला त्याची कींव आली. त्याला ठार न करतां अलगद तोंडात धरून सिंह घेऊन आला आणि त्याने सिंहिणीसमोर त्याला ठेवले.

“मला खायला काही आणले नाहीस का, प्रियकरा?” सिंहिणीने सिंहाला विचारले.

“प्रिये, मला कोल्ह्याच्या या पिल्ला-शिवाय आणखी काही एक शिकार सापडली नाही. हा सुद्धा आपल्यासारखाच सुळे व नखे असलेला मांसाहारी प्राणी आहे. शिवाय कोवळे पिल्लू आहे. म्हणून मी याला ठार केलं नाही. भुकेनं जीव कसावीस झाला असला तरी स्त्रीला, लिंग धारण करणाऱ्या लिंगाइताला, ब्राह्मणाला, मुलांना, विशेष-करून आपल्या आश्रयास आलेल्यांना ठार करू नये, म्हणे. तरी तू आजारी आहेस. नुकतीच व्यायली आहेस. म्हणून आपल्या आरोग्यासाठी तू काहीतरी आहार हा घेतलाच पाहिजेस. यासाठी तू याला ठार करून खाऊन टाक. एवढ्या आहारावर आपली भूक भागव. उद्यां याच्याहून चांगला मोठा प्राणी घेऊन येतो.” सिंह म्हणाला.

“कोवळे पिल्लू म्हणून तू पुरुष असून त्याला ठार केले नाहीस, तेव्हां, मी स्त्री जातीत जन्मून आणि आतां एक माता म्हणून म्हणवून आपलं पोट भरण्यासाठी याला कसा ठार करीन?” अगदी मृत्यु-समयीदेखील निषिद्ध काम करू नये, कर्तव्यच्युत होऊ नये, असे शास्त्रवचन आहे. म्हणून मी या कोल्ह्याच्या पिल्लाला आपला तिसरा छावा मानून आपल्या दुधावर वाढवीन.” असं सांगून सिंहिणीने कोल्ह्याच्या पिल्लाला अंगावर पाजले.

सिंहिणीचे पौष्टिक दूध प्याल्याने कोल्ह्याचे पिल्लू क्रमाने वाढत गेले व मोठे हृष्ट-पुष्ट झाले. सिंहाचे छावे व कोल्ह्याचे पिल्लू परस्परातला जातिभेद ओळखू शकले नाहीत. तिघे भावंडांसारखे वाढले आणि मिळून मिसळून खेळू लागले.

एकदां तिघे अरण्यात हिंडत असतां त्यांना एक रानटी हत्ती दिसला. त्याला पाहतांच सिंहाचे छावे गर्जना करीत त्याच्या पाठीवर चढून बसले. तेव्हां कोल्ह्याचे पिल्लू त्यांना म्हणाले–“त्याच्या वाटेला जाऊ नका. तो तुमचा हाडवैरी आहे.” असे सांगून कोल्ह्याचे पिल्लू सिंह रहात त्या गुहेकडे जोराने पळत गेले.

सिंहाचे छावेदेखील आपल्या मोठ्या भावाची नक्कल करून हतोत्साह होऊन हत्तीला सोडून पळू लागले. शूर सेनापती आपल्या शौर्यपराक्रमाने आपल्या सैन्याला प्रोत्साहन देऊ शकतो. परंतु तोच जर भित्रा पळपुटा असेल तर सैन्य धावरून पळून जाते नाहीका, तसे!

सिंहाचे छावेसुद्धा आपल्या गुहेकडे पळत जाऊन आपल्या वडील भावाचा भित्रे-पणा–हत्तीला पाहून तो कसा पळाला, हे हसत सांगू लागले. कोल्ह्याला त्याचा भयंकर राग आला. त्याचे डोळे आग पाखडू लागले. ओठ ‘थरथर’ कापू लागले आणि त्याने आपल्या धाकट्या भावंडांना खूप सुनावले.

त्याच्या त्या बोलण्याचा सिंहाच्या छाव्यांना भयंकर राग आला. ते पाहून सिंहीण कोल्ह्याला म्हणाली–“बाळा रे, त्यांना तू असे बोलतां कामा नये. ती तुझी धाकटी भावंडेच आहेत, नाही का?”



सिहिणीने गोड शब्दात जे सांगितले ते ऐकून कोल्ह्याला जास्तच राग आला. म्हणाला–"मी यांच्यापेक्षां शौर्यात, ज्ञानांत किंवा रूपारंगात कोणत्या बाबतीत लहान आहे, म्हणून हे माझी थट्टा करीत आहेत? मी आपल्या आत्मगौरवाचे रक्षण करण्यासाठी यांना आतांच्या आतां ठार करणार आहे!"

सिहीण हसत त्याला अडवीत म्हणाली–"बाबा रे! तू मोठा शूर असशील, मोठा शिकलेला असशील, खूप सुंदर असशील, परंतु तुझ्या जातीत जो जन्म घेतो तो हत्तीला मारू शकणार नाही! म्हणून मी सांगते ते लक्ष देऊन ऐक. तू जन्माने कोल्हा आहेस. तू लहान असतांना तुला पाहून कीव करून मी तुला अंगावर पाजले व वाढविले. माझे छावे अजून लहान आहेत, म्हणून तू कोल्हा आहेस हे त्यांनी ओळखले नाही. म्हणून तू आतांच निघून जा कसा! तू आपल्या कोल्ह्याच्या कळपात रहा. नाहीतर माझ्या बाळा, तुझा जीव धोक्यात पडेल!"

ते ऐकून कोल्हा प्राणभयाने थरथर कापत जो पळाला तो कोल्ह्यांच्या एका कळपात जाऊन मिसळला.

राजाने ही गोष्ट सांगितली व कुंभाराला म्हणाला–"तू कुंभार आहेस हे माझ्या सैनिकांना कळण्यापूर्वीच निघून जा. नाही तर ते थट्टेथट्टेत तुला ठार करतील."

कुंभार लगेच तेथून निघून गेला.

माकड ही गोष्ट सांगून म्हणाले–"मूर्खा! तू आपल्या बायकोच्या फंदात पडून मित्रद्रोह करायला निघाला होतास का? परंतु एका गोष्टीत एका ब्राह्मणाची बायको एका लंगड्या मूर्खाच्या फंदात पडून आपल्या सर्व आत्मीयांना सोडून आपलं अर्धे आयुष्य तिच्याबरोबर घालविलेल्या नवऱ्याचा वध करायला निघाली होती, तशी तुझी बायको वागली असती."

"कोणती गोष्ट ती?" मगरीने विचारतां माकडाने ती गोष्ट सांगितली.





# भल्लूक मांत्रिक

[ ६ ]

[चंद्रशिला नगरावर स्वारी करायला निघालेल्या दुर्मुख नावाच्या राजावर भल्लूक मांत्रिकाने चांडाळ भल्लूकाला सोडले. ते पाहून दुर्मुख एका अंगरक्षकाबरोबर घोड्यावर स्वार होऊन एका अरण्यातून पळून जात असतां नागमल्ल नावाच्या चोरांच्या नायकाने त्याला दोरीचा फास टाकून पकडले व वर ओढू लागला. पुढे–]

दोघे चोर थरकाप उडवून देणारा आवाज काढून ओरडत अंगरक्षकासमोर झाडाच्या फांदीवरून उतरतांच तो थरथर कांपत घोड्याचा लगाम जोराने ओढत म्हणाला–"अहो, माझ्या कंबरेला तलवार लोंबत असली तरी मी निःशस्त्रच आहे, असे समजा! माझ्या हातून तुम्हांला कोणत्याही प्रकारचा त्रास होणार नाही."

चोरांचा नायक घोड्याचा लगाम डाव्या हाताने घट्ट धरून आणि उजव्या हाताने तलवारीचे टोक अंगरक्षकाच्या कंठावर ठेवून म्हणाला–"अरे ए, तू तलवार उपसलीस तरी आम्ही भिणारे लोक नाही. तो पहा तुझ्या पुढे घोड्यावर गेलेला माणूस, झाडाच्या फांदीला लोंबकळतो आहे. तुम्ही दोघेच आहां की तुमच्या पाठीमागून आणखी काही लोक या बाजूला येत आहेत?"



'आपले काही अनुयायी मागून येत आहेत असे सांगितले तर जिवावरचं संकट टळेल, की आम्ही दोघेच आहों, असे म्हटले तर टळेल' या विचारात अंगरक्षक असतां राजा दुर्मुख झाडाच्या फांदीला बांधलेल्या दोरीला लोंबत असलेल्या अवस्थेतच मोठ्याने ओरडत म्हणाला–"मला हा अपमान असह्य झाला आहे, कोठे आहेस रे, अंगरक्षका?"

अंगरक्षक उत्तर देणार इतक्यात नागमल्ल त्याच्या कंठात तलवार खुपसण्याची भीती दाखवीत म्हणाला–"म्हणजे, तू अंगरक्षक आहेस तर! कशा तऱ्हेच्या व्यक्तीचा तू अंगरक्षक आहेस रे?"

त्यानंतर अंगरक्षक उतरल्यावरोबर राजा दुर्मुखाला फांदीवर ओढण्याचा कसोशीने प्रयत्न करीत असलेल्या चोराला नागमल्ल म्हणाला–"आपल्याला खूप पैसेवाले लोकच सापडले आहेत रे! रेशमी वस्त्रे घातलेल्या माणसाला त्याची कंबर मोडल्याशिवाय हळूहळू खाली उतरव."

झाडावरच्या चोराने दुर्मुखाला सावकाश खाली जमिनीवर उतरविले. लगेच दुर्मुख त्याच्या पाठीला बांधलेली दोरी सोड-विण्याचा प्रयत्न करू लागतांच नागमल्ल-शेजारी ते सर्व पहात असलेला दुसरा चोर दुर्मुखाजवळ जाऊन म्हणाला–"तुझ्या कंबरेला बांधलेली दोरी गळ्याला बांधणार आहेस का? इतकी घाई करू नकोस. तू कोण आहेस हे खरे सांगितले नाहीस तर ते काम आम्हीच करू."

इतक्यात झाडावरचा चोर आणि नागमल्ल दोघे तिकडे आले. नागमल्लने राजा दुर्मुखाकडे पायापासून डोक्यापर्यंत एकदा खोल नजरेने पाहून म्हटले–"तुझे हे श्रीमंती थाटाचे कपडे, नक्षी केलेली म्यान पाहिल्यावर तू खूप श्रीमंत असल्या-सारखा दिसतो आहेस. प्रथम तुझ्याजवळ जितकी रक्कम असेल ती काढून समोर ठेव. नंतर तू आपल्या या अंगरक्षकाला घरी पाठवून दहा हजार होन मागव. तसे तू करायला तयार नसशील तर तू जिवंत घरी परतणार नाहीस. तुझं प्रेत त्या गुहेत राहणाऱ्या वाघाला किंवा लांडग्याला फराळ करायला मिळेल."

ते ऐकल्यावर राजा दुर्मुखाला तो केवढ्या मोठ्या संकटात सापडला आहे याची जाणीव झाली. आपण कोण हे कळले तर चोर आणखी मोठ्या बक्षिसाच्या मोहाने आपला शिरच्छेद करून आपला शत्रू चंद्रशिला नगरीचा राजा जितकेतू याच्याकडे आपले डोके पाठवायला मागेपुढे पहाणार नाहीत. त्या ऐवजी आपण एक श्रीमंत व्यापारी असल्याचे खोटे सांगितले तर आपल्याला आपल्या अंगरक्षकाच्या हाती फक्त दहा हजार होनच मागविण्याची गरज राहील. परंतु मध्यंतरी आपण खोटे बोलल्याची गोष्ट बाहेर पडली तर...

राजा दुर्मुख आपल्या प्रश्नाचे उत्तर देण्याऐवजी मुक्यासारखा उभा राहून काहीतरी विचारात गढला असल्यासारखा पाहून चोरांचा नायक नागमल्ल चिडला व दातओठ चावीत म्हणाला–"काय रे कोणत्या विचारात आहेस? काही तरी युक्ती काढून माझ्या हातातून निसटून जाण्याच्या विचारात आहेस, नाही का?" असे म्हणत त्याने तलवार उचलली. लगेच दुर्मुख म्हणाला–"तू मागितलेस ते दहा हजार



होन कसे मागवायचे, याच विचारात होतो. माझे नाव दुर्जय शेट, मी उदयगिरीचा राहणारा आहे. आतां तर माझ्या जवळ फुटकी कवडीसुद्धा नाही!"

ते उत्तर ऐकून नागमल्ल आश्चर्यचकित होऊन म्हणाला–"इतकी श्रीमंती वस्त्रे अंगावर घालून आणि बरोबर फक्त एका अंगरक्षकाला घेऊन तू या जंगलातून प्रवास करतो आहेस म्हणावयाचास! आम्ही तुझ्या या गप्पांवर विश्वास करावा म्हणतोस होय?" असे विचारीत नागमल्ल शेजारच्या चोरांना म्हणाला–"अरे, याच्या कंबरेला बांधलेली दोरी सोडा आणि याच्या गळ्याला बांधा. मी तेवढ्यात



याला फाशी द्यायला एखादं चांगलं झाड हुडकतो."

नागमल्ल अजून बोलतच होता, तेवढ्यात त्यांना दुरून कोठून तरी हत्तीचा घिंकार आणि त्याच्या पाठोपाठ चांडाळ अस्वलाचे ओरडणे ऐकू आले. त्यामुळे राजा दुर्मुख व त्याचा अंगरक्षक नखशिख थरथर कापू लागले. अंगरक्षक एकदां चहूंकडे पहात म्हणाला—"महाराज, मला वाटलं होतं की ते चांडाळ भल्लूक कोठेतरी वाट चुकून जंगलात भटकत असेल. परंतु ते तर आपला वास घेत इकडेच येत असल्या-सारखं दिसते आहे." चोरांचा नायक अनुयायांकडे पहात म्हणाला—"यांचं बोलणं ऐकलंत का रे? हा आपलं नाव दुर्जय शेट म्हणतो आहे, आणि तो 'महाराज' म्हणून हाक मारतो आहे. त्याहून जास्त आश्चर्य म्हणजे चांडाळ भल्लूक...आणि ते जंगलात वाट चुकून भटकत आहे!" असे म्हणत तलवार उगारून नागमल्ल म्हणाला—"काय रे, तुम्ही दोघे बुद्धिभ्रम झालेले वेडे आहां की आम्हांला भ्रमांत घालण्यासाठी या गप्पा मारतां आहां?"

राजा दुर्मुख काय उत्तर द्यावे या विचारात घाबरून जाऊन इकडे तिकडे पहात असतां पुन्हा एकदा अगदी जवळ हत्तीचा घिंकार आणि अस्वलाचे ओरडणे ऐकू आलं. ते ऐकल्यावर नागमल्लसुद्धा चपापला व एका चोराला म्हणाला—"अरे, तू झाडावर चढून पहा तरी! एकाच वेळी हत्तीचा घिंकार आणि अस्वलाचं ओरडणे आहे की त्यांचं सोंग करणारी माणसं तर नाहीत? हे म्हणताहेत त्यांत खरं खोटं किती आहे, पहा तरी!"

चोरां पैकी एकजण झपझप एका झाडावर चढला आणि मोठ्याने किंकाळी फोडल्यासारखा ओरडून म्हणाला—"नागू! अरे तो दुर्जय शेट आणि त्याचा अंगरक्षक म्हणाला तेच खरं आहे! सोंड कापली कुऱ्हाड हातात घेऊन अस्वल—दोघे वाटेत आड येणाऱ्या झाडाच्या फांद्या आपल्या कुऱ्हाडीने कापीत झाडं पाडीत तुडवीत येत आहेत."

नागमल्लने भयकंपित आश्चर्याने चारी-बाजूला एकदा नजर फिरविली व आता काय करायचे या विचारात होता, तेव्हां राजा दुर्मुख त्याचा हात धरून म्हणाला—"नागमल्ला! आपण जितके लौकर होईल, येथून पाय काढण्यातच आपले सर्वांचे हित आहे. पैशाच्या मोहाला बळी पडून स्वत:चे जीवित धोक्यात घालू नकोस. तुला हवं असेल तर माझ्याकडे जेवढे पैसे आहेत ते देऊन मी तुला एक राज्यच खरेदी करून देईन." बोलतांना दुर्मुख थरथर कापत होता.

अंगरक्षक चटदिशी घोड्यावर बसला व त्याला पळविण्याच्या तयारीत लगाम धरून नागमल्लाला म्हणाला—"नागमल्ल सरदार! तू या क्षणी आमच्या महाराजांचा जीव वांचविलास तर ते तुला आपले अर्धे राज्य देऊ शकतील. मी घोड्यावर बसून वायुवेगाने राजधानीकडे जातो आणि बरोबर सैन्य घेऊन येतो. आपल्याला काय वाटते महाराज?"

"ते काम तर मलाच जमेल. परंतु राजधानीला जायची वाट कोणती हे या भयंकर अरण्यात कळत नाही." असे म्हणत



राजाने घोड्याच्या लगामाची दोरी त्या दृष्टीने घट्ट धरली.

नागमल्लने आपल्या दोघां अनुयायांकडे डोळ्याने खूण केली व दुर्मुख आणि त्याचा अंगरक्षक दोघांकडे डोळे वटारून पहात म्हणाला—"काय रे, तुम्ही दोघे खरोखरीच मूर्ख तरी आहांत नाहीतर पहिल्या-नंबरचे लबाड तरी आहांत. तिकडून त्या चांडाळाचे भल्लूक तुमच्या अंगावर धावून येत असतां तुम्ही कोठे तरी तुमची राजधानी आहे, तिकडे जाऊन सैन्य घेऊन येतां आहां का?" नंतर आपल्या दोघां अनुयायांना म्हणाला—"या दोघांना दोऱ्यांनी बांधून त्या डोंगराच्या गुहेत धरून घेऊन



या. त्या चांडाळाचे भल्लूक इकडच्या बाजूने निघून गेल्यावर खरोखरी हे कोण आहेत हे पाहून घेऊ."

नागमल्लाने असे सांगितले व गुहेच्या बाजूला निघाला. त्याच्या अनुयायांनी दुर्मुखाला व त्याच्या अंगरक्षकाला दोऱ्यांनी घट्ट बांधले आणि आपल्या पाठीमागून ओढून नेऊ लागले. ते एका मोठ्या गुहे-जवळ पोचले त्याच वेळी चांडाळ भल्लूक झाडाच्या आडून त्या बाजूला येत असलेले दिसले. चांडाळ दुर्मुखाला पाहून मोठ्याने ओरडून म्हणाला–"अस्सं काय? लबाडा, तू शेवटी सापडलासच! आपल्या याच कुऱ्हाडीला मी तुझं रक्त पाजणार आहे."

असे म्हणत भल्लूक हत्तीवरून जमिनीवर उडी मारून त्यांच्या पाठीमागे पळत आले.

नागमल्लसह सर्वच भयकंपित झाले आणि पळत जाऊन एका गुहेत शिरले. भल्लूक रूपातला चांडाळ गुहेजवळ पोच-ण्याच्या आत त्यांनी एक मोठा दगड गुहेच्या तोंडावर बसविला. तरी आंत सर्व थरथर कांपतच बसले होते.

भल्लूक चांडाळ गुहेजवळ गेला आणि गुहेच्या तोंडावरच्या दगडाला दोनदा लाथ मारून ओरडला–"अरे, कोण आहां गुहेत मुकाट्याने बाहेर या. मला राजा दुर्मुखाचे डोके तेवढे हवे आहे. इतर कोणाच्या जिवाला धोका नाही."

ते ऐकून चोरांचा नायक नागमल्ल म्हणाला–"अस्सं! छान! या भल्लूकाला राजा दुर्मुखाचे डोके पाहिजे आहे म्हणे! शेंडाबुडखा नसलेली आहे काय ही भानगड?" आणि दुर्मुखाकडे पाहून म्हणाला–"या जंगलाला लागून असलेल्या उदयगिरी राज्याचा अधिपती दुर्मुख नावाचा राजा आहे. मी कधी जंगल सोडून कोणत्याही शहरात गेलो नाही. म्हणून त्या राजाचे मी तोंडसुद्धा पाहिलेले नाही. तूच तो दुर्मुख-राजा तर नाहीस ना?" त्याने विचारले.

"मी दुर्जय शेट आहे, उदयगिरीचा राहणारा. कोणते तरी भूत बसले आहेसे वाटते या अस्वलाच्या मानेवर. याच्या बोलण्याकडे काय लक्ष द्यायचं रे? आपण येथून सुखरूप बाहेर निसटून जायला एखादी वाट असली तर बोल. तू मागितल्या-प्रमाणे मी तुला दहा हजार होन मागवून देतो." दुर्मुखराजा चोरांच्या नायकाकडे दीन मुद्रेने पहात म्हणाला.

"नागमल्ल सरदार! महाराज दिलेले वचन कधी मोडत नाहीत!" अंगरक्षक म्हणाला.

"गप्प बैस, मूर्ख कुठला! तुझ्या मानेवर भूतबीत तर नाही बसलं? या जंगलात पाऊल ठेवल्यापासून तू सारखा मला 'महाराज', 'महाराज' म्हणतो आहेस. पुन्हा असे म्हटलंस तर तुझी मानच उडवीन. खबरदार!" दुर्मुख म्हणाला.

चोरांचा नायक लगेच दचकल्यासारखा उभा राहून इतर चोरांना म्हणाला–"आपण सुदैवाने म्हणा, दुर्दैवाने म्हणा उदयगिरीच्या दुर्मुखराजालाच पकडलं आहे रे! कारण राजाशिवाय जाहीरपणे शिरच्छेद करण्याचा अधिकार इतर कोणाला असणार? हा दुर्जय शेट म्हण-विणारा चुकून खरं तेच बडबडला म्हणावयाचा!"

राजा दुर्मुखाला, गुहेच्या तोंडावरचा



करीत असलेल्या भल्लूकाच्या भीतीबरोबर गुहेतल्या चोरांच्या हातीच आपल्या जिवाला धोका असल्याची भीती वाटली. काही सूचना करण्याच्या हेतूने शेजारी बसलेल्या अंगरक्षकाला कोपराने खुणावून म्हणाला–"नागमल्ला! तुझ्या मनात माझ्या विषयी काहीतरी भ्रम झाल्यासारखा दिसतो आहे. मी खरोखरच दुर्जयशेटच आहे! या जंगलात पाय ठेवल्यापासून माझ्या नोकराचा मतिभ्रम झाला आहे आणि वाटेल ते बडबडतो आहे. याचे ग्रह चांगले दिसत नाहीत!"

"क्षमा करा, महाराज! सांगून ठेवतो." अंगरक्षक कळ आल्यासारखा दुःखाने








नागमल्ल कपाळ दोन्ही हातांनी घट्ट धरून म्हणाला–"आताच्या परिस्थितीत तू राजा असलास काय किंवा शेट असलास काय मला काहीच नुकसान नाही. ते भयंकर अस्वलमात्र गुहेच्या तोंडावरचा दगड बाजूला सरकवून आपणां सर्वांची डोकी उडविणार आहे, यात मात्र शंका नाही!" असे म्हणत आपल्या दोघां साथीदारांना म्हणाला–"आपण मरणार तर आहोंच, पण धाडस करून पाहतो. आपणच दगड बाजूला सरकवून आपण त्या चांडाळ भल्लूकावर तुटून पडलो तर कसे होईल?"

दोघे चोर काही उत्तर देणार इतक्यात अंगरक्षक काहीतरी विचार करून म्हणाला–"नागमल्ल सरदार! त्या भल्लूक वेषधारी चांडाळाची सृष्टी भल्लूक मांत्रिक नावाच्या महामांत्रिकाने केली आहे. त्याच्या अंगात राक्षसाचे बळ आहे! आपण ह्या गुहेतच गप्प बसून राहण्यात आपले हित आहे."

त्याचे बोलणे संपण्यापूर्वीच चांडाळ भल्लूकाने दोन्ही हातांनी धरून तो दगड

पहात म्हणाला–"अरे दुर्मुख राजा! बाहेर ये रे! तुझे डोके कापून मी आल्या वाटेने निघून जाईन!"

"छान! म्हणजे याने डूक धरला आहे तो एकट्या या दुर्मख राजावर की दुर्जय शेटवर; आपण वांचलो, बावा! याला धरून ढकला बाहेर!" चोरांचा नायक म्हणाला.

दोघे चोर राजाचे दोन्ही हात धरून त्याला ओढीत नेऊ लागले. तितक्यात थोड्या अंतरावरून कर्कश आवाज ऐकू आला–"मी केव्हांपासून पाहतो आहे, काय आहे ही गडबड? शेजारच्या गुहेत उग्रदंड आहे हे माहीत नाही वाटतं तुम्हांला?"

तत्क्षण चांडाळ भल्लूक म्हणाला–"तू राक्षस आहेस होय? उग्रदंड आहे का तुझं नाव? भल्लूक मांत्रिकाच्या मंत्रबळाने मंत्रवलेला परशू तुझी मान उडवीत आहे!" म्हणत राक्षसावर तुटून पडायला सरसावला.

(क्रमशः)





# लोभाचे पारितोषिक

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि पुन्हा नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! मला हे कळत नाही की कोणता उद्देश साध्य करण्यासाठी एक उपाय म्हणून तू हे प्रेत खांद्यावर घेऊन जाण्याचा श्रम करीत आहेस. परंतु साधन-शुद्धी नसेल तर साध्य प्राप्त होत नाही. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला धर्मदास याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी एका राजाच्या राजधानीत धर्मदास व गंगादास नावाचे दोन दरोडे-खोर रहात असत. दोघांनी दरोडे घालून पुष्कळ पैसे मिळविले. परंतु गंगादास जे पैसे मिळवी ते काळजीपूर्वक साठवी आणि













खूप चैनीत राही. परंतु धर्मदास आपल्या वाट्याचे पैसे एक धर्मशाळा स्थापन करून गरीबांना अन्नदान करण्यात खर्च करी आणि साधूसारखा धर्मशाळेतच राही.

हळूहळू साधूची कीर्ती देशभर पसरली. राजाच्या कानापर्यंतही त्याची प्रसिद्धी पोचली. राजाने त्या साधूला दरबारात बोलावून त्याला 'धर्मदाता' ही पदवी दिली.

परंतु कोणाला या गोष्टीची कल्पना देखील नव्हती की धर्मदाता हा एक मोठा चोर व दरोडेखोर आहे. खुद्द गंगादासला सुद्धा हे माहीत नव्हते की धर्मदाता हाच त्याचा साथीदार दरोडेखोर आहे.

त्या दोन दरोडेखोरांना कसे पकडावयाचे, हा राजासमोर एक फार मोठा प्रश्न होता. चोरांना धरण्यासाठी त्याने केलेले सर्व प्रयत्न फुकट गेले. म्हणून राजाने दवंडी पिटविली की जो चोरांची माहिती देईल त्याला एक हजार होन इनाम दिले जातील. दवंडी ऐकल्यावर गंगादासला वाटले की आपणच धर्मदासच्या घराची माहिती राजाला कळवावी, म्हणजे आपल्याला एक हजार होन मिळतील आणि चोरी करून जी मिळकत होईल ती सर्व आपल्यालाच मिळेल. कोणी वाटेकरी राहणार नाही.

तो विचार मनात आल्याबरोबर गंगादासने राजाच्या दर्शनास जाऊन सांगितले की राजधानीतल्या सर्व चोऱ्या धर्मदास करीत आहे. त्याने धर्मदासच्या घराचा पत्ता सुद्धां सांगून टाकला. राजाने धर्मदासाला अटक करविली. धर्मदासाने तो चोऱ्या करीत असल्याचे कबूल केले. राजाने त्याची चौकशी करण्यासाठी एक दिवस ठरविला आणि त्याला तुरुंगातच ठेवण्याचा हुकूम दिला.

दोनतीन दिवसांनी राजाला कळले की तीनचार दिवसांपासून धर्मदास धर्मशाळेत दिसत नाही आणि धर्मशाळेतले अन्नदान बंद पडले आहे. राजाने धर्मशाळेत अन्नदान चालू ठेवण्याची व्यवस्था केली.

परंतु राजधानीतल्या चोऱ्या बंद न झाल्याचेही राजाला कळले. म्हणून राजाने शिपायांना पाठवून गंगादासला बोलावून आणविले आणि म्हणाला–"धर्मदासाच्या चौकशीच्या वेळी तुझ्या साक्षीची गरज आहे. परंतु तुझ्यावर धर्मदासच्या साथीदारांकडून संकट येण्याची शक्यता आहे. म्हणून मी तुला चौकशी होईपर्यंत तुरुंगात सुरक्षित ठेवणार आहे. धर्मदासाला शिक्षा झाल्यावर तुला एक हजार होन इनाम देण्याची व्यवस्था होईल आणि तुला मी तुरुंगातून मुक्त करीन."

त्या प्रमाणे गंगादासला तुरुंगात ठेवण्यात आले. परंतु बरेच दिवस झाले तरी धर्मदासची चौकशी झाली नाही. अशा तऱ्हेने एक महिना लोटला. सर्व चोऱ्या बंद झाल्याचे लक्षात आले. शेवटी राजाने एके दिवशी धर्मदासाला तुरुंगातून सोडण्याची आज्ञा केली आणि त्याला चांगला पगार देऊन धर्मशाळेचा व्यवस्थापक म्हणून नेमले.

परंतु गंगादास मात्र तुरुंगातच राहिला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, त्या राजाने असे कां केले? धर्मदासाने चोरी करतो, हे मान्य केले असूनही चौकशी वगैरे न करतां त्याला सुटका दिली आणि वर त्याला धर्मशाळेचा व्यवस्थापक म्हणून नेमले आणि त्याला पकडवून देणाऱ्या गंगादासाला इनाम वगैरे काही न देतां तुरुंगात खितपत ठेवले, हे कां? या शंकांचे समाधान कारक उत्तर



माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"राजाचे चातुर्यच यात प्रगट होत आहे. धर्मदासच चोर आहे ही शंका करण्यासारखे कारण राजाला दिसलं नाही. उलट धर्मदासच धर्मदाता होता हे कळायला पुरावा होता. कारण धर्मदासाला तुरुंगात टाकले त्या दिवसापासून धर्मदाता नाहीसा झाल्याचे लक्षात आले होते. शिवाय शिपायांकडून राजाला कळले असणार की धर्मदासाचे घर सामान्य गरीबाच्या घरासारखे आहे. या उलट गंगादासाने स्वत:विरुद्ध अनेक पुरावे आपल्या बोलण्यावरून व वागणुकीवरून दाखविले होते. तो धर्मदासाचा साथीदार नसता तर त्याला हे कसे कळले की धर्मदास एक चोर आहे? शिवाय गंगादास खूप चैनीत रहात होता व त्याने आपल्या ऐपती पेक्षां मोठे घर बांधले होते. त्याहून जास्त हा मूर्खपणा त्याने केला की धर्मदासाला कैदेत टाकल्यावरही तो चोऱ्या करीत राहिला. म्हणून राजाला त्याच्यावर संशय यायला कारण झाले. त्याची निराळी चौकशी करण्याची गरज उरली नाही. आतां धर्मदास हा चोर होताच. परंतु तो जात्या चांगला माणूस होता. कारण त्याने चोऱ्या करून जे कमाविले होते ते सर्व धर्मशाळेत अन्नदान वगैरे करण्यासाठी खर्च करून टाकले आणि स्वत: साधूसारखा रहात होता. तो कैदेत होता, परंतु तो गंगादासासारखा मित्रद्रोही नव्हता. आपण धर्मशाळा चालू ठेवण्यासाठी खर्च करण्याचे ठरविले तर धर्मदास चोरी करण्याचे बंद करील असे राजाला वाटले. म्हणून राजाने या सर्व गोष्टींचा विचार करून धर्मदासाला एका योग्य पदावर नेमले."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# बायकांचा पगडा

रामू आणि सोमू दोघे भाऊ होते मोठा भाऊ रामू फार आळशी होता. तो कोणताही कामधंदा करीत नसे. सोमू मात्र शेतात खूप काम करी व चांगले पीक काढी आणि घरचा खर्च भागवून चार पैसे मागे टाकी. सर्व कुटुंबाचा खर्च त्यामुळे भागत असे तो चार पैसे मिळवून कमी खर्चात भागवी.

रामूची बायको हुशार होती. ती नवऱ्याला नेहमी म्हणे–"धाकटा भाऊ काबाडकष्ट करून मिळवतो आहे आणि तुम्हांला बसून रहायला लाज कशी वाटत नाही? तुम्हीसुद्धा शेतात जाऊन काम करायला काय हरकत आहे?"

सोमूची बायको बरेच दिवस दिराचा आळशीपणा पहात होती. ती नवऱ्याला दिवसभर घाम गाळताना पाही व तिला दिराचा राग येई. ती नवऱ्याला म्हणाली–"तुम्ही एवढी मेहनत कशाला करतां? तब्येत बिघडवून घ्याल. तुम्हीसुद्धा स्वस्थ घरात बसून कां नाही रहात?"

हळूहळू बायका म्हणत त्याचा परिणाम दोघांच्या मनावर होऊ लागला. रामूला स्वत:च्या आळशीपणाची लाज वाटू लागली आणि तो शेतात काम करू लागला. त्याला शेताच्या कामाची उत्तम माहिती थोड्याच दिवसात झाली.

या उलट सोमू घरी बसून राहू लागला आणि ऐदी झाला.





# औषध नाही विश्वास

एका गावी रामशास्त्री नावाचे एक वैद्यबुवा रहात असत. ते फक्त औषधी वनस्पतींचा प्रयोग करून जुना मुरलेला रोग बरा करीत. म्हणून त्यांच्या गांवच्या पंचक्रोशीत शास्त्रीबुवांना फार मान होता. शास्त्रीबुवा पैशाचे लोभी नव्हते. रोग्याची सेवा करणे आणि त्याला बरं करणे यातच त्यांना आपल्या विद्येची सार्थकता वाटे. रोगी देईल ती रक्कम ते आनंदाने स्वीकारीत. तरी त्यांना प्राप्ती चांगली होत असे.

शास्त्रीबुवांनी आपला मुलगा गोविंद याला वैद्यकशास्त्र चांगलं शिकवून आपल्या धंद्याची वाढ व्हावी असा विचार केला. गोविंदने वडिलांकडून वैद्यकशास्त्र शिकून घेतलं असलं तरी वडिलांच्या विद्येविषयी त्याच्या मनात जो आदर असायला हवा तो त्याच्या मनात नव्हता. त्याला वाटे की वनस्पती व गावठी औषधे ही शास्त्रीय दृष्ट्या कुचकामाची आहेत. म्हणून तो वडिलांच्या परवानगीने मोठ्या शहरात जाऊन शास्त्रोक्त वैद्यकशास्त्र शिकू लागला. शास्त्रीबुवांनी विचार केला की मुलाने शास्त्रोक्त अभ्यास केला तर त्याला धंद्यात चांगले यश येईल.

म्हणून गोविंद वैद्यकशास्त्राचे शास्त्रोक्त अध्ययन करण्यासाठी शहरात निघून गेला. काही वर्षांनी अभ्यास करून आपल्या गावी परत आला.

रामशास्त्रींनी गोविंदने वैद्यकशास्त्रात आपल्याहून जास्त प्राविण्य संपादन केले असल्याचे सांगून त्यांच्याजवळ जे रोगी येत त्यांना गोविंदकडे पाठवायला सुरवात केली. परंतु थोडेच दिवसात शास्त्रीबुवांना असे आढळून आलं की गोविंदला रोगाचं निदान करण्यात तितकंसं यश आलं नाही. म्हणून मोठ्या मुरलेल्या आजाराने आजारी असलेल्या रोग्यांना त्याच्याकडे पाठविणे धोक्याचं होईल, असे त्यांना वाटू लागलं. शास्त्रीबुवा वेळीच सावध झाले. गोविंद मात्र हे मानीत राहिला की वडिलांना वैद्यकशास्त्राचे शास्त्रोक्त ज्ञान मुळीच नाही. तरी साधी गावठी औषधे देऊन ते त्याच्या यशाच्या मार्गावर अडथळे आणीत आहेत. त्याने एके दिवशी ती गोष्ट वडिलांना सांगूनही टाकली आणि गावठी इलाज करण्याचे सोडून देण्यास सल्ला देण्याचा शहाणपणाही केला.

रामशास्त्री मनात हसले. त्यांना वाटलं की मुलाला कळत नाही की तो लहान तोंडी मोठा घास घेत आहे. तरी त्याचं मन न दुखविता म्हणाले–"बाळ! तू म्हणालास ते बरोबर आहे. माझी गावठी औषधे या खेडूतांच्या कामाला येतात. तुझ्यासारख्या शास्त्रोक्त अभ्यास करणाऱ्याला शहरात राहणाऱ्या रोग्यांचा इलाज करणे जास्त बरे होईल म्हणून तू शहरात जाऊन धंदा केलास तर जास्त फायद्याचे होईल."

गोविंदला ते बरोबर वाटले. परंतु दुर्दैवाने शहरात पोचल्यावर गोविंद स्वतःच आजारी पडला आणि आजार वाढतच गेला. रामशास्त्रींनी आपल्या मुलाला



औषधपाणी पुष्कळ देऊन पाहिलं, परंतु त्यांना थोडे देखील यश मिळालं नाही. एक महिना लोटला. शेवटी निराश होऊन रामशास्त्रींनी बराच विचार करून आपला एक शिष्य महादेवशास्त्री याला बोलावून त्याला गोविंदचा इलाज करायला सांगितले. त्याने ते मान्य केले.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे महादेवशास्त्र्याने औषध द्यायला सुरू केल्यावर थोड्याच दिवसात गोविंदला आराम पडू लागला. गावकऱ्यांना आश्चर्य वाटले की शास्त्रीबुवांसारख्या एका अनुभवी वैद्याला साध्य झाले नाही ते त्यांच्या एका शिष्याला कसे साध्य झाले? सर्वांनी शास्त्रीबुवांच्या










समोरच त्यांचा शिष्य महादेवशास्त्री याची प्रशंसा केली.

गोविंद चांगला बरा झाल्यावर महादेवशास्त्री आपल्या गावी परत निघाला. तेव्हां रामशास्त्रींनी त्याला थांबायला सांगून सुचविले की त्याने त्याच गावी राहून वैद्यकी करावी; गावात चागली प्राप्तीही होईल. महादेवशास्त्री म्हणाला–"गुरुवर्य! आपणांसारखे अनुभवी वैद्य असतांना मला येथे कोण विचारील?"

"नाही, मी हे गांव सोडून जायचं ठरविलं आहे." रामशास्त्री म्हणाले.

"गुरुवर्य, आपल्याला या गावात चांगले यश प्राप्त झाले आहे. अशा परिस्थितीत गाव सोडून जाण्याची गरज काय?" महादेवशास्त्र्याने विचारले.

"वैद्य म्हणून मला या गावात माझ्या मुलाचा इलाज करीत असतां अपयश मिळालं आहे. मी स्वतःच्या मुलाचा इलाज करण्यात यशस्वी झालों नाही तर माझ्यावर कोण विश्वास करणार? वैद्यावर विश्वास असल्याशिवाय रोगी बरा होत नाही." रामशास्त्री म्हणाले.

नंतर रामशास्त्र्यांनी मुलाला कोणकोणती औषधे दिली होती हे विचारून घेऊन महादेवशास्त्री म्हणाला–"आपण जी औषधे आपल्या मुलाला दिलीत तीच मी दिली होती."

"बरोबर! परंतु मी जेव्हां ती औषधे मुलाला देत होतो तेव्हां माझ्या मुलाचा विश्वास माझ्या औषधावर नव्हता. म्हणून मी तुला बोलावून औषधपाणी करायला सांगितले. तुझ्या औषधावर त्याचा विश्वास बसला. परंतु त्याचा परिणाम असा झाला की गावकऱ्यांचा माझ्यावरचा विश्वास उडाला. तुझं कुटुंब मोठे आहे. मी काय कोठे ही राहून कुटुंबाच्या खर्चाला हवा तेवढा मिळवू शकेन." असे सांगून रामशास्त्री पत्नीला बरोबर घेऊन दुसऱ्या गावी गेले. महादेवशास्त्री त्याच गावी राहून आपला धंदा करू लागला आणि त्याला धंद्यात चांगले यश मिळाले.



# कानउघाडणी

फार प्राचीन काळातली गोष्ट आहे, एकदा एका मोठ्या वादळामुळे कित्येक लोक हताहत झाले व अलोट संपत्ती नष्ट झाली. प्रजेने राजाकडे मदत मागितली. परंतु राजाला मदत कशी करावी हे कळेना. मंत्र्याचा सल्ला राजाला पसंत पडला नाही.

राजाने हेरांकरवी पीडित प्रजेची एक यादी मागविली. नंतर त्यांना पाठवून प्रजेला पैसे देऊन मदत केल्यास फायदा होईल की अन्नधान्य व उपयोगी वस्तु दिल्यास फायदा होईल या गोष्टीची चौकशी करून यायला सांगितले. हेरांनी काही दिवसांनी परत येऊन, अर्ध्या प्रजेला पैशाची गरज असल्याचे व अर्ध्या प्रजेला धान्य हवे असल्याचे सांगितले. तरी राजा काही निश्चय करु शकला नाही. निर्णय देण्यासाठी राजाने एक समिति नेमली. या समितीने लोकांना पैशाचीच मदत करावी अशी शिफारस केली. त्या प्रमाणे राजाने मोठ्या प्रमाणात प्रजेला पैशाची मदत केली.

नंतर राजाने वेष पालटून स्वतः देशभर प्रवास केला आणि प्रजेला काय वाटते त्याची माहिती काढून घेऊन रागाने तो मंत्र्याला म्हणाला–"प्रजा तर कृतघ्न दिसते आहे. कोणी माझी वाखाणणी करीत नाही. वादळ थांबल्याबरोबर कोण्या सोमगुप्त नावाच्या माणसाने अन्नदान केले होते. म्हणे लोक त्याचेच गोडवे गात आहेत." मंत्री नम्रपणे म्हणाला–"महाराज? ऐन संकटाच्या वेळी जी मदत मिळते तीच आठवते!"





# मुलांचा डेरा

शांतिवन नावाच्या गावी श्रीपती व भूपती नावाचे दोघे श्रीमंत गृहस्थ रहात असत, कधी काळी दोघांची परस्परांशी फार मैत्री होती. परंतु गावातल्या भांडणात त्यांचे वैर वाढत गेले.

शांतिवनापासून चार मैलांवर काली-पट्टण नामक एक गाव होते. तेथे दरवर्षी श्रीपती व भूपती दोघे जात असत. त्या वर्षी जत्रेहून परत येताना श्रीपतीने भूपतीचा आणि भूपतीने श्रीपतीचा वध करण्याचे ठरवून तशी तयारी करून ठेवली.

जत्रेला त्यांच्या गावाहून जाण्याच्या वाटेवर वडाचे एक मोठे झाड होते. परत येते वेळी तेथे पोचेपर्यंत काळोख पडू लागत असे. त्या जागी श्रीपती पोचला की त्याचा खून करण्यासाठी भूपतीने मारेकरी नेमून ठेवले होते. इकडे श्रीपतीने वडाच्या अलीकडे एक तलाव होता. त्याच्या बांधाच्या आड लपून राहून भूपती त्या जागी आला की त्याचे मुंडके उडविण्यासाठी आपले मारेकरी नेमून ठेवले होते.

त्या वर्षी जत्रा फारच चांगली भरली होती. इतर खेळांबरोबर सर्वात जास्त गमतीदार 'मुलांचा डेरा' म्हणून खेळ होता त्यात. या डेऱ्यात मुलांना प्रवेश नव्हता. फक्त मोठ्यांनाच प्रवेश मिळत असे. त्या डेऱ्याच्या समोर दाराजवळ एक विचित्र पेहराव करून एक म्हातारा माणूस उभा होता. तो एक कोणी सिद्धपुरुष होता. त्याला मंत्रातंत्रांची चांगली माहिती होती. तो गंमत पहायला येणाऱ्यांना एका गमतीदार आवाजात सांगे–"या डेऱ्यात पाऊल टाकून आपल्या बालपणातल्या गंमती-जमतींची मजा पाहून घ्या!"

डेऱ्यातून बाहेर येणारे सर्व लोक जोराने हसत खिदळत बाहेर येत होते. श्रीपतीला वाटले की जाऊन पाहू तर या गंमत कशी आहे ती. ते मनात आल्यावर तो बायकोला घेऊन त्या डेऱ्यात गेला आणि दहा वर्षांचा मुलगा झाला. थोड्या वेळाने भूपतीसुद्धा आपल्या बायकोला घेऊन डेऱ्यात शिरला. तो देखील दहा वर्षांचा मुलगा झाला. त्यांच्या बायका पांच सहा वर्षांच्या मुली झाल्या. परंतु त्यांना तेथे कोणी त्यांच्या बालमैत्रिणी भेटल्या नाहीत म्हणून त्या लगेच परतल्या आणि पुन्हा स्वस्वरूपात आल्या.

श्रीपती व भूपती दोघांनी आत गेल्यावर आपापल्या बायकांना ओळखलसुद्धा नाही. परंतु परस्परांना मात्र ओळखले व दोघे परस्परांना प्रेमाने भेटले. दोघे डेऱ्यातल्या मुलांबरोबर बराच वेळ खेळले. त्या डेऱ्यात मुलांनी खेळण्या लायक झोपाळे, घसरगुंडी वगैरे वस्तू होत्या. श्रीपती व भूपती दोघांनी त्या खेळात भाग घेतला.

त्यावेळी, म्हणजे बालपणी दोघे जीवश्च-कंठश्च मित्र होते. बरोबर अभ्यास करीत, खेळत आणि मारामारी करीत तरी लगेच विसरून पुन्हां गळ्यांत हात घालून घरी परत जात. एकदा पोहतांना श्रीपती बुडू लागला. त्याला पोहतां येत नव्हते. भूपतीने बुडी मारून त्याला वांचविले होते. एकदा भूपतीचा पाय मुरगळला होता. एक पाऊल देखील टाकणे अशक्य झाले होते. तेव्हां श्रीपती त्याला आपल्या पाठुंगळीला बसवून घरी घेऊन गेला होता. त्या सर्व गोष्टी दोघांना आठवल्या.



डेऱ्यातून बाहेर पाऊल टाकतांच दोघे स्वस्वरूपात आले. परंतु त्यांची मनेमात्र पार पालटून गेली होती. डेऱ्याच्या आत असतांना त्यांच्या मनांत जो बदल झाला होता त्याच मनःस्थितीत दोघे बाहेर आले. त्यांच्या बायका पूर्वीच बाहेर येऊन त्यांची वाट पहात होत्या. परंतु त्यांना त्यावेळी बायकांना भेटण्याची गर्दी वाटली नाही. त्यांनी परस्परांचा खून करण्यासाठी परतीच्या वाटेवर मारेकरी नेमून ठेवले होते त्याचीच आठवण होऊन जास्त काळजी वाटली. आतां त्यांना ते घृणित कार्य करण्याची इच्छा उरली नव्हती. कारण आतां ते गाढे मित्र झाले होते. मग परस्परांचा जीव घेण्याचा विचार मनात कसा राहणार?

काळोख पडू लागला होता. भूपतीने आपल्या बायकोला एका ओळखीच्या माणसाबरोबर गाडीतून पाठवून दिले आणि श्रीपतीला काही सांगितल्याशिवाय पळत वडाच्या झाडापर्यंत गेला. श्रीपतीने देखील भूपतीला काही सांगितल्याशिवाय आपल्या बायकोला गाडीत बसविले व स्वतःपायी झपाझप चालू लागला.

भूपतीने धावत पळत जाऊन वडाच्या झाडाजवळ बसवून ठेवलेल्या मारेकऱ्यांना निघून जायला सांगितले. तिकडे श्रीपतीने सुद्धा तलावाच्या काठाआड लपून बसवून ठेवलेल्या मारेकऱ्यांना पाठवून दिले.

शेवटी दोघे सुखरूप आपआपल्या घरी पोचले. दोघे परस्परांच्या वैराविषयी विचार करू लागले तेव्हा त्यांना तो सर्व प्रसंग एक वाईट स्वप्न पाहिल्यासारखा भासला. दुसऱ्या दिवशी दोघे भेटले तेव्हां दोघांनी किती घोर कृत्य करण्याचे ठरविलं होतं ते परस्परांना सांगितलं. परंतु त्यांच्या पुन्हां गाढ झालेल्या मैत्रीत त्यामुळे व्यत्यय आला नाही. मुलांच्या डेऱ्यात पाऊल टाकण्यापूर्वी त्यांनी जे जे केले ते सर्व मूर्खपणाचे असल्याची त्यांची खात्री झाली. त्यानंतर पुढील आयुष्यभर दोघे आदर्श मित्र म्हणूनच ओळखले गेले.



# खोटे नाणे

एक व्यापारी कोणावर तरी रागवत होता कोणीतरी त्याला खोटे नाणे देऊन गुळ विकत घेतला होता. कामाच्या गर्दीत व्यापाऱ्याच्या लक्षात ती गोष्ट आली नाही.

इतक्यात व्यापाऱ्याचे ध्यान दुकानासमोरच्या भिकाऱ्याकडे गेले. तो जमिनीवर पडलेली कोणती तरी चकचकीत वस्तू उचलून खिशात टाकीत होता. ती चकचकीत वस्तू म्हणजे रुपयाचे नाणे होते.

हा रुपया माझा आहे. मला दे." व्यापारी ओरडला

"आपण थोर पुरुष आहां, तरी खोटे बोलतां आहां." भिकारी म्हणाला.

व्यापाऱ्याने त्याला समजावून सांगितले की 'तुला मी अर्धा रुपया देतो, तू ते रुपयाचे नाणे मला परत दे.' भिकाऱ्याने अर्धा रुपया घेतला आणि दुसऱ्या खिशातला रुपया काढून व्यापाऱ्याला दिला आणि निघून गेला.

इतक्यात व्यापाऱ्याची बायको तेथे आली आणि काहीतरी शोधू लागली. कारण तिच्या मुलाने एक खरा रुपया कोठे तरी फेकला होता.

ते ऐकून व्यापाऱ्याची छातीच फाटली. भिकाऱ्याला अर्धा रुपया देऊन त्याने स्वतःचाच रुपया परत घेतला होता. नंतर त्याने तो रुपया काढून पाहिला तो खोटा रुपया होता. म्हणजे त्या दिवशी सकाळी उठल्याबरोबर व्यापाऱ्याने दोन खोटे रुपये संपादन केले होते.



# तीळ

एका गावात शंकर व पार्वती नावाचे एक जोडपे होते. पुष्कळ दिवसांनी त्यांना एक मुलगा झाला. त्याच्या कपाळावर चिंचेच्या बियांएवढा एक तीळ होता.

त्या नवराबायकोला अंगावरच्या तिळांचे शुभ गुण माहीत होते. शंकर आनंदाने टाळी वाजवून म्हणाला–"अग ए! पहा तरी! आपल्या मुलाला राजयोग आहे!" पार्वती म्हणाली–"तो तळी म्हणजे राजयोगाचे लक्षण नव्हे. एका विद्वानाचे ते लक्षण आहे!"

दोघांचं त्यावरून भांडण झालं. दोघं परस्परांवर चिडली. तेवढ्यात एक भिकारी दारासमोर येऊन ओरडला–"आई, एक भाकर वाढा गरिबाला!"

नवराबायकोंनी त्याच्याकडे पाहिले आणि परस्परांकडे प्रश्नार्थक दृष्टीने पाहू लागली. कारण त्या भिकाऱ्याच्या कपाळावर चिंचेच्या बियांएवढा तिळाचा डाग होता.



# समुद्रमंथन



देवांदानवांचे युद्ध शतकानुशतके चालू होते. देवांना वाटू लागले की अमृत-पान करून मृत्यूवर विजय मिळविला तरच राक्षसांना जिंकणे शक्य आहे म्हणून ते मेरुपर्वताजवळ अमृताचा शोध काढायला गेले.

परंतु त्यांचा शोध व्यर्थ गेला. शेवटी ब्रह्मदेवाने त्यांना सांगितले की समुद्र-मंथन केल्यास अमृतप्राप्ती होऊ शकेल. परंतु राक्षसांच्या मदतीशिवाय समुद्र-मंथन करणे शक्य नव्हते.





अमृतप्राप्ती होईल हे कळल्यावर दानव, देवांच्या बरोबर सहकार करायला तयार झाले. तेव्हां मंदर पर्वताला रवी करण्याचे ठरले. या रवीला दोरी हवी. देवांनी नागराज वासुकीची विनवणी केली. वासुकीने होकार दिला.



विष्णूने कूर्मावतार घेऊन कासव रूपे समुद्रात राहून पाठीवर मंदर पर्वताची रवी ठेवून घ्यायला मान्य केले. नंतर देवांनी वासुकीला शेपटीच्या बाजूने आणि दानवांनी तोंडाच्या बाजूने धरून एक युगपर्यंत समुद्रमंथन केले.

वासुकीच्या तोंडातून विषाच्या ज्वाळा बाहेर येऊ लागल्या आणि सर्व जग जळते की काय असे वाटू लागले. तेव्हां देवांनी शंकराला विनविले. शंकराने सर्व हलाहल विष पिऊन टाकले. त्याचा कंठ विषामुळे निळाकाळा झाला व त्याचे नाव नीळकंठ झाले.





त्यानंतर समुद्रातून लक्ष्मी, कौस्तुभ, पारिजातक, ऐरावत वगैरे रत्नें निघाली. तरी देवदानव मंथन करीत राहिले.

अगदी शेवटी धन्वन्तरी अमृतपात्र हातात घेऊन समुद्रातून वर आला. तो देवांचा वैद्य झाला. समुद्रमंथन अशाप्रकारे यशस्वी झाले.





दानवांनी अमृत पाहिले व घ्यायला धावले. देव सावध होते. ते अमृत वाचवायला धावले. अमृतासाठी देवा-दानवांचे युद्ध सुरू झाले. तेव्हा धन्वं-तरी किंकर्तव्य विमूढ उभाच्या उभा राहिला.

इतक्यात तेथे एक अपरूप सुंदर स्त्री आली. तिला पाहून देवांदानवांचे युद्ध थांबले. तिने दोघांना अमृत वाटून देण्याचे मान्य केले. तिच्या सुंदर रूपावर भाळून दानवांनी ते कबूल केले.





मोहिनी रूपे आलेली ती सुंदर स्त्री म्हणजे स्वत: विष्णूच होता. त्याला माहीत होते की राक्षसांना अमृतप्राप्ती झाली तर त्रिलोकावर संकट येईल. म्हणून मोहिनीरूपे विष्णूने अमृत फक्त देवांनाच प्राशन करायला दिले.



राहू नामक राक्षसाला मोहिनीचे चातुर्य कळले. देवांच्या रूपे येऊन त्याने अमृत प्राशन केले. परंतु मोहिनी रूपात असलेल्या विष्णूने ते ओळखले व अमृत त्याच्या कंठापर्यंत पोचायच्या आत आपल्या सुदर्शन चक्राचा प्रयोग करून राहूचे डोके उडविले.



राक्षसांना ती लबाडी कळली तोपर्यंत अमृत वाटण्याचे काम संपले होते. त्यांना अमृताचा एक थेंबही मिळाला नाही. देव 'अमर' झाले. त्यांनी-शौर्याने युद्ध करून दानवांना देवलोकांतून हाकलून लावले.



# शिपायांचा संप

कोशल राज्यात सर्वदा सुख, शांती आणि समाधान वास करीत असे. अशा राज्यात एकाएकी मोठ्या प्रमाणात चोऱ्या होऊ लागल्या. चोऱ्या बंद व्हाव्या यासाठी राजाने सैन्याचा उपयोग करण्याचे ठरविले. परंतु त्यावेळी राज्यावर बाहेरच्या शत्रूची स्वारी होण्याचा धोका होता. म्हणून मंत्र्याच्या सल्लयावरून राजाने चोरांचा शोध लावण्यासाठी शिपायांची एक खास तुकडी उभी केली.

त्यानंतर थोड्याच दिवसांनी चोऱ्या कमी झाल्या. दोन तीन वर्षे राज्यात पुन्हां सुखशांती नांदू लागली. परंतु पुन्हां काही दिवसांनी चोऱ्या होऊ लागल्या आणि या खेपेस शिपाई चोऱ्या बंद करण्यात अपयशी ठरले.

असं कां झाले? त्याचे उत्तर एका अफवेच्या रूपे ऐकू येई. शिपाई चोर आणि दरोडेखोरांकडून लाच घेऊन त्यांना कैद करीत नाहीत. ही अफवा खरी मानून प्रजेने शिपायांविरुद्ध उघड प्रचार करायला सुरवात केली.

शिपायांच्या प्रमुखाने त्याच्यावर लावलेला हा आरोप त्याचा अपमान करण्यासाठी असल्याचे मानून राजाकडे त्याविरुद्ध तक्रार नेली.

राजाने त्याचे म्हणणे ऐकून घेऊन म्हटले-"मी तुम्हांला नेमले होते ते तुम्ही चोरांचा शोध लावून त्यांना कैद करावे या साठी. परंतु चोऱ्या बंद न पडतां वाढतच आहेत. याचा अर्थ असा मानावा लागेल की प्रजेला वाटतो आहे तो संशय खरा असला पाहिजे किंवा तुम्ही सर्व अयोग्य तरी आहां."

ही गोष्ट शिपायांना अपमानास्पद वाटली. सर्वांनी मिळून संपावर जाण्याचे

ठरविले. ते कळल्यावर राजा व प्रजा दोघे घाबरून गेले. कारण चोरांना शिपाई संपावर असल्याचे कळले तर त्यांना सारे रान मोकळेच होणार.

शिपायांनी राजाला भेटून अशी अट घातली की ते प्रजेची जी सेवा करीत आहेत त्याबद्दल प्रजेसमोर राजाने जाहीर स्तुती करून त्यांची पाठ थोपटावी, तरच संप मागे घेण्यात येईल. ही अट सहजी मान्य करण्यासारखी नव्हती. राजाने त्याविषयी विचार करून उत्तर देण्यासाठी अवधी मागून घेतला. परंतु त्या अवधीत शिपायांनी काम करायचे बंद केले होते. म्हणून राजाने विचार केला की प्रजेच्या हितासाठी शिपायांची अट मान्य करावी.

परंतु मध्यंतरी प्रजेचे काही प्रतिनिधी राजाच्या भेटीस गेले व त्यांनी निवेदन केले–"महाराज! आपण शिपायांनी केलेल्या संपाबद्दल बिलकुल फिकीर करू नये. जाहीरपणे त्यांच्या सेवेची स्तुती करण्याची मुळीच गरज नाही."

राजाने विचारले–"असे का? याचे काही कारण?"

"कारण शिपायांचा संप सुरू झाला तेव्हांपासून राज्यात चोऱ्या व्हायच्या बंद झाल्या आहेत." प्रजेच्या प्रतिनिधींनी सांगितले.

राजा चकितच झाला. त्यानंतर त्याने चवकशी केली तेव्हां कळले की राज्यातल्या चोरांच्या मनात पालट झाला होता आणि शिपायांपैकीच काहींनी चोरीचा धंदा सुरू केला होता.

शिपायांनी संप पुकारला, त्यावरूनच त्यांचा अपराध उघडकीला आला होता. तेव्हां शिपायांचा प्रमुख प्रसंग ओळखून नरमला आणि त्याने राजाला भेटून संप मागे घेतल्याचे निवेदन केले आणि आपल्या अपराधाबद्दल क्षमा मागितली.

राजाने देखील त्या दिवसापासून शिपायांचे काही अधिकार कमी केले आणि त्यांच्यावरही नजर ठेवण्यासाठी एक नवी यंत्रणा उभी केली.



# औषधा शिवाय खोकला गेला

महादेवशास्त्री नामक एक वैद्यबुवा शेजारच्या गावाहून आले आणि इनामदार साहेबांच्या बाजूच्या घरात भाड्याने जागा घेऊन वैद्यकी करू लागले. हळूहळू वैद्यबुवा आणि इनामदार दोघांची मैत्री वाढू लागली. इनामदार साहेबांना पडसं खोकला झाला तरी वैद्यबुवा औषध देऊन तो बरा करीत. एकदा इनामदारसाहेब वैद्यबुवांना म्हणाले–"वैद्यबुवा हल्ली माझी तब्येत बिघडत चालली आहे, त्याचं कारण काय हो?"

वैद्यबुवांनी इनामदारसाहेबांना समजावून सांगितलं आणि दुसऱ्या दिवशी आपल्या जुन्या गावी निघून जातांना म्हणाले–"इनामदारसाहेब! तुम्हांला कधी गरज भासली तर मला कळवा!"

त्यानंतर बरेच दिवस गेले. इनामदारसाहेबांकडून वैद्यबुवांकडे कधी निरोप आला नाही. एके दिवशी वैद्यबुवा स्वतः इनामदारसाहेबांना भेटायला गेले आणि विचारले–"आपण कधी निरोप पाठविला नाही? तब्येत चांगली आहे ना?"

"निरोप पाठवायची गरजच पडली नाही हो!" इनामदारसाहेब म्हणाले.

"होय, बरोबरच आहे! औषध जवळ असलं की गरज फार भासते! औषध नसेल तर खोकला जवळपास फटकत नाही!" वैद्यबुवा म्हणाले.





# रंग बदलणारा कोंबडा

एका गावी एक म्हातारी रहात असे. तिच्याजवळ एक पांढरा शुभ्र कोंबडा होता. तिला तो कोंबडा म्हणजे जीव की प्राण वाटे. त्या गल्लीतले लोक कोंबडयाच्या सौंदर्याचे कौतुक करीत.

एके दिवशी तो कोंबडा गल्लीत खात फिरत नाहीसा झाला. आपल्या खुराडात परतला नाही. म्हातारीने शेजाऱ्या पाजाऱ्यांकडे जाऊन कोंबडयाची चवकशी केली, परंतु कोणी पाहिलाच नव्हता. तिला त्या दिवशी अन्न गेले नाही की झोप आली नाही.

खरोखरी तो कोंबडा त्या दिवशी त्या गल्लीतून एकदा जो निसटला तो खातखात दुसऱ्या व तिसऱ्या गल्लीत फिरून चवथ्या गल्लीतल्या कोंबडयांबरोबर खात असतां त्या कोंबडयाचा मालक खंडू याने त्याला पाहिले. त्याचा तो पांढरा शुभ्र रंग व उंच मान पाहून खंडूला मोह झाला. त्याने चटदिशी त्याला धरले आणि त्याला पिवळा रंग देऊन आपल्या कोंबडयांबरोबर आपल्या खुराडांत ठेवले.

रात्रभर तो कोंबडा खंडूच्या खुराडात राहिला. उजाडल्यावर खंडूच्या मुलाने आपल्या इतर कोंबडयांना खुराडातून बाहेर काढले तेव्हां म्हातारीचा कोंबडा 'कुक' 'कुक' करीत उडाला व पळून गेला. खंडूला ते कळताच तो त्याला शोधायला निघाला.

मध्यंतरी म्हातारीचा कोंबडा लाखेची खेळणी करण्याऱ्या गोपूच्या परसात गेला. गोपूने त्याला पाहताच आठवडयाच्या बाजारात त्याला विकून चांगले पैसे मिळवायचे ठरविले. त्याने त्याला पकडले व त्याच्या मालकाला ओळख पडू नये म्हणून त्याच्या सर्व अंगावर पांढरा रंग फासला आणि आपल्या अंगणात पायाला एक दोरी बांधून त्याला ठेवले. त्याला खायला थोडेसे दाणे टाकले आणि स्वत: आपल्या कामात गर्क झाला.

म्हातारी आपल्या कोंबडयाच्या शोधात होतीच. ती आपल्या शेजारच्या दोघा तिघांना बरोबर घेऊन कोंबडयाला शोधीत गोपूच्या घरासमोर आली. तिला तो कोंबडा दिसला. तिच्याबरोबर आलेल्या लोकांनीपण त्या कोंबडयाला ओळखले. तो कोंबडा म्हातारीचाच असल्याची त्यांची खात्री पटली. म्हणून गोपू आणि म्हातारी बरोबर आलेले लोक यांची कोंबडयासाठी बराच वेळ बाचाबाची झाली.

त्याच वेळी गावचा पाटील तिकडून जात होता, त्याने म्हातारीला विचारले– "म्हातारे! काय भानगड आहे?" म्हातारीने सांगितले की गोपूने तिचा कोंबडा चोरला आहे आणि तिने आपल्या शेजाऱ्यांकरवी तो कोंबडा तिचाच असल्याची साक्ष देवविली. तेव्हां गोपू म्हणाला–"पाटील साहेब, तो कोंबडा खरोखरी पिवळ्या रंगाचा आहे मी त्याच्या अंगावर हा पांढरा रंग लावला आहे."

त्या वेळी तेथे गर्दी झाली त्या गर्दीत खंडूसुद्धा आला होता. पिवळ्या रंगाची



गोष्ट ऐकताच तो पुढे होऊन म्हणाला– "पाटील साहेब! हा पिवळा कोंबडा माझा आहे. सकाळपासून मी त्याला शोधतो आहे. तो माझा मला देवविण्याची कृपा करा." तेव्हां पाटील गोपूला म्हणाला– "तू दुसऱ्याचा कोंबडा चोरून त्याचा खरा रंग लपविण्याचा प्रयत्न केलास या अपराधाबद्दल मी तुला पंचवीस रुपये दंड करतो."

तेव्हां खंडू कोंबडयाला उचलून घेऊन जाऊ लागला. पण म्हातारी आडवी उभी राहून म्हणाली–"तू याला नेणार काय? हा माझा कोंबडा आहे!" पाटील तिच्याकडे पाहून म्हणाला–"हा कोंबडा तुझा कसा काय ग?"

तिने पाटलाला सांगितले की तो कोंबडा तिच्या पांढऱ्या कोंबड्यासारखाच आहे. गोपूने कोंबड्याच्या अंगावरचा पांढरा रंग पुसून दाखविला तेव्हां पिवळा रंग आलेला दिसला. गोपू लगेच ओरडून म्हणाला– "पहा पाटील साहेब! आहे की नाही पिवळा रंग?"

परंतु म्हातारीच्या मनाचे तेवढ्यावर समाधान झाले नाही. पाटलाने एक तांब्या-भर पाणी मागविले आणि कोंबड्याला स्वच्छ धुवून काढले. तेव्हां पहिल्याने पांढरे पाणी निघाले आणि त्या पाठोपाठ पिवळे पाणी निघाले आणि कोंबड्याचा खरा रंग बाहेर स्वच्छ दिसू लागला.

पाटलाने दरडावून विचारले–"गोपू! काय रे हे? तू तुझा कोंबडा पिवळा आहेस म्हणालास आणि हा तर पांढरा शुभ्र आहे?"

"चुकलं पाटील. मला वाटलं की माझा पिवळा कोंबडा तो हाच असावा!" असं सांगून खंडू पाय काढू लागला. तेव्हां गोपू म्हणाला–"पाटील साहेब! हा खोटं बोलतो आहे. मी कोंबडा पाहिला तेव्हां तो पिवळ्या रंगाचा होता."

खंडूने सुटका मिळणे अशक्य असल्याचे ओळखलें व पाटलाचे पाय धरून म्हणाला– "माफ करा पाटील!"

परंतु पाटलाने त्याला माफ केले नाही आणि म्हातारीच्या पांढऱ्या कोंबड्याचा पांढरा रंग बदलून पिवळा रंग दाखविण्या-साठी केलेल्या प्रयत्नाबद्दल खंडूला पंचवीस रुपये दंड केला. दोघांकडून दंड वसूल करवून पाटलाने ती रक्कम म्हातारीला देवविली.

म्हातारी म्हणाली–"पाटील साहेब मला हे पैसे नकोत. या दोघांना माफ करा. या दोघांनी कोंबडा कापून खाल्ला असता तर मी काय केलं असतं. माझा कोंबडा मला परत मिळाला, एवढेच पुरे!"

पाटील दोघांना म्हणाला–"त्या म्हाता-रीच्या थोरमनापासून काही शिका आणि असल्या लबाड्या बंद करा."

म्हातारी आपला कोंबडा घेऊन आनंदाने आपल्या घरी परत गेली.





# मंगल नावच मंगल

कांचीपुरम येथे मंगलशास्त्री नावाचा एक ज्योतिषी रहात असे. ज्योतिष-शास्त्रात त्याचा हात धरणारा कोणी नव्हता. एकदा मंगलशास्त्रींना आपले नाव निरर्थक वाटले. आपण एक थोर ज्योतिषी, आणि नुसतं 'मंगल' हे नाव काय? वडिलांनी विचार करून आपल्याला नाव ठेवले नाही. रात्रभर ते अंथरुणावर तडफडत राहिले आणि त्यांनी आपले नांव स्वतःच शंकर असे ठेवले. शंकर शब्दाचा अर्थ आहे शुभ करणारा.

दुसऱ्या दिवशी त्यांच्याकडे जो कोणी जन्मकुंडली दाखवायला आला त्यापैकी प्रत्येकाने 'मंगल शास्त्री!' म्हणूनच त्यांना हाक मारली. तेव्हां त्यांनी त्यांना समजावून सांगितले की "यापुढे मला शंकरशास्त्री म्हणून हाक मारीत जा." परंतु कांची-वरमचे लोक त्यांना 'मंगलशास्त्री!' म्हणूनच हाक मारीत. ते म्हणाले– "शास्त्रीबुवा! आम्ही तुम्हांला लहानपणा-पासून 'मंगलशास्त्री' म्हणूनच हाक मारीत आलो. आतां निराळ्या नावाने हाक मारणे आम्हांला नाही आवडणार."

ते ऐकून मंगलशास्त्रींना आपल्या गावावर राग आला व ते कांचीवरम सोडून दुसऱ्या एका गावी गेले. तेथे 'शंकरशास्त्री' ह्याच नावाने लोक त्यांना ओळखू लागले.

एके दिवशी एक लाकूडफोड्या लाकडे फोडायला आला. शास्त्रीबुवांच्या बायकोने लाकडाची मोळी पाहून विचारले–"ही लाकडं जळतील का रे चांगली?"

ते ऐकून लाकूडफोड्या म्हणाला–"ताई! हे काय विचारतां शंकर लाकूडफोड्याची लाकडं जळणार नाहीत का? शंकराचा तिसरा डोळा 'भगभग' करून अग्नीवृष्टी करतो तशी ही लाकडं जळतील. नाहीतर



मी आपलं शंकर नाव बदलून टाकीन." ते ऐकून शंकरशास्त्री विचार करू लागले– "एका सामान्य लाकूडफोड्याचे नाव 'शंकर' आहे! आपले नावही तेच?"

शास्त्रीबुवांनी लगेच विचार करून आपले नाव लक्ष्मीपती ठेवून घेतले. जन्म-कुंडली दाखवायला दुसऱ्या दिवशी जो कोणी आला त्याला शास्त्रीबुवांनी बजावून सांगितले की त्यांना 'लक्ष्मीपती' या नावानेच बोलवावे. परंतु त्या गावचे राहणारे सर्व वीरशैव लिंगायत होते. त्यांनी लक्ष्मी-पती या नावाचा उच्चार करण्यात पाप असल्याचे सांगितले. म्हणून शास्त्रीबुवा संतापून ते गाव सोडून आणखी एका गावी जाऊन राहू लागले. तेथे त्यांनी आपले नाव लक्ष्मीपती शास्त्री असल्याचे सांगितले.

एके दिवशी शास्त्रीबुवा गावातल्या सार्वजनिक भेटीगाठीच्या ओटयावर बसून ज्योतिषशास्त्रावरची टिपणे पहात होते. तेव्हा एक भिकारी "ऐका गुरु, लक्ष्मी-पतीचे काव्य!" सुरात म्हणत तेथे आला.

ते ऐकून शास्त्रीबुवा दचकले. त्यांनी त्या भिकाऱ्याला त्याचे नाव विचारले. त्याने आपले नाव सुरात गात 'लक्ष्मीपती' असल्याचे सांगितले. शास्त्रीबुवा लक्ष्मीपती भिकाऱ्याला निरोप देऊन विचारात पडले. आपलं आणि भिकाऱ्याचं नाव एक कसं? म्हणून त्यांनी आपलं नाव 'अमर' असावं असं ठरविलं.

दुसऱ्या दिवसापासून त्यांच्याकडे येणाऱ्यांना त्यांनी बजावून सांगितलं की त्यांचं नाव बदलून 'अमर' असे झाले आहे. म्हणून पुढे कधी हाक मारायची झाली तर 'अमर' या नावेच हाक मारावी. परंतु त्या गावातले लोक वैष्णव होते. त्यांना लक्ष्मीपती हे विष्णूचे नावच आवडे. त्यांनी निक्षून सांगितले की त्यांना लक्ष्मीपती हेच नाव पसंत आहे व ते त्याच नावाने बोलावणार.

शास्त्रीबुवा संतापले आणि दुसऱ्या एका गावी जाऊन राहू लागले. त्या गावात 'अमर' या नावेच लोक त्यांना ओळखत.

एके दिवशी उजाडतांच त्यांची मोल-करीण सडारांगोळी घालायला आली नाही. शास्त्रीबुवा सडा घालून रांगोळी काढल्या-शिवाय घराबाहेर पडत नसत. म्हणून त्यांना मोलकरणीचा राग आला. त्याच वेळी मोलकरीण घाईघाईने आली व उशिरा येण्याचे कारण सांगू लागली. म्हणाली– "काय सांगू, शास्त्रीबुवा! आज आमच्या घरासमोरचा तीन वर्षे वयाचा 'अमर' नावाचा मुलगा एकाएकी देवाघरी गेला. आईवडिलांचा एकुलता एक मुलगा होता. त्यांचं दुःख पाहून माझे पाय तेथून हालतच ना."

ते ऐकून शास्त्रीबुवांना घेरी आल्यासारखे झाले. किती प्रेमाने त्याच्या आईवडिलांनी त्याचे नाव 'अमर' असे ठेवले आणि तीन वर्षे लोटतांच त्याला यमाने बोलावणे यावं. शास्त्रीबुवांना आपल्या नव्या नावाची चीड आली. 'नाव बदलून मी केवढी चूक केली!' शास्त्रीबुवा आपल्या मूळगावी कांचीपुरमला परतले.

कांचीपुरमचे लोक शास्त्रीबुवांची आठवण काढून म्हणत होते–'आपण सर्वांनी किती हट्टीपणा दाखविला? त्याला 'शंकरशास्त्री' म्हटले असते तर काय बिघडलं असते? आपण एका चांगल्या ज्योतिष्याला उगाच गाव सोडून जाऊ दिलं.'

शास्त्रीबुवा आपल्या गावी परतलेले पाहून गावकऱ्यांना परमानंद झाला आणि प्रेमाने त्यांनी त्यांना 'शंकरशास्त्री' म्हणून हाक मारायला सुरवात केली. म्हणाले– "कोठे गेला होता हो, किती दिवसांनंतर भेट होते आहे?"

तेव्हां शास्त्रीबुवांनी लाजलज्जा किंवा संकोच सोडून नम्रपणे त्यांना विनंती केली–"माझं नाव शंकरबिंकर नाही. आईवडिलांनी मला 'मंगल' हे शुभ नाम दिलं आहे. त्याच नावाने हाक मारीत जावे. मला तेच नाव आवडते."





# भुताची पीडा टळली

वाणी व वर्मा दंपतीला मूलबाळ नव्हते. परंतु दोघे नवराबायको इतक्या चांगल्या स्वभावाची होती की गावकरी त्यांच्या सुस्वभावाविषयी नेहमी बोलत.

एकदा रात्री फार जोराचा पाऊस पडू लागला. मुसळधार वृष्टीच चालू होती. दोघं जेवायला बसणार इतक्यात बाहेरच्या दारावर थाप ऐकू आली. दार उघडून पाहिले तर एक तरुण दंपती ओलीचिंब बाहेर उभी.

तरुण माणूस म्हणाला—"आम्ही शहरात जायला निघालो होतो. पावसात सांपडलो. आजची रात्र आपल्याकडे काढायला मिळेल का?"

"आंत या." म्हणत वाणीने त्यांना आत यायला सांगितले आणि त्यांना जेवा-यला वाढून त्यांना झोपायला अंथरूण पांघरूण तयार करून दिले.

त्या दोघांचं जेवण झाल्यावर अन्न दोघां पुरेसे उरलं नव्हतं. वाणीने पतीला खाऊन घ्यायला सांगितले. आणखी थोडा भात भाकरी काही करून घ्यायला घरात लाकडं नव्हती; होती ती भिजून गेली होती.

परंतु वर्माने उरलेलं अन्न अर्धंअर्धं दोघांनी वांटून घ्यायला हट्ट केला. दोघे त्याप्रमाणे खाऊन झोपली.

पहाटे कोणाचा तरी रडण्याचा आवाज ऐकून दोघांची झोप मोडली. बाहेरचे दार उघडे होते व दारात रात्री आलेली पाहुणी रडत बसली होती. वाणीला आश्चर्य वाटले. तिने त्या बाईला रडण्याचे कारण विचारले.

"काय सांगू बाई! माझं नशीबच फुटकं. मी रात्री तुमच्या घरी आले नसते तरच बरं झालं असते. तुमचं परस्परांवरचं प्रेम पाहून ते म्हणाले—'तु कधी या बाई-सारखी माझ्याशी वागलीस का? जी बाई नवऱ्यासाठी एवढा त्याग करायला तयार नाही ती बायकोच काय?' नंतर मी पुष्कळ सांगून पाहिलं, पण तिकडे दुर्लक्ष करून ते निघून गेले. स्वभावाने थोडे हट्टीच आहेत ते. आतां परत येणार नाहीत."



त्या बाईचे नाव चंद्रमती होते. वर्मा तिच्या नवऱ्याच्या शोधार्थ दिवसभर हिंडला, परंतु पत्ता लागला नाही.

"मला माहीत आहे, ते आतां परत येणार नाहीत. मला माझं म्हणण्यासारखं आणखी कोणी नाही. कोठे तरी विहिरीत उडी टाकून जीव देते, झालं!" म्हणत चंद्रमती रडू लागली.

तिची ती स्थिती पाहून पतिपत्नींचे हृदय विरघळले. नवरा चांगला असेल तरच बाईचं आयुष्य सुखाचं. दोघांनी तिला समजावून सांगितलं—"काही काळजी करू नकोस, तुझे पती येईपर्यंत तू रहा आमच्या घरी."

त्या दिवसापासून चंद्रमती त्या घरात त्या कुटुंबातली एक म्हणून राहू लागली. ती तशी गरीब स्वभावाची दिसली. रात्री तीच संपाक करी.

एक महिना झाला. वर्माचा मित्र मुरारी

आला. तसा तो दरवर्षी एकदोनदां येई. मागच्या खेपेस आला तेव्हां घरात चंद्रमती नव्हती. अर्थातच ही नवी बाई कोण, हा प्रश्न त्याच्या चर्येवर स्पष्ट दिसला. तिच्या-विषयी मित्राच्या तोंडी त्याने सर्व ऐकलं तेव्हां त्याला थोडे आश्चर्य वाटले. रात्री चंद्रमतीनेच सर्वांना जेवायला वाढले. जेवणे झाल्यावर मुरारी बाहेर वऱ्हांड्यातच खाट टाकून झोपला.

त्याला बरीच रात्र लोटली तरी झोप आली नाही. मध्यरात्रीच्या सुमारास त्याला कोणीतरी फुसफुसत बोलल्याची चाहूल लागली. चंद्रमती हातात दिवा घेऊन हळूच



पाहिले. सैपाक घराच्या पलीकडच्या खिड-कीचं दार वाजलं.

मुरारीला संशय आला. चंद्रमतीने सैपाकघरात पाऊल टाकताच तो उठून आडोशाला उभा राहून सर्व प्रकार पाहू लागला. चंद्रमती सैपाकघरात जाऊन खिडकीतून भात, आमटी, भाजी व दही एकेक करून बाहेर कोणाला तरी देत होती.

बाहेरचा माणूस म्हणाला–"आणखी किती दिवस ग, असं अर्ध्या रात्री जेवायचं? काहीतरी करून तिजोरी उघडून हाताला लागेल ते घेऊन कां नाही येत?" तो माणूस काळोखात होता. म्हणून मुरारीला त्याचं तोंड दिसलं नाही.

चंद्रमती त्याला उत्तरादाखल म्हणाली–"आतांआतां 'कोठे या घरच्या लोकांचा विश्वास माझ्यावर बसू लागला आहे. थोडा धीर धरा. किल्ल्यांच्या जुडग्याची जागा लौकरच कळेल."

ते ऐकून मुरारी विचार करू लागला–"ही बाई दिसायला भोळी दिसते, पण वस्ताद दिसते आहे. माझ्या मित्राच्या चांगुलपणाचा असा दुरुपयोग? थांबा, तुमचं हे नाटक मी लौकरच बंद करतो." असा विचार करून तो पुन्हा जाऊन खाटेवर पडला.

दुसऱ्या दिवशी त्याने चंद्रमतीची लबाडी वाणी व वर्माला सांगून त्यांच्या मनाला दुखविल्याशिवाय हे भूत घराबाहेर कसे काढायचे याची एक योजना तयार केली.

दुसऱ्या दिवशी मुरारी आपल्या मित्राला, चंद्रमतीला ऐकू जाईल इतक्या मोठ्या आवाजात सांगू लागला–"बाबा रे बाबा! रात्रभर माझा डोळा लागला नाही. तुझ्या घरात भुताटकी सुरू झाली आहे. कोठलं तरी भूत आलेलं दिसते आहे. मी पूर्वेकडे खाट ठेवली होती ती पश्चिमेकडे सकाळी आलेली दिसली. मी खिडकीत प्यायला पाणी ठेवलं होते. ते खाटेखाली आलेले होते. मी भुताखेतांना भीत नाही, म्हणून बरं, दुसरा कोणी असता तर गारच झाला असता."

वाणी आणि वर्मा दोघे ते ऐकून चकित झाली व म्हणाली–"मग भूतमांत्रिकाला बोलावू या का?"

"तसं भिण्याचे कारण नाही. मीच भुताला पळवून लावायचा मंत्र शिकलो आहे." मुरारी म्हणाला.

दुसऱ्या दिवशी तो बाजारातून पैंजण आणून रात्री मधूनमधून वाजवू लागला. नंतर त्याने उशी खाटेवर उभी ठेवून तिच्यावर पांघरूण घालून ठेवले आणि मागच्या दारी जाऊन सैपाकघराच्या खिडकीचे दार वाजविले.

बऱ्याच वेळाने चंद्रमती आली व सर्व खायचे पदार्थ भांड्यात नीट लावून ठेवून ते तिने नवऱ्याला समजून मुरारीला दिले. मुरारी लगेच घरात गेला आणि ते भांडे घेऊन चंद्रमतीच्या खाटेवर ठेवून खाट थोडी बाजूला सरकवून गुपचुप बाहेर जाऊन आपल्या अंथरुणावर जाऊन पडून राहिला.

चंद्रमती थोडा वेळ भांडं परत मिळेल म्हणून वाट पहात राहली आणि खिडकी बाहेर नवऱ्याला न आलेला पाहून थोडी चकित झाली. तिने सैपाकघराचे दार बंद केले आणि आपल्या खोलीत जाताच मोठ्याने किंकाळी फोडली. ऐकून वाणी व वर्मा धावत आली. मुरारीसुद्धा त्याला काही माहीत नसल्यासारखा आला.



चंद्रमती घाबऱ्या स्वरात म्हणाली–"भुताटकीची गोष्ट खरी आहे. मलासुद्धा पैंजण वाजल्याचा आवाज ऐकू आला. तिकडे ठेवलेली खाट या बाजूला आली आहे. हे पहा, सैपाकघरातलं भांडं माझ्या खाटेवर आलं आहे. म्हणून उठून बसले." तिने त्या खोलीत झोपणार नाही असे सांगून टाकले.

मुरारी तिला धीर देण्याचे सोंग करीत म्हणाला–"तुम्ही कोणी भ्यायचं कारण नाही. मी भुताला पळवितो." त्यानंतर तो लागोपाठ दोन दिवस रात्री पैंजणाचा आवाज करीत राहिला. म्हणून नवऱ्याने खिडकीच्या दारावर थाप मारली तरी

चंद्रमतीला खोली बाहेर यायला धाडस झालं नाही.

तिसऱ्या दिवशी मुरारी वाट पहात बसला. चंद्रमतीचा नवरा मागच्या बाजूला येत असलेला पाहून तो त्याच बाजूला जाण्याचं सोंग करीत बडबडू लागला–"तो माझ्या बहिणीशी असा दगा करू लागला आहे का? मीसुद्धा पाहतो तर!"

चंद्रमतीचा नवरा थबकला व मुरारीला विचारू लागला–"काय हो, काय भानगड आहे?"

"आणखी काय हो? या घराच्या मालकिणीचा मी भाऊ आहे. माझ्या मेहुण्याने माझ्या बहिणीला मूल झालं नाही म्हणून एका बाईला घरात ठेवून घेतले आहे हो! त्या बाईला तिच्या नवऱ्याने टाकलं आहे, म्हणे. त्या बाईशी माझा मेहुणा लग्न करणार आहे, म्हणे. आणखी त्याहून चीड आली ती या गोष्टीची की ती बाईसुद्धा लग्नाला तयार झाली आहे." असे सांगून मुरारी तेथून निघून गेला आणि दुसऱ्या बाजूने येऊन आपल्या खाटेवर झोपला. मुरारी म्हणाला ते सर्व चंद्रमतीच्या नवऱ्याला खरे वाटले. कारण तिनं गेल्या तीन रात्री खिडकीतून खाणे दिलं नव्हते. त्याच्या मनात संशयाने घर केले.

दुसऱ्या दिवशी चंद्रमतीचा नवरा आला आणि वर्माला म्हणाला–"मी काय मूर्खपणा केला आणि बायकोला येथे सोडून निघून गेलो. आतां तिला घेऊन जायला आलो आहे."

भुताच्या भीतीने चंद्रमती भ्यालीच होती. ती नवऱ्याबरोबर लगेच निघून गेली ती निघून गेल्यावर वाणी व वर्मांना वाटू लागलं की मदतीला एक बाई मिळाली होती ती निघून गेली.

मुरारीला ते कळलं तेव्हां तो म्हणाला–"तुमच्या घरातली भुताटकी गेली म्हणून तुम्हांला आनंद व्हायला पाहिजे आणि तुम्ही दुःखी होता आहां, आश्चर्यच आहे." नंतर त्याने घडलेली गोष्ट सांगितली आणि निरोप घेऊन निघून गेला.





## देवी भागवत

देवदूत इंद्राकडे परतला व चंद्राने जे सांगितले होते ते निवेदन केले.

"हे उत्तर द्यायला चंद्राला एवढी हिंमत झाली काय?" असे म्हणत इंद्राने चंद्रावर स्वारी करण्याचे ठरवून सैन्य सज्ज केले. ते कळल्यावर शुक्र आपल्या राक्षस शिष्यांबरोबर चंद्राच्या बाजूने युद्धाला आला. शंकर बृहस्पतीच्या मदतीला आला आणि दोघांचे युद्ध सुरु झाले.

तेव्हां तेथे ब्रह्मदेव आला आणि चंद्राला म्हणाला–"तू बृहस्पतीच्या बायकोला सोडून दे, नाहीतर मी विष्णूला सांगून तुझा मद उतरवितो." नंतर तो शुक्राला म्हणाला–"बृहस्पतीशी तुझं वैर आहे, म्हणून तू चंद्राला मदत करायला आला आहेस का? मग कोणी स्त्री पुरुषाबरोबर राजीखुशीने संसार करील का?"

शुक्राने चंद्राला सांगितले की ताराला परत पाठवून दे. तारा तेव्हां गरोदर होती. त्याच स्थितीत चंद्राने तिला बृहस्पतीकडे पाठवून दिले. शंकरादि देव आपापल्या लोकांत निघून गेले. तारा बृहस्पतीच्या घरी आल्यावर बाळंत झाली व तिला एक मुलगा झाला. त्या मुलाचे जातकर्म वगैरे संस्कार बृहस्पती करू लागला तेव्हां चंद्राचा दूत आला व त्याने चंद्राचा निरोप सांगितला. म्हणाला–"हा मुलगा तुझा नसून चंद्राचा आहे. तुला त्याचे जातकर्म आणि संस्कार करण्याचा अधिकार नाही."



बृहस्पती चंद्राच्या दूताला म्हणाला— "याचा तोंडावळा माझ्यासारखा आहे. हा माझाच मुलगा आहे. याला चंद्राचे रूप, रंग काहीच नाही." आणि त्याला परत पाठवून दिले. दूताने परतल्यावर चंद्राला ते सर्व सांगितले.

लगेच चंद्र राक्षसगुण ग्रहण करून युद्धाला सज्ज झाला. देवदानवांचे थांबलेले युद्ध पुन्हां सुरू झाले.

तेव्हां ब्रह्मदेवाने मध्ये पडून युद्ध थांबविले. या सर्व प्रकरणाला मूळ कारण अशी जी तारा तिला बोलावून त्याने विचारले— "पाहिलंस तुझ्यामुळे केवढा हा गोंधळ झाला आहे तो? तर तूच सांग, हा कोणाचा मुलगा आहे? चंद्राचा की बृहस्पतीचा?" तारा ब्रह्मदेवाच्या नजरेला नजर भिडवू शकली नाही. मान खाली करून त्रिवार म्हणाली—"चंद्राचा, चंद्राचा, चंद्राचा!"

ब्रह्मदेवाने लगेच त्या मुलाला चंद्राच्या हाती देऊन भांडण मिटविले. अशा तऱ्हेने बृहस्पतीची बायको जी तारा तिच्या पोटी चंद्राला जो मुलगा झाला तोच बुध होय? या बुधाला पुढे पुरुरवा नावाचा मुलगा झाला. त्याची कथा अशी :

### पुरुरवाची कथा

एके काळी सुद्युम्न नावाचा एक मोठा राजा होता. एकदां तो आपल्या काही मंत्र्यांसह घोड्यावर बसून शिकारीला निघाला. ते कुमारवन नांवाच्या एका सुंदर वनात पोचले. ते वन पाहून त्यांच्या मनाला फार आल्हाद वाटला. परंतु त्या पाठोपाठ सुद्युम्न व त्याच्याबरोबर आलेल्या इतर सर्वांना अकस्मात स्त्रीरूप मिळाले. इतकेच नव्हे तर सुद्युम्नाचा घोडा सुद्धा घोडी झाला. असे कसे झाले, हे सुद्युम्नाला कळले नाही. तो विचार करू लागला, हे कसे झालं? आतां मी या रूपात राज्य कसे करणार? शत्रूशी युद्ध कसे करणार?

सूत ही कथा सांगत असतां त्याला शौनकादि मुनींनी विचारले—"परंतु राजा व त्याच्या बरोबरच्या सर्वांना स्त्रीरूप मिळण्याचे कारण काय झाले?" सूत सांगू लागला, एकदा सनकसनंदनादी मुनी शंकराच्या दर्शनाला कुमारवनात गेले असतां पार्वती शंकराबरोबरच्या परिवाराला दिगंबररूपात दिसली. लगेच ते सर्व मागे फिरले आणि नारायणवनाच्या बाजूला गेले. अर्थात जे घडले त्याची जाणीव झाल्यामुळे पार्वती फार लाजली. तिला त्या वेळी जे दुःख झाले ते पाहून शंकराने असा नियम घालून दिला की त्या वनात जो कोणी पाऊल टाकील त्याला स्त्रीरूप प्राप्त होईल. सुद्युम्न व त्याच्या बरोबरच्या सर्वांना स्त्रीरूप येण्याचे हेच कारण.

त्यानंतर सुद्युम्नने इला हे नाव धारण केले आणि आपल्या सखींबरोबर त्याच वनात राहू लागला. काही काळ लोटला आणि चंद्राचा मुलगा बुध याने इलाला पाहिले आणि इलानेदेखील त्याच वेळी त्याला पाहिले. दोघांचे परस्परांवर प्रेम जडले. त्यांना जो मुलगा त्याचे नाव पुरुरवा.

त्यानंतर इलाने आपले कुलगुरु वसिष्ठ यांचे स्मरण करतांच स्त्रीरूपात असलेल्या सुद्युम्नाला होत असलेल्या मानसिक कष्टाची वसिष्ठ मुनींना कल्पना झाली व त्यांनी शंकराचे ध्यान करून तपश्चर्या केली. शंकराने प्रसन्न होऊन दर्शन दिले.

वसिष्ठ मुनी हात जोडून म्हणाले— "शंकरा! आमचा राजा सुद्युम्न याला परत त्याचे पुरुषरूप देण्याची कृपा कर."





शंकर म्हणाला–"वसिष्ठा! मी दिलेला शाप कसा बदलेल? पण एवढे होऊ शकेल की सुद्युम्न एक महिनाभर पुरुष व एक महिनाभर स्त्री असा पाळीपाळीने होत राहील, असा वर मी देतो."

अशा तऱ्हेने वसिष्ठ मुनींच्या कृपा प्रसादाने सुद्युम्न पुरुषरूप मिळताच आपल्या राजधानीत परतला आणि राज्य करू लागला. तो पुरुषरूपात असे तेव्हां महिनाभर राज्यकारभार पाही आणि स्त्रीरूपात असे तेव्हां अंत:पुरातच राही, बाहेर येत नसे. हे प्रजेला आवडत नसे.

मुलगा मोठा होईपर्यंत अशा तऱ्हेने राज्यकारभार पहात राहून सुद्युम्न तपश्चर्या

गुरु मानून त्याच्याकडून नऊ अक्षरी मंत्र "ॐ श्री नारायण नमः" हा घेतला आणि त्याचा जप करीत तपश्चर्या करीत असतां त्याच्या सुदैवाने महादेवीने सिंहवाहनावर बसून त्याला दर्शन दिले. सुद्युम्नाने स्वत:ला विसरून तिचा स्तोत्रपाठ केला आणि तिच्या अनुग्रहाने तो मुक्त झाला.

सुद्युम्नानंतर पुरुरवाने अनेक वर्षे उत्तम तऱ्हेने राज्य केले आणि अनेक यज्ञ करून ब्राह्मणांना दानधर्म केला. त्याचे सौंदर्य, कीर्ति व इतर गुणांचे वर्णन ऐकून उर्वशी त्याच्यावर मोहित झाली. त्यानंतर तिला ब्रह्मदेवाच्या शापामुळे पृथ्वीवर यावे लागले. तेव्हां ती पुरवाला भेटली व त्याच्याशी लग्न करण्याचे मान्य करून म्हणाली–"माझ्याजवळ दोन मेंढरे आहेत. मला ती स्वत:च्या मुलांपेक्षा जास्त जवळची वाटतात. त्यांचे तू रक्षण केले पाहिजेस. नंतर तू नग्न रूपें कधी माझ्या दृष्टीस पडतां कामा नयेस. आणखी एक अट अशी आहे की तू मला नेहमी खायला तूप दिले पाहिजेस. तू यांपैकी कोणतीही अट मोडलीस तर मी तुला सोडून निघून जाईन."

त्या सर्व अटी पुरुरवाने मान्य करून तिच्याशी लग्न केले आणि काही वर्षे तिच्या बरोबर संसार केला. तो भोगविलासात पूर्णपणे निमग्न झाला आणि धर्मार्थकाम व मोक्ष हे पुरुषार्थ पूर्णपणे विसरला. उर्वशी-सुद्धा पुरुरवाच्या प्रेमात अशी निमग्न झाली की ती स्वर्गलोकाला व इंद्राला पूर्णपणे विसरून गेली.

उर्वशी व पुरुरवा परस्पर प्रेमात स्वत:ला व जगाला विसरून गेल्याचे पाहून इंद्राने तिला परत बोलावण्याचा विचार केला. तो गंधर्वांना बोलावून म्हणाला–"स्वर्गात रंभा आदि अनेक अप्सरा आहेत, परंतु उर्वशी नसल्याने स्वर्गाची शोभाच नष्ट झाली आहे. म्हणून काय वाटेल ते करून पुरुरवाला फसवून मेंढरांचं अपहरण करा, म्हणजे आपले काम साधेल. तरमग निघा, आणि हे काम पुरे करा."

गंधर्व पुरुरवाला कळू न देता एका काळोख्या रात्री मेंढरांना पळवून घेऊन आले. ती ओरडू लागली. तेव्हां उर्वशी पुरुरवाला म्हणाली–"मला स्वत:च्या मुलांपेक्षा जास्त जवळची वाटणारी मेंढरे कोणी चोरून घेऊन गेला असतां तू बायकांसारखा पहात बसलास का? तू त्यांचं रक्षण करशील अशी खात्री होती, म्हणून मी थोडं दुर्लक्ष केलं आणि तू असमर्थ आहेस हे मला माहीत नसल्याने दोन्ही मेंढरं घालवून बसले." असे सांगून तोंडाला आले ते पुरुरवाला म्हणाली.

आपल्या प्रियतमेच्या दु:खात दु:खी होऊन पुरुरवा स्वत:चे भान न राहल्याने चोरांचा पाठलाग करायला नग्नावस्थेतच





ग्रावला. पुरुरवा नग्नावस्थेत असल्याचे ऊर्वशीला कळावं यासाठी त्याच्या अंगावर प्रकाश पडेल अशा युक्तीने गंधर्वांच्या आदेशाने वीज चमकली. मेंढरांना परत घेऊन येत असतां पुरुरवा नग्नावस्थेत असल्याचे पाहून ऊर्वशी त्याचे पाय धरून म्हणाली– "मी पहिल्यानेच आपली अट सांगितली होती. तू वचन भंग केलेंस आतां तुझ्या-बरोबर राहणे मला शक्य नाही. आता मला गेलेच पाहिजे. मला विसरू नकोस?"

ऊर्वशीनें स्वर्गलोकी प्रस्थान करतांच पुरुरवा तिच्या विरहानें दुःखी झाला. त्याला बुद्धिभ्रम झाला. तो ऊर्वशीचे स्मरण करून तिच्या प्रेमाच्या गोष्टी आठवत खूप भटकत फिरला व अचानक कुरु देशात त्याला ऊर्वशी दिसली.

तिच्या जवळ जाऊन तो गदगद् स्वरात म्हणाला–"माझा तुझ्यावर थोडादेखील राग नाही. तुझं मी काही वाईट केले नाही व करू इच्छित नाही. तुला चुकून सुद्धा उलट उत्तर दिले नाही. मी सर्वदा तुझा एक दास होऊन राहलो. तू सांगितलेस ते काम मी केले. तरी तू मला सोडून गेलीस. हा न्याय झाला का? माझ्यावर तुझे प्रेम होते, म्हणून तू स्वतः माझ्याजवळ आलीस. मग तू मला सोडून कशी काय गेलीस? तुझं प्रेम शाश्वत आहे, असेच मी मानीत आलो. मला या दुःखसागरात लोटून तू निघून गेलीस का?"

त्याचा भ्रम दूर करण्यासाठी ऊर्वशी त्याला म्हणाली–"आमच्या जातीतल्या अप्सरांना प्रेम कसलं आलं आहे? माझ्यासाठी दुःखी होऊ नकोस. तू जा आणि राज्यकारभार पहा." असे सांगून ती निघून गेली.

पुरुरवाची जी गत झाली तीच आपली होते की काय या भीतीने व्यासाने घृताची-कडे पाहून विचार केला. घृताचीने सुद्धा विचार केला की व्यास आपल्याला कधी शाप देईल या विचाराने ती एका मादी पोपटाचे रूप घेऊन उडून गेली. व्यासाला त्यामुळे

फार विरहताप झाला. त्याचा परिणाम असा झाला की व्यास अग्नीसाठी अरणीवर अरणीने घाशीत असतां अरणीतून शुकाचा जन्म झाला.

### पितापुत्र

व्यास शुकाला पाहून विचार करू लागले—"हा काय चमत्कार आहे! ही शंकराची कृपा असावी." ते आपल्या मुलाला गंगेवर घेऊन गेले व त्याला स्नान घालून त्यांनी त्याचे जातकर्म वगैरे संस्कार केले. आकाशात देवांनी दुंदुभी वाजविलो आणि जमिनीवर पुष्पवृष्टी झाली. नारदादींनी गान केले आणि रंभादींनी नृत्य केले.

पोपटाचे रूप घेतलेल्या स्त्रीच्या कारणाने जन्मलेल्या व्यासांच्या मुलाला शुक हे नाव प्राप्त झाले. मुलगा लहानाचा मोठा झाला. शुकासाठी आकाशातून हरिणाजिन, फुलांचा हार व कमंडलु घेऊन पडले. व्यासांनी आपल्या मुलाचा उपनयन संस्कार केला. शुक विद्याभ्यास संपल्यावर गुरुदक्षिणा देऊन व्यासांकडे परत आला.

विद्याभ्यास पुरा करून परत आलेल्या आपल्या मुलाला आलिंगन करून व्यासांनी आनंदाने विचार केला की आता मुलाचे लग्न करून द्यावे. त्यांनी एका योग्य मुनि-कन्येला शोधून आणून शुकाला म्हटले—"बाबा रे! तू सर्व वेदवेदांगांचा अभ्यास पूर्ण केलास. आतां विवाह कर व यज्ञयागादि कर. तुला पुत्रप्राप्ति होण्याची वेळ आहे ही. पुत्र संतान नसेल तर माणसाला सद्गती मिळत नाही. कीर्ती प्राप्त होत नाही. म्हणून एका कन्येशी विवाह कर व पुत्र प्राप्ती करून घेऊन स्वतःला व मला सुखी कर आणि पितरांचे समाधान कर. मी सांगतो आहे त्याकडे दुर्लक्ष करू नकोस. कित्येक वर्षे तपश्चर्या केल्यानंतर मला तुझी प्राप्ती झाली आहे. तुझ्यामुळे मला कीर्ती आणि सद्गती प्राप्त होईल अशी आशा मी मनात बाळगून आहे."

ते ऐकून शुक पित्यास म्हणाला—"मला लग्न करावयाचे नाही. मला तत्वोपदेश करा. मला या संसारसागरांत कां ढकलतां आहां?"





# मायावी मत्स्यकन्या

ब्रिटीशांचे राज्य असतांना एका संस्थानाचा रामप्रताप नावाचा एक अधिपती होता. तो म्हणजे एक विक्षिप्त प्राणीच होता. अनेक अंध विश्वासांबरोबर काही खुळ्या समजुतींचा पगडा त्याच्या मनावर होता. त्याच्या डोक्यात एकदां काही शिरले की त्याच्या पायून किती नुकसान झाले तरी तो ते सोडीत नसे. म्हणून त्याला सल्ला देणाऱ्या मंत्र्यांना व प्रजेला कित्येकदां विनाकारण पुष्कळ कष्ट सहन करावे लागत.

एकदां तो बंगाल प्रांतात प्रवासाला गेला असतां तेथे त्याने तागाची म्हणजे जूटची लागवड होतांना पाहिली. स्वदेशी परत येतांच आपल्या राज्यात तीच लागवड व्हावी या साठी त्याने बळजबरीने शेतकऱ्यांकडून तागाची लागवड करविली. त्याचा परिणाम असा झाला की तागाचे उत्पन्न तर खूप झाले, पण ते खरेदी करायला कोणी मिळेना आणि देशात अन्नधान्याचा दुष्काळ पडला. त्यात प्रजेचे आर्थिक नुकसान झालं ते झालंच, प्रजेला खायला पुरेसे धान्य मिळणे कठीण झाले.

एकदां रामप्रतापला वाटलं की कावळ्यांच्या दोन जाती आहेत—एक साधे कावळे व दुसरे ते महार कावळे. कावळ्यांची सारी जात म्हणजे यमदूतच. ते देशात राहिले तर देशावर केव्हां कोठून संकट येईल नकळे. म्हणून त्याने कावळ्यांचा संहार सुरू केला. जो कोणी मेलेला कावळा आणून देईल त्याला इनाम देण्याची व्यवस्था केली. कित्येक लोकांनी पुष्कळसे कावळे एका मागून एक ठार करून आणले आणि इनाम मिळविले. परंतु परिणाम असा झाला की राज्यभर सर्वत्र घाण वाढली. सफाईचे काम थोडे फार कावळ्यांच्या

कडून होई ते बंद पडले. राजधानीत मेलेल्या कावळ्यांची घाण साचली आणि राज्यभर कुचकट घाण येऊ लागली. तेव्हां कोठे राजाचे डोळे उघडले. परंतु आतां कावळे कोठून येणार? म्हणून परदेशातून जो कोणी कावळे आणी त्याला प्रत्येक कावळ्याला अमुक इनाम दिले जाईल असे राजाने जाहीर केले. त्यामुळे पुष्कळ लोकांनी कावळे आणून देऊन खूप फायदा करून घेतला. असा होता हा रामप्रताप.

असला मूर्खपणा त्याने अनेक वेळा केला आणि प्रजेचे फार मोठे नुकसान झाले तरी राजाचे डोळे उघडले नाहीत. एकदा रामप्रताप आपल्या मंत्र्याला म्हणाला–"मत्स्यकन्यांविषयी तुम्हांला काय वाटते?"

[illegible] कधीच पाहिला नसल्याने काही सांगू शकणार नाही." मंत्री म्हणाला.

"मला काल रात्री स्वप्नात दिसली एक मत्स्यकन्या; तिचा वरचा भाग स्त्रीचा व खालचा माशाचा होता. विचित्रच नाही का?" राजाने विचारले.

रामप्रतापच्या राजवाड्यासमोर एक मोठे सरोवर होते. या सरोवरातले पाणीच राजधानीतल्या प्रजेला प्यायला मिळे. त्यात मासे सोडलेले होते. चांदण्या रात्री रामप्रताप लहानशा होडीत बसून सरोवरात विहार करायला जाई. मंत्र्याशी तो मत्स्यकन्येविषयी बोलला त्या दिवशी रात्री स्वच्छ चांदणे पडले होते. रामप्रताप एक लहानसे होडके घेऊन सरोवरात जलविहार करण्यास एकटाच निघाला. परंतु तो थोड्याच वेळात परतला आणि मंत्र्याला तावडतोब बोलावून आणण्यास त्याने निरोप पाठविला.

मंत्री आला. राजा त्याला म्हणाला–"मी आपल्या सरोवरात स्वप्नात पाहिलेल्या मत्स्यकन्येपेक्षा सुंदर मत्स्यकन्येला पाहिले. ती माझ्या होडीसमोरच आकाशात उडाली आणि पुन्हा पाण्यात अदृश्य झाली. मला ती स्पष्ट दिसली,–अर्धी स्त्री व अर्धा मासा! मला आत्तां ती पाहिजे. ती पळून निसटून जाता कामा नये. यासाठी सरोवराच्या चारीबाजूला पाहरा ठेवा आणि जाळे टाकून तिला धरून आणायची व्यवस्था करा."

"तो आपणांला भ्रम झाला असावा, महाराज! एखाद्या मोठ्या माशाला पाहून तीच मत्स्यकन्या असावीसे वाटले असेल आपल्याला. चांदण्यात तेवढे स्पष्ट कोठे दिसते?" मंत्री म्हणाला.

"अजून मला चाळीशी लागली नाही! मी सांगितले तसे करा." मंत्री म्हणाला.

मत्स्य विभागाच्या तज्ञांनी सर्व सरोवर चाळून काढले. हजारो मासे जाळ्यांत सांपडले, परंतु मत्स्यकन्या मात्र सापडली नाही.

"सरोवरातले सर्व पाणी उपसून सरोवर कोरडे करून द्या." राजाने आज्ञा केली. तसे केले तर राजधानीभर सर्वत्र पाणीच पाणी होईल, शिवाय प्यायला एक थेंबही







पाणी न मिळाल्याने प्रजा तडफडून मरेल, वगैरे गोष्टी सांगून मंत्र्याने राजाचे मन वळवून पहायचा प्रयत्न करून पाहिला. परंतु राजा मानायला तयार नव्हता. मत्स्य-कन्या आणून दाखवा, असा त्याने हट्टच धरला.

"जो हुकुम महाराज! सरोवरातले पाणी अटविण्याची व्यवस्था करायला दोन तीन दिवस लागतील. शिवाय सरोवर चांगले चाळून काढले आहे आणि माशाचे पिल्लूसुद्धा उरले नाही. मत्स्यकन्या कोठून न कशी येणार? हे दोनतीन दिवस विचार करून पहा,–आपल्याला हा भ्रम तर झाला नाही?" मंत्री म्हणाला.

राजा मंत्र्यावर चिडला. मंत्री घरी परत आला. त्याच्या मोठ्या भावाचा मुलगा हलधर हा एक जादुगार होता व परदेशातून परत आला होता. त्याने मंत्र्याला तोंड उतरलेल्या स्थितीत घरी आलेला पाहून कारण विचारले आणि सर्व गोष्टी विचारून घेऊन म्हणाला–"तुमच्या राजाला दृग्भ्रमं होत असेल हे सिद्ध करून दाखविण्यासाठी मी एक यंत्र तयार केले आहे. तुम्ही जाऊन थोडा वेळ विश्रांती घ्या."

मंत्री शेजारच्या खोलीत गेल्याबरोबर हलधरने तीन इंच लांब व एक इंच रुंदीचा कागद घेऊन त्याची मधोमध घडी केली. नंतर घडीचा भाग एका कांचेच्या ग्लासाच्या बुडाला चिकटविला. एक ताटली घेऊन तिच्या मधोमध एक अर्ध्या रुपयाचे नाणे वर नाण्याचे चित्र दिसेल असे ठेवले आणि थोडे पाणी ओतले. नंतर कांचेच्या ग्लासाच्या बुडाला असलेला कागद पेटविला आणि ग्लासात धूप धूर केला आणि ग्लास ताटलीतल्या नाण्यावर उपडा ठेवला. आता ग्लासाच्या कडेच्या बाजूने पाहिले तर नाणे मोठं झालेलं दिसू लागलं.

हलधरने चुलत्याला बोलावून विचारले–"काका, ताटलीत किती रुपये आहेत हो?"

मंत्र्याने लक्षपूर्वक पाहून म्हटले–"एकच रुपया आहे की रे!"

"एकच रुपया आहे, जास्ती नाहीत नक्की सांगता येईल का?" हलधरने विचारले.

"होय!" मंत्री म्हणाला.

"तुम्हांला भ्रम झाला आहे! तो रुपयाच नाही मुळी!" असे म्हणत हलधरने कांचेचा ग्लास उचलून पाण्यातले अर्ध्या रुपयाचं नाणे काढून दाखविले. तो केवळ डोळ्यांचा भ्रम होता, हे सांगायला हरकत नव्हती.

तो भ्रम कसा होतो हे हलधरकडून विचारून घेऊन मंत्र्याने ते यंत्र जसेच्या तसेच नेऊन राजासमोर ठेवले व विचारले–"महाराज! आपल्याला याच्यात किती रुपये दिसतात?"

"एक रुपया आहे. मला कमी दिसते, असे वाटले का तुम्हांला?" राजाने विचारले.

"क्षमा करा, महाराज! माझ्या पुतण्याने मला असाच प्रश्न विचारला होता तेव्हां आपण सांगितलेत तेच उत्तर मी दिले. मला दृग्भ्रम झाला असल्याचे त्याने सांगितले. आपल्याला माझ्यापेक्षा चांगलं दिसतं नाही का? आपल्याला दृग्भ्रम होण्याचं कारण नाही, होय की नाही? म्हणूनच आपल्याला मी विचारले. ग्लासाखाली वास्तविक काय आहे, ते कृपा करून पहावे!" मंत्री म्हणाला.

राजाने चटदिशी ग्लास उचलला. ताटलीत अर्ध्या रुपयाचे नाणे होते.

राजा अवाक् होऊन पहात राहिला. नंतर स्वत: म्हणाला–"म्हणजे माझ्या डोळ्यांनीसुद्धा मला फसविले म्हणावयाचे! कदाचित् मी पाहिलेली मत्स्यकन्या असाच दृग्भ्रम तर नसेल?"

"का नसेल महाराज! त्या पूर्वीच्या रात्री आपण स्वप्नात मत्स्यकन्या पाहिली होती म्हणालात, होय ना? आतां सरोवर अटविण्याची गरज उरली नाही, म्हणावयाचे का?" मंत्र्याने विचारले.

राजाने नकारार्थी मान हलविली. मंत्र्याचा जीव भांड्यात पडला.






प्रश्न : पाऊस कसा पडतो? पावसाचे पाणी आकाशात अधांत्री कसे राहते? साधारणपणे पाऊस ऑक्टोबर-नोव्हेंबर मध्ये पडतो, कां? गारांचा पाऊस कसा पडतो?

उत्तर : पृथ्वीवर पाणी इतर द्रवपदार्थांसारखे गुरुत्वाकर्षणामुळे पृथ्वीला चिकटून राहते, परंतु पाणी तापले की त्याची वाफ होते. पाण्याला ताप मिळाला की त्यातल्या अणूंची हालचाल वाढते. पाणी न उकळले तरी त्याची वाफ कशी होते हे आपल्याला माहीतच आहे. ओले कपडे वाळतात. तपेल्यातले पाणी काही दिवसांनी कमी होऊन वाफेच्या रूपे उडून जाते. पाण्यातल्या अणूंपेक्षां वाफेच्या रूपात असलेल्या अणूंचा वेग जास्त असतो. (पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणापासून निसटून विस्तीर्ण आकाशात पसरण्यासाठी जो वेग असतो त्याला 'पलायन वेग' म्हणतात. पाण्यातल्या अणूंना कोणत्याही कारणाने असो तो 'पलायन वेग' मिळाला की ते पृथ्वीपासून निसटून निघून जातात. चंद्रावर "पलायन वेग" फार थोडा आहे, कारण चंद्राची गुरुत्वाकर्षण शक्ती पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षण शक्तीच्या मानाने पांच पट कमी असते. म्हणून चंद्रावर कधी काळी पाणी असले तरी ते फार पूर्वी चंद्राला सोडून निघून गेले असणार.)

वाफ झालेले पाणी आकाशात जाऊन धुळीच्या कणांत मिसळून मेघरूप घेते. लोखंडाच्या बोटी पाण्यावर तरंगतात तसे बाष्परूप झालेले पाण्याचे कण एकत्र जमून (मेघ) त्यांच्यातील हलकेपणामुळे हवेत तरंगतात. एवढेच नव्हे तर वाऱ्याबरोबर ढकलले जातात. ऋतूंचे वारे त्यांना धक्के देऊन विविध दिशांना नेतात. पर्वत आड आले किंवा मेघ आणखी वर आकाशात उडाले की, कोणत्याही एका कारणाने मेघ असतात त्या जागी हवेत गारवा निर्माण झाला की, मेघांतील बाफ पाणी होऊन पाऊस पडू लागतो. आकस्मिकपणे फार गारवा लागला तर वाफेच्या गारा होतात.

तुमच्या प्रांतात ऑक्टोबर नोव्हेंबर महिन्यात पावसाळा असला तरी जगात इतरत्र तसा नसतो. सुमेरियन देशवासियांनी ६-७ हजार वर्षां पूर्वी जेव्हां राशिचक्राचा स्वरूपनिर्णय केला तेव्हां त्यांनी मकर, कुंभ आणि मीन राशी जलराशि असल्याचे ठरविले. कारण त्यावेळी सूर्य त्या राशीत असतो आणि तेव्हां त्या प्रदेशात पावसाळा असतो.




[ ६७ ]

### कृतघ्नाची गोष्ट

एका गावी एक ब्राह्मण रहात असे. तो आपल्या बायकोला स्वत:च्या जिवापेक्षा जास्त प्रेमाने संभाळीत असे. बायको मात्र नवऱ्याच्या सर्व आप्तबंधूंशी नेहमी भांडे, म्हणून नवऱ्याला जीव नकोसा वाटे. म्हणून त्याने परगावी दूर कोठे तरी जाऊन रहायचे ठरविले.

दोघे नवरा बायको ब्राह्मणाने ठरविल्याप्रमाणे दूर गावी राहण्यास निघाली. वाटेत त्यांना एका वाळवंटाच्या प्रदेशातून जावे लागले. ऊन फार कडक पडले होते. दोघांनाही तहान लागली होती. नवरा स्वत:साठी व बायकोसाठी पाणी आणायला दूर गेला. थोड्या वेळाने परत येऊन पाहातो तर बायको झळ लागल्याने मरून पडली होती. बायकोची विरहवेदना असह्य झाल्यामुळे त्याने देवाला साकडे घातले. तेव्हां आकाशवाणी झाली—"जर तू आपले अर्धे आयुष्य बायकोला द्यायला तयार असशील तर तुझी बायको पुन्हां जिवंत होईल."

ब्राह्मण लगेच म्हणाला—"मी अर्धे आयुष्य बायकोला द्यायला तयार आहे."

ब्राह्मणाच्या तोंडचे ते वाक्य निघतांच त्याची बायको उठून बसली आणि त्यांचा पुढला प्रवास सुरू झाला.

थोडे दिवस पायी चालत राहल्यावर ती दोघं एका शहराबाहेरच्या एका फुलबागेत आली. ब्राह्मण बायकोला म्हणाला—"तू येथेच थांब, मी गावात जाऊन दोघांसाठी काहीतरी खायला घेऊन येतो."

ब्राह्मणाची बायको त्या फुलबागेत बसून राहिली. त्याच वेळी एक लंगडा गातगात त्या बाजूला आला. त्याच्या गोड आवाजा-



वर ब्राह्मणाची बायको इतकी भाळली की ती त्याला म्हणाली–"आपण दोघं नवराबायको म्हणून पुढील आयुष्य घालवूं. तुम्हांला ते मान्य नसेल तर मी आत्महत्या करीन."

"मी लंगडा आहे बाई, आपलं दोघांचं कसं जमणार?" लंगड्याने विचारले.

"लंगडेपण असलं म्हणून काय झालं?" ब्राह्मणाची बायको म्हणाली. शेवटी लंगड्याने तिचा प्रियकर म्हणून तिच्या-बरोबर राहायचे मान्य केले.

थोड्या वेळाने ब्राह्मण जेवण घेऊन आला आणि बायकोला जेवायला बोलाविले. बायको म्हणाली–"हा लंगडासुद्धा उपाशी आहे, यालासुद्धा खायला आपल्याबरोबर बसवया."

ब्राह्मणाने होकार दिला. तिघे मिळून जेवली. नंतर ब्राह्मणाची बायको म्हणाली–"आपल्याला मूलबाळ नाही. तुम्ही कोठे गेलात म्हणजे मला एकटीला राहावे लागते. म्हणून या लंगड्याला बरोबर घेऊन जाऊ."

ब्राह्मण म्हणाला–"या लंगड्याला चालता येत नाही, याचे ओझे कोण वाहणार?"

बायको म्हणाली–"तुम्ही एक मोठे टोपले घेऊन या. याला त्यात बसवून मी त्याला उचलून नेईन." बायको म्हणाली.

मूर्ख ब्राह्मणाने ती गोष्टही मान्य केली आणि गावात जाऊन एक टोपले घेऊन आला. त्यात लंगड्याला बसवून ब्राह्मणाची बायको त्याला उचलून घेऊन चालू लागली.

वाटेत एक विहीर लागली. तीत खोल पाणी होते. विहिरीच्या काठावर बसून तिघांनी थोडा वेळ विश्रांती घेतली आणि लंगड्याच्या मदतीने ब्राह्मणाच्या बायकोने नवऱ्याला तो झोपला असतां विहिरीत ढकलले. त्यानंतर ब्राह्मणाची बायको त्या लंगड्याला उचलून घेऊन पुढे निघाली.

ती दोघं एका मोठ्या शहरात पोचली. त्या गावचा राजा एक धर्मभीरू माणूस होता. राजाच्या शिपायांनी एका बाईच्या डोक्यावर टोपलीत एका लंगड्याला

राजाकडे नेले.

ब्राह्मणाची बायको राजाला म्हणाली–"महाराज! हे माझे पती आहेत. माझ्या नातेवाईक यांना असे पंगू करून यांना ठार करण्याचा प्रयत्न करू लागले. म्हणून मी त्या सर्वांना दृष्टीआड एके दिवशी रात्री यांना एका टोपलीत घालून आपल्या राजधानीच्या गावी घेऊन आले."

"मी आजपर्यंत तुझ्यासारखी सतीसाध्वी स्त्री दुसरी पाहिली नाही. मी तुला दोन गावे इनाम देतो." राजा म्हणाला.

ब्राह्मणाच्या बायकोला परमानंद झाला आणि निघाली. त्याच वेळी तिचा नवरा तेथे आला. तो विहिरीत पडल्यानंतर बराच वेळ ओरडत राहिला. तेव्हां एका संन्याश्याने त्याचा आवाज ऐकून त्याला वांचविले.

नवरा तेथे आलेला पाहून ब्राह्मणाची बायको राजाला म्हणाली–"हाच तो माणूस ज्याने माझ्या पतीचीही दशा केली."

राजाने आज्ञा केली–"धरा याला आणि फाशी द्या!" तेव्हां ब्राह्मण नम्रपणे म्हणाला–"महाराज, मला फाशी देण्यापूर्वी य-बाईला मी दिलेले कर्ज हिला परत करायला सांगा."

राजाने विचारले–"काय ग बाई, तू ह्याच्याकडून काय घेतले होतेस?"

"महाराज, याने मला काहीच दिले नाही." ब्राह्मणाची बायको म्हणाली.



"तू वाळवंटात झळ लागून मेलीस तेव्हां मी तुला आपले अर्धे आयुष्य देऊन तुला जिवंत केले होते. हे खरे नाही का?" ब्राह्मणाने बायकोला विचारले व राजाला म्हणाला—"महाराज! या बाईसाठी मी आपल्या सर्व आप्तेष्टांना सोडून आपल्या गावाबाहेर पडलो आणि हिला आपले अर्धे आयुष्य देऊन हिला वांचविले. त्याचा मोबदला तिने कसा दिला, पहा. ही मला एका विहरीत ढकलून या लंगड्याच्या बरोबर संगनमत करून येथे आली आणि आपल्या हस्ते माझा वध करविते आहे!"

राजाने दरडावून ब्राह्मणाच्या बायकोला विचारले—"खरं सांग, हा म्हणतो आहे, ते सर्व खरे का?" ब्राह्मणाच्या बायकोने खरे ते सांगितले. राजाने ब्राह्मणाला आपले आयुष्य परत घ्यायला सांगितले व ब्राह्मणाच्या बायकोच्या तोंडून वदविले—"मी आपल्या पतीकडून जे अर्धे आयुष्य घेतले होते, ते त्याला परत करते." हे शब्द तिच्या तोंडाबाहेर पडताच. ती तत्काळ मरून जमिनीवर आदळली.

मगरीला सांगितली व म्हणाला—"मूर्खा! वाजवी पेक्षा जास्त बोलणाऱ्या पोपटांना पिंजऱ्यांत बंद करून ठेवतात. परंतु कमी बोलणारे बगळे नेहमी स्वच्छंदपणे आकाशात उडत राहतात. तेव्हां आतां तू चालता हो. नाहीतर मानेला हात घालून तुला हाकलून द्यावे लागेल."

तेव्हां मगर म्हणाली—"मी थट्टा केली तिचा तू गैरसमज करून घेतलास. मी एक विश्वासपात्र व्यक्ती आहे. मी तुझा कधी द्रोह करणार नाही."

"अरे, बायकोच्या गुलामा! तुझ्यासारखे लोक बायकोला खूष करण्यासाठी स्वतःचे हित, ऐश्वर्य व मित्र सर्व घालवून बसतात. नंद व वररुचीसारखे लोक आपल्या बायकोचे गुलाम झाले तर तुझ्या बोलण्यावर कोण विश्वास करील?" माकडाने विचारले.

मगरीने त्यांची गोष्ट सांगायला आग्रह केला. माकड ती गोष्ट सांगू लागले.





# भल्लूक मांत्रिक

[ ७ ]

[नागमल्ल नावाच्या चोरांच्या नायकाने राजा दुर्मुखाला पकडले तेव्हां सुटका करून घेण्यासाठी त्याने आपले नाव दुर्जयशेट सांगितले. परंतु नागमल्लला ते खरे वाटले नाही व तो त्याला एका गुहेत घेऊन गेला. चांडाळ भल्लूकाने ओरडाआरडा केला तेव्हा उग्रदंड राक्षस आला. चांडाळ भल्लूक परशू घेऊन त्याच्यावर धावला. पुढे—]

चांडाळ भल्लूक सूर्यप्रकाशात तळपणारा परशु घेऊन वार करायला येत असलेला पाहून उग्रदंड नांवाचा राक्षस चकित झाला. इतक्यात काही आठवल्या सारखे त्याला वाटले आणि तो थरथर कापू लागला. कापऱ्या हातानेच त्याने आपली दगडाची गदा उगारली व म्हणाला—"अधम मानव भल्लूका! थांब! तुझं डोकं फिरलं आहे का रे?"

चांडाळ भल्लूक लगेच जागच्या जागी थांबला आणि उग्रदंडाकडे निरखून पाहून म्हणाला—"तू राक्षस आहेस, म्हणून तुला गर्व चढलेला दिसतो आहे! तुझ्या सारख्या कोकरांना पाहून मी भिऊन जाईन असे वाटले होय तुला? तुझे दोन्ही पाय व तू गदा धरली आहेस तो हात थरथर कापत आहेत, हे मला चांगले दिसते आहे!"



उग्रदंड दांत ओठ चावीत व जमिनीवर आपला पाय आपटीत म्हणाला–"माझे हात पाय कापता आहेत की काय ते राहू दे. तुझ्यात भल्लूकपणा किती आहे आणि माणुसकी किती आहे, नकळे! तुझी ही संकर जात पाहून घृणा वाटते आहे!"

ते ऐकून भल्लूकाला जास्तच राग आला. आपल्या पराक्रमाची राक्षसाला कल्पना यावी यासाठीच की काय त्याने आपल्या हातातल्या परशूने एका खडकावर वार केला व म्हणाला–"अरे, मूर्ख राक्षसा! भल्लूक मांत्रिकाने हे चांडाळ भल्लूकाचे रूप मला दिले आहे. या रूपाची थट्टा

डोके धडावरून तुझ्या पायांवर पडणार आहे!" असे म्हणत रागाने पुढे उडी मारली आणि परशुचा वार करायला पुढे सरसावला.

उग्रदंड चटदिशी उडी मारून बाजूच्या देवदार वृक्षाच्या आड उभा राहिला. नंतर एकेक पाऊल पुढे टाकीत येत असलेल्या चांडाळ भल्लूकाला म्हणाला–"चांडाळ भल्लूका! जरा शांत हो! आपण दोघे परस्परांना मारायला धावतो आहो, त्यात कोणालाही त्यापासून फायदा होणे शक्य नाही, समजलं?"

तो प्रश्न ऐकल्यावर भल्लूकाला तो त्या बाजूला कोणत्या हेतूने आला होता ते आठवलं. भल्लूक मांत्रिकाने आपल्याला दुर्मुखराजाचे डोके आणायला पाठविले होते. ते काम पुरे करून भल्लूक मांत्रिकाकडे परत जाण्याऐवजी आपण या उग्रदंड राक्षसाशी उगाच भांडण वाढवून वेळ घालवीत आहो! तो आपली खोडी काढायला आला तेव्हां आपण परशू उगारला आणि भिऊन तो झाडाआड लपला, म्हणजे तो हारला व आपण जिंकलो असाच अर्थ नाही का!

तो विचार मनात येतांच चांडाळ भल्लूकाने एकदां आपल्या बोटांनी परशूला चांगली धार आहे की नाही पाहून घेतले

आठवण करून दिलीस की मी कोणत्या कामासाठी या बाजूला आलो आहे त्या गोष्टीची! मी त्याबद्दल तुझा आभारी आहे. आतां तू आपल्या वाटेने जा, व मी आपले काम पुरे करून आपल्या वाटेने जातो. मी या गुहेत लपलेल्या दुर्मुखाचे डोके उडवून ते घेऊन जातो."

उग्रदंड दोन पावले पुढे येऊन म्हणाला–"अरे ए, चांडाळ भल्लूका! थांब थोडा. तू थोड्या वेळापूर्वी भल्लूक मांत्रिकाच्या नावाचा उल्लेख केला होतास. मी ज्या भल्लूक मांत्रिकाविषयी ऐकले होते तो आणि तू म्हणतो आहेस तो दोघे एकच आहेत की काय अशी शंका माझ्या मनाला शिवून गेली आहे. तू म्हणतोस त्या मांत्रिकाचे वय काय असावे?"

त्या प्रश्नाचे उत्तर देण्याऐवजी चांडाळ भल्लूक मोठ्याने हसला व म्हणाला–"सूर्याचे व चंद्राचे वय काय असावे रे? तितके वय आहे त्याचे. त्याच्या डोळ्यासमोरच हिमालय पर्वताचा जन्म झाला व तो एवढा वाढला. ब्रह्मपुत्रा नदी तान्ही मुलगी होती. ती जन्मली तेव्हां कशी मोठ्याने रडली आणि तिला सासरी पाठविली तेव्हां खडक फोडीत उड्या मारीत ती कशी निघाली ते सर्व त्याने



"शाबास, चांडाळ भल्लूका! तुझ्या हातातला परशू जितका वापरून तीक्ष्ण झाला आहे तितकी तुझ्या टाळ्यातली जीभ लांब व तीक्ष्ण झाली आहे की रे! मी खरोखरच थक्क झालो बुवा! मी सुद्धा तुझ्याबरोबर येऊन त्या मांत्रिकाचे दर्शन करावे, म्हणतो! काय वाटते तुला?" असे म्हणत उग्रदंडाने आपल्या हातातली दगडी गदा दूर फेकली.

राक्षसाचे बोलणे व वागणे पाहून चांडाळ भल्लूक चकित झाला. म्हणाला–"हातातली गदा तू दूर फेकलीस ती



"कशासाठी काय विचारतोस? या क्षणापासून आपण दोघे मित्र झालो रे!" उग्रदंड म्हणाला.

ते ऐकून चांडाळ भल्लूक खदखदा हसला व म्हणाला—"भल्लूक मांत्रिकाचा भल्लूकाचे डोके बसविलेला मंत्रदंड लागल्याने मला भल्लूक रूप मिळाले असले तरी मी मूळ कोण हे मला चांगले आठवते आहे. मी राजा दुर्मुखाचे डोके त्याला नेऊन दिले की मला तो पुन्हां चांडाळ रूप देईल. म्हणून आपल्या दोघांची मैत्री होणे शक्य नाही. तू आपल्या गुहेच्या वाटेने चालू लाग." असे

चोरांचा नायक वगैरे लपले होते त्या गुहेकडे गेला.

या खेपेस चांडाळ भल्लूक गुहेच्या तोंडावरचा दगड बाजूला सरकविण्याचा प्रयत्न करू लागला तेव्हां गुहेत राजा दुर्मुखाचा अंगरक्षक चोरांचा नायक नागमल्ल याला म्हणाला—"नागमल्ला, महाराजांबरोबर आपल्या सर्वांचंच मरण याखेपेस तरी टळणे शक्य दिसत नाही. मग काय करू या?"

नागमल्लने दुर्मुखाकडे एकदा पाहिले. तेव्हां दुर्मुख स्वत:शीच काहीतरी पुटपुटत होता आणि गुहेच्या तोंडाकडे पहात होता. नागमल्लने आपल्या दोघां अनुयायांना तलवारी उपसून तयार रहायला सांगितले व दुर्मुखाला म्हणाला—"तुझ्या अंगरक्षकाच्या बोलण्यावरून तू दुर्जय शेट नाहीस ही आतां आमची खात्री झाली आहे. ते अस्वल आलं आहे ते तुझं डोकं उडविण्यासाठी. आत्मरक्षणासाठी काहीतरी युक्ती काढण्याऐवजी तोंडातल्या तोंडात काय पुटपुटतो आहेस रे?"

"मी पुटपुटत नाही की विचार करीत बसलो नाही, सुटका व्हावी म्हणून मी आपल्या कुळदेवतेचा धावा करतो आहे." दुर्मुख म्हणाला. त्या वेळी त्याचा आवाज

कामे केलीस ती आपल्या कुळदेवतेला विचारून त्याच्या अनुमतीनेच केलीस म्हणावयाची? त्या गप्पा सोड आणि मुकाट्याने बाहेर नीघ." म्हणत नागमल्ल व त्याच्या साथीदारांनी दुर्मुखाला ओढून ढकलून गुहेच्या तोंडापर्यंत नेले आणि अर्धवट बाजूला सारलेल्या दगडाजवळ नेऊन मोठ्याने म्हणाला—"अरे ए, चांडाळ भल्लूका! थोडा शांत होऊन ऐक! या गुहेत आमच्या पैकी तुला हवा आहे तो दुर्जयशेट, हे खोटे नांव लावणारा दुर्मुख राजाच हवा आहे ना?"



"होय रे होय! इतर केरकचरा कशाला हवा आहे मला? त्याला डोक्यासकट बाहेर ढकला. मी त्याचे फक्त डोके कापून नेणार आहे." चांडाळ भल्लूक म्हणाला.

"तरमग थोडा धीर धर." असे सांगून चोरांचा नायक नागमल्ल मागे फिरला व दुर्मुखाला म्हणाला—"राजा, दुर्मुखा! चांडाळ भल्लूक म्हणाला ते तू ऐकलेस ना? मरण टळणे शक्यच नसेल तर राजाला शोभेल अशातऱ्हेने तलवार उपसून बाहेर जा आणि त्या चांडाळ भल्लूकाशी दोन हात करून कां मरत नाहीस?"

ते ऐकून राजा दुर्मुखाच्या तोंडचे पाणीच पळाले. म्हणाला—"मी राजाला शोभेल अशातऱ्हेने मरायला शिकलोच नाही." आणि बाजूला असलेल्या अंगरक्षकाकडे वळून म्हणाला—"काय रे अंगरक्षका! दाखव तुझी स्वामिभक्ती खरी आहे की खोटी! स्वर्गप्राप्तीसाठी हीच वेळ सर्वात चांगली आहे! तू पुढे हो आणि त्या भल्लूकावर तुटून पड आणि मी निसटून जायला मिळते का पाहतो!"

अंगरक्षकाने तलवार उपसली होती ती पुन्हा म्यानेत ठेवली व म्हणाला—"मी मरून स्वर्ग मिळविला तर इहलोकात माझ्या बायकोला व मुलांना कोण संभाळणार हो? तिकडे इतक्या घाईने जायची गरजच काय मला?" असें सांगून



गुहेच्या भिंतीला टेकून डोळे मिटून बसून राहिला

इतक्यात बाहेरून चांडाळ भल्लूक संतापून दांत ओठ चावीत ओरडला— “काय रे, कोठे आहे तो दुर्मुख राजा? मी जर का गुहेत पाऊल टाकले तर सर्वांना उभा चिरून फेकून देईन.”

चोर नागमल्ल आपल्या दोघां साथी-दारांना बरोबर चलायला खूण करून ते आल्याबरोबर गुहेच्या तोंडाजवळ गेला आणि तोंडावरचा दगड थोडा बाजूला सरकवून तोंड बाहेर काढून भल्लूकाला म्हणाला—“अहो, आम्ही तिघे या अरण्या-

आलो आहो.”

चांडाळ भल्लूक म्हणाला—“अरे, तुम्ही सर्व चोर आहां हे मला माहीत आहे! मी तुम्हांला कोणत्याही प्रकारची इजा करणार नाही. तुम्ही खुशाल बाहेर या.

नागमल्ल व त्याच्या साथीदारांनी गुहेच्या तोंडावरचा दगड चांगला बाजूला सारला आणि बाहेर निघू लागले तेव्हां ती संधी साधून दुर्मुख निसटून जाण्यासाठी चटदिशी बाहेर आला.

चांडाळ भल्लूक त्याला धरायला धावला. दुर्मुख स्वतःचा बचाव करण्यासाठी पळून झाडाच्या आड लपायला निघाला, परंतु तेथे उग्रदंड राक्षसाला उभा पाहून घाबरून मोठ्याने ओरडला आणि उग्रदंडाचे पाय धरले.

चांडाळ भल्लूक जवळ येऊन म्हणाला— “शेवटी सांपडलास की रे, भित्र्या!” तितक्यात उग्रदंड चांडाळ भल्लूकाला म्हणाला—“मित्रा! एक क्षणभर थांब! तू मला हे सांग की भल्लूक मांत्रिक तुला जिवंत दुर्मुखाचे डोके कापून घेऊन ये म्हणाला की त्याच्या प्रेताचे डोके कापून घेऊन ये म्हणाला?”

त्या प्रश्नाचे उत्तर चांडाळ भल्लूकाला

कडे पाहू लागला. म्हणाला—“तुला असे म्हणावयाचं आहे का की हा मेला आहे?”

“मेलेला नाही, बेशुद्ध पडला आहे! बेशुद्ध असलेल्या माणसाचा शिरच्छेद करणे हे एक महापाप आहे, असे थोरा मोठ्यांचे सांगणे आहे. तेव्हां एक काम कर. तू याला उचलून त्या महामांत्रिकाकडे घेऊन जा आणि तेथे त्याचे डोके उडव. तेथे पोचेपर्यंत याला शुद्ध येईल.” उग्रदंड राक्षस म्हणाला.

चांडाळ भल्लूक फूत्कार सोडल्यासारखा रागाने म्हणाला—“शत्रूला मी खांद्यावर उचलून घेऊन जाऊ म्हणतोस? छे! ते शक्य नाही!”

उग्रदंडाने एकदा गुहेकडे वळून पाहिले. तेथे नागमल्ल व त्याचे साथीदार पळून जाण्याचा विचार करीत असलेले दिसले. उग्रदंड आपली दगडी गदा हातात घेऊन म्हणाला—“काय रे, चोरांनो! पळून जाण्याचा विचार चालू आहे का तुमचा? तंगड्या तोडून टाकीन लक्षात असू द्या. मुकाट्याने इकडे या. तो अंगरक्षक कोठे आहे?”

तिघां चोरांच्या अंगाचा थरकाप उडाला. नागमल्ल गुहेत डोकावून पहात म्हणाला—“तिकडे या राजाचा अंगरक्षकही बेशुद्ध होऊन पडल्यासारखा दिसतो आहे!”



“बेशुद्ध पडल्याचं सोंग करतो आहे तो. उग्रदंड त्याला अभयदान देत आहे असे सांगून बाहेर बोलव.” उग्रदंड म्हणाला.

नागमल्ल मोठ्याने हाक मारून म्हणाला—“अरे अंगरक्षका? ऊठ, उग्रदंड राक्षस तुला अभयदान देतो आहे!”

ते ऐकताच अंगरक्षक लगेच उठून बसला व रांगत गुहेबाहेर येत म्हणाला—“महा-राजांचे डोकं उडालं का हो? तो भयंकर चांडाळ भल्लूक निघून गेला वाटतं?”

परंतु नागमल्लचे दोघे साथीदार गुहेत शिरले. एकाने त्याची मान धरली आणि दुसऱ्याने कंबरेला हात घालून त्याला गुहेबाहेर ओढत आणले व म्हणाले—“तसं काही नाही

तो पहा तुझा राजा उग्रदंडाच्या पायावर लोटांगण घालून पडला आहे?"

अंगरक्षक थरथर कांपत उग्रदंडाजवळ जाऊन म्हणाला—"अहो! मी या क्षणापासून आपला अंगरक्षक आहे! या चांडाळ भल्लूकाच्या हातातून मला वांचवा!"

उग्रदंड मोठ्याने हसून म्हणाला—"तरमग मला एक अंगरक्षक मिळाला म्हणावयाचा! मी एवढा महाराक्षस आणि माझी ही दशा!" असे म्हणत अंगरक्षकाकडे वळून म्हणाला—"अरे, अंगरक्षका! लगेच माझ्या त्या गुहेत जा आणि आतून एखादे दगडी भांडे घेऊन येऊन पलीकडच्या ओढ्याचे पाणी घेऊन ये. या बेशुद्ध पडलेल्या तुझ्या राजाला शुद्ध येते का पहावयाचे आहे."

"आमचे महाराज शुद्धीवर आल्याशिवाय हा चांडाळ भल्लूक त्यांचे डोके कापून नेणार नाही तर?" असे म्हणत आश्चर्यचकित होऊन सर्वांकडे पहात उभा राहिला.

डोळे वटारीत म्हणाला—"ए मूर्खा! उग्रदंड म्हणाला त्याचा अर्थ कळला नाही वाटतं तुला?" तत्क्षण अंगरक्षक धावत उग्रदंडाच्य गुहेत गेला आणि तेथून एक दगडी भांडे घेऊन ओढ्याकडे गेला. ते भांडे भरून तो आणू लागला, तितक्यात शेजारच्या एका झाडीत सोंड तुटलेला हत्ती उभा होता त्याने अंगरक्षकाला पाहिले आणि मोठ्याने चीत्कार केला आणि त्याच्या अंगावर धावला.

अंगरक्षक तेथेच ते भांडे टाकून मोठ्याने ओरडत उग्रदंड व इतर लोक होते तिकडे धावत पळत आला व म्हणाला—"चांडाळ भल्लूक महोदया! सोंड तुटलेला हत्ती माझ्या पाठीमागून येतो आहे!"

"ओहो, म्हणजे माझे वाहन याच भागात आहे, वाटते!" असे म्हणत चांडाळ भल्लूकाने मान वळवून पाहिले तेव्हां हत्ती आपली सोंड वर करून चीत्कार करीत त्या सर्वांच्या अंगावर धावत आला. (क्रमशः)



# आरण्यक

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले व नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाकडे निघाला. तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तू राज्यकारभार सोडून अनावश्यक जंगलात फिरतो आहेस. या उलट एका आरण्यकाने राजनीतीत प्रवेश केला होता. तुला मी त्याची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

चंद्रगिरीचा राजा अमरपालचे नाव ऐकूनच मोठमोठे प्रतापी राजे भयकंपित होऊन जात. त्याच्याशी युद्ध करून कधी कोणाला यश मिळाले नाही. तो अजेय होण्याचे कारण त्याच्या सैन्यातली रानटी जातीची तुकडी होती.

रानटी जातीच्या लोकांचे केंद्र चंद्रगिरीजवळचे दाट जंगल होते. त्यांचा एक



नायक होता. चंद्रगिरीचे राज्य बळकावण्यासाठी तो व त्याची प्रजा आपले सर्वस्व होम करण्यास नेहमीं तयार असत. जंगली जातीच्या लोकांचा नायक व राजा अमरपाल यांचे परस्परांशी फार सख्य होते. तो दरवर्षी राजाकडे जंगलातील चंदन, व्याघ्रचर्म, सांबरशिंग इत्यादी अमूल्य वस्तूंबरोबर जंगली जातीच्या शूर तरुणांना सैन्यात भर्ती होण्यास पाठवीत असे. त्या शूर तरुणांच्या मदतीने अमरपाल राजाने रानटी सैनिकांच्या काही तुकड्या सैनिक शिक्षण देऊन सज्ज केल्या. त्या शूर सैनिक तुकड्यांच्या मदतीने अमरपाल राजाने आपल्या शेजारच्या [illegible] स्वाऱ्या करून ती राज्ये बळकावली आणि त्या राज्यांकडून दरवर्षी खंडणी वसूल करू लागला.

काही वर्षांनी रानटी जातीच्या नायकाचा मुलगा वयात आल्यावर विचार करू लागला की राजा अमरपाल हा आपल्या रानटी जातीचे शोषण करीत आहे. दरवर्षी अमरपाल राजाचे अधिकारी जंगलात जात व जंगलातल्या अमूल्य वस्तू बरोबर काही रानटी जातीच्या तरुणांना बळजबरीने सैन्यात भर्ती करण्यासाठी धरून घेऊन जात.

आरण्यकाला हे आवडले नाही व त्याने आपला विरोध दर्शविला. तो बापाला म्हणाला–“बाबा! आपण अमरपाल राजाला खंडणी देतो आहो, ती कशासाठी? त्यांनी आपल्याशी कधी युद्ध करून आपल्याला जिंकले आहे का? आपल्या राज्यातली संपत्ती व तरुणांना नेण्याचा त्यांना काय अधिकार आहे?”

त्यावर आरण्यकचा बाप स्मित करून म्हणाला–“बाळा, राजाकडे जी आपल्या जातीच्या तरुणांची तुकडी आहे ती आपली नाही का? राजाची शक्ती ही तरी शक्ती आपलीच नाही का? राजा आपला असतां आपल्याकडे वांकडी नजर टाकण्याची हिंमत कोण करील?”

“बाबा, तुम्ही [illegible] नाही. राजाची शक्ती ती आपली कधी होणे शक्यच नाही. वास्तविक आपली शक्ती तीच राजाची शक्ती आहे. आपण स्वतंत्र नसून राजाचे सामंत आहोत. राजाचे अधिकारी आपल्याकडे खंडणी मागायला येतील तेव्हां, जर आपण नकार दिलात तर खरी गोष्ट कळेल.” आरण्यकने आपली बाजू समजावून सांगितली.

ते ऐकल्यावर नायकाने गंभीरपणे विचार केला आणि आपल्या जातीच्या लोकांची सभा घेऊन त्याने जाहीर केले–“बंधुओ! मी आजपासून आपल्या पदाचा त्याग करीत आहे, यापुढे माझा मुलगा आरण्यक तुमचा नायक राहील. तुम्ही सर्वांनी त्याच्या आज्ञेप्रमाणे वागत जा.”

थोड्या दिवसांनी राजाच्या अधिकाऱ्यांनी दरवर्षी प्रमाणे बांबू, चंदनाचे लाकूड, व्याघ्रचर्म, हत्ती आणि पंचवीस तरुण यांची मागणी केली.

तेव्हा आरण्यकने अधिकाऱ्यांना स्पष्ट शब्दांत सांगितले–“आम्ही तुम्हांला ही खंडणी कां द्यायची? चंद्रगिरीचा राजा तुमचा आहे, तसा आमचाही आहे. आम्ही स्वतंत्र नागरिक आहो. परंतु आमचे सर्व तरुण तुमच्या सैन्यात भर्ती होतात. म्हणून आमची जात दिवसेदिवस आत्मरक्षण



करण्यासही असमर्थ ठरत आहे. यापुढे हे सर्व आतां बंद तुम्ही जाऊन महाराजांना सांगा की आमचे जे लोक त्यांच्या सैन्यात भर्ती झाले आहेत त्यांना परत पाठवावे, जंगलातले सर्व वैभव व संपत्ती ही आमची आमच्या जातीची आहे. राजाला कधी आर्थिक संकटाला तोंड द्यावे लागले तर त्यांनी आमची मदत अवश्य घ्यावी. कधी राज्यावर संकट आले तर आम्ही आपल्या सर्व शक्तीनिशी राजाच्या मदतीला धावून येऊ. आम्ही सर्व राजाला मदत करायला सर्वदा सज्ज राहू. मी वचन देतो.”

तेव्हां राजाचे अधिकारी रिकाम्या हाताने परतले. परंतु दुसऱ्या दिवशी राजा-



कडून आरण्यकच्या नावे ताकीद आली– "रानटी जातीचे लोक स्वतंत्र नाहीत. ते राजा अमरपाल याची प्रजा आहे. साला-बादप्रमाणे दोन दिवसांच्या आत जर जंगलांतले धन मागणीप्रमाणे हजर केले गेले नाही, तर राजाच्या सैन्यात रानटी जातीच्या ज्या तुकड्या आहेत त्यांची कत्तल केली जाईल, आणि जंगली जातीच्या सर्व वस्त्या नेस्तनाबूत केल्या जातील."

ते फर्मान ऐकून आरण्यकला आश्चर्य वाटले. त्याने राजदूतांना समजावून सांगितले–"आम्ही महाराजांचे सामंत नाही. राजाने आम्हांला युद्धात जिंकले तरच आम्ही त्याचे सामंत होऊ!"

त्यानंतर आरण्यक युद्धाला सज्ज झाला. जंगलातल्या वस्त्या उध्वस्त करायला आलेल्या सैनिकात एकही रानटी जातीचा सैनिक नव्हता. आरण्यकाने आपल्या जातीच्या लोकांना लपून छपून छापे मारायला सांगून राजाच्या सैन्याचा धुव्वा उडविला. कित्येक सैनिक कैद झाले आणि कित्येक जखमी झाले.

आरण्यकला कैद झालेल्या सैनिकांकडून कळलें की त्याच्या जातीच्या सर्व सैनिकांना कैदेत टाकण्यात आले आहे व त्यांना अनेक हालअपेष्टा सहन कराव्या लागत आहेत. राजाची ताकीद आली तेव्हां आरण्यकच्या मनात एक अंधुक शंका होती, तीच खरी ठरली.

गंमत अशी की त्याच सुमारास काही लुटेरे एक मेणा घेऊन त्या जंगलातून जात असतांना दिसले. तेव्हां लुटेरे व आरण्यकाचे अनुयायी यांची चकमक झाली व त्या चकमकीत सर्व लुटेरे कैद झाले. त्या मेण्यात राजाची एकुलती एक राजकन्या होती आणि लुटेरे खरोखरी लुटेरे नव्हते; राजाच्या मंत्र्याने राजकन्येचा वध करण्या-साठी नेमलेले मारेकरी होते.

आरण्यकाला वाटले की राजा स्वत: इतका दुष्ट नसावा, त्याच्या मंत्र्यानेच रानटी

म्हणाला–"राजकन्येच्या संरक्षणाची जबाब-दारी मी घेतो. तुम्ही मलाजी खरीखुरी माहिति सांगितलीत त्याबद्दल मी तुम्हांला मुक्त करीत आहे. नंतर मंत्र्याला राजाची गादी पाहिजे असेल तर मी त्याला मदतच करीन. मी त्याच्या बाजूने राजाशी वेळ पडल्यास युद्ध करीन. तेव्हां तुम्ही जाऊन मंत्री महाशयांना एक गुप्त संधी करण्या-साठी माझ्याशी बोलण्यास पाठवून द्या."

ते कळताच मंत्री आरण्यकाला भेटायला जातीने आला. आरण्यकाने लगेच त्याचा वध केला व राजकन्येला बरोबर घेऊन राजाच्या दर्शनाला गेला. राजकन्येचे अप-हरण व मंत्र्याच्या वधाची बातमी कळल्या-वर राजा म्हणाला–"मी तुझा आभारी आहे. तुमच्या जातीच्या मदतीने मी अनेक युद्धे जिंकली आहेत. तू मला एका कटातून सोडविलेस. मी कधी तुमच्या जातीला आपले गुलाम मानले नाही. तुझ्या वडिलांशी माझे सख्य होते म्हणून त्यांनी पाठविलेल्या तरुणांना मी आपल्या सैन्यात भर्ती करून घेत असे. तुझ्या जातीच्या तरुण सैनिकांना तुरुंगात डांबून ठेवल्याची गोष्ट मला माहीत नव्हती आपली आपसा-तली मैत्री कायम रहावी हीच माझी इच्छा



राजधानीत राहिले काय किंवा जंगलात राहिले काय, त्यात मी फरक मानीत नाही. तुला पाहिजे असल्यास तू त्यांना आपल्या बरोबर घेऊन जा."

आरण्यक म्हणाला–"नाही महाराज, हे सैनिक आपल्या सेवेसाठी राजधानीतच राहतील. त्यांना आपण उत्तम शिक्षण देऊन शूर सैनिक कराल, ते आम्हांला मान्यच आहे." असे सांगून आरण्यक राजाचा निरोप घेऊन परतला.

येथवर गोष्ट सांगून बेताळ म्हणाला– "राजा, राजाकडून ताकीद आल्यावर आरण्यकाच्या मनात शंका कशी काय

बळकावण्याची इच्छा आहे, हे त्याला कसे काय कळले? ते कळल्यावर त्याने मंत्र्याला बोलावून त्याचा वध कां करविला? हे सर्व झाल्यावर आरण्यकने त्याच्या वडिलांच्या काळातले रिवाज कसे काय मान्य केले? या प्रश्नांची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"काही अंशी आरण्यकाची चुकीची समजून झाली होती की त्याच्या पित्याने राजाशी सख्य केले नसून त्याची गुलामी पत्करली आहे. त्याच्या मनांत ती शंका यायला कारणही तसेच होते. कारण खंडणीच्या नावे राजाचे अधिकारी जंगलातली संपत्ती व तरुणांना धरून घेऊन जात असत. म्हणून त्याने नायक झाल्यावर तो प्रघात बंद केला. त्याला अशी खंडणी नित्यनियमित दरवर्षी देणे मुळीच मान्य नव्हते. नकार दिल्यावर राजा काय करतो हे पाहून घ्यावे, असाही

खंडणी देण्याचे नाकारताच त्याच्या जातीच्या लोकांना तुरुंगात डांबून त्यांचा छळ करण्यात येईल या गोष्टीची त्याला कल्पना देखील नव्हती. कारण राजा इतक्या सामर्थ्यशाली तुकडीचा अंत करून स्वतःचे नुकसान करून घेण्यासारखेच होते. म्हणून राजाकडून आलेला संदेश राजाचा नसून आणखी कोणाचा होता ही शंका त्याच्या मनात उपजली. राजकन्येचा वध करायला निघालेल्या मंत्र्याच्या हस्तकांकडून तो सर्व मंत्र्याचा डाव होता हे देखील त्याला कळले. म्हणून त्याने युक्तीने मंत्र्याला बोलावून घेऊन त्याचा काटा काढला. राजाला भेटल्यावर त्याचा चांगुलपणा त्याला कळला. म्हणून त्याच्या बापाच्या काळातले सर्व प्रघात चालू ठेवण्यास नकार देण्याचे कारण उरले नाही."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.





# अगस्त्य ऋषी

असे सांगतात की कित्येक पौराणिक पुरुषांचा जन्म मडक्यात किंवा पात्रात झाला. त्यांपैकी अगस्त्य व वसिष्ठ ऋषी हे दोघे प्रसिद्धच आहेत. अगस्त्य ऋषींनी उतारवय होईपर्यंत विवाह केला नाही. एकदा ते रानावनात हिंडत असतां त्यांना काही लोक उलटे टांगलेले दिसले. अगस्त्य मुनींनी त्यांना विचारले—"तुम्ही या टांगलेल्या स्थितीत अधोमुखकां आहां?"

ते म्हणाले—"आमच्या वंशात जन्मलेल्या अगस्त्य नांवाच्या वंशजाने विवाह न करून पुत्रसंततीचा मार्गच बंद केला आहे. म्हणून आम्हांला सद्गती मिळणे शक्य नाही, आणि आमची ही स्थिती झाली आहे."

ते आपले पूर्वज असल्याचे कळल्यावर विवाह करून त्यांचा उद्धार केला पाहिजे असे अगस्त्य मुनींनी ठरविले आणि विदर्भ राजाकडे जाऊन त्याची मुलगी लोपामुद्रा हिच्याशी विवाह करण्याची इच्छा प्रगट केली. परंतु कंदमुळे व फळे खाऊन रहणाऱ्या मुनीशी आपल्या कन्येचा विवाह करण्यास राजाचे मन मानेना. परंतु लोपामुद्राच विवाह करण्यास तयार झाली.

विवाह झाल्यावर लोपामुद्राने मुनींजवळ उत्तम वस्त्रालंकार देण्यास विनंती केली. म्हणून अगस्त्य मुनी धन याचना करण्यास श्रुतपर्वकडे गेले. श्रुतपर्वजवळ धन नव्हते. तेव्हां दोघे प्रद्नश्व नामक राजाकडे गेले. त्याच्याजवळही दान करण्याइतके धन नव्हते. तेव्हां तिघे इल्वल नामक राजाकडे गेले.

राजा इल्वल वातापि नामक एका व्यक्तीला बकऱ्याचे रूप देऊन त्याचे मांस शिजवून अतिथी अभ्यागतांना वाढत असे. वातापी अतिथि ब्राह्मणाचे पोट फाडून बाहेर येई. अशातऱ्हेने इल्वल व वातापि दोघे ब्राह्मणांचा वध करीत.











इल्वलकडे अगस्त मुनी व दोघे राजे गेले त्यांना इल्वलने तसंच बकऱ्याचे मांस वाढले. अगस्त्य मुनींना इल्वलचे ते गुपित माहीत होते. म्हणून भोजन झाल्यावर अगस्त्य म्हणाले–"जीर्ण जीर्ण वातापि जीर्ण!" आणि वातापि जीर्ण झाला. इल्वल प्रगटपणे काहीच बोलला नाही. त्याने धन देऊन निरोप दिला.

असे सांगतात की कावेरी ही अगस्त्य मुनींची बायको होती. एकदा ब्रह्मदेव अगस्त्य मुनींना म्हणाला–"कवेर नामक राजर्षींची मुलगी कावेरी शंकराचे ध्यान करून तपश्चर्या करीत आहे. तिच्याशी त्याने विवाह करावा. अगस्त्यांनी ते मान्य केले आणि कावेरीला आपल्या कमंडलूत ठेवून घेतले.

त्यानंतर अगस्त्य विंध्य पर्वताला दंड देण्यासाठी निघाले. त्यांनी आपले कमंडलू शिष्यांच्या हातात दिले. ते कमंडलू घेऊन शिष्य सह्याद्रीपर्यंत गेले. तेव्हां कावेरी नदीरूपे प्रगट झाली.

की त्याने सूर्य व चंद्राचा मार्ग अडविला. मुनींनी त्याला थांबविण्याचा यत्न केला. परंतु त्याची प्रार्थना विंध्य पर्वताने मान्य केली नाही. तेव्हां अगस्त्य ऋषींनी विंध्य पर्वताला दक्षिणेकडे जाण्यासाठी मार्ग देण्यास आज्ञा केली. विंध्य पर्वत त्यावेशी वांकला. तेव्हां अगस्त्यांनी त्याला परत येईपर्यंत तसाच ओणवा रहायला सांगितले. परंतु अगस्त्य ऋषी दक्षिणेत गेले ते परतले नाहीत.

अशीही एक आख्यायिका आहे की अगस्त्य मुनींनी समुद्राचे प्राशन केले होते. त्याची कथा अशी: कालकेय नावाचा एक राक्षस मुनींना त्रास देत असे. त्याचा संहार करणे देवांनादेखील शक्य झाले नाही. कारण कालकेय समुद्रात लपून राही. म्हणून देवांना मदत करण्याच्या हेतूने अगस्त्यांनी समुद्र पिऊन आटविला. तेव्हां कालकेय प्रगट झाला. त्याचा देवांनी वध केला.



# स्वतःची पाळी

एका गावी वीरू नावाचा एक तरुण युवक होता. त्याचे वडील नव्हते. तो आपल्या आईचे काही एक ऐकत नसे. उडाणटप्पू निघाला. त्याने लग्न करून घेतले. परंतु कामधंदा काही करीत नसे. त्याने चोरीचा धंदाच सुरू केला. त्याच्या बायकोला ते आवडले नाही. तिने पुष्कळ समजावून सांगून पाहिले, परंतु तिच्या बोलण्याकडे तो दुर्लक्ष करी.

एकदा वीरू कोठेतरी चोरी करायला गेला आणि तीन दिवसांनी परतला, तेव्हां त्याने घरात जो माल पूर्वी चोरून आणून ठेवला होता तो नाहीसा झालेला कळला. बायकोला विचारले तेव्हां कळले आदल्या दिवशीच कोणी चोर घरात शिरले आणि त्यांनी सर्व झाडून उचलून नेले.

वीरूला राग आला आणि वाईटही वाटले. तो बायकोला, तोंडाला आले ते बोलला. तेव्हां त्याची बायको म्हणाली–"तुम्ही चोरून आणलेला माल कोणी चोरून नेल्याचे तुम्हांला एवढे वाईट वाटले आणि विचार करा की ज्यांनी मेहनत करून चार पैसे जोडले तेच तुम्ही चोरलेत तर त्यांना किती वाईट वाटेल ?

त्या दिवसापासून त्याने कानाला खडा लावला की चोरी करायची नाही,

बायकोने शेजारच्या घरी ठेवलेला सर्व माल आणून नवऱ्याला बजावले की निदान या पुढे तरी मेहनत करून स्वतःचा निर्वाह करण्याचे ठरवा.





# बरे व वाईट

श्रीपूर येथे शंकरराव नावाचे एक गृहस्थ रहात. त्यांनी पापपुण्याचा विचार न करता खूप पैसे मिळविले. त्यांना पन्नासावे वर्ष लागले तेव्हां त्यांच्या पत्नी वारल्या. त्यांना मूलबाळ नव्हते. त्यांनी घरकामासाठी राजू नावाच्या एका तरुण मुलाला नोकर ठेवले होते.

राजूची ओळख सरला नावाच्या एका तरुण मुलीशी झाली. सरला दिसायला सुंदर होती. श्रीपूरच्या आठवड्याच्या बाजाराच्या दिवशी ती दोघं भेटत.

एकदा शंकरराव राजूबरोबर स्वत: आठवड्याच्या बाजाराला निघाले. तेथे राजूला सरला भेटली आणि दोघं बराच वेळ परस्परांशी बोलत उभी राहिली. शंकररावांनी राजूला बोलावून विचारले– "कोण रे मुलगी ती? तुम्हां दोघांची बरीच ओळख दिसते?"

राजू म्हणाला–"मालक ती हिंमतपूरची राहणारी आहे. तिच्या वडिलांचे नाव रंगराव आहे."

सरलाला पाहिले तेव्हांपासून शंकररावाच्या मनात कालवाकालव सुरू झाली. तिच्याशी लग्न करून घेऊन पुन्हां संसार थाटायला काय हरकत आहे? हा विचार मनात येतांच त्यांनी रंगरावांकडे निरोप पाठविला. रंगरावांनी विचार केला, मुलगी श्रीमंताच्या घरी पडली तर आपल्याला चार घास सुखाचे खातां येतील. त्यांनी मुलीची इच्छा नसूनही शंकररावांना होकार दिला व लग्नाच्या खर्चासाठी म्हणून एक मोठी रक्कम मागून घेऊन लग्नाचा मुहूर्त ठरवून टाकला.

ते कळल्यावर अर्थातच राजू हताश झाला. त्याला काय करावे, सुचेना. परंतु त्याचे दोघे हिकमती मित्र रामू व सोमू दोघांनी एक युक्ती काढली. ते हिमतपूरलाच रहात. ते गावोगावी हिंडून सोंगे करून आपली उपजीविका करीत. त्यांना राजूने त्याच्यावर आलेला प्रसंग वर्णन करून सांगितल्याबरोबर त्यांनी त्याला मदत करण्याचे वचन दिले.

मुहूर्त ठरला होता, त्याच्या आदल्या दिवशी शंकरराव राजूला बरोबर घेऊन हिंमतपूरला आले आणि गावातल्या शाळेत उतरले.

त्या दिवशीच त्या गावी एका श्रीमंताच्या घरी त्याची म्हातारी आजी वारली होती. सर्व गावकरी फार दु:खी होते. म्हणून शंकररावाच्या लग्नाला मोडता घालायला रामू व सोमूला चांगली संधी मिळाली.

मध्यरात्रीच्या सुमारास रामू यमराजाचे व सोमू यमदूताचे सोंग करून निघाले. रामू एका रेड्यावर बसून निघाला. दोघे शाळेच्या बाजूनेच निघाले. शाळेसमोर रेड्याला उभा करून यमराज खदखदां हसून म्हणाला–"काय रे, भल्लूकमुष्टी! या म्हातारीचे काळीज किती टणक आहे रे! माझ्या पाशात सापडली आहे, तरी पहा, कशी उड्या मारते आहे!"

"होय महाराज! आपण आलात, बरे झाले, नाहीतर तिचे प्राण आपल्या यमपाशात अडकवून तिला घेऊन जाणे मला जमले नसते." यमदूत म्हणाला.

त्यांचे ते बोलणे ऐकून शंकरराव चकित झाले. त्यांनी खिडकी उघडून बाहेर पाहिले



आणि यमराजाला स्वतः व यमदूताला पाहून त्यांची बोबडीच वळली.

यमराजाने शंकररावांकडे पाहिले व यमदूताला म्हणाला–"अरे, हा तर श्रीपूरचा शंकरराव दिसतो आहे! याचे आयुष्य अवघे एक आठवडाभर उरले आहे. त्याला ठीक वेळेवर जाऊन उचलून न्यायला विसरू नकोस."

"जी, मालक!" यमदूत म्हणाला. त्यानंतर दोघे पुढे निघून गेले व काळोखात दिसेनासे झाले.

त्यांचे संभाषण ऐकून शंकररावांच्या तोंडावाटे शब्द उमटेनासा झाला. कांपऱ्या आवाजात राजूला म्हणाले–"ऐकलेस का रे, त्या दोघांचे बोलणे? खरोखरच का रे, हे यम व यमदूत होते?"

"काय म्हणालात मालक? यमदूत आणि यमराज? मला नाही दिसले, बुवा!" राजू आश्चर्यचकित होऊन म्हणाला.

त्यानंतर शंकररावांची झोप उडाली. रात्रभर तळमळत पडून राहिले. यमराज [illegible] यमदूत मलाच दिसले आणि राजूला दिसले नाहीत, याचा अर्थ काय बरे असेल? एका आठवड्यात मरण येणार आपल्याला? मग हवें कशाला हे लग्न? एका भोळ्या मुलीचं आयुष्य वायां कां घालवावं?

"शंकरराव दुसऱ्या दिवशी बोहोल्यावर उभे राहिले नाहीत. त्यांनी रंगरावाला सांगितले की मुलीचे लग्न राजूशी लावून द्यावे.

"ही काय थट्टा आरंभली आहे, मालक? मी आपल्या मुलीचे लग्न एका फाटक्या भिकाऱ्याशी लावून देऊ म्हणतां?" रंगरावांनी रागाने विचारले.

"राजू फाटका भिकारी कसा काय? तो माझ्या सर्व इस्टेटीचा वारस आहे. मी आपली सर्व इस्टेट त्याच्या नावी लिहून देत आहे." शंकरराव म्हणाले.

त्यानंतर सरलाचे लग्न राजूशी झाले.

शंकरराव यमदूताची वाट पहात राहिले, परंतु त्यांचे प्राण उचलून न्यायला यमदूत आलेच नाहीत.



# व्यवहारी वाणी

सोनुशेट एक हुशार वाणी होता. तो दररोज लक्ष्मीची पूजा करी. लक्ष्मीचा त्याच्यावर अनुग्रह होता. एकदां लक्ष्मीला सोनुशेटवर कां कोणास ठाऊक थोडा राग आला. तिने स्वप्नात सोनुशेटला दर्शन देऊन सांगितले की तिने त्याचे घर सोडून जायचे ठरविले आहे.

सोनुशेटने तिचे पाय धरले व म्हणाला–"अशी रागावून जाऊ नकोस. माते! मी तुझी महापूजा करावी, म्हणत आहे. तेव्हां निदान ती पूजा होईपर्यंत तरी रहा!"

"ठीक! तुझी महापूजा संपेपर्यंत मी कोठे जाणार नाही." लक्ष्मीने महापूजेच्या लोभाने वाणी म्हणाला ते मान्य केले.

मग काय? वाण्याने दुसऱ्या दिवसापासून रोजची साधी पूजा करणेसुद्धा सोडले. कित्येक दिवस लोटले. लक्ष्मी संतापली. वाण्याला स्वप्नात दर्शन देऊन म्हणाली–"काय रे, तू महापूजा केव्हां करणार आहेस? मी आजच तुझ्या घरातून पाय काढते."

"माते! तू वचन दिले आहेस की महापूजा संपेपर्यंत कोठे जाणार नाहीस म्हणून!" वाण्याने आठवण करून दिली. लक्ष्मीला ठाऊक होते की जन्मात कधी महापूजा करणार नाही. म्हणून म्हणाली–"तरमग साधी पूजा तरी करीत रहा!" असे सांगून ती अंतर्धान पावली.



# बोळू

एका गावी बंडू व खंडू नावाचे दोघे मजूर रहात असत. त्यांना सर्व बोळू म्हणून हाक मारीत. एकदा बंडूने गावच्या पाटलाला भेटून विचारले–"काय हो, मला सर्व बोळू म्हणतात. खरंच का मी हो बोळू आहे ?"

"मी तुला एक प्रश्न विचारतो, त्याचे उत्तर दे. माझ्या कुटुंबात चारजण आहेत. एक माझी बायको, दुसरा माझ्या मुलगा आणि तिसरी माझी मुलगी. चवथी व्यक्ती कोण असेल सांग पाहू ?" पाटलाने विचारले.

"तुम्ही सांगितलेत तर ना मला कळणार !" बंडू म्हणाला.

"अरे बोळ्या ! चवथा माणूस मी !" पाटील म्हणाला.

त्यानंतर बंडूने विचार केला की खंडूला तोच प्रश्न विचारून पहावा. त्याने खंडूला विचारले–"काय रे, खंडू ! मी तुला एक प्रश्न विचारतो. त्याचे उत्तर दे. माझ्या कुटुंबात चार जण आहेत. एक माझी बायको, दुसरा माझा मुलगा आणि तिसरी माझी मुलगी ! आतां चवथी व्यक्ती कोण बरे असावी ?"

"अरे, तूच !" खंडू म्हणाला.

"अरे खुळ्या ! चवथी व्यक्ती आपल्या गावाचे पाटील ·नाही का ?" बंडूने खंडूला बोळू समजून विचारले.



# बली व वामन



प्रल्हादाचा नातू बली हा फार शूर व पराक्रमी होता. त्याने भूलोक जिंकून चक्रवर्ती ही पदवी धारण केली. तरी त्याचे समाधान झाले नाही.

म्हणून त्याने स्वर्गावर स्वारी केली. त्याच्या समोर देवांचा टिकाव लागेना. त्याच्या समोर दोनच मार्ग मोकळे होते, एक होता बलीचे दास्यत्व मान्य करणे व दुसरा स्वर्ग सोडून निघून जाणे.





देव कोणताही निर्णय करू शकले नाहीत. त्यांनी विष्णूच्या दर्शनाला जाऊन त्यांच्यावर आलेल्या प्रसंगाचे वर्णन केले. बली जसा पराक्रमी होता तसा तो सत्यवचनी व थोर दानशूरही होता. विष्णूला ही गोष्ट माहीत होती. म्हणून बलीला जिंकण्यासाठी विष्णूने निराळीच युक्ती योजली



बलीने तीन पावले जमीन दान केली तेव्हां वामनाने एका पावलाने सर्व पृथ्वी व दुसऱ्या पावलाने सर्व आकाश व्यापून टाकले.



ते पाहून बली चकित झाला. वामनाने बलीला विचारले की तिसरे पाऊल कोठे ठेवू? तेव्हां बलीने आपल्या डोक्याकडे संकेत केला. लगेच वामनाने बलीच्या मस्तकावर पाऊल ठेवून त्याला पाताळात पाठवून दिले. अशा तऱ्हेने एका गिड्याच्या हाती बलीचा पराभव झाला.



बलीची पत्नी विद्यावती हिने वामनाला विनंती केली की त्याने बलीच्या बाबतीत इतका अन्याय करू नये. तेव्हां विष्णू म्हणाला की बलीची आज्ञा कधी भंग होणार नाही व मी स्वत: द्वारावर पाहरा देईन.



# ध्रुव

पहिला मनू स्वायंभू याला त्याची पत्नी अनंता हिच्या पोटी उत्तानपाद नावाचा मुलगा झाला. त्याला दोन बायका होत्या. मोठी राणी सुनीता हिच्या मुलाचे नाव ध्रुव होते. दुसरी राणी सुरुची हिच्या मुलाचे नाव उत्तम होते.

धाकटी राणी सुरुची ही उत्तानपाद राजाची लाडकी होती. म्हणून सुरुची जे करी ते प्रत्येक काम, बरे असो की वाईट, त्याला मान्य असे.

एकदा ध्रुव लाडिकपणाने आपल्या बापाच्या मांडीवर जाऊन बसला. ते पाहून सुरुची त्याला संतापून म्हणाली— "तुला आपल्या बाबांच्या मांडीवर बसण्याचा हक्क नाही. तो अधिकार फक्त माझा मुलगा उत्तम यालाच आहे. तुला जर आपल्या वडिलांच्या मांडीवर बसायचेच होते तर तू माझ्या पोटी जन्म घेतला पाहिजे होतास! आतां या जन्मी ते शक्य नाही. ऊठ, चालता हो!" असे म्हणत सुरुचीने ध्रुवाला उत्तानपादाच्या मांडीवरून खाली ओढले.

तो अन्याय पाहूनही उत्तानपादने सुरुचीला डोळे वटारूनही पाहिले नाही. तो काहीच बोलला नाही, गप्प राहिला.

ध्रुवाला ती गोष्ट अपमानाची वाटली. त्याला आपल्या सावत्र आईचा राग आला. त्याने आपल्या आईकडे जाऊन सावत्र आईने केलेल्या अपमानाची गोष्ट सांगितली, परंतु तिला तिच्या सवतीच्या विरुद्ध पतीला एका शब्दानेही सांगण्याची हिंमत झाली नाही.

ध्रुवाला कळले की पित्याच्या घरात त्याला स्वाभिमानाने राहणे शक्य नाही. म्हणून तो आपल्या आईचा निरोप घेऊन तपश्चर्या करण्यासाठी जंगलात निघून गेला.








तेथे तो सप्तर्षीना भेटला व तपश्चर्या कशी करावयाची हे त्याने विचारून घेतले. सप्तर्षीनी सुचविल्याप्रमाणे त्याने विष्णूचे ध्यान करून तपश्चर्या सुरू केली. विष्णूने त्याच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन त्याला अनेक वर दिले.

उत्तानपादाला कळले की त्याचा मुलगा ध्रुव विष्णूला प्रसन्न करून व त्याच्याकडून अनेक वर मिळवून परतला आहे. तेव्हां तो त्याला प्रेमाने भेटला व त्याने त्याचा राज्याभिषेक केला आणि स्वतः तपश्चर्या करण्यासाठी वान प्रस्थाश्रमात प्रवेश केला. अशातऱ्हेने ध्रुव पित्याच्या गादीला वारस मान्य झाला.

ध्रुवने अनेक लग्ने केली व त्याला अनेक पुत्र झाले. त्याने आपल्या पित्याचा वंश वाढविला.

ध्रुवच्या राण्यात धन्या नावाची एक राणी होती. तिच्या पोटी जन्मलेल्या राजपुत्राचे नाव शिष्ट असे होते. दुसरी राणी शिशुमार राजाची मुलगी भ्रमी ही होती. तिला कल्प व वत्सर नावाचे दोन मुलगे झाले. वायुपुत्री इला सुद्धा ध्रुवाची एक राणी होती. तिच्या पोटी उत्कल जन्मला. शंभुवा नामक एका राणीच्या पोटी ध्रुवाला भव्य व श्लिष्टी नावाचे दोन मुलगे झाले. या सर्वां व्यतिरिक्त ध्रुवाला आणखी एक विचित्र बायको होती. ती म्हणजे त्याची सावली. तिला राजाने नारी होण्यास आज्ञा केली. तिने नारी रूप घेऊन ध्रुवाशी विवाह केला आणि ध्रुवाला तिच्या पोटी पांच मुले झाली.

असेही सांगतात की ध्रुव पूर्वजन्मी एक ब्राह्मण होता. त्यावेळी त्याची एका राजाशी मैत्री होती. म्हणून राज्य करण्याची इच्छा त्याच्या मनात फार होती. म्हणून तो या जन्मी क्षत्रिय कुळात जन्मला आणि राज्य करू लागला.

त्यानंतर विष्णूच्या अनुग्रहाने तो ध्रुव नक्षत्र झाला. ध्रुव याचा अर्थ स्थिर न हलणारा. आजही उत्तर दिशेला ध्रुवाचे दर्शन आपल्याला घडते आहे.



# प्रश्नातली गोम

शिवगंगेच्या राजाच्या दरबारात एकदा विद्यासागर नावाच्या एका विद्वान पंडिताने प्रवेश करून आव्हान केले की कोणी पंडित त्याला जिंकेल तर तो आपले स्वर्णकंकण काढून त्याला इनाम देईल. परंतु सर्व दरबारी पंडितांनी त्याच्या समोर हार मानली. तरी दरबारी धाडस करून म्हणाला–"पंडितवर्य ! मी आपल्याला पांच प्रश्न विचारतो. त्याची उत्तरे तुम्ही चुकीची द्याची. बरोबर उत्तर दिलेत तर तुम्ही हारलात व मी जिकलो, असे होईल !"

विद्यासागरांनी ती अट मान्य केली व उत्तरे द्यायला तयार झाले. "तुम्ही परदेशी आहां ना ?" या प्रश्नाचे उत्तर "नाही, मी येथलाच रहिवाशी आहे," असे पंडितवर्यांनि दिले. "तुम्ही आतां स्वदेशीच आहां तर ?" पंडितवर्य म्हणाले–"होय !" "आपल्याजवळ स्वर्णकंकण आहे ना ?" विचारता "नाही !" उत्तर दिले. "आमच्या राजाचे नाव महीपाल आहे ना ?" उत्तर "नाही !"

तेव्हां विदूषकाने काहीतरी विसरल्याचा अभिनय करून विचारले–"आतांपर्यंत मी किती प्रश्न विचारले !" विद्यासागर म्हणाले–"चार ! पांचवां विचारा ?"

"माझ्या पांचव्या प्रश्नाचे बरोबर उत्तर देऊन हारलात !" विदूषक म्हणाला.











# मंत्रवलेली लिंबे

चिन देशातल्या पेकिंग शहरात घडलेली ही गोष्ट आहे. चिंग नावाचा एक शिंपी होता. त्याचा बाप व आजा सुद्धा शिंप्याचा धंदाच करीत असत. चिंगचा बाप वारला तेव्हां त्याने मुलासाठी मागे फक्त एकच मशीन ठेवले होते. चिंग आपल्या कामात हुशार होता. त्याच्या बापासारखाच तो आपल्या गिऱ्हाइकांना खूष ठेवी. त्याने लौकरच जरूर तेवढे पैसे जमवून आणखी चार मशीने विकत घेतली आणि आणखी चार जणांना अन्नाला लावले.

परंतु चिंगच्या भरभराटीबरोबर त्याच गल्लीत शिवणकाम करून उदरनिर्वाह करणाऱ्या दहा जणांच्या पोटावर पाय आला. परंतु ते स्वतःच त्याबद्दल जबाबदार होते. ते कधी वेळेवर कपडे शिवून देत नसत. म्हणून त्यांचे गिऱ्हाइक चिंगकडे कपडे शिवायला टाकू लागले. चिंग त्यांना खूष ठेवी. अशातऱ्हेने इतर दुकाने ओस पडू लागली.

चिंगमुळे ज्यांचा धंदा बसला त्या सर्वांनी त्याचा सर्वनाश करण्यासाठी एक योजना योजली. त्यांच्यापैकी वांग नावाचा एक शिंपी होता. त्याने चिंगवर मंत्र टाकून त्याचा सर्वनाश करण्याचा सल्ला दिला. त्यानंतर सर्व गिऱ्हाइकांना इतर शिंप्याकडे जावेच लागले. असा विचार करून एका भूतवैद्याकडे गेले. परंतु भूतवैद्याच्या दाराला कुलूप लावलेले दिसले. कारण तो कोठेतरी परगावी निघून गेला होता. म्हणून सर्व शिंपी निराश होऊन परतले.

दुसऱ्या दिवशी वांगच्या दुकानात एक भूतवैद्यासारखा माणूस आला. त्याने विचारले—"काल कोणी माझ्या गुरूकडे चौकशीसाठी गेल्याचे ऐकल्यावरून मी

परगावी कोणाच्या तरी मानेवरचे भूत उतरवायला गेले होते, म्हणून घरी नव्हते. बरं, तर सांगा काय काम होतं? त्या माणसाला पाहून व त्याचा वेष पाहून वांगला तो भूतवैद्यच असल्याची खात्री झाली. वांगने सर्व गोष्टी त्याला समजावून सांगितल्या.

तेव्हां भूतवैद्याच्या शिष्याने विचारले—"परंतु भुताला बोलवायचे म्हणजे थोडा फार खर्च होणार. तुम्ही तेवढा खर्च करायला तयार आहां का?"

"आम्ही सर्व मिळून दहाजण आहों. जो खर्च होईल तो आपसात वांटून घेऊ." वांग म्हणाला.

"मी तुम्हांला एक लिंबू मंत्रवून देईन. ते फोडून त्यात एक सोन्याची मोहोर ठेवून ती चिंगच्या दुकानात ठेवा. तेव्हां तुमची पीडा टळेल." असे सांगून भूतवैद्याच्या शिष्याने वांगच्या हातात एक लिंबू मंत्रवून ठेवले.

वांगच्या जवळ सोन्याचं नाणं नव्हतं. तरी त्याने त्याच्या जवळ जी थोडी फार चीजवस्तु होती ती विकून एक सोन्याचे नाणे आणून ते लिंबाच्या आत खुपसून भरले आणि चिंगच्या दुकानात गेला. त्याला बोलण्यात गुंतवून त्याच्या नजरे-



आड त्याने ते लिंबू हळूच एकाच जागी ठेवून दिले आणि घरी परतला.

मध्यंतरी भूतवैद्याचा शिष्य इतर शिंप्यांकडे गेला व त्यांना देखील एकेक लिंबू देत गेला. त्यांना देखील त्याने एक सोन्याचे नाणे लिंबात ठेवून चिंगच्या दुकानात ठेवायला सांगितले. सर्वांनी तसे केले.

दिवसामागून दिवस गेले. परंतु चिंगचा सर्वनाश होण्याऐवजी त्याच्या धंद्यात बरकतच होत गेली. त्याने आणखी दहा मशीने विकत घेऊन धंदा वाढविला.

ते पाहून सर्व शिंपी हताश झाले. त्यांनी भूतवैद्याला भेटून विचारले—"काय हो, तुमचा शिष्य राहातो कोठे?"

भूतवैद्याने चकित होऊन विचारले– "माझा शिष्य? कोणी नाही बुवा! मी एकटाच हा धंदा करतो."

वांग बुचकळ्यात पडला. मध्यंतरी चिंगने आपल्या पेठेतल्या सर्व शिंप्यांना आपलं नवीन दुकान पहायला निमंत्रण दिले. त्याला बरकत होण्याचे कारण कळावे म्हणून सर्व शिंपी दुकानात गेले. चिंगने सर्वांना मोठी मेजवानी दिली.

वांग स्वतःला आवरू शकला नाही. त्याने विचारले–"मित्रा चिंग! तुझ्याकडे इतके पैसे एकाएकी कोठून आले रे?"

"कोणत्या तरी भाग्य देवतेने माझ्या दुकानात दहा लिंबे व त्यांत एकेक सोन्याचे नाणे आणून ठेवले. मी लिंबाचे सरबत करून प्यालो व माझी तब्येत जास्तच सुधारली. सोन्याची नाणी खर्च करून मी दहा मशीने विकत घेतली." चिंग म्हणाला.

सर्व शिंपी रडक्या आवाजात म्हणाले– ती सोन्याची नाणी आमचीच आहेत. आम्ही तुझं दिवाळे निघावे म्हणून भूत-वै [illegible] प्रत्येक लिंबात सोन्याचे नाणे ठेवण्यासाठी आपापले सर्वस्व विकून एकेक सोन्याचे नाणे विकत घेतले, तुझे दिवाळे काढविण्यासाठी स्वतःचे काढले." चिंग हसून म्हणाला– "अस्सं होय? ते मला माहीत नव्हते."

तेव्हां सर्व शिंपी रडू लागले. चिंगने त्यांची समजूत घातली–"मी विकत घेतलेल्या नव्या मशिनांवर काम करायला मला दहा शिंपी हवे आहेत. तुम्ही आलात तर मला आनंदच होईल. तुम्ही जेवढे काम कराल तेवढी मजुरी तुम्हांला मिळेल."

त्यानंतर सर्व शिंपी त्याच्याकडे नोकरी करू लागले.

ज्या दिवशी सर्व शिंप्यांनी मिळून चिंगचा सर्वनाश करण्यासाठी कट केला त्या दिवशी चिंगने आड उभा राहून सर्व ऐकले होते. भूतवैद्याचे सोंग करून तोच सर्वांकडे गेला होता आणि त्यांचा कट फसवायला तोच कारण झाला होता. परंतु त्याने ती गोष्ट आयुष्यभर गुप्तच ठेवली.



# लग्न—देवळात की घरी?

गोविंदरावांच्या शेवटच्या मुलीचे लग्न ठरले. सर्वांच्या मते ते लग्न देवळात व्हावे असे होते. परंतु कोणत्या देवळात व्हावे, याविषयी एकमत होत नव्हते. गोविंदरावांचे म्हणणे होते की गावातल्या बालाजीच्या देवळातच हा लग्न समारंभ करणे बरोबर होईल. त्यांचा मोठा मुलगा मारुतीचा भक्त होता. मारुतीच्या देवळात हा लग्नसोहळा करणे उचित होईल असे त्याचे मत होते. गोविंदरावांच्या मोठ्या मुलीने सर्व देवांच्या आधी ज्याचे नामस्मरण करावे लागते त्या गणेशाच्या देवळातच लग्नाच्या बेत ठेवण्याचा सल्ला दिला.

हा वादविवाद ऐकून नवऱ्या मुलीने सल्ला दिला की लग्नाचा मुहूर्त गुरुजींनी ठरविला आहे, तर त्यांच्या सल्लयाप्रमाणे लग्न कोठे करावे हे ठरविणे बरोबर होईल.

सर्वांचे मत ऐकून घेतल्यावर गुरुजी म्हणाले–"कोणत्याही देवळात लग्न ठेवणे उचित नाही, बालाजीला दोन बायका आहेत, तर मारुती ब्रह्मचारीच आहे! गणपतीच्या बाबतीत दुमत आहे. कोणी त्याला ब्रह्मचारी मानतात तर काही लोकांच्या मते त्याला दोन बायका आहेत. राम हा सर्वांत चांगला आहे, परंतु तुम्हांला माहीतच आहे की त्याच्या पत्नीला त्याच्याशी लग्न केल्याची फळे आयुष्यभर कशी चाखावी लागली ती! म्हणून घरीच लग्न करणे शुभ होईल.





# थोरांचे थोरपण

विशाल देशाच्या रूपवर नामक गावी म्हणे, संगीत शास्त्राचे तज्ज्ञ, मोठमोठे कवी, नट, चित्रकार व शिल्पशास्त्र पारंगत असे थोरपुरुष रहात असत. ते आपली सर्व मिळकत लोकांसाठी खर्च करीत.

विशाल देशाचा राजा विजयसेन याने ती गोष्ट ऐकून त्या गांवी सर्वात थोरपुरुष कोण आहे, याची माहिती काढून आणण्यासाठी आपला मंत्री, सेनापती, पुरोहित, खजिनदार आणि राजधानीतल्या काही प्रमुख नागरिकांना पाठविले. परंतु कोणीच सर्वात थोरपुरुष कोण आहे, हे सांगू शकला नाही.

त्याच सुमारास चिरंजीवी नावाचा एक थोर ज्ञानी पुरुष विशाल देशात आला. राजाने चिरंजीवीला आपल्या राजवाड्यात बोलावून त्याच्यासमोर तोच प्रश्न ठेवला.

चिरंजीवीने, रूपवर गावात सर्व नागरिकात थोर पुरुष कोण या गोष्टीची चौकशी करून येण्याचे मान्य केले व निघाला. गावाच्या वेशीवरच चिरंजीवीला माधव नावाची एक व्यक्ती भेटली. त्याने विचारले—"तुम्ही आमच्या गावात सर्वात थोर व्यक्ती कोण, याचा शोध लावायला आला आहां का? मी थोर व्यक्ती दाखवीन. परंतु प्रत्येक थोर व्यक्तीमागे मला तुम्ही एक सोन्याची मोहोर दिली पाहिजे. मान्य असेल तर माझ्याबरोबर चला."

राजाच्या तोंडी चिरंजीवीला माधवच्या या अटी विषयी पूर्वीच कळले होते. म्हणून त्याला आश्चर्य वाटले नाही. माधवने पहिल्याच दिवशी चिरंजीवीची साठ थोर व्यक्तींची ओळख करून दिली आणि साठ मोहोरा मिळविल्या.

चिरंजीवीने ज्या ज्या थोर पुरुषाची ओळख करून घेतली. त्या त्या व्यक्तीने स्वत:च सांगितले की देशातल्या अनेक

पाहून त्यांनी त्यालोकांना शक्य ती सर्व मदत केली होती.

त्यानंतर माधव म्हणाला—"तुम्हांला उद्यां मी आणखी काही जणांची ओळख करून देईन."

तेव्हां चिरंजीवी म्हणाला—"इतक्या व्यक्तींच्या गावात त्यांची नुसती ओळख थोर करून देण्यासाठी एक मोहोर घेणाऱ्या तुमच्या सारख्यांना पाहूनही मला थोडे आश्चर्यच वाटले!"

ते ऐकून माधवने सर्व मोहोरा परत केल्या व म्हणाला—"मला वाटले होते की तुम्ही ह्या मोहोरा राजीखुशीने देतां आहां. तुम्हांला त्याबद्दल वाईट वाटत असेल तर मला या पैशाची गरज नाही."

चिरंजीव चकित होऊन म्हणाला—"हेदेखील विचित्रच! परंतु तुम्हांला इतका धनलोभ कां हे मला कळत नाही?"

"ते तुम्हांला काय करायचे? मी खरं खरं काय ते सांगितलं तर तुम्ही ती समस्या सोडवू शकाल का?" माधवने विचारले.

"हो, मी सोडवू शकेन!" चिरंजीवी म्हणाला.

"तरमग, चला माझ्याबरोबर!" असे सांगून माधव चिरंजीवीला गावाबाहेरच्या



असलेल्याची दु:स्थिती त्याने चिरंजीवीला दाखविली.

"हे लोक कोण?" चिरंजीवीने माधवला विचारले.

माधव सांगू लागला—"पंचवीस वर्षापासून हे गांव वाळीत टाकल्या सारखे आहे. त्यावेळी एक संन्यासी आमच्या गावात आले. गावकऱ्यांनी त्यांचा अपमान केला. म्हणून त्या संन्याश्याने त्यांना शाप दिला की त्यांना निकृष्ट जीवन घालवावे लागेल व त्यांना जो कोणी मदत करील त्याचा सर्वनाश होईल. म्हणून गावकरी घाबरून त्या संन्याश्याच्या पायां पडले व

सुटका मिळण्याचा मार्गही सांगून जा.' तेव्हां संन्यासी म्हणाला–'जर कोणी आपले गांव न सोडतां या गावांतील प्रत्येक व्यक्तीमागे मला एक हजार सुवर्णमुद्रा देईल तर या गावातल्या लोकांना पुन्हा सुखी जीवन चालविण्यास संधी मिळेल.' आतां तुम्हीच सांगा, या सर्व गावाचा उद्धार करायला किती सुवर्णमुद्रा मिळवाव्या लागतील?"

"परंतु यांचा उद्धार केल्यावर तुझा सर्वनाश होईल. हे तुला माहीत नाही का?" चिरंजीवीने विचारले.

"म्हणूनच तर मी लग्न केले नाही. रात्री कोठेतरी झाडाखाली पडून राहतो. माझा सर्वनाश व्हायला माझ्याजवळ आहेच काय? मी आजपर्यंत जी मिळकत झाली तिच्यामुळे पांच जणांचा उद्धार करू शकलो. आणखी किती जणांना सुखी जीवनाचा लाभ मी देऊ शकेन, हे पहावयाचे!" माधव म्हणाला.

त्यानंतर चिरंजीवी विजयसेन राजाकडे गेला आणि तो जे प्रत्यक्ष पाहून आला ते

जितक्या धनाची आवश्यकता आहे, तेवढ पाठवून द्यावे. माझ्या मते त्या गावांत सर्वांत थोर व्यक्ती तोच आहे.

"तो दीनदरिद्र लोकांना मदत करतो, म्हणून तो सर्वांत थोर आहे का?" राजाने विचारले.

"नाही, थोर पुरुषाचे थोरपण निराळेच असते, जो आपली थोरवी आपल्या तोंडाने सांगत नाही, व दुसऱ्याकरवी ती कळते, तोच खरा थोर पुरुष. माधव सर्व गावातल्या चोर व्यक्तींचा परिचय करून देऊन एका उदात्त कार्यासाठी अविरत श्रम करीत आहे, परंतु त्याचे थोरपण ओळखू न शकणारे गांवकरी आणखी किती गुणी असेल तरी माधवहून थोर कसे काय होऊ शकतील?" चिरंजीवीने समजावून सांगितले.

चिरंजीवी जे म्हणाला, ते राजाला पटले व त्याच्या सल्ल्याप्रमाणे राजाने आपल्या कर्तव्याचे पालन केले.





# असभ्य कोण

फार प्राचीन काळी इजिप्त देशावर मेहेर नामक एका सुलतानाचे राज्य होते. त्याच्या मनात आपले राज्य वाढविण्याची महत्वाकांक्षा होती. त्याने शेजारच्या राज्यांवर स्वारी करून त्यांच्याकडून खंडणी वसूल करण्याचे व एक शाहनशाह होण्याचे ठरविले. त्याने एक फार मोठे सैन्य उभे केले व दिग्विजयाला निघाला.

त्याच्या शेजारच्या राज्यांच्या प्रमुखांनी साहस करून त्याला तोंड दिले. परंतु समुद्राच्या लाटासारख्या येणाऱ्या मेहेरच्या फौजांसमोर त्यांना टिकाव धरणे अशक्य होते. त्यांनी शूरासारखे युद्ध करून वीरगती मिळविली. काही इतर राजांनी वैर करणे आत्मघातकीपणाचे होईल म्हणून त्यांनी खंडणी द्यायचे मान्य करून त्याच्याशी संधी केली. मेहेरच्या मनातली राज्यलिप्सा वाढतच गेली. त्याने जी राज्ये जिंकली होती त्यांचे खजिने लुटले आणि नवे सैन्य उभे करून नव्या राज्यांवर स्वारी करू लागला. अशातऱ्हेने त्याच्या राज्यलिप्सेला बळी झालेला शिकांग नावाचा देश होता.

शिकांग देश हा एक डोंगराळ मुलूख होता. त्या देशात जंगले देखील अनेक होती. घमेंडखोर मेहेरने त्या देशावरही स्वारी केली. शिकांग देशाचे रहिवासी रानटी जातीचे, आपल्याकडील भिल्लजाती-सारखे होते. ते कोणत्यातरी झाडाआड किंवा टेकाडाआड लपून गनिमी काव्याने युद्ध करीत. मेहेरच्या सैन्यावर विषारी बाणांची वृष्टी करून त्यांचा संहार करीत. रात्री मेहेरचे सैन्य बेफिकीर होऊन झोपले असतां अचानक हल्ला करून शिकांग सैनिक त्यांची कत्तल करून त्यांच्या प्रेतांचे ढीगरचून ठेवीत आणि पळून जात.










म्हणून मुख्य सेनापतीने सुलतानाला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला—"जहांपनाह! शिकांगवर स्वारीचा विचार सोडून परत जाण्यातच आपले सर्वांचे हित आहे. जे सैनिक वांचले आहेत त्या सर्वांचे मत स्वदेशी परत जावे असेच आहे." परंतु हट्टी सुलतानाने सेनापतीच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. तरी सेनापती साहस करून म्हणाला—"जहांपनाह! आपण शाहंशाह आहां. नीलनदीच्या काठावरच्या सर्व राज्यांवर आपला अधिकार झाला आहे. तेव्हां या पुढे जास्त जाणे फायद्याचे नाही, आपण जिंकलेल्या देशांत शांतता व सुव्यवस्था ठेवण्यासाठी काय तो उपाय करावा."

"आपण शिकांग राज्य काबीज केलेच पाहिजे. इतकी राज्ये जिंकल्यानंतर एका सामान्य डोंगराळ प्रदेशातल्या राजासमोर का मी मान तुकविणार?"

मेहेरच्या तोंडातून निघालेला शब्द म्हणजे काळघा दगडावरची रेघ. त्याने अलोट धन खर्च करून नवीन सैन्य उभे केले. त्या डोंगरी राजाची घमेंड चूर करण्याचा हट्ट त्याच्या मनात होता. खडक, मुरमाड जमीन आणि कांटेरी झुडपे. अशा डोंगराळ प्रदेशावर अधिकार झाल्याने त्याला काय मिळणार होते?

परंतु हट्टाला पेटून त्याने आपल्या सैनिकांना प्रोत्साहन देत म्हटले—"तुमच्या पैकी जो कोणी शिकांगचा राजा बेट्सू याला जिवंत किंवा मृत अवस्थेत धरून आणून माझ्यासमोर उभा करील त्याला मी एक हजार मोहरा इनाम देईन."

ते ऐकून सुलतानाच्या सैनिकांना उत्साह चढला. त्यांनी जंगले पायाखाली तुडविली व जो कोणी जंगली जातीचा वीर समोर येई त्याची कत्तल केली. परंतु प्रत्येक रानटी जातीचा माणूस मेहेरच्या दहा शिपायांना तरी लोळवून मगच शत्रूच्या हाती मरे. परंतु सुलतानाच्या असंख्य सैनिकांसमोर मूठभर रानटी लोकांना शिरकाव करून युद्ध करणे शक्य नव्हते.

म्हणून प्रयत्न करून पाहिला, परंतु मेहेर संधीला तयार होणार नाही, हे त्याला चांगले माहीत होते. शिवाय संधीचा हात पुढे करतांच तो आपल्याला बंदी करील व ठार करील, अशी शंकाही त्याला वाटत होती. अशा परिस्थितीत युद्ध करून वीरगती प्राप्त करणे जास्त चांगले असे त्याने ठरविले. तसे ठरवून आपल्या जातीच्या सैन्याची जुळवाजुळव करून त्याने दोन डोंगरामधील एका खिंडीत इजिप्तच्या सैन्याशी निकराचे युद्ध केले.

या युद्धात मेहेरला जय मिळाला. बेट्सूचा एक देखील सैनिक जिवंत राहिला नाही. परंतु मेहेरचे सहस्रावधी शूर सैनिक धराशायी झाले.

युद्ध संपतांच मेहेरने विचारले—"बेट्सू कोठे आहे?"

त्याचा एक सेनापती म्हणाला—"जहांपनाह, त्याचा जखमी मृत देह आपल्या सैनिकांच्या मृतदेहांच्या राशीबरोबर पडला आहे."

तो स्वतःच्या डोळ्यांनी पाहण्याच्या आशेने मेहेर निघाला. तो पोचला तेव्हा त्याला एक दृश्य दिसले—तेथे एक काळा कभिन्न बलदंड देहाचा माणूस त्या सहस्रावधी मृतदेहांच्या मध्यभागी उभा राहून



चारी बाजूला पहात काहीतरी शोधीत होता. त्याला पाहतांच मेहेरने विचारले—"तू कोण रे?"

मेहेरच्या सेनापतीने उत्तर दिले—"हा कोणीतरी नरमांस भक्षी दिसतो आहे. प्रेतांचे लचके तोडून खायला आलेला दिसतो आहे."

सेनापतीचे म्हणणे बरोबर असावे. कारण आफ्रिकेत अशा नरमांसभक्षी लोकांच्या कित्येक जाती होत्या व आहेत ही.

मेहेरने त्या नरमांसभक्षी माणसाला विचारले—"कायरे, तुझी आज मेजवानी आहे नाहीं का? किती मेलेली माणसं पडली आहेत! तू वाटेल ते प्रेत उचलून

घे! परंतु तू चारी बाजूला कशासाठी पाहतो आहेस?"

"या सर्वांना खाण्यासाठी कोणीतरी यांचा मुडदा पाडला आहे, परंतु मला तर एकाच प्रेताची गरज आहे. तरी हे मुडदे पाडणाराची परवानगी हवी न? म्हणून मी हे मुडदे पाडणाराची वाट पाहतो आहे!" तो काळा कभिन्न माणूस म्हणाला.

तेव्हां मेहेर मोठ्या गर्वोक्तीने म्हणाला– "मीच तर हे सर्व मुडदे पाडले, परंतु यांना खाण्यासाठी नाही!"

"जर खाण्यासाठी नाही, तर व्यर्थ इतक्या लोकांचा वध तू कशासाठी केलास?" त्या काळ्या व्यक्तीने निर्भयपणे विचारले.

तेव्हां मेहरचा सेनापती म्हणाला–"हा कोणीतरी जंगली असभ्य माणूस दिसतो आहे! याला सभ्यतेच्या गोष्टी सांगणे व्यर्थ आहे!"

इतक्यात बादशाहच्या पाठीमागून कोणी तरी हसल्याचा आवाज ऐकू आला. मेहेरने वळून पाहिले, त्याला राहणारा एक फकीर उभा असलेला दिसला.

मेहेरने चकित होऊन विचारले–"पीर साहेब! आपण हंसता आहां?"

"होय सुलतान! तू ज्याला असभ्य जंगली म्हणतोस तो आपली भूक भागविण्यासाठी फक्त एकच माणूस ठार करतो. परंतु विनाकारण कोणाचा गळा कापीत नाही. या उलट तू? आपले साम्राज्य पसरावे म्हणून युद्ध करून निष्कारण लक्षावधी माणसांची शिकार करीत फिरतो आहेस! मी म्हणतो ते बरोबर आहे की नाही ते विचार करून पहा! तूच पहा, तुम्हां दोघांपैकी जास्त जंगली व असभ्य कोण?" फकीर ठासून म्हणाला.

फकीर म्हणाला त्याचा अर्थ न कळण्या– इतका मेहेर मूर्ख नव्हता. लाजेने त्याची मान खाली झाली. तत्काळ त्याच्या मनात पालट झाला. त्याने लगेच ठरविले– "आज पासून मी तलवार हातात धरणार नाही!"






शुक म्हणाला ते ऐकून व्यास म्हणाले– "बाबा रे, मी शंभर वर्षे तपश्चर्या केल्यावर तू माझ्या पोटी जन्माला आलास. म्हणून मी सांगतो आहे त्याविरुद्ध काही हट्ट करू नकोस. तुला तारुण्य आले आहे, तेव्हां आतां लग्न करून सुखाने संसार कर. मी कोणत्या तरी राजाच्या दर्शनाला जाऊन पैशाची व्यवस्था करतो. तुला कोणत्याही गोष्टीची उणीव भासणार नाही."

"लग्न केल्याने माणूस सुखी होतो हे कसे मानावयाचे? लग्न करून घेऊन नाना प्रकारच्या संकटांना तोंड देत संसारकूपात खितपत पडून बाहेर येऊ न शकल्यामुळे दुःखी कष्टी झालेल्यांना मी पाहतोच आहे! बेडचा पायात पडल्या तर त्यातूनही सुटका मिळते, परंतु स्त्रीच्या प्रेमपाशातून मुक्ती कधीच मिळत नाही. अशा सुखाचे स्वतः होऊन कसे वरण करू?" शुक म्हणाला.

"मनावर ताबा ठेवून ते निर्मल ठेवणे हाच मुक्तीचा मार्ग होय! इतर बंधनांचा मनावर मग काय परिणाम होणार? न्यायाने धन संपादन करून, खोटे बोलल्याशिवाय शुद्ध मन ठेवून मुक्त हस्ताने दानधर्म करीत राहल्यास गृहस्थाला मुक्ती मिळते रे, बाळा! गृहस्थाश्रमात राहून अतिथि सत्कार करून, वानप्रस्थाश्रमवासियांस मदत करीत राहल्यास आणि सर्व कर्तव्यकर्मांचे पालन केल्यास मुक्ती मिळते. म्हणूनच नाही का वसिष्ठादी मुनिवर्यांनी गृहस्थाश्रमात प्रवेश



केला? वेदोक्त धर्माचे पालन करावयाचे झाल्यास गृहस्थाश्रमाशिवाय दुसरा मार्ग नाही. कारण माणसाची पंचेंद्रिये ही फार बलशाली असतात. अविवाहित माणसाला ती वाटेल तशी नाचवीत असतात, मग तो किती थोर विद्वान असो की मूर्खअसो! पंचेंद्रियांना काबूत ठेवण्यासाठी लग्न करणे आवश्यक आहे. वार्धक्य आले की वान-प्रस्थाश्रमात जाऊन तपश्चर्या करावी." व्यासांनी शुकाला उपदेश केला.

व्यासांचा तर्क शुकाला मान्य नव्हता. संसारसुखाचे दोष दाखवून तो म्हणाला,–

"कुटुंब व संसार यांचे बंधन म्हणजे एक फांशी आहे. माणूस संसार थाटतो. [illegible] इंद्रासमोर त्याला पदोपदी अपमान सहन करावा लागतो. धन संपादन करणे तरी सोपे आहे का? त्रिलोकांवर राज्य करणाऱ्या इंद्रापेक्षां संन्यासी जास्त सुखी असतो. ब्रह्मा, विष्णू व महेश हे तरी सुखी आहेत का? कोणत्या राक्षसाला कसे ठार करावयाचे हीच काळजी नित्य त्यांना असते. या जगात फक्त गरिबालाच सुख नसते असे नसून श्रीमंतालाही सुख नसते. मला ज्ञानाश्रित एखादा मार्ग असेल सांगा."

शुक म्हणाला ते ऐकून व्यासांची खात्री झाली की मुलाचे मन वैराग्याकडे प्रवृत्त झाले आहे. म्हणून ते म्हणाले–"मुला मी एके काळी मुक्ती देणाऱ्या देवी भागवताची रचना केली होती. ते तू वाच, म्हणजे तुला ज्ञानप्राप्ती होऊ शकेल."

नंतर व्यास म्हणाले,–"पुढे विष्णू शिशु-रूप धारण वटपत्रावर विचार करू लागला– 'मी येथे शिशुरूपात कां बरे आहे? माझी सृष्टी कोणी केली? मला हे कसे कळणार?' ते पाहून त्या बालकावर दया करून देवीने अर्धाच श्लोक म्हटला व म्हणाली–"हेच सर्व काही आहे. हे समजावून घेतले तर मला ओळखल्यासारखेच, समज."

विष्णूने तो अर्धा श्लोक ऐकला खरा, त्याला त्याचा अर्थ कळेना. तो विचार करू [illegible] कोण? ती स्त्री आहे की पुरुष? की यांपैकी एकही नाही?"

नंतर तो अर्धा श्लोकच म्हणू लागला. तेव्हां महादेवीची चतुर्भुज मूर्ती शंख, चक्र, गदा आदि धारण करून प्रगट झाली. तिने सुवर्णवस्त्र परिधान केले होते. ती मंदहास्य करीत होती.

देवीचे ते अद्भुत रूप पाहून विष्णू अवाक पहात राहिला. तेव्हां देवी म्हणाली–"मायेच्या पडद्यामुळे तू मला विसरला आहेस. तू सगुण आहेस. मी सत्व शक्ती आहे. तुझ्या नाभिकमलातून ब्रह्मदेव जन्मला. तो रजोगुण प्राप्त करून सर्व लोकांची सृष्टी करील. त्या सृष्टीची स्थिती म्हणजे पालन करणे तुझे काम राहील. त्या ब्रह्मदेवाच्या भुवयांच्या मध्यभागातून रुद्र जन्माला येईल. तो घोर तपश्चर्या करून तामस गुणी होईल व प्रलय कालात ब्रह्मदेवाने निर्मिलेल्या सृष्टीचा नाश करील. तू माझ्या मदतीने विश्वाचे पालन पोषण करणार आहेस. म्हणून तू सत्व शक्तीच्या स्वामिनीला, म्हणजे मला ग्रहण कर. मी सर्वदा तुझ्या वक्षस्थलावर वास करीन."

तेव्हां विष्णूने विचारले–"मला अर्धाच श्लोक कसा काय ऐकू आला?"



"तू मला सगुण रूपात पहात आहेस. तुला अर्धा श्लोक म्हणून दाखविणारी देवी निर्गुण स्वरूपिणी पराशक्ती आहे. तुझ्यावर कृपा करून पराशक्तीने तुला हा मंत्र सांगितला. तू याचा जप करीत राहिलास तर तुझे शुभ होईल."

विष्णूने त्याच मंत्रबळाने मधुकैटभांचा वध केला आणि त्यांना भिऊन त्याच्याकडे आश्रय मागायला आलेल्या ब्रह्मदेवाला त्या मंत्राचा उपदेश केला. ब्रह्मदेवाने नारदाला आणि नारदाने व्यासांना त्या मंत्राचा उपदेश केला.

व्यासांनी शुकदेवाला त्या मंत्राचा उप-देश करून म्हटले–"मी याचीच रचना



अनेक संहिता रूपे करून सविस्तर त्याचे वर्णन केले आहे."

त्यानंतर शुक त्या मंत्राचा जप करीत आश्रमातच राहू लागला. परंतु शुक चिंतित झालेला पाहून व्यास म्हणाले–"तू माझा मुलगा असून ज्ञानप्राप्ती कशी होईल याची चिंता कां करतो आहेस? मी सांगितले त्यावर तुझा विश्वास बसत नसेल तर मिथिला नगरीत ज्ञानी राजा जनक आहे. तू त्यांच्याकडे जाऊन आपल्या शंकांचे निवारण करून घे."

"राजशास्त्र आणि ज्ञान यांचा परस्पर संबंध कसा काय? राज्यशासन तर सर्व पापांचे मूळ कारण होय! असे असतां

हे पाहणार आहे." शुक म्हणाला.

"बाळा! तू जाऊन ये. माझे पंचप्राण तुझ्या वर नजर ठेवतील. तू सर्व शंकांचे निवारण करून घेऊन लौकर परत ये." असे सांगून व्यासांनी शुकाला निरोप दिला.

**मिथिलेला शुक**

शुक आपल्या पित्याचा आशीर्वाद घेऊन निघाला. वाटेत कित्येक देश, वन, पर्वत पुण्यक्षेत्रे व मुनिआश्रम पहात मेरुपर्वत प्रदेश दोन वर्षे प्रवास करून पार केला व मिथिलेला आला. तेथे त्याला विचित्र दृश्यें दिसली. एका द्वारपालकाने त्याला विचारले–"तू कोण रे, कोणत्या कामासाठी आला आहेस?"

शुक काहीच उत्तर न देतां फाटकाबाहेर बसून राहिला. तेव्हां द्वारपालक पुन्हां म्हणाला–"तुम्हांला असे वाटलं का की मौन राहल्याने परवानगीशिवाय आत जाणं शक्यहोईल? तुम्हांला पाहून असे वाटते की तुम्ही वेदाध्ययन करणारे ब्राह्मण आहांत. तुम्ही कोण, तुमचा कुळवंश काय आणि काय काम आहे हे सांगितल्या शिवाय आत जाता यायचे नाही."

तेव्हां शुक म्हणाला–"मी ज्या कामासाठी राजाच्या दर्शनाला आलो होतो ते काम तू दारातच पुरे केले आहेस! मी एवढे

कष्ट सहन करून मेरुपर्वत व हिमालय ओलांडून-राजाच्या दर्शनाच्या आशेने आलो; ही माझी चूक झाली. सामान्यपणे लोक धनलोभाने देशोदेशी हिंडतात. परंतु मी धनलोभाने आलो नव्हतो, पूर्वजन्माचे कर्मफल म्हणून कित्येक देश फिरत येथवर आलो, हे माझे प्रारब्धच, नाहीतर काय? परंतु याचा काही परिणाम आहे का? माझ्या श्रमाचे फळ मला हेच मिळाले की एका द्वारपालकाने मला आत प्रवेश करायला मज्जाव केला."

ते सर्व ऐकल्यावर द्वारपालकाला वाटले की हा कोणी तरी थोर पुरुष असावा. त्याने शुकाजवळ जाऊन नम्रपणे म्हटले–"मी आपल्याला अडविले, या बद्दल क्षमा करून आत प्रवेश करा!"

"तू आपल्या कर्तव्याचे पालन केलेस तर त्यात तुझी चूक काय? राजाने तुला जी आज्ञा केली होती तिचे तू पालन केलेस. राजाचा सुद्धा यात काही दोष नाही. विचार केल्याशिवाय मी आलो ही माझीच चूक." शुक म्हणाला.

त्यानंतर द्वारपालकाने शुकाला आत येण्यास विनंती केली. शुकाने प्रवेश केला व राजवाड्याजवळ गेला. तेथे आणखी एका द्वारपालकाने अडविले. तेव्हां शुक पुन्हां मौनमूर्तीसारखा जागच्या जागी उभा



राहिला. त्याच वेळी कोणी मंत्री त्या बाजूने जात होता. त्याने शुकाला प्रणाम केला, त्याला एका सुंदर राजोद्यानात नेऊन त्याचा यथोचित अतिथिसत्कार केला. नंतर सर्व कलांत पारंगत व सौंदर्यात अप्सरांची सुद्धा मान खाली करू शकणाऱ्या काही वेश्यांना शुकाच्या सेवेला ठेवून मंत्री निघून गेला. शुक तेथेच राहू लागला.

शुकाच्या सेवेला नेमलेल्या वेश्या त्याला निरनिराळी पक्वान्नं खायला आणून देत आणि त्याला प्रसन्न ठेवण्यासाठी प्रयत्न करीत. हळूहळू त्या शुकाच्या सौंदर्यावर भाळल्या. परंतु शुकाचे मन अल्पमात्र विचलित झाले नाही. वेश्यांच्या मनाची













खात्री झाली की शुकाने आपल्या पंचेंद्रियांवर पूर्ण ताबा ठेवला आहे. त्यांनी त्याची सर्व प्रकारे सेवा करीत असतां त्याच्या झोंपण्यासाठी उत्तम व्यवस्था केली. शुक रात्रभर शांतपणे झोपला. प्रात:काल उठून शौचस्नानादि आटोपून समाधी धरून बसला.

**शुक व जनक संवाद**

जनकाला शुक आल्याचे कळल्यावर तो स्वत: आपल्या पुरोहिताला बरोबर घेऊन शुकाच्या दर्शनाला आला. त्याने शुकाची अर्घ्य देऊन पादपूजा केली. शुकाने अत्यंत आदरपूर्वक जनक राजाला कुशल प्रश्न विचारून त्याचा मान राखला.

त्यानंतर जनक राजाने शुकाला येण्याचे कारण विचारले. तेव्हां शुक म्हणाला—"राजन्, माझे वडील व्यास यांनी माझा व्रतबंध वगैरे संस्कार करून विवाह करून घेण्यास सांगितले. वैवाहिक बंधनात राहण्याची माझी इच्छा नसल्याने मी विवाहास नकार दिला. धर्मार्थकाममोक्ष हे चार पुरुषार्थ साध्य करण्यास गृहस्थाश्रमात प्रवेश करणे हाच उत्तम मार्ग असल्याचे त्यांनी मला सांगितले. परंतु ते मला मान्य नव्हते. तेव्हां त्यांनी मला सल्ला दिला की मी मिथिलेला जाऊन जनक महाराजांना भेटावे व त्यांच्याकडून आपल्या शंकांचं निवारण करून घ्यावं. म्हणून मी आपणांकडे आलो आहे. मला मोक्षप्राप्ती हवी आहे. तेव्हां मी काय करावे?"

तेव्हां जनक महाराज म्हणाले—"मोक्षप्राप्तीची इच्छा असणाऱ्या व्यक्तीने प्रथम उपनयन संस्कार करून घेऊन वेदाध्ययन करावे. गुरुदक्षिणा देऊन गुरूच्या आज्ञेने विवाह करून घ्यावा. रीतीरिवाजांचे व इतर नैमित्तिक नियमांचे पालन करून गृहस्थाश्रमातली कर्त्तव्ये पूर्ण करावी. पुत्र व पौत्र प्राप्त झाल्यावर वानप्रस्थाश्रम ग्रहण करावा. कामक्रोधादि षड्रिपूंना जिंकून सर्व अग्नींना आपल्यात आवाहन

करावे. नंतर वैराग्य अवलंबन करून सर्वसंग परित्याग करावा व संन्यास ग्रहण करावा. तसे न करतां प्रथमच संन्यास ग्रहण करू नये. पूर्ण वैराग्य प्राप्त झाल्यावरच संन्यास ग्रहण करावा. एकूण अट्ठेचाळीस संस्कार आहेत. त्यापैकी गृहस्थाने चाळीस करावयाचे असतात व बाकी आठ संन्याश्याने करावयाचे असतात.

तेव्हां शुकाने विचारले–"राजन् मनात वैराग्य असेल तर संन्यास घेण्यात काय दोष आहे?"

"राजा! इंद्रिये अजेय असतात. मोठ-मोठे पंडित देखील त्यांना वशीभूत होतात. मग सामान्य माणसाची गोष्ट विचारायलाच नको. क्षणाक्षणाला मनात विकार उत्पन्न होत असतात. क्षुधा, निद्रा, सुखप्राप्ती, संतानप्राप्ती ह्यांपासून संन्यासी कसा सुटणार? इच्छा अभिलाषांचे दमन कसे होणार? म्हणून सर्व भोग भोगल्यावर त्यांचा त्याग करणे साध्य होते. पहिल्यानेच [illegible] होणार? जो उंचावर झोपतो त्याला खाली पडावे लागते. कोणी संन्यास घेतल्यावर खरोखरी विरक्त न होता भोगविलास करण्यासाठी आसक्त असेल तर त्याला नरकप्राप्ती होते. क्रमाने ज्ञान संपादन करून नंतर संन्यास ग्रहण करावा. मन सहजी काबूत येत नाही. त्याला हळूहळू क्रमाने मार्गावर आणावे लागते. गृहस्थाश्रमी रहात असता शांत मनाने रहावे. लाभप्राप्ती झाली तर उत्साह वाढता कामा नये व नुकसान झाले तर हतोत्साह होऊन बसता कामा नये. जो त्यागमय जीवन घालवितो त्याला शेवटी मोक्षप्राप्ती होते. मलाच पहा, मी सर्व प्रकारचे भोग भोगतो आहे. प्रजेकडून प्रशंसा होण्यालायक मी राज्यकारभार पाहतो आहे. तरी मी आपले मन निर्मल ठेवले आहे. मरण आल्यावर मला मोक्षप्राप्ती होईल. तुला असेच जीवन घालविता येणार नाही का?" या शब्दात जनकाने शुकाला उपदेश केला.





# शहरातली नोकरी

सदू व धोंडू आपला विद्याभ्यास संपल्यावर एका शहरात नोकरीच्या शोधार्थ निघाले. त्या शहराच्या म्युनिसीपालिटीत दोघां कारकुनांची जागा रिकामी होती. म्हणून दोघांनी अर्ज पाठविले. दोघांना उत्तरे आली की अमुक दिवशी कारकुनांची निवड होईल.

सदूच्या बापाचा एक मित्र म्हणाला–"माझा शंकर नावाचा एक नातेवाईक त्या शहरात राहतो. त्याच्या नावे मी चिट्ठी देतो. त्याच्या घरी जाऊन रहायला मुळीच हरकत नाही." ती चिट्ठी घेऊन सदूने बापाच्या मित्राचे आभार मानले व धर्मशाळेत किंवा खाना-वळीत उतरण्याऐवजी शंकररावांकडेच उतरण्याचे ठरविले.

दोघे मित्र निवड होणार होती त्याच्या आदल्या दिवशी त्या शहरात पोचले. धोंडूला कोणाच्या घरी उतरणे आवडत नसे. त्याने धर्मशाळेत उतरण्याचे ठरविले. ते पोचले ते निवड होणार होती त्या दिवशी पहाटे ठरल्याप्रमाणे धोंडू धर्मशाळेत उतरला व सदू शंकररावांचे घर शोधीत निघाला. सुदैवाने पत्ता मिळाला व तो शंकररावांच्या घरी पोचला.

सदू त्या घरी जाऊन दार वाजवणार इतक्यात सुमारे चाळीस वर्षे वयाच्या एका माणसाने दार उघडले व बाहेर आला. त्याच्या हातात एक सूटकेस होती. तो कोणत्या तरी गावी जायला निघाला आहे असे सदूला वाटले.

सदूने त्या व्यक्तीला विचारले–"काय हो, शंकररावांचे घर ते हेच ना?"

"होय, हेच! मीच शंकरराव! तू कोण?" असा प्रश्न करून त्या माणसाने न्याहाळून सदूकडे पाहिले.

सदू आपली ओळख सांगून म्हणाला– "आज सकाळी परीक्षा आहे. मी दमून भागून आलो आहे. थोडावेळ विश्रांती घ्यावी, म्हणतो."

तो माणूस पडक्या आवाजात म्हणाला– "मला आतांच कळले की माझ्या धाकट्या भावाची तब्येत एकाएकी बिघडली आहे. म्हणून मी त्याच्याकडे निघालो आहे. तू येथे खुशाल रहा, आपलेच घर मान. मी उद्यां संध्याकाळपर्यंत परत येईन." असे सांगून ती व्यक्ती निघून गेली.

ते घर बरेच मोठे होते. सदूने एकदा सर्व घरात हिंडून फिरून पाहिले. घरात दुसरं कोणी नव्हते. त्याने मधल्या खोलीत एक खाट टाकली आणि झोपला. त्याचा [illegible] दाराची कडी वाजली. त्याने दार उघडले. बाहेर छान उजाडले होते. दाराबाहेर आठदहा जण हातात काठ्या घेऊन उभे होते. दार उघडताच ते आत शिरले व त्यांनी सदूला धरले.

त्यांच्या बरोबर आलेला एक वृद्ध माणूस म्हणाला–"हा लबाड चोर मी घरी परत येणार नाही असे समजून माझ्या पाहुण्यासारखा घरात शिरून बसला आहे. मी आत जाऊन पाहतो, सर्व वस्तू जागच्या जागी आहेत की नाहीत." असे सांगून तो म्हातारा आत गेला. घरातल्या पेट्या व कपाटे वगैरे उघडून पाहून मोठ्याने ओरडला–"माझ्या घरातले सर्व दागिने व [illegible] काम असले पाहिजे, याने‌च चोरी करून सर्व माल कोणाच्या तरी हाती बाहेर पाठवून दिला असला पाहिजे." असे म्हणत त्या म्हाताऱ्या माणसाने सदूची मान धरून त्याला मारायला हात उगारला.

सदू म्हणाला–"अहो मी चोर नाही. मी थोड्या वेळापूर्वी येथे आलो."

"हे सर्व खोटे! बोल तुझा साथीदार चोर कोठे गेला आहे तो!" असे म्हणत त्या म्हाताऱ्याने सदूला खूप वडविले.

सदूला तो अपमान असह्य झाला. एका बाजूला नोकरीसाठी परीक्षेची वेळ सात्र-ण्याची काळजी होती आणि दुसरीकडे त्याच्यावर चोरीचा आळ. ते गावात त्याला ओळखणारा कोणीच नव्हता. जो माणूस घरात खुशाल झोपायला सांगून निघून गेला तोच चोर होता तर! याचा अर्थ शहरात चोरांचेच राज्य असते तर!

सदू सर्वांना नमस्कार करून नम्रपणे म्हणाला–"मला माहीत नव्हते की ज्या माणसाने मला आत झोपायला सांगितले तोच चोर होता. मी नोकरीसाठी परीक्षा द्यायला बाहेर गावाहून आलो आहे. माझ्या वडिलांच्या मित्राने त्यांच्या शंकरराव नावाच्या मित्राच्या नावे ही चिट्ठी दिली आहे. तरमग हे शंकररावांचे घर नाही का?" असे सांगून सदूने ती चिट्ठी दाखविली.

शंकररावांनी ते घर सहा महिन्यापूर्वीच सोडले होते. तेथे जमलेल्या गर्दीतल्या एका

















माणसाने सुचविले की याला एका खोलीत बंद करून ठेवा व शंकररावांना बोलावून विचारू या." त्या प्रमाणे सदूला एका खोलीत बंद करून ठेवण्यात आले. शंकररावांना एक जण जाऊन बोलावून घेऊन आला. तोपर्यंत दुपार होऊन गेली होती. सदू दमून भागून गेला होता. त्याला भूक लागली होती आणि झोपही पुरेशी मिळाली नव्हती. शिवाय परीक्षेची वेळ टळल्याची काळजी. यामुळे उभे होण्याची शक्ती सुद्धा त्यांच्या अंगात उरली नव्हती.

शंकररावांनी सदूच्या हातातली चिट्ठी घेऊन वाचली व म्हणाले–"होय, ही चिट्ठी माझ्या नातेवाइकाचीच आहे. परंतु मी या माणसाला यापूर्वी कधी पाहिलेले नाही. परंतु हा आमच्याच गावाचा असावा, असे चिट्ठीवरून तरी वाटते."

त्यानंतर सर्वांनी सदूला सोडून दिले. शंकररावांनी त्याला आपल्या घरी बोलाविले परंतु सदू म्हणाला–"आज तुम्ही मला वांचविलेत. मी आभारी आहे. आतां

सांगून सदू तेथून निघाला. मध्यतरी धोंडूची त्याची गाठ पडली. त्याने सदूला विचारले–"अरे, तू कां नाही आलास परीक्षेला?"

सदूने त्याच्यावर गुदरलेला सर्व प्रसंग वर्णन करून सांगितला. तेव्हां धोंडू म्हणाला–"बाबा रे! शहरातली नोकरी तुझ्या कामाची नाही. फार सावधपणे रहावे लागते. तू म्युनिसीपालिटीत चोराला दाखवितो म्हणून घेऊन यायला पाहिजे होतेस. तेथे मी होतोच. आपले अर्ज कचेरीत मिळालेच असते. ते पाहून तू चोर नाहीस हे शाबित झाले असते. तुला परीक्षेत बसतां आले असते. मला दोन दिवसात कामावर हजर व्हायला हुकूम झाला आहे! तेव्हां मी तुला आपल्या गावी पोचवून परत येऊ शकेन."

त्यानंतर सदूने आपल्या गावीच राहण्याचे ठरवून शेतकीची कामे पाहण्याचे ठरविले.



# गुरूच शिष्य झाला तेव्हां

एका संन्याश्याचे चार शिष्य होते. त्यांच्यापैकी सदानंद फार हुशार होता. संन्याश्याची प्रवचने फार परिणामकारी होत असत. सदानंदाला वाटे की आपल्याला सुद्धा संधी मिळाली तर आपणही अशीच सुंदर प्रवचने करून चांगला नावलौकिक मिळवू शकू. त्याने ती गोष्ट एकदा गुरुसमोर बोलूनही दाखविली. गुरू म्हणाला–"वेळ पाहून आपण तसे करून पहायला हरकत नाही."

एकदा दूरच्या गावाहून संन्याश्याला प्रवचन द्यायला निमंत्रण मिळाले. त्या गावी संन्याश्याला कोणी प्रत्यक्ष ओळखत नव्हता. म्हणून गुरूने सदानंदला भगवी वस्त्रे घालायला दिली आणि स्वतः त्याचा शिष्य होऊन त्याच्याबरोबर त्या गावी गेला.

त्यांची युक्ती कोणाला कळली नाही. त्या गावात सदानंदचे प्रवचन फारच छान झाले. गुरूला सुद्धा आनंद झाला. परंतु एक प्रश्न दत्त म्हणून त्याच्या समोर उभा राहिला. श्रोतृवृंदांपैकी पांच जणांनी पांच तऱ्हेचे प्रश्न विचारले. त्यांची उत्तरे सदानंदला माहीत नव्हती. परंतु प्रसंगावधान ठेवून तो म्हणाला–"हे लहान लहान प्रश्न आहेत, यांचे उत्तर माझे शिष्यवर्ग देतील."

संन्याश्याने त्या प्रश्नांची उत्तरे देऊन गावकऱ्यांना संतुष्ट केले.





# प्रश्नोत्तरे

**का. पद्मनाभ भट, कार्कळ, द. कन्नड (कर्नाटक)**

प्र : भूकंप एकाच एका जागी होण्याची कारणे काय?

उ : भूगर्भात अनेकानेक चिरा व भेगा असतात. त्याचबरोबर जोराने हालचाल लू असते. भूगर्भातील उष्णतेमुळे दगडदेखील विरघळून जातात व त्यांचा रस चिरांभेगांतून वाहतो. भूगर्भातील रंध्रांतून त्या रसाची वाफ व वायू वर येऊन ध्वंस करतात. कधीकधी ज्वालामुखीचा लावा वाहून एखादे बेट किंवा बेटावरचा बराचसा प्रदेश नष्ट होतो; किंवा लावाबरोबर वाहून आलेल्या रसाचे एक नवे बेट निर्माण होते. अशा अघटित गोष्टींवरून भूगर्भात किती शक्ती आहे याची कल्पना करता येईल. त्या शक्तीमुळे भूगर्भातील फटी रुंद होतात व जमिनीची आतल्या आत कालवा कालव होते. त्यामुळे भूकंप होतात. अशा चिरा ज्या भूभागाच्या भूगर्भात जास्त असतात त्या प्रांतातच वारंवार भूकंप होतात. वास्तविक भूकंपाचा धक्का पृथ्वीवर सर्वत्रच कमी जास्त प्रमाणात कळतो. जपानमध्ये कोठेही भूकंप झाला तरी सहस्रावधी मैलांवर लावलेल्या यंत्रांवरून ते कळते.

**जी. एस. रमणरेड्डी, पल्लकुप्पम् (तमिळनाडु)**

प्र : बस चालत असतां दिव्यावर फिरणारे किडे बरोबर कसे प्रवास करतात?

उ : बसचा वेग किंवा तिच्याबरोबर हवेत निर्माण झालेला वेग यात पडलेले किडे बसच्याबरोबर आपोआप ओढले जातात. त्यांना उडण्याचा प्रयत्नच करावा लागत नाही. कोणी कधी बसल्या बसल्या शेकडो मैल जाऊ शकेल का? परंतु आपण विमानात बसून शेंकडों मैल वेगाने प्रवास करतोच की नाही? हेच पहा, पृथ्वी स्वत: भोवती फिरत असता तिच्या वरची प्रत्येक वस्तू ताशी एक हजार मैल वेगाने चालते—दगड, माती, केरकचरा सर्वच.

**नीलेश्वरपु वेंकट श्रीकृष्ण, मंगळगिरी (आंध्र)**

प्र : ऋषीमुनी व्याघ्रचर्म किंवा मृगचर्म यांवर कां बसत?

उ : ऋषीमुनी रानावनात आश्रम बांधून रहात व पाळलेल्या प्राण्यांना खात, त्यांना सूतकाढणे, कापड किंवा चटई विणणे वगैरे हस्तव्यवसाय नसत. म्हणून ज्या प्राण्याची शिकार करीत



# लब्ध प्रणाश

[ ६८ ]

**प्रणयकलहाची गोष्ट**

नंद हा एका मोठ्या साम्राज्याचा चक्रवर्ती राजा होता. त्याची कीर्ती शरद्ऋतूच्या चंद्राच्या चंद्रिकेसारखी दिग्दिगंत पसरली.

त्याचा प्रधान वररुची हा सर्व शास्त्रांत पारंगत व कुशाग्रबुद्धी होता. एकदां संध्याकाळी त्याचे व त्याच्या बायकोचे काही कारणावरून भांडण झाले. तो प्रणयकलह होता. त्याचे बायकोवर स्वत:च्या जिवापेक्षाही जास्त प्रेम होते. म्हणून शक्य तितक्या लौकर बायकोच्या मनाचे ठरवून अनेक प्रकारे तिचे मन वळविण्याचा प्रयत्न त्याने करून पाहिला. पण काही एक परिणाम न झालेला पाहून तो अत्यंत दीन मुद्रा करून बायकोला म्हणाला—"प्रिये, मी काय केले तर तुझा हा रुसवा जाईल, सांग तरी!"

बराच वेळ पतीने तिच्या पायधरण्या केल्यावर ती शेवटी म्हणाली—"तुम्ही आपल्या डोक्याचा चमनगोटा करून माझ्या पायां पडलात तर मी पुन्हां नेहमीसारखी तुमच्यावर प्रेम करीन."

वररुचीने ती म्हणाली तसे केले आणि तिचा क्रोध शांत केला.

त्याच दिवशी संध्याकाळी नंद व त्याची राणी यांचा प्रणयकलह सुरू झाला. नंदाने राणीचा राग कमी करण्यासाठी पुष्कळ प्रयत्न करून पाहिला, पण काही फायदा झाला नाही.

शेवटी तो राणीला म्हणाला—"प्रिये, तुझ्या वांचून एक क्षणदेखील मी जिवंत राहणार नाही. मी तुझ्या पायां पडतो!"

"तुम्ही तोंडात लगाम घालून घ्या, मी तुमच्या पाठीवर बसते. तुम्ही घोड्या-



सारख खिकाळत माझं वाहन झालात तर माझ्या मनाचं समाधान होईल." राणी म्हणाली.

नंदाला कबूल व्हावे लागले.

दुसऱ्या दिवशी वररुची नंदाच्या दरबारात आला तेव्हां, नंदाला त्याच्या हेरांकरवी वररुचीला चमतगोटा कसा करून घ्यावा लागला होता हे कळले असल्यामुळे नंदाने वररुचीची थट्टा उडविण्याच्या हेतूने त्याला विचारले—"काय रे, वररुची! मुहूर्त वगैरे पाहिल्या शिवायच असे जावळ करून घेतले का रे?"

नंदाने प्रणयकलहप्रसंगी जे केले होते ते कळले असल्यामुळे वररुची म्हणाला—

"प्रभो! पुण्यकलहात यशस्वी व्हायच असेल तर अनेक अवाच्य कामे करावी लागतात, हे आपल्याला माहीत नाही का? केली नाहीत तर पाऊल पुढे पडणे शक्यच नाही!"

नंद काय उत्तर देणार? गप्प राहिला.

माकडाने मगरीला ही गोष्ट सांगितली व म्हणाले—"मूर्खा! या दोघांनी आपापल्या बायकांच्या मनाचे समाधान करण्यासाठी स्वत: कष्ट सहन केले, इतरांचा जीव धोक्यात घातला नाही. परंतु तू मात्र आपल्या मित्राचा जीव घ्यायला तयार झालास, पण सुदैवाने ते कळले. मागे एक गाढव रेंकू लागले व मेले तसेच आहे."

मगरीने ती गोष्ट सांगायला सांगितली व माकडाने ती सांगितली.

### वाघाचें कातडे पांघरणारे गाढव

एका गावी एक धोबी रहात असे. त्याच्या जवळ एक गाढव होते. त्याला खायला मिळत नसे. म्हणून अशक्त झाले.

एकदा तो धोबी जंगलातून फिरत असता त्याला एक मरून पडलेला वाघ दिसला. त्याने विचार केला, आपल्या गाढवाच्या अंगावर या वाघाचे कातडे काढून लावावे व त्याला शेतात सोडावे. शेतकरी त्याला वाघ समजून त्याच्या वाटेला जाणार नाहीत. गाढव खुशाल शेतात चरेल व धष्टपुष्ट होईल.

त्याप्रमाणे धोब्याने वाघाचे कातडे काढून ते आपल्या गाढवाच्या अंगावर पांघरून शिवून टाकले आणि शेतात सोडले. शेतकरी त्याला वाघ समजून शेतातून पळवून लावायला धजले नाहीत. गाढव उजाडेपर्यंत खूप चरून घरी परत आले. काही दिवसांनी ते इतके लट्ठ झाले की दारातून आत शिरणे देखील त्याला अशक्य झाले.

एके दिवशी रात्री ते शेतात चरत असता दुरून एक गाढवीण रेकू लागल्याबरोबर ते देखील रेकू लागले. तेव्हां शेतकऱ्यांना कळले की ते वाघाचे कातडे पांघरलेले गाढव आहे. त्यांनी त्याला खूप बडवून ठार केले.

माकडाने गाढवाची गोष्ट पुरी केली त्याच वेळी पाण्यातून एक प्राणी बाहेर येऊन मगरीला म्हणाला—"अरे ए कराळमुखा! अरे, तुझ्या बायकोचा जीव भुकेने कासावीस झाला होता. तुला परत यायला उशीर झालेला पाहून तुझ्या बायकोने निराश होऊन आत्महत्या करून घेतली."

ते ऐकल्यावर मगर ओरडू लागली—"मेलो, माझ्यावर आकाशच कोसळलं! माझं घर या पुढे घर राहिलंच नाही. चांगल्या माणसाला बायको असेल तर घर. बायको नसेल तर ते घर नाही. बायको असेल तर वृक्ष वनस्पती किती सुंदर वाटतात? बायको नसेल तर राजवाडा सुद्धा ओसाड वाळवंटासारखा वाटतो. मित्रा, मी तुझ्याशी जे कपट नाटक केले त्या बद्दल क्षमा कर. मी परत जाऊन आपल्या बायकोच्या चितेवर प्राण सोडतो!"

ते ऐकून माकड म्हणाले—"तू आपल्या बायकोचा गुलाम आहेस व तिच्या बोटावर नाचतोस हे मला माहीत होते. आता तुझ्या बोलण्या-वागण्यावरून ती गोष्ट खरी



झाली. मूर्खा, अशी बायको मेल्याबद्दल रडतो आहेस? अशी बायको मेली तर तो क्षण सुखाचा समजून मेजवानी उडविली पाहिजे. अशा बायकोच्या सहवासात मनाला कधी शांती मिळत नाही. अशा बायकोसाठी तू आत्महत्या करणार? नको."

"मित्रा, तू म्हणालास ते बरेचसे बरोबर आहे. पण मी काय करू? मी बायकोला घालवून बसलो. घर गेले व तुझ्या-सारख्याची मैत्री घालवून बसलो. एका शेतकऱ्याच्या बायकोसारखा दोन्ही बाजूंनी फसलो." मगर म्हणाली.

"कोणती गोष्ट ती! ऐकू दे तरी!" माकड म्हणाले व मगर गोष्ट सांगू लागली.

**शेतकऱ्याच्या बायकोची गोष्ट**

पूर्वी एक शेतकरी दूर असलेल्या एका शेतात आपल्या सुंदर बायकोबरोबर संसार थाटून रहात असे. त्यांना मूलबाळ नव्हते. शेतकऱ्याचे उतारवय झाले होते. बायको तरुण होती म्हणून कोणी तरुण पुरुष दिसतो का पाही.

होती. त्याने तिच्या मनातली गोष्ट ओळखली व एकदां तिला भेटून म्हणाला– "हे सुंदरी, तुला मी पाहिले त्या क्षणापासून तुझ्यावर आपला जीव ओवाळून टाकला. नुकतीच माझी बायको मेली. मला आपलं म्हणणारा कोणी नाही. तू मला आपला मानून सुखी कर."

ती म्हणाली–"तसं तुला वाटत असेल तर मला काही हरकत नाही. आपण पळून जाऊ या. माझ्या नवऱ्याने पेटीत पुष्कळ पैसे जमा करून ठेवले आहेत. ते मी आणते. आपण सुखाने संसार करू."

"तुझा नवरा झोपल्यावर तू माझ्याकडे ये." तो दुष्ट माणूस म्हणाला.

तिने होकार दिला.

त्या दिवशी रात्री तिचा नवरा झोपला असतां त्याचा सर्व पैसा उचलून ती ठरल्या जागी आली. त्या दुष्ट माणसाला आनंद झाला. तो आनंदाने तिला बरोबर घेऊन निघाला.





# भल्लूक मांत्रिक

[ ८ ]

[ राजा दुर्मुख त्याच्या पाठीस लागलेल्या चांडाळ भल्लूकापासून स्वतःला वांचवीत उग्रदंड राक्षस दिसतांच घाबरून बेशुद्ध झाला. उग्रदंडाने त्याला शुद्धीवर आणण्यासाठी अंगरक्षकाला ओढयाचे पाणी आणायला सांगितले. ओढयाजवळ सोंड तुटलेला हत्ती होता. तो त्याच्या पाठीस लागला व धावू लागला. पुढे– ]

उग्रदंड राक्षस हत्तीला येत असलेला पाहून चांडाळ भल्लूकाला म्हणाला–"काय रे हा तुटक्या सोंडेचा हत्ती तुझे वाहन आहे का? याला पाहून असे वाटते की हा रानटी हत्ती असावा."

"होय, रानटी हत्तीच तर आहे! तो जंगलात माझ्या आड आला नसता तर वांचला असता. मी आपला परशू त्याच्या सोंडेवर हाणला व त्याच्यावर चढून बसलो आणि त्याचे कान पिरगळून त्याला येथ-पर्यंत घेऊन आलो." चांडाळ भल्लूक म्हणाला.

त्यांचे बोलणे चालू असतां हत्ती त्यांच्या जवळ येऊन पोचला. त्याला पाहून चोरांचा नायक नागमल्ल व त्याचे दोघे अनुयायी गुहेच्या बाजूला पळू लागले. तोंपर्यंत बेशुद्धावस्थेत पडलेला राजा दुर्मुख दचकल्या-सारखा उठला आणि पळत जाऊन झाडांच्या



आड लपला. अंगरक्षक घाबरून ओरडला आणि उग्रदंडाच्या पाठीमागे जाऊन उभा राहिला.

उग्रदंडाने आपली दगडाची गदा हत्तीवर उगारली व अंगरक्षकाला म्हणाला—"अरे, आतांपर्यंत तू माझा अंगरक्षक होतास आणि आतां मीच तुझा अंगरक्षक झालों, वाटते? भित्रा, घाबरट कुठला!" असे म्हणत उग्रदंड हत्तीच्या वाटेवरून थोडा बाजूला सरकून उभा राहिला.

चांडाळ भल्लूक आपला परशू फिरवीत हत्तीसमोर जाऊन म्हणाला—"थांब! तू मला ओळखले नाहीस का? मी चांडाळ भल्लूक आहे! तू माझे वाहन आहेस!"

चांडाळ भल्लूकाचे बोलणे अद्याप संपले ही नव्हते, हत्तीने त्याला सोंडेने धरून वर उचलले व दूर फेंकणार इतक्यात उग्रदंड राक्षसाने उडी मारून हत्तीचा कान धरून पिरगळला आणि आपली दगडी गदा त्याच्या छातीत जोराने हाणली. त्या धक्क्याने हत्तीने चांडाळ भल्लूकाला सोंडेतून खाली सोडला आणि मोठ्याने ओरडत जमिनीवर आदळला. उग्रदंड चटदिशी पुढे गेला आणि हत्तीचे पुढले दोन्ही पाय धरून वर उचलीत ओरडला—"अरे, अंगरक्षका! पळ आणि झाडावरच्या वेली तोडून घेऊन ये. याचे पाय बांधून ठेवू या."

अंगरक्षक झाडीत शिरला. चांडाळ भल्लूक किंकर्तव्यविमूढ स्थितीत डोळ्यांची उघडझाप करीत डाव्या हाताने कपाळ धरून म्हणाला—"उग्रदंडा! माझ्या मंत्रवलेल्या परशूपेक्षा तुझ्या अंगातले बळच जास्त शक्तिशाली आहेसे दिसते आहे. तू मला वांचविलेस, मी तुझा आभारी आहे. तुला काय पाहिजे ते माग, मी देतो!"

उग्रदंड चांडाळ भल्लूकाकडे हसत पहात म्हणाला—"मला काही मागायचेच असेल तर ते तुझा गुरू भल्लूक मांत्रिक याच्याचकडे मागेन! आतां आधी ह्या भडकलेल्या हत्तीला काबूत आणून कसा आवरायचा [illegible] व माझ्याबरोबर याचे पाय घट्ट धर पाहू!"

चांडाळ भल्लूक उग्रदंडाकडे चकित होऊन पहात म्हणाला—"माझ्या या वाहनाचे पाय मी धरू म्हणतोस? याहून जास्त अपमानाची गोष्ट ती काय असणार? तू पहात रहा, मी आपल्या परशूने या हत्तीच्या डोक्याची शंभर शकले उडवून टाकतो!" असे म्हणत त्याने परशु उचलला.

"अरे, बाबा, जरा थांब! तू चांडाळ म्हणून सारे आयुष्य घालविलेस आणि ही चढेलपणाची भाषा तू कोठे शिकलास रे? तू या हत्तीला ठार केलेस समज, तर तू ज्या कामासाठी आला आहेस ते काम पुरे करून आपला गुरु भल्लूक मांत्रिक याच्याकडे कसा काय जाशील?" उग्रदंडाने विचारले.

जमिनीवर पडलेला हत्ती उग्रदंडाच्या पकडीतून स्वतःला सोडविण्यासाठी ओरडत तडफडत उठण्याचा प्रयत्न करीत होता. उग्रदंड स्वतः त्याचे दोन्ही पाय जास्त घट्ट धरून हुंकार करीत मोठ्याने ओरडून म्हणाला—"काय रे अंगरक्षका! कोठे मेलास रे इतका वेळ? चार रानटी वेल तोडून आणायला इतका उशीर?"

"उग्रदंड मालक, आम्ही आलोच!" असे म्हणत चोरांचा नायक नागमल्ल व त्याचे दोघे अनुयायी एक जाडजूड मोठा वेल घेऊन आले. उग्रदंड त्यांना वेलाच्या दोरखंडाने हत्तीचे पाय घट्ट बांधून ठेवायला





सांगून म्हणाला—"ओहो, तर तुम्ही खरेखुरे चोर आहांत! केव्हां कोणती वस्तू कशा कामासाठी उपयोगी पडेल, म्हणून सर्व वस्तू कशा सांभाळून ठेवता तुम्ही!"

नागमल्लाने आपल्या अनुयायांना हत्तीचे पाय घट्ट बांधून ठेवायला सांगितले व म्हणाला—"उग्रदंड मालक! आम्ही जंगलातले प्राणीच नाही का! आपण इकडून जाण्यापूर्वी आमच्यावर एक कृपा केली पाहिजे!"

"हो, करीन, नक्की करीन! या चांडाळ भल्लूकाकडून तुमच्या तिघांची डोकी उडवायची, हेच ना?" उग्रदंडाने विचारले.

सारखं झालं. तो काही बोलणार इतक्यात चांडाळ भल्लूक—"हे शिरीषवन भैरव!" असे ओरडत आणि आपला परशू वर उचलून म्हणाला—"अरे, लबाड चोरांनो! तो दुर्मुख राजा कोठे आहे रे? त्याला कोठे लपवून ठेवला आहे तुम्ही? तुम्ही आत्तांच्या आत्तां सांगितले नाहीत तर तुमची डोकी उडालीच समजा!"

चोरांचा नायक नागमल्ल थरथर कांपत म्हणाला—"भल्लूक मालक! आपण डोके उडविलेत तर त्या दुर्जयशेट, की दुर्मुख राजाचा शोध कसा लागणार? तो इकडेच कोठे बेशुद्ध होऊन पडला असला पाहिजे की हो!"

"मी तेच तर विचारतो आहे की तो कोठे आहे? त्याचे डोके कापून नेले नाही तर तो भल्लूक मांत्रिक माझे डोके उडवील ना!" चांडाळ भल्लूक म्हणाला.

तोपर्यंत नागमल्लच्या दोघां अनुयायांनी हत्तीचे दोन्ही पाय छान घट्ट बांधून ठेवले होते. तरी हत्ती आपल्या मागच्या पायावर उभा राहण्यासाठी धडपडत होता. त्याच वेळी अंगरक्षक एक मोठा थोरला जंगली वेल घेऊन तेथे आला.

उग्रदंड नागमल्लच्या दोघां अनुयायांना अंगरक्षकाने आणलेल्या वेलाने हत्तीचे

म्हणाला—"काय रे अंगरक्षका! काय रे एवढ्याशा कामाला एक महिना लावलास? काहीतरी लपवालपवीचे काम करीत होतास, होय की नाही? झाडीत पळून गेलेल्या दुर्मुख राजाला कोठेतरी आड लपायला मदत करायला गेला होतास, होय की नाही?"

तो प्रश्न ऐकून अंगरक्षक दचकल्यासारखा होऊन म्हणाला—"उग्रदंड महाराज! आतां मी त्या राजाचा अंगरक्षक नाही, आपला अंगरक्षक आहे की हो!"

चांडाळ भल्लूक दोन पावले पुढे येऊन दांत ओठ चावून अंगरक्षकाला म्हणाला—"काय रे, तो दुर्मुख कोठे लपला आहे, तुला माहीत आहे, तुझ्या चेहऱ्यावरूनच ते कळते आहे. खरं सांगतोस की तुझी मान उडवू?" असे म्हणत त्याने आपला परशू उचलला.

अंगरक्षक घाबरून ओरडत उग्रदंडाच्या आड पळत जाऊन उभा राहिला व म्हणाला—"उग्रदंड महाराज! आपल्या अंगरक्षकाचे रक्षण करणे आतां आपल्याच हातात आहे."

उग्रदंड अंगरक्षकाची मान धरून त्याला पुढे ओढून म्हणाला—"तो दुष्ट राजा कोठे लपला आहे, हे तू खरे सांगितले नाहीस तर तुझ्या शरीरातल्या अवयवांपैकी फक्त



डोके वांचविणे मला शक्य होणार नाही. रानातल्या वेली तोडून आणायला तू गेला होतास तेव्हां तुझा तो पळून गेलेला मालक तुला भेटला होता. त्याच्याशी तू काहीतरी कानगोष्टी करून तू इकडे आलास, होय की नाही? काय काय झालं ते तू खरे सांगितले नाहीस तर तुला मी या हत्तीच्या सोंडेत देईन." असे म्हणत अंगरक्षकाला खाली जमिनीवर पडलेल्या हत्तीकडे ओढून नेऊ लागला.

अंगरक्षक जीव गेल्यासारखा मोठ्याने ओरडून व दोन्ही हात जोडून म्हणाला—"दंड महाराज, आपले पाय धरतो आणि स्वतःचे कान धरतो. त्या महाराजांनी



मला आपले अर्धे राज्य देऊ केल. काही वाटेल ते करून आपल्या दोघांच्या डोळ्यांत धूळ फेकून उदयगिरीला आपण दोघे पळून जाऊ या. म्हणाला. त्यानंतर मला अर्धे राज्य देऊन माझा राज्याभिषेक करून देतो, असे ही म्हणाला."

"म्हणजे त्याच्या बोलण्यावर तू विश्वास केलास!" म्हणत उग्रदंड राक्षस मोठ्याने हसला व म्हणाला–"अरे, अंगरक्षका! तू मनुष्य होऊन एका माणसाच्या बोलण्यावर विश्वास करतोस म्हणजे आश्चर्यच आहे! उदयगिरीला पोचल्यावर तुझा राज्याभिषेक नाही; शहराच्या मध्यभागी तुला सुळावर चढविले जाईल!"

बरोबर आहे, दंड महाराज! मी आतां कोठे जाणार नाही, आपल्या बरोबर अंग-रक्षक म्हणून राहून उरलेले आयुष्य घालवितो." अंगरक्षक गयावया करीत सांगू लागला.

चांडाळ भल्लूक इतका वेळ ते सर्व, काही बोलल्याशिवाय ऐकत होता तो "जय भल्लूक मांत्रिका!" म्हणून ओरडला. त्याच्या आवाजाने सर्व जंगल हादरले, म्हणाला–"आता या गप्पा बंद करा. मी इकडे कोणत्या कामासाठी आलो, आणि तुमचा हा तमाशा काय चालला आहे? भल्लूक मांत्रिकाचा अपमान करणाऱ्या उदयगिरीच्या राजाला त्या दुर्मुखाला आणून समोर उभे केले पाहिजे. तसे केले नाहीत तर तुमची सर्वांची डोकी एकामागून उडवून एका वेलात ओवून गळ्यात घालीन."

ते ऐकून उग्रदंड राक्षसाला राग आला. म्हणाला–"चांडाळ भल्लूका! तुझ्या अंगात इतक्या सर्वांची डोकी उडविण्याची शक्ती आहे तर, काय रे?"

चांडाळ भल्लूक ते ऐकून संतापला, डोळे वटारून पहात व आपला परशू उगारून म्हणाला–"हा परशू म्हणजे काय वाटलं तुला? भल्लूक मांत्रिकाने मंत्रवलेला आहे. याच्यासमोर उभा राहून कोणी जिवंत

म्हणत त्याने एक उग्रदंड उभा होता तिकडे एक पाऊल टाकले.

उग्रदंड राक्षस दोन पावले मागे सरत म्हणाला–"चांडाळ भल्लूका! थोडा शांत हो! आपण दोघांनी परस्परांच्या शक्तीची परीक्षा घेतली तर येथे आहेत त्या सर्व दुष्टांना आपण स्वतःच मदत केल्यासारखं होईल. मला वाटतं मी तुला हे पूर्वी एकदां सांगितले आहे!"

"ते ठीक आहे रे! पण दुर्मुखराजाच्या डोक्याचे काय? ते घेतल्याशिवाय मी भल्लूक मांत्रिकाकडे कसा काय जाणार?" चांडाळ भल्लूक म्हणाला.

"त्या राजाचा शोध लावण्यासाठी आपण सगळे हे अरण्य हिंडून पाहू या. राजवाड्यात राहणारा आणि फुलबागांत हिंडणारा हा राजा जंगलात कोठेही एकटा जाणे शक्य नाही." उग्रदंड म्हणाला.

सर्वजण दुर्मुख राजा पळून गेला होता त्या बाजूला निघाले. तितक्यात त्यांना दुरून एक मोठी किंकाळी ऐकू आली व त्याच्या पाठोपाठ हे शब्द त्यांना ऐकू आले. "अरे लौकर बाण सोड, मी उदयगिरीचा राजा आहे! मी आपले अर्धे राज्य तुला देईन."

तो आवाज दुर्मुख राजाचाच होता. अंगरक्षक रागाने त्या दिशेला पळत जात ओरडला–"मला देतो म्हणाला होता अर्धे



राज्य आणि ते दुसऱ्या कोणाला देतो आहे का? मला नाही ते मान्य होणार!"

अंगरक्षक गेला तेव्हां त्याला राजा दुर्मुख एका झाडाच्या टोकाला चढून बसला होता व त्याला धरण्यासाठी एक चित्ता झाडावर चढत असलेला दिसला. झाडाखाली एक रानटी जातीचा माणूस धनुष्यावर बाण ठेवून नेम धरून उभा असलेला दिसला.

अंगरक्षकाला पाहून राजा दुर्मुख जिवंत जीव आल्यासारखा मोठ्याने ओरडला–"अरे, अंगरक्षका? पाहतो काय आहेस? हा वाघ मला खाणार आहे. त्याला बाण मारून ठार कर! त्या मूर्ख जंगली माणसाच्या हातातून धनुष्यबाण ओढून घे!"

ते ऐकून अंगरक्षक थोडा चिडल्या सारखा म्हणाला–"महाराज! चित्त्याला मारले तर अर्धे राज्य देईन, हे आपणच म्हणालात ना?"

"होय रे बाबा, मीच! माझ्या अंगावर तो उडी मारील त्याच्या आधी त्याला

"आम्हां दोघांना अर्धे अर्धे राज्य देऊन टाकलेत तर आपल्याला काय उरणार महाराज?" अंगरक्षकाने शांतपणे विचारले.

"माझा जीव रे, माझा जीव!" राजा मोठ्याने ओरडला.

त्या रानटी माणसाने एकदा दुर्मुखाकडे व एकदां शेजारी उभा असलेल्या अंगरक्षकाकडे भोळ्या नजरेने पाहिले व म्हणाला–"मला तुमचे राज्य नको. अर्धे राज्य ही नको. फक्त पांच वराह दिलेत तरी पुरे!" असे म्हणत त्याने चित्ता राजावर उडी टाकणार इतक्यात बरोबर नेम धरून बाण सोडला.

बाण वर्मी लागला आणि कळवळल्यासारखा मोठ्याने ओरडत चित्ता आणि त्याचा पंजा लागल्यामुळे फांदी हातातून सुटल्यामुळे राजा दोघे झाडावरून खाली पडले. (क्रमशः)





# गळ्याची कसोटी

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही, तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, या जगात कोणत्याही गोष्टीचे मूल्य ठरविणे अशक्य आहेसे वाटते. हेच पहा ना, तू एवढे श्रम करीत आहेस त्याचं काय मूल्य आहे? मूल्य ठरविणे हे एखाद्या मानवातीत शक्तीवर सोडून द्यावे तर तेही निरर्थकच ठरते. त्याचे एक उदाहरण म्हणून मी तुला संगीताचा एक चाहाता अशा कांतिवर्मा नांवाच्या राजाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

वसंत नावाच्या एका राज्याचा कांतिवर्मा नावाचा एक राजा होता. तो संगीत-

## वेताळाच्या गोष्टी



शास्त्राचा तज्ज्ञ आणि चाहता होता. तो दररोज संगीत ऐकून त्या आनंदात मग्न होऊन सर्व जगाला विसरून जात असे. परंतु तो ज्याचे गायन एकदां ऐकले त्याचे पुन्हां ऐकत नसे. कारण कोणतेही गाणे किती चांगलं झालं तरी त्यात काही ना काही तरी दोषच त्याला आढळून येई. त्याच्या मते गायकाचा आवाज मुख्य करून चांगला असला पाहिजे. परंतु कोणाचाही आवाज उत्तम व निर्दोष असल्याचे त्याला किंवा त्याच्या दरबारातील कोणाला कधी आढळून आले नाही.

दररोज गाण्याच्या बैठकी होत. दररोज एक नवा गवई येऊन गाणे म्हणे. काही

रसिकांना असह्य वाटत होते. तरी राजाने उत्तम गायकाचा शोध चालूच ठेवला.

एकदां रात्री राजाला झोपेत सरस्वतीचा दृष्टांत झाला. देवी म्हणाली—"दक्षिणेकडे अरण्यात जाऊन पाहिलेस तर एका वडाच्या झाडाखाली एक फार मोठा महिमा असलेली वीणा तुला सापडेल. तू ती घेऊन ये. तिचा तुला उपयोग होईल. ती वीणा समोर ठेवून कोणी गाणे म्हटले तर गाणाऱ्याचा आवाज कसा आहे हे वीणा सांगेल. एवढेच नव्हे तर आवाजाला अनुरूप असे गाणाराला रूपही मिळेल." असे सांगून देवी अंतर्धान पावली.

ते स्वप्न असल्याची गोष्ट झोप मोडल्यावर कांतिवर्माच्या लक्षात आली. परंतु ते स्वप्न राजाला इतकं खरं वाटलं की दुसऱ्या दिवशी राजा दक्षिणेकडच्या जंगलात त्या वीणेच्या शोधार्थ निघाला आणि आश्चर्य म्हणजे, खरोखरच एका वडाच्या झाडाखाली त्याला एक वीणा सापडली.

तो ती वीणा घेऊन परतला. त्याने श्रद्धा भक्तिपूर्वक त्या वीणेची पूजा केली आणि ज्या दिवाणखान्यात गायनाच्या बैठकी होत तेथं नेऊन ठेवली.

त्या दिवसापासून जो कोणी गवई येई त्याला त्या वीणेचा महिमा राजा सांगे, की

सांगेल आणि तिने जे मत दिले असेल त्या प्रमाणे गवयाला रूपही प्राप्त होईल!

त्या सूचनेचा अर्थ न कळल्याने म्हणा किंवा त्या सूचनेकडे दुर्लक्ष करून एका गवयाने गाणे म्हटले तेव्हां वीणा म्हणाली— "गार्दभ स्वर!" आणि त्या पाठोपाठ त्या गवयाला गाढवाचे रूप आले आणि तो बैठकीतून गाढवासारखा रेकत पळून गेला.

ही गोष्ट घडली त्याच्या नंतर तीन दिवस त्या वीणेच्या भीतीने कोणी गवई गाणे म्हणायला तयारच झाला नाही. परंतु चवथ्या दिवशी दुरून कोणीतरी गानकला कोविद आला. त्याने वीणेसमोर बसून गाणे म्हटले. तो थांबताच वीणा म्हणाली—

"रेड्याचा गळा!" लगेच त्या गवयाला रेड्याचे रूप मिळाले आणि तो तेथून ओरडत पळून गेला.

त्याच्या दुसऱ्या दिवशी आणखी एक जण, मोठ्या आत्मविश्वासाने गाणे म्हणू लागला. पण वीणा "कुत्र्याचा आवाज!" म्हणाली. लगेच तो कुत्रा होऊन भुंकत बैठकेतून पळून गेला.

ते सर्व राजकन्या पहात होती. ती संतापली व स्वतः वीणेसमोर बसून गाणे म्हणू लागली. तिचा गळा फार गोड होता. तिचे गाणे श्रोते तन्मय होऊन ऐकत होते. ती थांबताच वीणा "कोकिलकंठ!" म्हणाली. त्या पाठोपाठ राजकन्या कोकिळा होऊन तेथून उडून गेली.



    

बैठकीत हजर असलेल्या प्रत्येकाला वीणेचा इतका राग आला की त्यांनी वीणेचा चक्काचूर केला. परंतु तेवढ्यावर राजाचे समाधान झाले नाही. राजाने वीणेचे तुकडे गोळा करून ते जाळून भस्म केले. परंतु आश्चर्य म्हणजे वीणेच्या मुळे ज्यांचे ज्यांचे रूप पालटले होते त्यांना पुन्हा स्वतःचे रूप प्राप्त झाले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा! साक्षात् सरस्वतीने दिलेली ती वीणा होती. परंतु कांतिवर्माला किंचित देखील तिचा उपयोग झाला नाही. या उलट राजाला इतके कष्ट सहन करावे लागले त्याला आतां काय म्हणावे?" याचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"कांतिवर्मा हा संगीतशास्त्राचा चाहाता होता, असे दिसून [illegible] दारू प्यायची संवय झाली की दारूड्या जसा स्वतःला आवरू शकत नाही व मिळेल ते पितो तसा कांतिवर्मा गाणे येते असे म्हणणाऱ्या प्रत्येकाकडून गाणे म्हणवून घेई व कंटाळा आला तरी, आता कोणाचे गाणे ऐकणार नाही असे ठरवूही शकला नाही. संगीताचा चाहाता चांगले गाणेच ऐकतो.. त्याला स्वप्नात दिसली ती सरस्वतीच होती असे मानले तर तिने त्याला ज्ञानोदय व्हावा यासाठी ती वीणा दिली होती. कारण श्रोत्रेंद्रिय हेच उत्तम किंवा सुमार गाण्याची कसोटी लावण्यास पुरेसे असते. उच्च किंवा कमी प्रतीच्या गाण्याची व गळ्याची कसोटी पहायला कृत्रिम साधने कुचकामाचीच असतात, ही गोष्ट कांतिवर्माला शेवटी कळली असली पाहिजे."

अशा प्रकारे राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# स्वर्गप्राप्तीचा मार्ग

छोटू मंगलपूर गावाच्या वेशीवर पोचला तेव्हा त्याला एक विचित्र दृश्य पहायला मिळाले. गावाला लागून जी शेते होती त्यांत पेरणी झाली होती, परंतु काही दम पिकात दिसत नव्हता. जमिनीला चिरा व भेगा पडू लागल्या होत्या. पीके वाळून चालली होती. परंतु त्याला लागून एक तलाव होता त्यात मात्र काठापर्यंत तुडुंब भरलेले पाणी होते!

आणखी थोडे अंतर चालून गेल्यावर छोटूला आणखी एक विचित्र गोष्ट पहायला मिळाली. एका जागी चिंचेची, आंब्याची वगैरे मोठमोठी झाडे होती. त्यांना आळी करून काही लोक केळीच्या मळ्याला पाणी लावतात तसे पाणी लावीत होते!

"या गावच्या लोकांची डोकी फिरली तर नाहीत?" मनाशी म्हणत छोटूने अभावी काम करीत असलेल्या लोकांना जाऊन शेतात विचारले–"काय हो? एका बाजूला पाण्याच्या अभावी पिके वाळून जात आहेत तर दुसरीकडे चिंच, आंबा या सारख्या मोठमोठ्या झाडांना पाणी लावत आहेत हे काय? तळ्यात एवढे पाणी असतां पीके वाळून जाण्याचे दुर्दैव कां नशिबी यावे तुमच्या सर्वांच्या?"

शेतकरी म्हणाले–"तलावातले पाणी आमच्या शेतात कसे येणार हो? हे तळे जमिनदाराचं आहे व शेते आमची आहेत. ती चिंचेची, आंब्याची झाडे सुद्धा जमिनदाराचीच आहेत. देवाच्या कृपेने चुकून कधी पाऊस पडला तरच आमच्या शेतात पिके पिकणार! आमचं भाग्य, आणखी काय?"

छोटूला भयंकर राग आला. म्हणाला– "तुम्ही आहांत खुळे. तळे असेल जमिन-



[illegible] त्या तांब्यातून काय फेकून टाकता आहां?"

संन्यासी स्मित करून म्हणाला—"होय रे, बाबा! मी तांब्यात ताजे पाणी मिळावे म्हणून खटपट करतो आहे. परंतु या तळ्यातले बरंचसं पाणी शिळेच दिसतं आहे. मी त्या लोकातून इतका दूर चालून आलो ती माझी मेहनत फुकट गेली. का म्हणून नाही विचारलेस? आकाशात लोंब कळत असलेल्या एका पापी माणसाला स्वर्गांत पोचवायचं आहे, त्यासाठी ताजं पाणी हवं आहे!"

जमिनदाराचे औत्सुक्य थोडे वाढले. त्याने छोटूला तेथून जाऊ न देता विचारलं— "काय हो, आकाशात कोणी पापी लोंबकळतो आहे, म्हणतां? आणि त्याच्यासाठी ताजं पाणी? त्या पाप्यासाठी या तलावाच्या पाण्याची का गरज वाटली? त्या लोकांतून तुम्ही चालत येण्याचं कारण? कृपा करून सविस्तर सांगाल का?"

उत्तरादाखल छोटू म्हणाला—"मी परलोकवासात राहतो. स्वर्गांतून आलो आहे. या तलावाचा मालक रामचंद्र बहाद्दुर स्वर्ग किंवा नरक या दोन्हीपैकी एकातही न जातां आकाशात लोंबकळतो आहे. फार कष्टात आहे विचारा! त्याचा बाप रावबहाद्दुर स्वर्गातून आपल्या मुलाच्या यातना पाहून दु:खी होतो आहे. या तळ्यातले ताजे पाणी आणून मुलावर प्रोक्षण केले तर त्याचा उद्धार होईल, असे देवांना सांगून त्यांच्या परवानगीने त्याने मला या कामासाठी इकडे पाठविले आहे. परंतु आतांचा जमिनदार फार मोठा पापी आहे, म्हणे! तळ्याखालची शेते वाळून चालली असूनही त्याने गेल्या वर्षी तळ्याचं पाणी सोडलं नाही, म्हणून तळ्यात शिळं पाणीच राहिलं, ताजं आलंच नाही. आतां त्या पाप्याचा उद्धार कसा होणार?"

जमिनदार भीतीने थरथर कापत म्हणाला—"काय हो, या तळ्याचं पाणी इतकं पवित्र आहे का?"

"या पाण्याचं महत्व तुला काय कळणार? या तळ्याच्या पाण्यात हिमालयातून निघणाऱ्या पवित्र नद्यांचं पाणी येऊन पडत आहे. म्हणून जमिनदाराचे दोन्ही मृतात्मे या पाण्यावरच तर अवलंबून आहेत. राव बहाद्दुरांनी या तळ्याचं पाणी शेजारच्या शेतकऱ्यांच्या शेताला पुरविलं आणि उरलेलं आपल्या शेताला लावलं. आपलं पीक निघालं नाही तरी हरकत नाही, परंतु गरिबाची पिकं निघाली पाहिजेत हे व्रत त्यांनी पाळलं. हे पुण्य करून ते स्वर्गाला गेले. त्यांचा मुलगा राजाराम बहाद्दुर स्वार्थी निघाला. स्वतःचं पोट भरल्यावरच तो इतरांना देत असे. स्वतःच्या शेताला पाणी लावून उरलेलं इतरांच्या शेतात सोडीत असे. म्हणून तो स्वर्गाला गेला नाही व नरकातही गेला नाही. मध्ये लोंबतो आहे. राव बहाद्दुर उत्तम होता, त्यांचा मुलगा मध्यम आणि आतां आहे तो अधम निघाला."

व म्हणाला– मीच तो अधम, स्वामी! आपल्याला पुण्य लाभेल मला स्वर्गप्राप्तीचा मार्ग दाखवा!"

छोटूने जमिनदाराला हात धरून उभे केले व म्हणाला–"घाबरू नकोस, पापभीरूला कसलीच भीती नसते. सर्व पापातून तुला मुक्ती लाभेल. मी सांगतो तसे तू केलेस तर स्वर्गप्राप्तीचा मार्ग तुलाच काय तुझ्या बापालातुद्धा मिळेल! पुण्याचे फळ तुझ्या आजोबांना मिळालं व तुझ्या पापाचं फळ तुझ्या बापाला भोगावं लागत आहे. तू आतां काही पुण्यकार्य केलेस तरच तुझ्या बापाचा उद्धार होईल! पूर्वी तू केलेस ते सर्व विसर व नवीन जीवन सुरू कर. तू यापुढे तळ्याचं पाणी शेतकऱ्यांच्या शेतांना सोडीत जा. पुढे कधीही शेते वाळून देऊ नकोस."

त्यानंतर लौकरच जमिनदाराला एक थोर व उदार दानी म्हणून नावलौकिक मिळाला. त्याच्या तळ्यात दर वर्षी ताज्या पाण्याची भर पडू लागली.





# सोळा हजार रुपये

कांचीवरम नगरी कृष्णमूर्ती नावाच्या एका गृहस्थाला वेंकटेश व शोभनाद्री नावाचे दोन मित्र होते.

कृष्णमूर्तीजवळ वडिलोपार्जित एक घर व आयुष्यभर पुरतील एवढे पैसे होते. ही गोष्ट ओळखूनच दोघे मित्र त्याला चिकटून होते. दोघे त्याला एकदां म्हणाले–"मित्रा, तुझे पैसे नुसते तिजोरीत ठेवलेस तर त्यांचा काय उपयोग? ते भांडवल घालून व्यापार केलास तर एकेका रुपयाचे दहादहा रुपये मिळविता येतील."

कृष्णमूर्ती म्हणाला–"बाबांनो! मला व्यापाराचा अनुभव नाही."

"काही नाही रे! तू भांडवल लाव आम्ही व्यापार व्यवहार सर्व पाहतो." दोघे मित्र म्हणाले.

कृष्णमूर्तीच्या भांडवलावर व्यापार सुरू झाला. मित्रांवर सर्व व्यवहार सोडून देऊन कृष्णमूर्ती घरी स्वस्थ बसून राहिला. दोघां मित्रांनी भांडवल व त्यावर झालेला फायदा सर्व गिळंकृत केला आणि व्यापारात नुकसान झाल्याचे सांगून दिवाळे काढले. आपले धन अपहरण करून दोघांनी प्रत्येकी पांचपांच हजार रुपये बँकेत टाकले असल्याची गोष्ट शेवटपर्यंत कृष्णमूर्तीच्या लक्षात आली नाही आणि कळले तेव्हां दोघांनी मित्रद्रोह केल्याचा त्याला रागही आला नाही. तो पूर्ववत मैत्रीच्या भावनेने त्यांना भेटत राहिला.

पुढे काही दिवसांनी तो आजारी पडला आणि एकदा जी खाट धरली ती शेपटपर्यंत सुटली नाही. आपण या जगात फार दिवसाचे पाहुणे राहिलो नाही, असा विचार करून त्याने शोभनाद्रीकडे भेटायला यायला निरोप पाठविला. तो आल्याबरोबर कृष्णमूर्ती त्याला म्हणाला–"शोभनाद्री! तू माझ्यावर थोडा उपकार करशील का?"



काय रे, कसला उपकार?" शोभनाद्रीने विचारले.

"आता मी किती दिवसाचा पाहुणा राहिलो रे? जाण्यापूर्वी माझं जे आहे ते कोठे आहे हे बायकोला सांगण्याची वेळ आली आहे. परंतु तुला माहीत आहेच, माझी बायको म्हणजे स्वभावाने खर्चिक आहे. पैसे हातात आले की दोन दिवसात त्यांचा फडशा होऊन जाईल." कृष्णमूर्ती म्हणाला.

कृष्णमूर्तीजवळ आणखी पैसे आहेत तर, याची खात्री होताच शोभनाद्रीच्या तोंडाला पाणी सुटले. 'लबाड इतके दिवस कधी बोलला नाही!' असा मनात विचार क[illegible] म्हणालास, बाईच्या हातात पैसा आणि पुरुषाच्या हातात मूल वाढत नाहीत, म्हणतात ते खोटे आहे का?"

व्यापारधंद्यात मी जे घालवून बसलो, त्याशिवाय माझ्याजवळ आणखी सोळा हजारांपर्यंत रक्कम आहे. ते पैसे हजार हजार रुपये याप्रमाणे माझ्या घरातल्या चार खोल्यांत प्रत्येकी चार खड्डे खणून कोपऱ्यात पुरून ठेवले आहेत. परंतु माझ्या बायकोला ही गोष्ट माहीत नाही व कोणाला ती गोष्ट कळू देतां कामा नये. वर उपकार एवढाच कर," असे म्हणत तू माझ्या कृष्णमूर्ती श्वास लागल्यासारखा गप्प झाला.

"बोल रे, बोल!" शोभनाद्री म्हणाला.

"तू मधूनमधून येऊन आमच्या घरची परिस्थिती येऊन पहात जा. माझ्या बायकोला पैशाची गरज भासेल तेव्हां तिला फक्त एका खड्ड्याची गोष्ट सांगून तो खणून त्यातले पैसे वापरायला सांग." कृष्णमूर्ती म्हणाला.

"मी तुम्ही सांगितलेत तसे सर्व करतो. तुम्ही माझ्यावर सोडा आणि निश्चित व्हा." असे सांगून शोभनाद्री निघून गेला.

त्याच दिवशी संध्याकाळी कृष्णमूर्तीने वेंकटेशाकडे निरोप पाठवून त्याला भेटीला [illegible] बोलाविले. त्यालासुद्धा सोळा खड्ड्यात ठेव पुरून ठेवली असल्याचे गुपित सांगून शोभनाद्रीला त्याने सांगितलं होतं तसंच सांगून म्हणाला–"तू माझ्यावर एवढी कृपा कर आणि हे गुपित शोभनाद्रीलासुद्धा सांगू नकोस. त्याच्यावर माझा विश्वास नाही, म्हणून तर मी तुला बोलावून सांगितले."

"त्याच्या कानापर्यंत ही गोष्ट मी कां जाऊ देईन. तू अगदी बेफिकीर रहा. मी सर्व पाहून घेतो." असे त्याने अगदी विश्वासाच्या शब्दात सांगितले.

कृष्णमूर्ती वारल्यानंतर पुढे काही दिवसांनी कृष्णमूर्तीची बायको रुक्मिणी शोभनाद्रीकडे जाऊन म्हणाली–"भाऊजी, मला पैशाची फार गरज आहे हो! पंचवीस रुपये देता का? मागाहून परत करीन."

"माझ्याजवळ कोठे आहेत हो पैसे वहिनी? शिवाय तुम्ही असे कर्ज काढून किती दिवस काढणार? तुम्ही आपलं घर विकलंत तर एक हजार रुपये सहजी मिळू शकतील. तसं करायला काय हरकत आहे?" शोभनाद्री म्हणाला.

"मला ही गोष्ट सुचलीच नाही. विकायचं ठरविलं तर रात्री ठरवून मी उद्यां तुम्हांला सांगते." ती म्हणाली.

इकडे दोघांचं हे बोलणं झालं आणि कर्मधर्मसंयोगाने रात्री वेंकटेश सवयीप्रमाणे



कृष्णमूर्तींच्या घरी चौकशीला गेला. तेव्हां कृष्णमूर्तींच्या बायकोने शोभनाद्री म्हणाला ते सांगून विचारले–"काय हो एक हजार रुपये कमी नाहीत का?"

वेंकटेश म्हणाला–"एक हजारच? तुम्ही विकायचंच ठरविलंत तर मी पंधराशे द्यायला तयार आहे!"

दुसऱ्या दिवशी कृष्णमूर्तींच्या बायकोने वेंकटेश म्हणाला ते शोभनाद्रीला सांगितले. "मी दोन हजार देतो!" तो म्हणाला.

सोळा हजार रुपये या घरात पुरून ठेवलेले आहेत. दोन हजार रुपये दिल्यास आपले काहीच नुकसान नाही. फुकटात चवदा हजार पदरात पडतील. परंतु नेहमी-

प्रमाणे वेंकटेश संध्याकाळी आला. त्याने अडीच हजार द्यायचे कबूल केले. अशातऱ्हेने त्या दोघांची चढाओढ दररोज होत राहली, जणुकाही लिलावाची बोलीच चालू होती. शेवटी शोभनाद्री दहा हजार रुपये द्यायला तयार झाला. दहा हजार गेले तरी हजार तरी मिळतीलच, या विचाराने.

रुक्मिणी इतकी वेडी नव्हती. वेंकटेश आणखी किंमत वाढवतो का विचारून पहायचं तिने ठरविलं.

वेंकटेशने किंमत वाढविली नाही. तो शोभनाद्रीला भेटून म्हणाला–"काय रे, तू त्या घराला दहा हजार द्यायला तयार झाला आहेस, म्हणे! तुला त्यात काय मिळणार आहे रे?"

"तू तरी तुला काय मिळणार म्हणून एवढी किंमत वाढविलीस रे?" शोभनाद्रीने टोमणा मारला.

दोघे परस्परांकडे डोळे मिचकावीत स्मित करून पाहू लागले. खरे गुपित दुसऱ्याला कळले वाटते म्हणून दोघांपैकी प्र[illegible] शोभनाद्रीला म्हणाला–"तू दहा हजार कोठून आणणार रे? तुझ्या नावावर बँकेत पांचच हजार तर आहेत?"

"तुझ्या नावावरसुद्धां पांच हजारच आहेत ना बँकेत? ती रक्कम मला कर्जाऊ दे. एका आठवड्याने परत करतो." शोभनाद्री म्हणाला.

"ते नाही जमणार. तुझे पांच हजार व माझे पाच हजार देऊन ते घर आपण दोघे आपल्या दोघांच्या नावावर लिहून घेऊ या." वेंकटेश म्हणाला.

"मान्य आहे मला!" शोभनाद्री म्हणाला.

कृष्णमूर्तीला फसवून त्यांनी मिळविलेले पाचपाच हजार रुपये रुक्मिणीला आणून देऊन त्यांनी घर आपल्या दोघांच्या नावावर लिहून घेतले.

त्यानंतर दोघे एक कुदळ घेऊन घरातला एक कोपरा खणू लागले. परंतु किती खणलं तरी हुंडा किंवा ठेव सांपडली नाही.





# च्यवन

च्यवन हा भृगू ऋषी व पुलोमा यांचा मुलगा होता. त्याने घोर तपश्चर्या केली व दीर्घकाल तपश्चर्या करीत असतां वृद्ध झाला. त्याच्या अंगावर व चारी बाजूला एक वारूळ झाले.

वैवस्वत मनूचा मुलगा शर्याती सपरिवार व सुकन्या नामक आपल्या मुलीसह बन-विहार करीत च्यवन तपश्चर्या करीत होता त्या जागी आला. च्यवन तपश्चर्या करीत होता त्या वारुळातून ज्योतीची किरणे येत असलेली पाहून सुकन्येने वारुळ खणविले.

तपोभंग झाल्यामुळे च्यवनाला राग आला व त्याने सुकन्येला व तिच्या बापाला शाप दिला. शर्यातीने च्यवनाजवळ क्षमा मागून अबोध मुलीला क्षमा करण्यास विनंती केली. "तू आपल्या मुलीचे लग्न माझ्याशी करून दिल्यास मी शाप मागे घेतो," असे च्यवन म्हणाला. निरुपाय होऊन शर्यातीने म्हाताऱ्या च्यवनाशी अबोध सुकन्येचे लग्न करून देऊन शापमुक्ती मिळविली.

च्यवन भयंकर रागीट स्वभावाचा असूनही सुकन्येने पतीची सेवा करून त्याच्याकडून शाबासकी मिळविली.

एकदा अश्विनीकुमार च्यवन ऋषीच्या आश्रमावरून उडत जात असतां त्यांना सुकन्या दिसली. ते तिला म्हणाले–"हे तरुणी, तू या तरुण वयात या म्हाताऱ्या-बरोबर संसार करते आहेस, हे कसे काय? आम्ही तुझे एका तरुणाशी लग्न करून देतो."

सुकन्येने ती गोष्ट च्यवन ऋषींना जाऊन सांगितली. च्यवन ऋषी न रागवतां सुकन्येला म्हणाले–"ते म्हणतात तसे कर." च्यवन अश्विनीकुमारांना म्हणाले–"तुम्ही मला तारुण्य प्राप्त करून दिलेत तर मी शर्याती यज्ञ करीत आहे त्यात तुम्हांला सोमपान करण्यास संधी देईन."

अश्विनीकुमारांनी च्यवनाला शेजारच्या एका सरोवरात बुडी मारायला सांगितले. त्याने बुडी मारल्यावर अश्विनीकुमार दोघांनी त्या सरोवरात बुडी मारली. त्यानंतर सरोवरातून तिघे तरुण बाहेर आले. तिघे दिसायला सारखे होते. ते सुकन्येला म्हणाले–"तू आमच्यापैकी वाटेल त्याची निवड कर." गंमत अशी की सुकन्येने च्यवनाचीच निवड केली.

तिकडे शर्यातीने यज्ञाची सर्व तयारी केली व मुलीला आणि जावयाला बोलावून घेऊन जायला च्यवन ऋषींच्या आश्रमाकडे आला. परंतु आपल्या मुलीला एका तरुणाबरोबर पाहून, व आपल्या मुलीने असले हीन कर्म केल्याचे वाटून त्याचे मन फार दु:खी झाले.

परंतु सुकन्येने घडलेले वृत्त थोडक्यात सांगून पित्याच्या मनातली शंका दूर केली. त्यानंतर च्यवन ऋषींनी शर्यातीच्या यज्ञात मुख्य पुरोहित होऊन अश्विनीकुमारांना यज्ञभाग दिला. अश्विनीकुमारांसारख्या क[illegible] देविल्याबद्दल इंद्राला राग आला. त्याने च्यवनावर वज्रायुध उगारले परंतु च्यवनाने आपल्या मंत्रबलाने इंद्राचा हात जागच्या जागी थांबविला. त्यानंतर च्यवनाने इंद्रावर कृपा करून त्याच्या हातावर टाकलेला मंत्र मागे घेतला.

एकदां च्यवन गंगा व यमुना नद्यांच्या संगमावर स्नान करीत होते. तेव्हां कोळ्यांनी मासे धरण्यासाठी जाळे टाकले होते त्यात ते अडकले. कोळ्यांनी च्यवनाची क्षमा मागितली. परंतु ते म्हणाले–"तुमच्या जाळ्यांत जे काही आलं ते तुमचं धन, तुमची मिळकत आहे. तेव्हां मला माशांबरोबर विकून टाका."

कोळी च्यवनाला नहुष राजाकडे घेऊन गेले आणि त्याची किंमत द्यायला विनंती केली. ब्राह्मण हा गाई इतका पवित्र आहे तेव्हां तीच त्याची किंमत आहे असे सांगून नहुष राजाने कोळ्याला एक गाय देऊन निरोप दिला.



## परशुराम

एकदां हैहय वंशीय राजा कार्तवीर्य रानात शिकारीला गेला असतां तेथे जमदग्नीमुनींचा आश्रम पाहून शक्तिमदाने त्याने तो उध्वस्त केला.



त्यावेळी जमदग्नीचा मुलगा परशुराम आश्रमात नव्हता. आश्रमात परतल्यावर घडलेला वृत्तांत त्याला कळला. तो संतापून सरळ कार्तवीर्याच्या राजवाड्यात गेला व त्याने आपल्या परशूने त्याचा शिरच्छेद केला.





दुसऱ्या दिवशी कार्तवीर्याचे मुलगे जमदग्नीच्या आश्रमात शिरले व तो तपश्चर्या करीत असतां त्यांनी त्याचा वध केला. त्यावेळीसुद्धा परशुराम तेथे नव्हता.



तो वृत्तांत कळल्यावर परशुरामाने आपल्या परशूने कार्तवीर्याच्या सर्व पुत्रांचा शिरच्छेद केला. परशुराम ब्राह्मण होता. त्याच्या समोर क्षत्रियांचा पाडाव लागला नाही.

आपल्या वडिलांचा असा अमानुष वध क्षत्रियांनी केलेला पाहून परशुरामाला इतका राग आला की त्याने सर्व क्षत्रियांना दोषी ठरवून क्षत्रिय जातीचे निर्मूलन करण्याचे ठरविले.





त्यानंतर परशुरामाने एकवीस वेळा क्षत्रिय वंशाचे शिरकाण केले आणि क्षत्रियांच्या रक्ताच्या रक्तरंजित तलावात पित्याचे तर्पण करून त्याचा आत्मा शांत केला.

त्यानंतर त्याने एक मोठा यज्ञ केला आणि त्याने क्षत्रियांचा वध करून जे भूमंडळ जिंकले होते ते कश्यप मुनींना दान केले आणि स्वतः महेंद्र पर्वतावर तपश्चर्या करण्यासाठी निघून गेला.





अशा तऱ्हेने क्षत्रियांचा संहार तर झाला, परंतु राक्षसांचा अत्याचार मात्र चालूच राहिला. ते त्रिलोकातल्या प्रजेला नाना तऱ्हेने त्रास देत होते.

परशुरामाला ती गोष्ट कळली तेव्हा त्याने शंकराचे स्मरण करून राक्षसांचा संहार करण्यासाठी आवश्यक अस्त्रे संपादन केली आणि महेंद्र पर्वतावरून खाली आला.





शंकराच्या कृपेने संपादन केलेल्या अस्त्रांनी परशुरामाने राक्षसांचा सर्वनाश केला आणि अशा तऱ्हेने जगाला राक्षसांच्या त्रासांतून मुक्त केले.



श्रीरामाने, जनकराजाने रचलेल्या सीतास्वयंवर प्रसंगी शिवधनुष्य भंग केले व सीतेशी विवाह करून मिथिलेहून परत अयोध्येला निघाला.



त्यावेळी परशुरामाने रामाला अडवून त्याला आव्हान केले की त्याने विष्णु धनुष्यावर दोरी चढवून दाखवावी. रामाने सहज दोरी चढवून त्यावर बाण धरला. तेव्हां परशुरामाला कळले की रामावतार सुरू झाला आहे. त्याने आपल्या सर्व शक्ती श्रीरामाला देऊन मनाचे समाधान दर्शविले.



# गरुड

कश्यपाची बायको विनता; तिच्या मुलाचे नाव गरुड होते. कश्यपाची दुसरी बायको कद्रू, तिची मुलं, म्हणजे नाग. गरुड त्यांची सेवा करी. एकदा गरुड नागांना पाठीवर बसवून आकाशात उडत असता उन्हाचा ताप असह्य झाल्यामुळे नाग तडफडून खाली पडले. तेव्हां कद्रू गरुडाला खूप रागावून वाटेल ते बोलली.

गरुडाने आपल्या आईला जाऊन विचारले—"आई, माझ्या अंगात एवढी शक्ती असतां, मी माझ्या सावत्र आईची व तिच्या मुलांची चाकरी कां ग करायची?" तेव्हां विनता म्हणाली—"बाळा, एकदां मी कद्रू बरोबर पैज लावली व त्यात हारले. म्हणून तुला व मला तिची चाकरी करावी लागते आहे."

त्यानंतर गरुडाने कद्रूला विचारले—"मला व माझ्या मातेला तू आपलं दास्यत्व करायला लावणे आम्हांला बिलकुल मान्य नाही. आम्हांला या दास्यातून तू मुक्त कर." तेव्हां कद्रू त्याला म्हणाली—"जर तू मला अमृत आणून देशील तर मी तुम्हांला दास्यमुक्त करीन."

गरुडाने कद्रूची ती अट मान्य केली व तो आपल्या मातेचा निरोप घेऊन देवलोकात गेला. तेथे देव अमृताचे रक्षण करीत होते. अमृत पात्राच्या चारीबाजूला धगधग विस्तव जळत होता व त्याच्यावर एक चक्र फिरत होते. शिवाय दोन मोठे नाग अमृतपात्राच्या रक्षणार्थ नेमलेले होते.

गरुडाने अमृताचे रक्षण करण्यासाठी बसलेल्या पाहरेकऱ्यांशी युद्ध करून त्यांचा वध केला, विस्तव विझविला आणि खूप सावधपणे चक्राखालून अमृतपात्राजवळ जाऊन तेथल्या नागांना ठार केले. तो पात्र घेऊन परत आला. इंद्राला ती

बातमी कळल्यावर त्याने गरुडावर आपल्या वज्रायुद्धाचा प्रहार केला. त्या प्रहारामुळे गरुडाचे एक पीस गळून पडले. गरुडाशी युद्ध करून त्याला जिंकणे अशक्य असल्याचे इंद्राला कळले. तेव्हां त्याने गरुडाशी सलोख्याची बोलणी करून त्याला विनविले की त्याने अमृत कोणाला देऊ नये.

गरुड म्हणाला–"मी आपल्या मातेला व स्वतःला दास्यमुक्त करून घेण्यासाठी अमृत कद्रूच्या मुलांना द्यावेच लागेल. परंतु ते प्राशन करण्यापूर्वीच मी ते त्यांच्या हातातून हिसकावून परत आणीन."

वचन दिल्याप्रमाणे गरुडाने दर्भ अंथरून त्यांवर अमृतपात्र ठेवले आणि आपल्या सावत्र आईच्या तोंडी विनता व तो दास्य-मुक्त झाल्याचे वदविले. नंतर नाग अमृतपान करायला घाईघाईने पुढे सरकले, त्याच वेळी गरुड अमृतपात्र उचलून देवलोकात निघून गेला. अमृत दर्भांवर पडले असेल असे समजून नाग दर्भ चाटू लागले. म्हणून त्यांच्या जिभा चिरल्या गेल्या.

गरुडाच्या पराक्रमाची देवांनी प्रशंसा केली. श्री विष्णूने गरुडाला आपले वाहन होण्यास सांगितले आणि इंद्राने गरुडाला वर दिला की नाग गरुडांचा आहार होतील.

इंद्राचा सारथी मातली त्याची मुलगी गुणकेशी हिचे लग्न सुमुख नामक एका नागकुमारशी करण्याच्या विचारात होता. गरुडाने सुमुखाचा वध करण्याची प्रतिज्ञा केली असल्याचे मातलीला कळले. तेव्हां तो इंद्राकडे व विष्णूकडे धावला व सुमुखाला चिरंजीव करावे, अशी विनंती केली. इंद्राने त्या गोष्टीस होकार दिला. गरुडाला त्या गोष्टीचा राग आला व तो इंद्रावर चालून जायला तयार झाला. विष्णूला ते आवडले नाही व गरुडाचा गर्व भंग करण्यासाठी म्हणाला–"ओहो, तुझ्या अंगात बरीच शक्ती आहेसे दिसते. पाहू दे तरी!" असे म्हणत विष्णूने आपला हात गरुडाच्या पाठीवर ठेवला. गरुडाला त्याचे वजन पेलणे अशक्य झाले. त्याचा गर्व भंग झाला.





# रूपमतीचा विवाह

नंदीनी नावाच्या एका नदीच्या काठावर पन्नास मैलांच्या अंतरावर रुद्रपूर व देवगिरी नामक दोन राज्ये होती. रुद्रपूरची राजकन्या रूपमती हिच्याशी देवगिरीचा राजा देवपाल याचा विवाह झाला. परंतु त्यांना बरीच वर्षे मूलबाळ झाले नाही तेव्हा राजाच्या हितैषी वृद्ध मंडळींनी सल्ला दिल्यावरून देवपालाने कालिंदी नावाच्या एका बाईशी लग्न करून घेतले. कालिंदी ही दुष्ट व ईर्ष्याळू स्वभावाची होती.

एकदा देवपाल शिकारीसाठी अरण्यात गेला असता घोडा बिथरला आणि राजाला जंगलातल्या एका निर्जन स्थानी घेऊन गेला. सुदैवाने काळोख पडण्याआधी राजाला एक झोपडी दिसली. त्या झोपडीत एक योगी रहात असे. त्या योग्याने राजाला आपल्या झोपडीत बोलावून त्याचा योग्य तो अतिथिसत्कार केला. राजाला मूलबाळ नसल्याचे ऐकून त्या योग्याने राजाला एक सोन्याचा सर दिला व म्हणाला–"हा सर आपल्या मोठ्या राणीच्या गळ्यात घाल व तो कधी काढू नकोस असे तिला सांग. ती यथासमयी गरोदर होऊन तिला मुलगा होईल. मुलगा झाल्यावर हा सर त्या मुलाच्या गळ्यात घाल. कोणत्याही परि-स्थितीत तो गळ्यातून काढता कामा नये, असे त्याच्या आईला व पुढे मोठा झाल्यावर त्याला सांग. गळ्यातून काढताच तो मृतवत होईल आणि पुन्हां गळ्यात घातल्यावरच तो उठून उभा राहील."

देवपालने परतल्यावर तो सोन्याचा सर रुपमतीच्या गळ्यात घातला. योग्याने सांगितल्याप्रमाणे ती यथासमयी गर्भवती होऊन तिला मुलगा झाला. परंतु त्या मुलाच्या अंगात जीव, असावा असे वाटले नाही. परंतु रुपमतीने गळ्यातला सर



काढून मुलाच्या गळयात घालताच तो रडला व तो जिवंत असल्याचे सिद्ध झाले.

आपली सवत गरोदर असल्याचे कळले त्या दिवसापासून कालिंदीच्या मनात कालवाकालव सुरू झाली. तिला नवऱ्याचा राग आला होता. धाकट्या राणीच्या मनात पेटलेला ईर्ष्याग्नी ओळखून देवपालने तिच्या हातून मुलाच्या जिवाला कोणत्याही प्रकारचा अपाय होऊ नये यासाठी सर्व उपाय केले. त्याने मुलाचे नाव गोपालकुमार या ऐवजी गोलापकुमार असे ठेवले.

गोलाप आपल्या सावत्र आईच्या जवळ कधी गेला नाही आणि अठरा वर्षांचा झाला.

त्याच सुमारास देवपालाला देवाज्ञा झाली. सर्व राजवाडा शोकमग्न असतां आणि सर्व मंडळी राजाच्या अंत्येष्टीच्या कामात गुतली असतां गोलापच्या संरक्षणाकडे थोडे दुर्लक्ष झाले. अशा समयी कालिंदीने एकदां रात्री तो झोपला असतां त्याच्या गळयातून तो सर काढून घेतला आणि तो मृतवत झाल्याची खात्री करून घेऊन तिने "सांप, सांप! असा ओरडा केला. गोलापला मृतवत् पडलेला पाहून तो सांप चावून मेल्याचेच सर्वांना वाटले.

दुसऱ्या दिवशी कालिंदीने मंत्र्याला गोलापचे सर्व अंत्यविधी उरकून टाकायला सांगितले. नवरा गेल्याच्या दुःखापाठोपाठ पुत्रशोकाने दुःखी झाली असूनही रुपमतीने मुलाच्या गळयात तो सोन्याचा सर नसल्याचे पाहिले व मंत्र्याला, मुलगा मेला नसून जिवंत असल्याचे सांगून हे सर्व काम कालिंदीचे असावे असे समजावून सांगितले. मुलगा कृत्रिम कारणाने मृतवत पडला असल्याची मंत्र्याची खात्री झाली. मंत्र्याने सोन्याच्यासर नसल्याचे कालिंदीला सांगितले, परंतु तिने तिला काहीच माहीत नसल्याचे सांगितले.

मंत्र्याने कालिंदीला समजावून सांगितले की मुलगा साप चावून मेला असल्याचे लोकांना खरे वाटत नाही. म्हणून त्याचा दहन संस्कार रात्री केव्हातरी उरकून

गुप्तपणे उरकून घ्यायला कबूल झाली.

मध्यरात्रीच्या सुमारास मंत्र्याने आपल्या खास विश्वासपात्र नोकरांच्या मदतीने गोलापचा देह व गोलापची आई दोघांना नावेत बसविले आणि प्रवाहाच्या दिशेने पन्नास मैलावरच्या देवगिरीला पाठवून दिले दहनक्रिया न झाल्याचे कालिंदीला कसंतरी कळेल या भीतीने मंत्र्याने तिला पहाटेच जागी करून तिला सांगितले की "राणी, मुलाचा देह नावेत दहन क्रियेसाठी पलीकडच्या तीरावर नेत असतां एकाएकी नाव बुडाली आणि राजकुमाराचा देह व राणी रूपमती वाहून गेल्याचे बरोबर पाठविलेल्या लोकांनी सांगितले."

राणीने घाबरून जाऊन हुकूम केला की त्यांची प्रेते हुडकून काढण्यासाठी सर्व नदीचे पाणी चाळून काढा.

"आतांपर्यंत प्रेते समुद्रात पोचली असतील! पाणी चाळून काढले तरी काय उपयोग?" मंत्री म्हणाला.

आपल्या डोळयासमोर गोलापच्या अस्थी नदीत न पडलेल्या कळल्यामुळे कालिंदी निराश झाली.

तिकडे राणी रूपमती मुलाचा देह घेऊन रुद्रपूरला पोचली व तिचा मोठा भाऊ चंदन याला भेटून घडलेले वृत्त सांगितले.



चंदनला सावित्री नावाची एक मुलगी होती. तिचे व गोलापचे लग्न फार पूर्वीच ठरलं होते. मृतवत गोलापचा देह पाहून तिला फार वाईट वाटलं. परंतु दुःखावेग थोडा ओसरल्यावर तिने कालिंदीजवळचा सोन्याचा सर काहीतरी युक्ती करून आणण्याचे आणि गोलापला वाचवून आपले 'सावित्री' हे नाव सार्थक करण्याचे ठरविले. तिने रूपमतीकडून तो सोन्याचा सर कसा होता हे चांगले सविस्तर विचारून घेतले आणि अगदी तसाच दुसरा सोन्याचा सर करवून घेऊन ती स्वतःच्या नावेत बसून देवगिरीला आली. राजवाडयातल्या सर्व परिस्थितीची



चांगली चौकशी केली. कालिंदीच्या गुड-घ्याला कसला तरी फोड झाला असल्याचे व राजवैद्याने औषधपाणी करून हात टेकले असल्याचे तिला कळले.

आतां कालिंदीला सांत्वनेचा एक शब्द बोलणारा राजवाड्यात कोणी नव्हता. राजवैद्याने केलेल्या औषधोपचारामुळे तिचा फोड बरा होण्या ऐवजी वाढत गेला.

सावित्री आपलं काम साधण्यासाठी कोणतातरी एक लेप तयार करून घेऊन आणि फोड व जखमा बऱ्या करण्यात प्रवीण असे सांगून राजवाड्यात गेली. कालिंदीने तिला आत बोलावून घेतले. सावित्रीने कालिंदीची जखम पाहिली व म्हणाली–

बऱ्या केल्या आहेत. जखमेची खूण सुद्धा राहणार नाही, अशी औषधे माझ्याजवळ आहेत."

"तू माझी ही जखम बरी केलीस तर तू मागशील ते मी तुला देईन." कालिंदी म्हणाली.

सावित्रीने कालिंदीच्या गळ्यातला तो सर लक्षपूर्वक पाहिला. रूपमतीने सांगितले होते अगदी तसाच होता तो. सावित्रीने तयार करून बरोबर आणलेला सर सुद्धा जवळजवळ त्याच्या सारखाच होता.

सावित्री कालिंदीच्या हातातल्या सोन्याच्या बांगड्या दाखवून म्हणाली– "राणी सरकार, माझी चिकित्सा चालू असेपर्यंत अंगावर कोणत्याही धातूचा दागिना असतां कामा नये. या बांगड्या, अंगठ्या वगैरे सर्व काढून ठेवा."

कालिंदीने सोन्याच्या बांगड्या अंगठ्या वगैरे सर्व दागिने काढून ठेवले. परंतु गळ्या-तला तो सर मात्र काढला नाही. सावित्रीने ते पाहिले, पण काही बोलली नाही. तिने कालिंदीच्या पायाला लेप लावला आणि परत आपल्या नावेत गेली.

दुसऱ्या दिवशी सावित्री आली तेव्हां कालिंदी म्हणाली–"तुझ्या औषधाचा मुळीच परिणाम झालेला दिसत नाही की?"

पाहिले व म्हणाली–"ते गळ्यात काय आहे हो?" असे म्हणत जवळ जाऊन कालिंदीच्या गळ्यातला तो सर स्वत: काढून म्हणाली–"हे सोने अंगावर असतां औषधाचा फायदा कसा होईल?" असे म्हणत आपल्या पिशवीतून एक कागदाची पिशवी काढून तीत तो सर ठेवला व नाडीने पिशवीचे तोंड घट्ट बंद करून पिशवी आपल्या शेजारी ठेवून दिली.

सावित्रीने केले ते अर्थातच कालिंदीला मुळीच आवडले नाही. सावित्रीच्या हाती आपल्या जखमेवर लेप लावून घेत असतां तिची नजर सारखी त्या पिशवीवरच होती.

सावित्री औषध लावण्याचे काम पुरे झाल्यावर कागदाची पिशवी आपल्या औषधांच्या पिशवीत ठेवीत म्हणाली– "आतां पहा, माझ्या औषधाचा गुण!"

"माझा सर? तू तो काढून ठेवला आहेस ना?" कालिंदीने थोड्याशा करड्या स्वरात विचारले.

"राणी, सरकार! ही सामान्य कृपा आपली माझ्यावर होणार नाही का?" अगदी भोळ्यासारखी सावित्री म्हणाली.

"जखम बरी झाल्यावर तू मागशील ते मी देईन. तोंपर्यंत हा सर माझ्याजवळच राहू दे." राणी म्हणाली.



"म्हणजे तुमचा माझ्या औषधावर विश्वास नाही तर? नाही तर नाही!" असे म्हणत सावित्रीने कागदाची पिशवी काढली व नाडी सोडण्याचे सोंग केल्या-सारखे करून व ती सुटत नसल्यासारखे दाखवून आणि चिडल्याचे सोंग करून कागदाचा खालचा भाग फाडला. त्या-बरोबर सर खाली जमिनीवर पडला. तो उचलून शेजारी उभी असलेल्या एका दासीच्या हातात देऊन व फाड-लेल्या कागदाचे तुकडे गोळा करून आपल्या पिशवीत ठेवले व आपल्या नावेकडे निघून गेली. ती लगेच रुद्रपूरला निघून गेली.

वास्तविक सावित्री ज्या कामासाठी आली होती ते काम झाले होते. गोलापच्या गळ्यातला सर तिला मिळाला होता. तिने कालिंदीचा म्हणून परत केलेला सर नकली होता. सावित्रीजवळच्या कागदाच्या पिशवीत आणखी एक लहान पिशवी होती. दोन्ही पिशव्यांची तोंडे एकच असल्या–कारणाने कालिंदीकडून घेतलेला सर आतल्या पिशवीत पडला. खालच्या पिशवी–तला सर नकली होता व तो आधीच घालून ठेवलेला होता. त्या पिशवीचा खालचा भाग फाडल्याबरोबर तो नकली सर खाली पडला. तो कालिंदीच्या हातात दिला तर ती कदाचित ओळखेल या हेतूने सावित्रीने दासीच्या हातात दिला. सावित्रीने आपला सर ठेवून घेतला नाही एवढी खात्री राणीला झाली. औषधाचा गुण पडावा म्हणून तिने लगेच तो मागून घेतला नाही.

सावित्रीने परत आपल्या घरी पोचल्यावर कोणाला काही सांगितल्या शिवाय तिचा विवाह गोलापच्या मृतदेहाशी करून द्यावा [illegible] मान्य झाली नाही. "गोलाप पुनर्जीवित होण्यासारखा आहे की नाही हे कळले तर लग्न करता येईल", असे म्हणाले.

"ते माझे पती झाले तर मी आपल्या पातिव्रत्याच्या बळाने सत्यवानासारखा त्यांना पुनर्जीवित करीन." सावित्री म्हणाली.

सावित्रीचे लग्न एका निष्प्राण व्यक्तीशी झाले. सावित्रीने आपल्या आतेच्या हाती, म्हणजे रूपमतीच्या हाती गळ्यात मंगळसूत्र बांधून घेतले आणि बरोबर आणलेला सर गोलापच्या गळ्यात घातला. लगेच गोलाप उठून बसला.

त्यानंतर काही दिवसांनी गोलाप आपल्या आईला व बायकोला बरोबर घेऊन एकाएकी देवगिरीला आला. कालिंदीला स्वतःच्या डोळ्यांवर विश्वास होईना. परंतु तिने सावित्रीला ओळखले. सर्व खरी वस्तुस्थिती कळण्यापूर्वीच नव्या राजाने, म्हणजे गोलापने कालिंदीला जन्मठेप शिक्षा सांगून तिला तुरुंगात टाकले.





# औदार्याचे ढोंग

हरिपूर येथे रंगनाथराव नावाचे एक श्रीमंत गृहस्थ रहात असत. त्यांच्याकडून कर्ज घेणारे गावात मोजकेच लोक होते. स्वतः चिकट लोभी असून औदार्याचे सोंग व ढोंग करण्यात ते हुशार होते.

त्या गावी एक हरिकीर्तनकार आले व रंगनाथरावांना भेटून गावात एक कीर्तन ठेवावे अशी विनंती केली. कीर्तनकाराला चार दिवस खेपा घालवून त्यांनी कीर्तनाची काही एक व्यवस्था केली नाही. कीर्तनकाराने दुसऱ्या एका गावी जे चार पैसे मिळवून आणले होते ते देखील खर्च होऊन गेले. उद्याचा दिवस कसा जाणार या काळजीत कीर्तनकार रंगनाथरावांना म्हणाला– "आजचा शिधा देवविण्याची व्यवस्था केलीत तर कृपा होईल."

नेमका त्याच वेळी त्यांच्याकडे सोनूशेट नावाचा एक वाणी कर्जाऊ पैसे मागायला म्हणून आला. रंगनाथरावांनी त्याची हरिकीर्तनकाराशी ओळख करून दिली व म्हणाले–"हे एक विद्वान कीर्तनकार आहेत. यांच्या कीर्तनाची व्यवस्था झाली पाहिजे आणि आजचा शिधा तुम्ही द्यायचा !"

सोनूशेटने होकारार्थी मान हलविली, आणि कर्जाची रक्कम घेऊन निघाला. कीर्तनकार अर्थातच त्याच्या बरोबरच निघाले. सोनूशेटने मनातल्या मनात रंगनाथरावांना शिव्या देत कीर्तनकाराला दुकानातून शिधा काढून दिला आणि त्या दिवशी संध्याकाळी गावातल्या देवळात त्यांच्या कीर्तनाची व्यवस्था करून दिली. संध्याकाळी कीर्तन सुरू झाले. सुरवातीला कीर्तनकारांनी रंगनाथरावांची वाखाणणी केली. मी या गावी आलो त्याचे मुख्य कारण रंगनाथरावांचा नावलौकिक ! त्यांची कीर्तिचंद्रिका दिगदिगंत पसरली आहे. त्यांचे



औदार्य म्हणजे याचकांचा एक कल्पवृक्षच! पौर्णिमेच्या चंद्रावरही डाग असतो, परंतु रंगनाथरावांची कीर्तिचंद्रिका निष्कलंक आहे. एक सुसंस्कृत पुरुष म्हणून प्रथम त्यांचेच नाव समोर येते. त्यांचा त्याग म्हणजे शिबी राजाची आठवण होते."

ही सर्व स्तुती ऐकून रंगनाथरावांना अंगावर शेरभर मांस चढल्यासारखं झालं. कीर्तन संपल्यावर सर्वांबरोबर घरी परत असतां ते विचार करूं लागले, "या कीर्तनकाराने आज आपली इतकी स्तुती केली, त्यात काही हेतू होता की काय?"

दुसऱ्या दिवशी कीर्तनकार रंगनाथरावांकडे गेले आणि बिदागीची आठवण करून

... कोरा कागद घेतला आणि त्यावर आपले नाव लिहून पंचवीस रुपये लिहिले आणि तो कागद कीर्तनकाराला देत म्हणाले—"इतरांकडे जाऊन वसूल करून या. मी नंतर देईन."

कीर्तनकार दहा प्रमुख व्यक्तींकडे गेले व शंभरापर्यंत कशीबशी रक्कम वसूल झाली. त्या दिवशी संध्याकाळी ते रंगनाथ रावांना भेटायला त्यांच्या घरी गेले तेव्हां रंगनाथरावांनी साऱ्या जगाच्या गप्पा मारल्या, परंतु त्यांनी लिहून दिलेल्या रकमेविषयी एका शब्दानेही बोलले नाहीत.

शेवटी कीर्तनकार निरोप घेऊ लागले तेव्हां रंगनाथरावांनी, 'बरं आहे', या असा कोरा निरोप दिला.

दुसऱ्या दिवशी कीर्तनकार रंगनाथ रावांच्या घरी दोनदां गेले. एकदां रंगनाथ घरात नाही म्हणून आणि दुसऱ्या वेळेस पूजेला बसले आहेत म्हणून कळले.

तिसऱ्या दिवशी कीर्तनकार गेले तेव्हां रंगनाथराव कोणाशीतरी बोलत होते.

कीर्तनकारांनी अनेक वेळा जाऊन पाहिले व शेवटी म्हणाले—"मी उद्यां निघणार आहे. आपली रक्कम देण्याची कृपा करावी."

"म्हणजे, दिवाणजींनी दिले नाहीत का? मी परवाच द्यायला सांगितले होते.

... नाहीत, तुम्ही उद्या या." रंगनाथराव म्हणाले.

कीर्तनकार निराश होऊन परतले व दुसऱ्या दिवशी दीवाणजी गावाहून आले असल्याची खात्री करून घेऊन रंगनाथ रावांकडे आले. दीवाणजींनी विचारले—"काय हो, इकडे कसे काय?"

कीर्तनकारांनी घडलेली गोष्ट सांगितली.

दीवाणजी थोडा वेळ विचार करून म्हणाले—"अहो, तुम्ही, मी सांगतो त्याचा चुकीचा अर्थ करून घेऊ नका. चंद्राची रक्कम लिहून देण्या पुरतीच रंगनाथरावांची जबाबदारी. त्यांची रक्कम पाहून इतर लोक रकमा टाकतात त्या रंगनाथराव स्वतःच्याच मानत!"

कीर्तनकाराच्या डोक्यात तेव्हां लख्ख प्रकाश पडला. त्या दिवशी संध्याकाळी रंगनाथराव आठदहा जणांबरोबर बसून बोलत असतां कीर्तनकार येऊन म्हणाले—"बरं, येतो रंगनाथराव! निरोप घ्यायला आलो आहे. तुम्ही माझ्याजवळ फक्त एकच खोटे बोललात. तुम्ही दिवाणजींना बिदागीची रक्कम द्यायला सांगितली म्हणालात ना, तेवढेच एक खोटे बोललात. मी आपली स्तुती करून कित्येक खोट्या गोष्टी बोललो असेन. गरीब आहे, म्हणून आशेने कितीदां तरी खोटे बोललो, त्यात काही चुकले नाही असे मानत आलो. म्हणूनच आपला अनुग्रह माझ्यावर झाला नाही, असे वाटतं आहे आतां."

दहा जणांसमोर ही संभावना झाल्यामुळे रंगनाथरावांना कोणी थोबाडीत चपराकल्यासारखे कीर्तनकाराचे शब्द झोंबले. त्या सर्व जणानी कीर्तनकाराला काही ना काही बिदागी दिलेली होती. म्हणून रंगनाथ रावांनी कीर्तनकाराला थांबायला सांगितले व दीवाणजीवर आपला राग काढून पंचवीस रुपये देववून मोकळे झाले.

"इतक्या दिवसांनी का होईना, या नाटकी दानशूराला चपराक हाणणारा भेटलाच तर!" असे मनात गुदगुल्या झाल्यासारखे हसत गावकरी निघून गेले.





# वाईट माणसाचे थोरपण

गोपाळचा मुलगा गोविंद वीस वर्षांचा झाला. तरी त्याला अक्कल थोडी सुद्धा आली नाही. त्याने चांगले काम एकतरी केले आहे, असे ऐकिवात नव्हते. तो कसा सुधारणार याची गोपाळला नेहमी काळजी लागली होती. अशा समयी त्या गावी चिरंजीवी आला. तो कसाही माणूस असो त्याला विवेकवान करतो असे ऐकून गोपाळने त्याला आदरपूर्वक आपल्या घरी बोलाविले आणि आपल्या मुलाविषयी सर्व परिस्थिती समजावून सांगितली.

चिरंजीवीने गोविंदाला बोलवायला सांगितले व तो आल्यावर त्याच्याकडे निरखून पहात म्हणाला—"तुम्ही विनाकारण कशाला काळजी करता आहा हो, गोपाळराव! तुमच्या मुलाने वाईट कामे केलीत तर त्यात काय? चांगल्यापेक्षा वाईट कामेच करणे कठीण आहे. कठीण काम करणारा नेहमी चांगलाच होतो!"

गोविंद आपल्या वडिलांकडे थोडचाशा बेफिकीरपणे पहात हसत तेथून निघून गेला.

गोपाळ निराश होऊन म्हणाला—"तुम्ही माझ्या मुलाला सन्मार्गावर आणाल असे वाटले होते आणि तुम्ही हे काय केलेत हो? आतां तो काय सुधारणार?"

"म्हणजे, मी म्हणालों ते बरोबर नाही असे वाटले वाटते तुम्हांला?" चिरंजीवी थोडा रागाने म्हणाला.

"नाहीतर काय? अहो, तुमच्यासारख्या थोरामोठ्यांनी असेच बोलायचं असतं का? चांगलं म्हणवून घेणं कठीण असतं, परंतु वाईट म्हणवून घ्यायला एक क्षणही लागत नाही." गोपाळ म्हणाला.

"फक्त म्हटल्याने पुरत नाही. मला तुमच्या मुलालासुद्धा ही गोष्ट पटवून सिद्ध करून दाखविली पाहिजे." चिरंजीवी म्हणाला.

गोपाळने पुन्हा आपल्या मुलाला बोलावून घेतले. चिरंजीवी आपल्या बाजूने आहे हे कळल्याबरोबर, याच क्षणापासून वडिलांच्या तोंडून नेहमी शिव्या ऐकणे कायमचे सुटणार असे वाटून गोविंद लगेच बाप सांगेल ते करण्यास तयार झाला.

तिघे मिळून गावातल्या रामराव नावच्या एका वडीलधाऱ्या व्यक्तीच्या घरी गेले. रामरावांनी आपल्या अनुभवाच्या गोष्टी त्यांना सांगितल्या. त्यांनी आपल्या नोकरांचाकरांशी थोरपणाने वागून त्यांच्याकडून चांगले नाव मिळविले होते. परंतु अशा गृहस्थाला एकदां न जाणे कां एकदम राग आला आणि त्यांनी आपल्या गड्याला खूप बडवून काढले. असे फक्त एकदांच घडले. तरी त्यांच्या नोकरांचाकरांकडून त्यांना वाईटपणाच घ्यावा लागला. तेव्हांपासून त्यांनी नोकरांशी किती चांगला व्यवहार केला तरी त्यांच्या मनात जी अढी बसली ती कायम! शेवटी रामराव म्हणाले—"तुम्ही चांगली कामे वाटेल तितकी करा, एक वाईट केले की ती चांगली कामे फुकट जातात."

गोपाळ आपल्या मुलाला आणि चिरंजीवीला बरोबर घेऊन अशाच दोघांतिघां अनुभवी वडीलधाऱ्यांकडे गेला. सर्वांचं



म्हणणं रामराव म्हणाले तेच होतं, "चांगलं नाव मिळविणं कठीण व वाईट नांव मिळविणं सोपं असतं!"

"बोला आता?" गोपाळने चिरंजीवीला विचारले.

"थांबा! मी म्हटलं ते खरं असल्याचं सुद्धा सिद्ध करून दाखवितो. या गावात आडदांड मूर्ख असा कोणी असेल तर त्याचे नाव सांगा पाहू." चिरंजीवी म्हणाला.

"आणखी कोणी कशाला हो? आमचाच आहे की मुलगा! परंतु तो आपल्याबरोबर इतके कष्ट सहन करतो आहे तर मी आणखी एकाचे नाव सांगतो. त्याचे नाव खंडू." गोपाळ म्हणाला.







तिथे मिळून ते पूर्वी रामराव वगैरे ज्या तिघांना भेटून आले होते त्यांच्याकडेच गेले व खंडूविषयी त्यांचे मत विचारीत गेले.

"तो शुद्ध उडाणटप्पू आहे हो! त्याचं नुसतं तोंड पाहिलं तर पंचमहापातकं लागतील!" रामराव व इतर दोघे म्हणाले.

त्यानंतर तिघे खंडूकडेच गेले. चिरंजीवी त्याला म्हणाला—"सर्व गांव तुला दुष्ट म्हणून नावं ठेवते आहे! तुला हे माहीत आहे का?"

"माहीत आहे! कोणी मला मूर्ख म्हणाला तर मला त्याची पर्वा करण्याचं कारण काय?" खंडू म्हणाला.

तिघे तेथून परतू लागले तेव्हां वाटेत त्यांना एक भिकारी भेटला. त्याला जवळ बोलावून चिरंजीवीने विचारले—"तू नंदीबैलासारखा फिरतो आहेस, मेहनत मजुरी करून नाही राहतां येत तुला? आळशासारखा भीक मागतो आहेस तो?"

"तुम्हांला वाटलं तर भीक घाला, नाही तर नका घालू. उगाच उपदेश करीत नका फिरू! मी भीक मागितली तरी मानानं राहातो आहे, काही वाईट काम तर करीत नाही!" भिकारी म्हणाला.

तो निघून गेल्यावर चिरंजीवी हसून म्हणाला—"पाहिलंत, भिकारीसुद्धा कोणी काही बोललेलं ऐकून घ्यायला तयार नाही. गावभरच्या लोकांनी किती धुळवड केली तरी वाईट काम करणारा ते सर्व करून वाईट काम आनंदाने करीतच राहतो. इतकी सहनशक्ती वाईट माणसांशिवाय इतर कोणामध्ये पहायला मिळणे शक्य नाही. म्हणून वाईट म्हणवून राहणं फार कठीण असे मी म्हटलं. मानव जन्म घेऊन मानापमान सर्व सोडून देण्या इतके कठीण काम काही आहे का या जगात सांगा!"

चिरंजीवी म्हणाला त्यातलं व्यंग्य गोपाळच्या लक्षात आलं. गोविंदालासुद्धा व्यंग्य ऐकून लाजल्यासारखं झालं. त्याने आपली सर्व वाईट कामे करण्याचे त्या दिवसापासून सोडले.






शुक, जनक म्हणाला ते ऐकून म्हणाला—"महाराज, आपण म्हणालात ते ऐकल्यावर मला फार आनंद झाला, परंतु माझ्या मनातली शंका मात्र दूर झाली नाही. लग्नानंतर बायकोच्या सहवासात माणूस गुरफटून जातो. त्या अवस्थेत सुख मिळतेच असे नाही. सुख मिळाले नाही तर मन खिन्न होते. अशा माणसाला मोक्षलाभ कसा काय होणार?"

"निर्लिप्तपणे केलेली कामे वाईट असली तरी त्यांचा परिणाम चांगलाच होतो." जनक म्हणाला.

"मायेच्या पाशात गुरफटलेला माणूस निर्लिप्त कसा होऊ शकेल? दिव्याचं नुसतं नाव घेतल्याने काळोख नाहीसा होतो का? तसेच शास्त्रज्ञान प्राप्त झाल्याबरोबर माणसातील अज्ञानाचा नाश होईल का? तुझ्यात धनलिप्सा, पुत्रलिप्सा, स्त्रीलिप्सा, राज्यलिप्सा आहेत. मग तू जीवन्मुक्त कसा काय होऊ शकशील? तू राजा आहेस, म्हणून कर्तव्य पालनार्थ तू दुष्टांचा संहार व सुष्टु जनांचं रक्षण हे केलेच पाहिजेस! हा भेद मानणाऱ्याला मोक्ष लाभतो हे कसे मानावयाचे? माझ्याविषयी विचारशील तर मला काहीच नाही, सुख नाही की दुःख नाही, शत्रू नाही की मित्र नाही, मान नाही की अपमान नाही, राज्य करायला एखादे खेडेगांवसुद्धा नाही. एखाद्या रानटी श्वापदा सारख्या माझ्या सारख्यालाच



जीवन्मुक्ती मिळते, नाही का?" शुकाने विचारले.

"संन्यास घेऊन अरण्यवास करू लागल्याने माणूस चिंतामुक्त होतो, असे मानू नकोस. ममत्व सोडून कोणताही मार्ग अवलंबिला तर मोक्षलाभ होतो. ममत्व सोडले नाही तर कोणताही मार्ग अवलंबिला तरी मोक्षप्राप्ती होत नाही हे तुला सांगणाची गरज नाही." जनक म्हणाला.

शुकाच्या मनाचे समाधान झाले व तो आपल्या पित्याकडे आला.

"काय रे बाबा! जनकाने तुझ्या मनातल्या शंकांचे समाधानकारक उत्तर दिले

जनकासारखे राहायला मला हरकत वाटत नाही." शुक म्हणाला.

ते ऐकून व्यासांना फार आनंद झाला. त्यांनी पीवरी नावाच्या मुलीशी शुकाचे लग्न करून दिले. शुकाने निर्लिप्तपणे तिच्याबरोबर संसार थाटला. कालक्रमाने पीवरीच्या पोटी त्याला गौरप्रभू, देवश्रुत, भूरी व कृष्ण असे चार मुलगे व त्यांच्यानंतर कीर्ती नावाची मुलगी झाली. कीर्तीचं लग्न विभ्राजचा मुलगा अणूह याच्याशी झाले व तिला ब्रह्मदत्त नावाचा मुलगा झाला.

ब्रह्मदत्त राजा झाला व राज्य करू लागला. एकदा नारदाने त्याच्या घरी येऊन त्याला बीज मंत्राचा उपदेश केला. त्यामुळे ब्रह्मदत्ताच्या मनात ज्ञानोदय झाला व त्याचे मन वैराग्याकडे वळले. त्याने आपले राज्य मुलाला दिले व स्वत: बद्रिकाश्रमात जाऊन राहू लागला. शुक पित्याला सोडून कैलास शिखरावर निघून गेला. तेथे काही दिवस ध्यानमग्न राहून व नंतर त्या शिखरावरून उडी मारून त्याने सिद्धी मिळविली.

आपल्या मुलाच्या मृत्यूमुळे व्यासांना फार वाईट वाटले व ते स्वत: कैलास पर्वतावर गेले. पित्याच्या हाकेला शुकाने

शंकराने त्यांचे सांत्वन केले. म्हणाला–"तुझ्या मुलाला योग्यांनाही दुर्लभ अशा मोक्षाची प्राप्ती झाली आहे. अशा थोरपुरुषासाठी शोक करीत बसणे बरोबर नाही."

तेव्हां व्यास म्हणाले–"आपल्या मुलाला मी प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनी पाहिल्याशिवाय माझ्या मनाचे समाधान होणार नाही. माझे मन हताश व उदास झाले आहे."

शंकराने पाहिले की व्यासाचे दु:खी मन सांत्वनेच्या शब्दांनी शांत होणारे नाही. म्हणून त्याने व्यासांना एक वर दिला–"व्यास! तुझा मुलगा नित्य सावलीसारखा तुझ्याबरोबर राहील." तेव्हां शांत चित्ताने व्यास आपल्या आश्रमात परत आले.

शौनकादि मुनींनी शुकाचा जीवन वृत्तांत ऐकला व त्यानंतर त्यांनी सूत मुनींना विचारले–"मुनिवर्य! त्यानंतर व्यासांनी काय केले हे सांगण्याची कृपा करावी."

सूतमुनी सांगू लागले:

**धृतराष्ट्र इत्यादींचा जन्म**

व्यास मुनींचे शिष्य अनुक्रमे देवल, वैशंपायन, जैमिनी, असित व सुमंत या पूर्वीच आपल्या गुरूचा निरोप व आशीर्वाद घेऊन निघून गेले होते. त्यानंतर शुकदेखील निघून गेला. तेव्हां व्यासांना त्यांची माता



सत्यवती हिची आठवण झाली. तेव्हां ते आश्रमातून आपल्या जन्मस्थानी आले. तेथे निषाद इत्यादींना भेटून आपल्या मातेची चौकशी केली. तेव्हां त्यांना कळले की त्यांच्या मातेशी लग्न करून शंतनू तिला हस्तिनापूरला घेऊन गेला आहे.

ते कळल्यावर व्यासांनी सरस्वती नदीच्या तीरावर आश्रम स्थापन केला व तपश्चर्या करण्यात मग्न झाले.

तिकडे शंतनूला सत्यवतीपासून चित्रांगद आणि विचित्रवीर्य नावाचे दोन मुलगे झाले. शंतनूचा मोठा मुलगा भीष्म होता. त्याने आपल्या प्रतिज्ञेप्रमाणे स्वत:चा राज्याभिषेक करून घेतला नाही व सत्यवतीचा मोठा



मुलगा चित्रांगद याचा राज्याभिषेक करून त्याला गादीवर बसविले. चित्रांगद एकदा शिकारीला गेला असतां तेथे त्याचेच नाव असलेल्या, म्हणजे चित्रांगद नावाच्या एका गंधर्वाशी त्याचे द्वंद्वयुद्ध झाले आणि त्यात चित्रांगद गंधर्वाच्या हाती शंतनूचा मुलगा चित्रांगद मारला गेला.

तेव्हां भीष्माने आपला धाकटा भाऊ चित्रांगद याची अंत्येष्ठी वगैरे संस्कार करून सर्वात धाकटा भाऊ विचित्रवीर्य याला गादीवर बसले. त्या गोष्टीस व्यास मुनींनी सुद्धा मान्यता दिली. विचित्रवीर्य वयात आला तेव्हां भीष्माने त्याचा

त्याच सुमारास काशी राजाने आपल्या तिघां मुलींच्या लग्नासाठी स्वयंवर रचले आणि सर्व राजांना निमंत्रणे पाठविली. भीष्माने स्वयंवरप्रसंगी सर्व राजांचा पराभव करून काशी राजाच्या तिघी कन्या, अंबा, अंबिका व अंबालिका यांचे अपहरण केले आणि त्यांना हस्तिनापूरला घेऊन आला. तिघां मुलींना सत्यवती मातेला दाखवून तिच्या संमतीने विचित्रवीर्याशी त्यांचा विवाह करून देण्याचे ठरवून मुहूर्तही धरविला.

त्यावेळी अंबा लज्जावनत मुखाने भीष्माला म्हणाली–"मी व साल्व राजा दोघांनी परस्परांवरच्या प्रेमाने परस्परांना शब्द दिला आहे. आपण माझे हरण करून आणले आहे. तेव्हां साल्व राजा माझ्याशी लग्नाला तयार होणार नाही!"

तेव्हां भीष्माने माता सत्यवती व इतर वडीलधारी मंडळी यांचा सल्ला घेतला अंबाला स्वेच्छापूर्वक जायला परवानगी दिली.

अंबा साल्व राजाकडे जाऊन म्हणाली– "मी भीष्माला आपल्याशी वचनबद्ध असल्याचे सांगितल्यावरून त्याने मला आपल्याकडे जायला सोडले आणि आदरपूर्वक आपणांकडे पोचते केले आहे. म्हणून आपण

साल्व म्हणाला–"भीष्माने तुझ्या अंगाला स्पर्श केला आहे. तुला कोणी पळवून नेले आणि नंतर सोडून दिले तर तुझ्या सारख्या तरुणीशी कोण लग्न करील? तू आल्या वाटेने परत जा."

"अहो, पण मी आतां कोठे जाऊं? भीष्माचा निरोप घेऊन मी आले आणि तुम्ही माझा स्वीकार करीत नाही!"

परंतु साल्व राजाने दुर्लक्ष केल्यावर ती भीष्माकडे आणि म्हणाली–"मला साल्व राजाने परत पाठविले आहे. आतां आपणच माझ्याशी विवाह करून माझा उद्धार करावा."

भीष्म म्हणाला–"दुसऱ्याशी जी वचनबद्ध झाली आहे, अशा तरुणीशी विवाह करू नये. म्हणून तू आपल्या पित्याकडे परत जा."

परंतु अंबा पित्याकडे गेली नाही. रानात जाऊन तपश्चर्या करू लागली.

भीष्माने काशी राजाच्या दोघां कन्यांशी विचित्रवीर्याचे लग्न करून दिले. विचित्रवीर्याने आपल्या दोघां राण्यांसह सुखोपभोग घेत नऊ वर्षे राज्य केले आणि राज्यक्ष्मा होऊन त्या आजारात मरण पावला.

आपल्या दोघां निपुत्रिक मुलांचा स्वर्गवास झालेला पाहून सत्यवतीने भीष्माला



तले. तू शंतनू महाराजांचा मोठा मुलगा आहेस. तेव्हां तू त्यांच्या वंशाचे रक्षण कर. तू अंबा व अंबालिका यांच्यापासून पुत्रप्राप्ती करून घेऊन वंशवृक्ष वाढव. हे धर्मसंमत आहे."

"मी लग्न न करण्याची व राज्य न करण्याची प्रतिज्ञा केली आहे. म्हणून कुलीन ब्राह्मणापासून नियोगाद्वारे पुत्रोत्पत्ती करून वंश रक्षण करणे शास्त्रसंमत आहे." भीष्माने आपले मत दिले.

भीष्माची ती सूचना ऐकताच सत्यवतीने व्यासांचे स्मरण केले आणि व्यास प्रगट झाले. भीष्माने त्यांचे यथोचित स्वागत



सत्यवती व्यासांना म्हणाली—"तू आपल्या दोघां धाकट्या भावांच्या पत्नींच्या पोटी पुत्रोत्पत्ती करून त्यांच्या वंशाचा उद्धार कर."

मातेच्या आज्ञेप्रमाणे व्यासांपासून प्रथम अंबिकेच्या पोटी एक पुत्र जन्मला. तो धृतराष्ट्र परंतु तो जन्मांध होता. म्हणून सत्यवतीच्या आज्ञेप्रमाणे व्यासांपासून अंबिकेला एक मुलगा झाला. तो पांडुरोगाने आजारी असल्याचे कळले. तेव्हां सत्यवतीने अंबिकेचा होकार घेऊन व्यासांना पुन्हां आज्ञा केली. परंतु अंबिकेने स्वतःच्या जागी एका दासीला ठेवले. तिच्या पोटी

सारखाच थोर प्रतिभावान निघाला. अशातऱ्हेने भरत वंशाच्या वृद्धीसाठी व्यासांपासून धृतराष्ट्र, पांडुराज व विदुर जन्मले.

मुनींनी सूताला विचारले—"मुनिवर्य, सत्यवती व शंतनूचा विवाह कसा झाला? आणि विवाहपूर्वी तिच्या पोटी व्यासांचा जन्म कसा झाला? तो वृत्तांत कृपा करून सांगावा."

सूत मुनी सांगू लागले—

उपरिचर वसू चेदीचे राज्य करीत होता. तो थोर पराक्रमी होता. त्याने तपश्चर्या करून इंद्राला प्रसन्न केले. इंद्राने त्याला एक दिव्य विमान दिले. तो सर्वदा विमानात बसून आकाश विहार करी. म्हणून त्याला 'उपरिचर' या नावाने लोक ओळखू लागले.

उपरिचर वसूची राणी गिरिका फार सुंदर होती. तिच्या सहवासात सुखोपभोग करीत असतां त्याला पांच पराक्रमी मुलगे झाले. त्याने त्यांना पांच देशांचे राज्य दिले.

एकदा गिरिका ऋतुस्नानोत्तर पतीला भेटण्यासाठी प्रतीक्षा करीत असतां राजा वसूला त्याच्या पित्याने आज्ञा केली—"बाळ, तुझ्या आजोबांचे श्राद्ध करावयाचे आहे. तेव्हां तू जाऊन लौकर शिकार करून









राजा वसू विचारात पडला. पत्नी वाट पाहते आहे आणि पितृआज्ञेचे पालन करावयाचे आहे. परंतु शेवटी वसू आपल्या पित्याच्या आज्ञेचे पालन करण्यासाठी शिकारीला निघाला.

त्या वेळी त्याचं लक्ष पत्नीकडे होते. म्हणून एका ब्राह्मणाच्या शापामुळे यमुना नदीत माशाच्या रूपे विहार करणारी अद्रिका नावाची एक अप्सरा गरोदर झाली. ते ऐकून मुनींनी सूत मुनींना मध्येच थांबवून विचारले–"मुनिवर्य, अद्रिकेला ब्राह्मणाने कां शाप दिला होता ?"

सूत मुनी सांगू लागले.

एकदा एक ब्राह्मण यमुनेत उतरून संध्यावंदन करीत असतां अद्रिका नावाची अप्सरा यमुनेवर स्नानाला आली. पाण्यात उतरून त्या ब्राह्मणाजवळ आली आणि थट्टेत तिने त्याचा पाय ओढला. तेव्हा ब्राह्मणाने रागावून तिला शाप दिला–"तू मासा होऊन पाण्यातच पडून रहा. तेव्हां त्या अप्सरेने ब्राह्मणाच्या पायां पडून क्षमा मागितली. तिची दीन अवस्था पाहून ब्राह्मणाला कीव आली. त्याने तिला समजावून सांगितले की काही दिवसांनी तुझ्या पोटी एक मुलगी व एक मुलगा जन्माला येतील. तेव्हां तुला स्वस्वरूप प्राप्त होईल."
ब्राह्मण निघून गेला. तेव्हांपासून अद्रिका माशाच्या रूपे यमुनेतच राहिली.

आतां वसूमुळे गरोदर झालेला तो मासा एका कोळयाच्या जाळयात सांपडला. कोळयाने माशाचे पोट चिरले तेव्हा त्याच्यातून एक मुलगा व एक मुलगी बाहेर आली. कोळयाने त्या दोघां मुलांना नेऊन वसू राजाला दाखविले. तो चकित झाला. त्याने मुलाला घेतला व मुलीला संभाळायला कोळयालास सांगितले. ती मुलगी कोळयाच्या घरात कालिका, मत्स्योदरी व मत्स्यगंधा या तीन नावे कोळयाच्याघरातच लहानाची मोठी झाली. मुलगा मत्स्य नावे उपरिचर वसूच्या वाड्यातच लहानाचा मोठा झाला. माशाच्या रूपातली अद्रिका मुक्त होऊन अप्सरा रूपे आपल्या लोकांत निघून गेली.



# अपूर्ण प्रतिज्ञा

चतुरावर्त नावाच्या गावी एका श्रीमंत व्यापाऱ्याचा सुदर्शन नावाचा मुलगा रहात असे. बाप मेल्यावर त्याने बापाने मागे सोडलेली सर्व इस्टेट निरनिराळ्या व्यसनात पडून घालविली. जवळ चार पैसे होते तोपर्यंत मित्र होते. त्याने दुसऱ्या एका गावी निघून जायचे ठरविले आणि निघाला. त्याचे मित्र त्याला पाहून हसले.

त्याला फार राग आला व त्याने प्रतिज्ञा केली–"मी खूप पैसे मिळवून येतो व तुम्ही सर्व माझ्या चारीबाजूला उभे राहून कसे नाचता हे पाहतो. नाही तर मी मेलोच समजा !"

दुसऱ्या गावी जाऊन त्याने व्यापार केला व बापाने त्याच्यासाठी जेवढे धन मागे सोडले होते त्यापेक्षा जास्त धन त्याने संपादन केले आणि प्रतिज्ञेप्रमाणे आपल्या गावी निघाला.

वाटेत नवराबायको रात्री एका गावातल्या धर्मशाळेत उतरली. त्या दिवशी रात्री धर्मशाळेच्या पडवीत काही जण जुगार खेळत होते. सुदर्शन त्यांच्याबरोबर खेळू लागला आणि बरोबर मिळवून आणलेले सर्व धन घालवून बसला.

तो उजाडल्यावर आपल्या गावी न जाता परतू लागलेला पाहून बायकोने विचारले–"तुम्ही प्रतिज्ञा केली होतीत, ती हो ?"

"प्रतिज्ञापूर्ण करू शकलो नाही तर मेलोच समजा, मी म्हटले होते ना ? तेच झाले समज ! दारुड्या आणि जुगारी सुदर्शन तेव्हांच मेला ग !" तो म्हणाला.





# पातीचे कांदे

उर्मिला एक भोळी मुलगी होती व स्वभावाने गरीबही होती. तिच्या आईवडिलांनी तिचे लग्न बेताची सरकारी नोकरी करणाऱ्या एका माणसाशी करून दिले. तिच्या नवऱ्याचे नाव चिरंजीवी होते. तो स्वभावाने तापट होता.

सासरी आल्या दिवसापासूनच उर्मिला आपल्या नवऱ्याला पाहून भिऊ लागली. नवरा जे सांगे ते भीतीमुळे तिच्या डोक्यात शिरत नसे. म्हणून ती ते काम अगदी उलटेच करी.

एक दिवशी चिरंजीवी बाजारातून पातीचे कांदे आणून बायकोला देत म्हणाला—"याच्या कांद्यांची भाजी कर आणि पात्यांची पातळ भाजी कर. मी जरा देवळात जाऊन येतो." असे सांगून तो निघून गेला.

नवरा बोलू लागला त्याबरोबर ती घाबरून गेली आणि तिने उलटेच केले. पात्यांची भाजी केली आणि कांद्यांची आमटी केली. तिने भाजी व आमटी निरनिराळ्या पातेल्यांत झांकून ठेवून दिली आणि नवरा परत येण्याची वाट पाहू लागली.

चांगला काळोख पडल्यावर खूप उशिरां चिरंजीवी घरी परतला. त्याने बायकोला विचारले—"मी सांगितले तशी भाजी व आमटी करून ठेवलीस का?"

"हो केली. कांद्यांची आमटी आणि पात्यांची पातळ भाजी करून ठेवली आहे." उर्मिला म्हणाली.

ते ऐकून चिरंजीवी इतका संतापला की त्याने बायकोला खूप बडवून काढायचे ठरवून बाहेरचे दार बंद केले व म्हणाला—"तू नेहमी मी सांगतो त्याच्या बरोबर उलट करतेस! चार लाथा खाल्याशिवाय तुझ्या लक्षातच येत नाही!" असे म्हणत त्याने उर्मिलाला बडवून काढले.

उर्मिला [illegible] राहिली. तितक्यात माळ्यावरून कोणीतरी अकस्मात् उडी मारून खाली आला. तो चोर होता. तो दिवसा उजेडातच घरात शिरून माळ्यावर लपून बसला होता. त्याचा काळा कभिन्न चेहरा पिळदार मिशा आणि हातातला सुरा पाहूनच चिरंजीवीची बोबडी वळली. चोराने सुरा चिरंजीवीच्या कंठावर ठेवून विचारले—"असा घुम्यासारखा पाहतो आहेस काय? घरात दागिने, पैसे असतील ते सगळे बांधून आण."

चिरंजीवी थरथर कापत म्हणाला—"मेहरबानी करून तो सुरा खाली करा."

"नंतर तो पुढे आणि चोर मागेमागे असे दोघे पेटीजवळ गेले पेटीतले दागिने व पैसे काढले व ते एका गाठोड्यात बांधून त्याने चोराच्या हातात दिले.

चोराने ते गाठोडे खाकेत धरले व चिरंजीवीला म्हणाला—"कोठे आहे रे कांद्याची आमटी व पात्यांची भाजी? बायकोला सांग लौकर वाढायला. मी जेवणार आहे!"

चिरंजीवीने उर्मिलेकडे पाहून खिसकावून म्हटले—"असे डोळे फाडफाडून पाहात काय बसली आहेस? ऊठ आणि चटकन यांना वाढ!"

उर्मिलाने ताट मांडले आणि चोराला भाजी आमटी वाढून भात वाढला. चोर जेवत होता आणि चिरंजीवी पंख्याने वारा घालू लागला.



"काय पण भाजी झाली आहे आणि अमृतासारखी आमटी झाली आहे!" असे म्हणत चोराने आमटी व भाजीची भांडी रिकामी केली व चिरंजीवीला म्हणाला– "काय रे, तू माणूसच आहेस ना की राक्षस? इतका चांगला सैंपाक करणाऱ्या बायकोला लाथा बुक्कयांनी मारतोस? सर्व घर झाडून नेणाऱ्याला वाढायला सांगून स्वतः पंख्याने वारा घालतोस!" असे म्हणत चोर हंसू लागला.

चिरंजीवीला मान वर करून पाहण्याची किंवा बोलण्याची हिंमत झाली नाही.

"मी चोर कसा झालो, माहीत आहे का?" चोराने विचारले.

माहीत नाही या अर्थी चिरंजीवीने नकारार्थी मान हलविली.

"माझे बाबा खूप दारू पीत. नेहमी माझ्या आईला मारहाण करीत. माझी आई मोलमजुरी करून पैसे मिळवी मला शिकवायला. परंतु माझे बाबा आईला बडवून ते पैसे हिसकावून घेऊन जात. [illegible] शेवटी प्राणास मुकली. आतां त्या घरात राहणे मला अशक्य झाले व मी पळून गेलो. लिहितां वाचता येत नव्हते. काम करून काही मिळविण्याची लायकीसुद्धा नव्हती. नाइलाजाने चोरीचा धंदा सुरू केला. नवरा बायको दोघांनी मिळून संसार संभाळला तर त्या घरातली मुलं कधी बिघडणेच शक्य नाही. कांद्या पात्यांचा परस्पर संबंध असा आहे की दोन्ही निरनिराळी असली तरी त्यांचा वास व चव एकच असतात. नवरा बायको निरनिराळी असली तरी त्यांची मने व भाव एक असला पाहिजे. आतां तरी तू यापुढे डोके ठिकाणावर ठेवून बायकोशी नीट वाग." असे सांगून चोर उठून उभा राहिला आणि खाकेतले दागिन्या पैशांचे गाठोडे त्याने उर्मिलेच्या हातात दिले आणि निघून गेला.

त्या दिवसापासून चिरंजीवीने बायकोच्या अंगावर चुकूनसुद्धा हात उगारला नाही की उर्मिला त्याला पाहून भ्याली नाही.



# गोदामांचे गुपित

एकदा श्रीकृष्णदेवरायांना त्यांचे प्रधान तिम्मरसू म्हणाले–"महाराज, आपल्या गोदामांची जागा बदलावी म्हणतो." तेव्हां कृष्णदेवरायांनी इतक्यात जागा बदलण्याची गरज का वाटली, म्हणून प्रधानांना विचारले. तेव्हां तिम्मरसू म्हणाले–"आपल्या सैन्यातल्या सर्व गुप्त गोष्टींची देखरेख करणाऱ्या सैनिकांचा प्रमुख अधिकारी नुकताच वारला. त्याची मुलं पाण्यासारखा पैसा खर्च करीत असल्याचे मला हेरांकरवी कळलं आहे. मयत अधिकाऱ्याने त्याच्या पगारातून इतके पैसे वांचविणेच शक्य नाही. आपल्या गोदामांचे गुपित त्याने बहामनी सुलतानांना विकून पैसे मिळविले असणार!"

"हा तुमचा फक्त संशयच असावा." श्रीकृष्णदेवराय म्हणाले.

"संशय नाही, खरी वस्तुस्थिती आहे! मी, बहामनी सुलतानांना गोदामांचे गुपित विकत घेण्याची इच्छा आहे का, लोभ दाखवून पाहिलं. त्यांनी तेवढे औत्सुक्य दाखविले नाही. म्हणजे त्यांना सर्व रहस्य माहीत होतें असा अर्थ झाला. मयत अधिकारी देशद्रोही होता." तिम्मरसू म्हणाले.

श्रीकृष्णदेवरायांनी तावडतोब गोदामांची जागा बदलण्यासाठी परवानगी दिली.





# प्रश्नोत्तरे

**वाय हेमसुंदराव, डोर्नकल (आंध्र)**

प्र. : असे सांगतात की मध्यरात्री सुद्धा नॉर्वे देशात सूर्याचा प्रकाश असतो. तेथे मध्यरात्रीच्या वेळी सूर्य असण्याचे कारण काय?

उ. : पृथ्वी एका विशिष्ट कक्षेत सूर्याला प्रदक्षिणा घालीत असते. ती स्वत: भोवती फिरते तेव्हां तिची धुरी त्या कक्षेला तिरप्या अवस्थेत असते. त्यावरून आपल्याला हे कळते की पृथ्वी सूर्याच्या सभोवती बारा महिन्यात एक प्रदक्षिणा पुरी करते त्या अवधीत सहा महिने पृथ्वीच्या धुरीचे उत्तरेकडील टोक म्हणजे उत्तर ध्रुव सूर्याच्याकडे असतो आणि बाकी सहा महिने दक्षिण ध्रुव सूर्याकडे असतो. या सहा महिन्यांच्या अवधीला आपण अनुक्रमे उत्तरायन व दक्षिणायन म्हणतो. सूर्य जेव्हां पृथ्वीच्या उत्तर दिशेला असतो तेव्हां उत्तर ध्रुवाच्या सभोवतालच्या प्रदेशात सूर्यास्त होत नाही. त्याचबरोबर उत्तर ध्रुव मंडलाच्या बाजूच्या काही प्रदेशात मध्यरात्री सूर्यास्त होत नाही. काही प्रदेशात रात्र काही तासच असते. ग्रीन लॅंड सारखे काही देश नार्वे पेक्षांही उत्तर ध्रुवाच्या जास्त जवळ आहेत.

**के. जी. सरलाकुमारी, के. जी. हेमलता, कुप्पम् (आंध्र)**

प्र. : संभाषण व्हायला भाषा आवश्यक असते. भाषेचा जन्म केव्हां व कसा झाला? तिचा प्रचार प्रसार कोणी केला? इतक्या भाषा कशा निर्माण झाल्या?

उ. : भाषा म्हणजे वस्तू, कामे आणि भाव यांचा संकेत करणारा शब्दसमूह. मुके प्राणीसुद्धा विशिष्ट प्रकारे ओरडून किंवा आवाज करून आपल्या जातिबांधवांपुरते आपले भाव प्रगट करतात. संकटात सापडलेला कावळा एका तऱ्हेचा आवाज काढून इतर कावळ्यांना बोलावतो. मानवजातीत भाव व विचार यांच्या विकासाबरोबर भाषेचा पण विकास झाला. रानटी जातीच्या लोकांच्या भाषेत शब्द संख्या कमी असते. उदाहरणार्थ सवर भाषाच घ्या. संकेत रूपे काही शब्द मानल्यावर त्यांचे अर्थ ज्यांना समजतो ते एकच भाषा बोलणारे त्या जातीचे लोक मानले जातात. आपल्याला जी भाषा कळत नाही, त्या भाषेत 'सांप', 'सांप' म्हणून कोणी सावध केले तरी ते काय म्हणत आहेत हे ऐकणाऱ्याला ती भाषा आल्याशिवाय कळणार नाही. अशाच तऱ्हेने निरनिराळ्या प्रदेशात राहणाऱ्या लोकांनी निरनिराळ्या भाषांची सृष्टी केली. त्या भाषा शिकणे इतरांना त्या भाषा बोलणाऱ्या



# अघटित अनपेक्षित

[ ७० ]

"कोणीही मागचा पुढचा विचार केल्याशिवाय घाईगर्दीने कोणतेही काम करून मागाहून पश्चात्ताप करू नये. 'न्हावी आणि मुनी' यांच्या गोष्टीवरून हा धडा प्रत्येकाने घेण्यासारखा आहे." विष्णुशर्मा राजकुमारांना म्हणाले.

"आम्हांला ती गोष्ट सांगा" असे राजकुमारांनी आग्रह केल्यावर विष्णुशर्मा गोष्ट सांगू लागले.

पाटलीपुत्र येथे मणिभद्र नावाचा एक मोठा व्यापारी रहात असे. तो दानधर्म, धार्मिक कार्य आणि स्वत:च्या कुटुंबियांसाठी लक्षावधी रुपये खर्च करी. कलिंगपट्टण, कायल, कोर्कसारख्या मोठमोठ्या बंदरात त्याला व्यापारा निमित्ते जावे लागे. त्याची गलबते बंगाल आखाता पलीकडच्या बंदरापर्यंत जात येत.

एकदा त्याची सर्व गलबते समुद्राच्या मध्यभागी असतां मोठे तुफान आले आणि त्याच्या तडाख्याने सर्व गलबते बुडाली. एकही वांचले नाही. मणिभद्राचे सर्वस्व नष्ट झाले व त्याचे दिवाळे निघाले. एक कोट्याधीश एका दिवसात भिकारी झाला. त्याच्या कृपेवर ज्यांनी मोठमोठे वाडे बांधले होते आज त्याला विचारीतनासे झाले. त्याला लग्नकार्याला जेवायला बोलावणे तर सोडाच, ते त्याचा पदोपदी अपमान करू लागले. त्याच्या हृदयाला धक्काच बसला.

आतांपर्यंत दोघां नवराबायकोंनी मानाने सर्व आयुष्य घालविले होते. म्हणून गरीबीत दिवस काढणे त्यांना जड जाऊ लागले. मणिभद्र एकटा असता तर त्याने सर्व कष्ट आनंदाने सहन केले असते. परंतु बायकोला



ते कष्ट जड जात असलेले पाहून त्याला ते सहन करणे अशक्य झाले. ती पूर्वी रेशमी जरीकाठी लुगडी नेसायची. दररोज दानधर्म करायची. दररोज तिच्यासाठी फुलांच्या पाट्या भरभरून येत. आतां त्या सर्व वस्तू स्वप्नातल्या गोष्टीसारख्या दुर्मीळ झाल्या. रानात स्वतंत्रपणे हिंडणाऱ्या एखाद्या हत्तीला बांधून ठेवल्या सारखे तिला घर वाटू लागले. आपले दुःख लपवून पतीला सुखी ठेवण्याचा तिचा प्रयत्न जास्तच करुण वाटत होता.

एकदां रात्री मणिभद्रची बायको सैंपाक घरात कामात गुंगून गेली असतां मणिभद्र खाटेवर पडून विचार करू लागला—" गरीबी हे [illegible] किती निकृष्ट जीवन घालवायला लावते? सौजन्य, सहनशीलता, सुशीलपणा, कुलीनपणा हे सर्व गुण गरिबीत शोभत नाहीत. मान, प्रतिष्ठा, ज्ञान, बुद्धी, सौंदर्य आणि विवेक हे सर्व गरीबी येताच नष्ट होतात. पोटाची खळगी भरण्याच्या काळजीत बुद्धिमत्ता निरुपयोगी होते. एका श्रीमंताच्या आजूबाजूला सहस्रावधी गरीब असले तर प्रत्येकाची नजर एकट्या श्रीमंतावरच असते. इतरांकडे कोणी ढुंकूनसुद्धा पहात नाही. जगाला काय तो पैसाच दिसतो. गरीबाने जे काम त्याचा गुन्हा म्हणून मानले जाते तेच काम श्रीमंताने केल्यास ते पुण्यकार्य मानले जाते. असे जीवित जगायचेच कशाला? मी उद्या दूर कोठे तरी जंगलात जाऊन गळयाला फाशी लावून घेतो, म्हणजे मी फाशी लावून घेऊन मेल्याचे दुःख माझ्या बायकोला भोगावे लागणार नाही. मी व्यापार धंद्यानिमित्त परदेशात गेलो असेन असे समजून ती दुःखी होणार नाही. तिला वैधव्याचे दुःखही भोगावे लागणार नाही. ती माहेरी जाऊन उरलेले आयुष्य सुखाने घालवील. मी असेन तोपर्यंत माहेरी जाण्याचा विचार तिच्या मनातच येणार नाही. मी नसल्यावर तिला जावेच लागेल."

असा विचार करत [illegible] लागला. त्याला एक स्वप्न पडले. त्याला एका दिगंबर जैन मुनींचा दृष्टांत झाला. दिगंबर मुनी त्याला स्वप्नात भेटून म्हणाले—"मणिभद्रा! आत्महत्येचा विचार करू नकोस. पूर्वजन्मातली सत्कृत्ये कधी कधी अयशस्वी वाटतात. परंतु शेवटी यशस्वीच होतात. मागच्या जन्मी एका दिगंबर जैन मुनीने गोरगरिबांना दान करण्यासाठी तुझ्याकडे याचना केली. तू त्यांना एक लाख सुवर्ण मुद्रा देऊन खूष केलेस. मीच तो दिगंबर मुनी. तुझ्याकडून मला जे सोने मिळाले ते मी गोरगरिबांना दानधर्म करण्यात खर्च केले नाही. त्याचा मलाच मोह झाला आणि देवधर्माला विसरलो. असे सांगतात की पूर्वजन्मी आपले मन ज्या वस्तूवर आसक्त होते, आपण या जन्मी तेच रूप घेऊन जन्माला येतो. हे पूर्णपणे सत्य आहे, मी बाहेरून मुनीसारखा दिसत असलो तरी मी वास्तविक सोन्याचा गुलाम, दास झालो आहे. आतां माझे डोळे उघडले. माझे मन सोन्यापासून विरक्त झाले आहे. तरी सोन्यावर भाळलेला हा मानवदेह मला सोडायला तयार नाही. त्याचा शेवट झाला पाहिजे आणि तुझे सोने तुला मिळाले पाहिजे. म्हणून मी याच रूपात उद्या



तुझ्याकडे येणार आहे. तू मला सहजी ओळखशील. कारण माझ्या हातात भिक्षापात्र नसेल. मी 'भिक्षादेहि' म्हणणार नाही. तू थोडा देखील संकोच न करतां माझ्या डोक्यावर सोटा हाण. मी तत्काळ दोन मण वजनाचा सोन्याचा पुतळा होऊन तुझ्या पायावर पडेन. तू मला दिलेले तेवढेच सोने होते. ते सोने मिळाल्यावर तुला व तुझ्या बायकोला सुखाने पुढील आयुष्य घालविता येईल. या थोड्या काळातल्या गरिबीचा तुला एवढा फायदा अवश्य होईल की माणसाचा स्वभाव व या जगाचा नियम याची तुला चांगली ओळख होईल व तुझी सदसद-

विवेकबुद्धी वाढेल. नंतर मी पुन्हा जैन मुनी होऊन सरळ देवलोकात जाईन आणि निर्विघ्नपणे तपश्चर्येत मग्न होऊन जाईन." असे सांगून तो जैन मुनी अदृश्य झाला.

मणिभद्राची झोप मोडली व तो स्वप्नात पाहिले त्याविषयी विचार करू लागला– "हे स्वप्न खरे असेल का की खोटे? झोपण्यापूर्वी माझ्या मनात पैशाचा विचार आला, म्हणून हे स्वप्न निरर्थकच असणार. असे सांगतात की, रोग्याला, दुःखी माणसाला आणि दारुड्याला जी स्वप्ने पडतात ती खरी नसतात, तरी पाहू या, काय होते ते!"

त्यानंतर मणिभद्र पहाटे उठला. स्नान पूजा आटोपून घराबाहेर ओटयावर जाऊन बसला. त्याच्याजवळ एक जाडजूड दांडके होते.

त्याच वेळी एका न्हाव्याने येऊन मणिभद्राच्या बायकोच्या पायाच्या बोटाची नखे काढली. ते काम संपले असेल नसेल [illegible] लल्या स्थितीत आला. 'भिक्षांदेहि' म्हणतां मणिभद्राकडे पहात स्मित करू लागला.

मणिभद्र त्याला पाहून दचकला. त्याला पाहतांच स्वप्नात पाहिलेलाच मुनी असल्याचे त्याने ओळखले. त्याने तत्क्षण दांडके उचलून त्या मुनीच्या डोक्यात हाणले. मुनी जमिनीवर आदळला आणि त्याच मानव देह अदृश्य होऊन सोन्याच्या पुतळ्यात त्याचे रूप पालटले. ते पाहून मणिभद्र, त्याची बायको आणि न्हावी तिथे आश्चर्यचकित झाले.

अघटित अनपेक्षितपणे ते घडलेले पाहून मणिभद्राच्या डोळ्यात आनंदाश्रू आले. तो बायकोच्या मदतीने तो सोन्याच्या पुतळा घरात घेऊन गेला आणि त्या पुतळ्याचे एक बारीकसे बोट कापून न्हाव्याला देत म्हणाला–"हे घे बाबा! तू हे सोने घेऊन सुखी हो! परंतु ही गोष्ट कोणाजवळ बोलू नकोस!"





# भल्लूक मांत्रिक

[ १० ]

[चांडाळ अस्वलाच्या हातातून उग्रदंडाने राजा दुर्मुखाला वांचविले आणि दुर्मुखाला भल्लूक मांत्रिकाकडे घेऊन जाण्याची जबाबदारी स्वतःवर घेतली. रानटी शिकारीसुद्धा चांडाळ अस्वलाबरोबर चंद्रशिला नगरीला जाण्यास तयार झाला. वाटेत चांडाळ अस्वलाला हत्तीवर आलेल्या चौघां जणांनी अडविले व त्याच्यावर तीर सोडू लागले. पुढे–]

चांडाळ भल्लूक त्याच्यावर येणाऱ्या बाणाना परशूने दूर सारून स्वतःचे रक्षण करू लागला. त्याने आपले वाहन त्या हत्तींच्या दिशेने वळवून तीर सोडणाऱ्या सैनिकावर हल्ला केला. सोंड तुटलेला हत्ती आणि सैनिकांचे हत्ती यांची झुंज सुरू झाली. सोंड, दांत आणि डोकी यांचा उपयोग करून हत्ती परस्परांना रेटीत झुंजू लागले. तेव्हा चांडाळ भल्लूकाने आपला परशू 'शिरीषवन भैरव की जय' असा जयघोष करून शत्रूच्या हत्तीवर फेंकला आणि एका हत्तीचा दांत तुटला. त्या गडबडीत रानटी शिकारी हत्तीवरून घसरून खाली पडला.

दात तुटलेला हत्ती मागे फिरला व पळू लागला. दुसऱ्या हत्तीवरचे सैनिक घाबरून गेले. ते परस्परांशी बोलू लागले– "त्या हत्तीवरचे अस्वल नुसते अस्वल नसून चांगले शिकलेले दिसते आहे." असे म्हणत



त्यांनी आपल्या हत्तीला वळविले आणि पळण्याचा विचार करू लागले.

चांडाळ भल्लूकाने त्याचा अनुयायी शिकारी खाली जमिनीवर पडला होता त्याच्याकडे एकदां पाहिले. तो बेशुद्ध होऊन पडला होता. परंतु न थांबतां त्याने आपल्या हत्तीला शत्रूच्या हत्तींवर सोडले. त्यांना थांबवून म्हणाला–"अरे मूर्खांनो! तुम्हांला मी अस्वल आहे असे वाटले का? मी गुन्हेगारांचा शिरच्छेद करणारा चांडाळ आहे. तुम्ही आहां तिथेच काही वेळ थांबा."

चांडाळ भल्लूकाचे ते रूप पाहून आणि त्याचा माणसासारखा आवाज ऐकून शत्रु-सैनिक थरथर कापू लागले.

सोंड तुटलेल्या हत्तीला शत्रूच्या हत्तींच्या चारीबाजूला एकदा दोनदा फिरविले. नंतर आपला परशू एका हत्तीच्या गंड-स्थलावर ठेवून सैनिकांना विचारले– "खरंखरं सांगा, तुम्ही कोण आहां? तुम्ही दुर्मुख महाराजांचा 'जयजयकार' केलात. त्या राजाचे डोके मी आपल्याकडे गहाण ठेवून घेतले आहे. तुम्ही ज्या दुर्मुख राजाचे नाव घेऊन 'जयजयकार' केलात तो खरोखरचा राजा नसून कोणी तोतया शेतकरी राजा तर नाही?"

त्याचे उत्तर देण्यापूर्वी त्या सैनिकांपैकी एकाने खाली वांकून चांडाळ भल्लूकाला नमस्कार केला व म्हणाला–"भल्लूक महाराज! आम्ही ज्या महाराजांचा 'जय-जयकार' केला ते उदयगिरीचे दुर्मुख महाराज आहेत. आम्हांला असे कळले की त्यांना हत्तीला वाहून करून येणाऱ्या कोणी व्यक्तीने कैद केले आहे. म्हणून त्यांना सोडवून घेऊन जाण्यासाठी आलो आहों."

ऐकून चांडाळ भल्लूक चकित होऊन म्हणाला–"तुम्ही ज्या महाराजांविषयी बोलत आहां त्यांना सोडवून नेण्यासाठी फक्त चारच जण आलां आहां का?"

ते ऐकून चारही सैनिक उत्तर न सुचल्या-मुळे म्हणा किंवा घाबरून म्हणा, परस्परा-

परशू दात तुटलेल्या हत्तीच्या गंडस्थलावर टेकून ठेवून दरडावून विचारले–"तुम्ही खरंखरं काय ते बोलला नाही तर या हत्तीचे गंडस्थल मी फोडणार आहे. त्यानंतर तुम्हां चौघांची डोकी फोडणार आहे."

तेव्हा सैनिकांपैकी एकजण धीर करून म्हणाला–"भल्लूक महाराज! दुर्मुख महा-राजांचा किल्ला सूर्यभूपती नावाच्या मांडलिक राजाने बळकावला आहे. त्या लढाईत आम्ही स्वतःचा बचाव करून आपल्या महाराजांच्या शोधार्थ आलों आहो."

"तुमची राजभक्ती वाखाणण्यासारखीच आहे, परंतु तुम्ही ज्या राजाच्या शोधार्थ एवढे कष्ट करून येथवर आला आहां तो राजा दुर्मुख चंद्रशिला नगरीवर स्वारी करण्यासाठी निघाला होता आणि वाटेत एका थोर मांत्रिकाचा आणि कालीवर्मा नामक एका पराक्रमी वीराचा अपमान करून संकटात सापडला आहे. आता तो जिवंत उदयगिरीला पोचेल की नाही शंकाच आहे. तेव्हां तुम्ही दुसऱ्या कोणत्या-तरी राजाच्या पदरी नोकरी करण्याचा विचार करा." चांडाळ भल्लूक म्हणाला.

सैनिकांना ते सर्व काही समजले नाही. ते चकित होऊन चांडाळ भल्लूकाकडे पहात राहिले. नेमका त्याच वेळी दुर्मुख राजाचा



अंगरक्षक धावत तेथे आला व म्हणाला– "भल्लूक प्रभो! आपल्या पाठीमागून येत असतां हत्तींचे 'चीत्कार' ऐकून आम्हांला वाटलं की आपल्या वाहनाला रानटी हत्तींनी अडविले तर नसेल!" असे म्हणत असतां जमिनीवर बेशुद्धावस्थेत उपडा पडलेल्या शिकाऱ्याकडे त्याची दृष्टी गेली. म्हणाला–"भल्लूक प्रभो! आपल्या सेव-काला हत्तींनी पायाखाली तुडविले असावे!"

चांडाळ भल्लूक आपला हत्ती रानटी शिकाऱ्याजवळ नेऊन म्हणाला–"तो मेल्या-सारखा नाही वाटत. तो हत्तीवरून घसरून पडला होता, बेशुद्ध झाला असेल. पाठीवर थोपटून पहा जरा!"



अंगरक्षकाने रानटी शिकाऱ्याच्या पाठी-वर थोपटून म्हटले–"अरे, ऐकलेस का? ऊठ, तुझे मालक तुला बोलावीत आहेत!"

शिकारी दचकल्यासारखा चटदिशी उठून बसला आणि तीरकमान हातात घेऊन सैनिकांवर नेम धरीत म्हणाला–"भल्लूक महाराजांना अडविणारे हेच सैनिक का?"

"अंगरक्षका! आम्हांला वांचव!" असे ओरडत सैनिक हत्तीवरून उड्या मारून खाली आले.

अंगरक्षक चकित झाला. त्याला 'अंग-रक्षक' म्हणून हाक मारणारे हे सैनिक कोण? नंतर त्यांच्याकडे निरखून पाहून त्यांना ओळखून म्हणाला–"तुम्ही आहां, होय? [illegible] आलांत?"

तो प्रश्न ऐकून चांडाळ सैनिक खदखदां हंसून म्हणाला–"ते नाही का तुला माहीत? तुझ्या दुर्मुख महाराजांचा किल्ला त्यांच्या एका मांडलिकाने बळकावला आहे. थोड्याच वेळाने ज्याचे डोके उडणार आहे त्याला राज्य असून नसून सारखेच म्हणा!"

त्याच वेळी तेथे राजा दुर्मुख आणि त्याच्या पाठोपाठ राक्षस उग्रदंड आणि जंगलातले चोर तेथे आले. दुर्मुखाने आपल्या सैनिकांना ओळखून विचारले–"अरे, तुम्ही इकडे जंगलात कशाला आलांत?"

सैनिक काही उत्तर देणार इतक्यात चांडाळ भल्लूक हत्तीवरून उतरून दुर्मुखाला म्हणाला–"दुर्मुखा! तोच प्रश्न तुझ्या अंगरक्षकाने त्यांना विचारला होता. मी सांगतो, ते ऐक! तू काळजी करण्यासारखे काही झालेले नाही. तुझा किल्ला तुझ्या एका मांडलिक राजाने बळकावला आहे!"

"कोण आहे तो मांडलिक राजा?" असे म्हणत दुर्मुख राजाने आपली तलवार म्यानेतून उपसली आणि आपल्या सैनिकांना म्हणाला–"माझा एकच मांडलिक राजा आहे, सूर्यभूपती! त्यानेच किल्ला बळका-वला असावा! तुम्ही आपला किल्ला शत्रूच्या हाती देऊन इकडे भितऱ्यासारखे [illegible] आत्तांच्या आत्तां तुमची डोकी उडवितो." असे दरडावून म्हणत दुर्मुख सैनिकांच्या अंगावर धावला.

परंतु उग्रदंड राक्षसाने चटदिशी पुढे होऊन दुर्मुखाचा हात धरला व त्याला थांबवून म्हणाला–"दुर्मुखा! अशी घाई करू नकोस! पहिल्याने तू आपले डोके भल्लूकाच्या व मांत्रिकाच्या हातातून वांच-विण्याचा प्रयत्न कर. त्यानंतर आम्ही सर्व तुला तुझा किल्ला परत मिळवून द्यायला मदत करू."

ते ऐकून दुर्मुख शांत झाला. उग्रदंडाचे दोन्ही हात आदरपूर्वक तो धरून म्हणाला–"उग्रदंड प्रभो! मला मरायचेच असेल तर एका राज्याचा राजा म्हणून मला मरू द्या! तुमची मदत मिळाली तर त्या दुष्ट मांडलिक राजाचे डोके छाटून किल्ल्यावर टांगल्याशिवाय मला चैन मिळणार नाही. त्यानंतर मी स्वखुशीने आपला शिरच्छेद करवून घ्यायला तयार होईन आणि स्वत: भल्लूक मांत्रिकासमोर जाईन."

दुर्मुख राजाच्या मनात जी वेदना होती ती समजण्या इतका उग्रदंड राक्षस शाहणा होता. त्याला त्याची दया आली. त्याने चांडाळ राक्षसाजवळ जाऊन त्याला विचारले–"हे बघ, चांडाळ भल्लूका!



दुर्मुख ही जी मदत मागतो आहे, तशी करू या का?"

चांडाळ भल्लूक क्षणभर विचारात पडला. नंतर सर्वांकडे एकदां नजर फिरवून म्हणाला–"तुम्ही सर्व मिळून मला फस-विण्याचा कट तर करीत नाही ना?" असे म्हणत तो आपल्या हातातल्या परशूची धार पारखल्यासारखा सोंग करू लागला.

उग्रदंडने विचार केला चांडाळ भल्लूक संतापून भडकून जाण्या आधी त्याला शांत करणे योग्य होईल. स्मित करून त्याच्या खांद्यावर हात ठेवीत उग्रदंड म्हणाला–"चांडाळ भल्लूका! आम्हांला सर्वांना तुझ्या परशूचा महिमा चांगला माहीत



आहे! परंतु मला हे सांग, भल्लूक मांत्रिकाने जे डोके आणायला तुला सांगितले आहे, ते राजा दुर्मुखाचे की सिंहासन घालवून बसलेल्या दुर्मुखाचे?"

चांडाळ भल्लूकाला त्या प्रश्नाचे उत्तर काय द्यावे हे न सुचल्यामुळे चिडल्यासारखा मान हालवून म्हणाला–"उग्रदंडा! तू काही निरर्थक गप्पा मारून मला धर्मसंकटात ढकलतो आहेस! मी म्हणतो आहे ते खरे आहे ना? तुला जे सांगावयाचे असेल ते स्पष्ट शब्दांत कां नाही सांगत?"

"तरमग ऐक! असे वाटते आहे की दुर्मुख राजाला आपल्या जिवापेक्षा त्याचे राज्य घालवून बसल्याबद्दल जास्त काळजी वाटते आहे. म्हणून त्या दुष्ट सूर्यभूपती मांडलिकाला किल्ल्यातून बाहेर काढून लोकांमध्ये हा विश्वास उत्पन्न केला पाहिजे की उदयगिरीचा राजा दुर्मुखच आहे. त्यानंतर आपण त्याला भल्लूक मांत्रिकाकडे घेऊन जाऊ."

ते ऐकून दुर्मुख राजा दोन्ही हात जोडून म्हणाला–"चांडाळ भल्लूक प्रभो! मी आणखी काही तासांनी हे जग सोडून जाणार आहे. म्हणून माझी ही शेवटची इच्छा मानून ती पुरी करण्याची जबाबदारी मला देहदंड देणाऱ्यावर आहे!"

चांडाळ भल्लूकाला ते पटले असावे. म्हणूनच त्याने होकारार्थी मान हलविली. त्याच वेळी रानटी शिकाऱ्याने आपला एक तीर झाडाच्या बुंधाला नेम करून सोडला व म्हणाला–"भल्लूक प्रभो! त्या मांडलिक राजाला माझ्या अचूक नेमबाजीचे एक उदाहरण म्हणून दाखविण्याची संधी मला द्यावी. कारण त्या मांडलिक राजाने रानांत पक्षी मारून जगणाऱ्या आम्हां रानटी शिकाऱ्यांकडून दर पक्षामागे कर वसूल केला आहे!"

तत्क्षण चोरांचा सरदार तलवार उपसून म्हणाला–"तो सूर्यभूपती दुष्ट व अत्याचारी आहे! आम्ही आपले प्राण तळहातावर घेऊन रानातून जाणाऱ्या यात्रेकरूंना लुटतो. [illegible]ती, आमच्या लुटीच्या मालातला अर्धा वांटा वसूल करून घेऊन येण्यासाठी हा मांडलिक राजा आमच्यावर आपल्या शिपायांना पाठवीतो. त्या दुष्ट मांडलिक राजाच्या मानाने दुर्मुख महाराज धर्मराज युधिष्ठिरासारखे आहेत!"

"अस्सं! तरमग व्हा पुढे! त्या मांडलिकाचे डोकेसुद्धा दुर्मुख राजाबरोबर भल्लूक मांत्रिकाला अर्पण करू या. परंतु उदयगिरी नगर किती दूर आहे, हे प्रथम सांगा!" चांडाळ भल्लूक आवेशाने म्हणाला.

"पाऊल वाटेने गेल्यास आपण अर्ध्या घटकेत तेथे पोहोचू! मी वाट दाखवायला पुढे चालतो. चांडाळ भल्लूक मालक! मला तुमच्या हत्तीवर बसायला परवानगी द्याल का?" शिकाऱ्याने विचारले.

होकारार्थी मान हलवून चांडाळ भल्लूक हत्तीच्या पाठीवर चढून बसला. उग्रदंड राक्षसाने दुर्मुख राजाला उचलून दांत तुटलेल्या हत्तीवर बसविले व भल्लूकाला म्हणाला–"तुझ्या परवानगीने मी दुर्मुख राजाला हत्तीवर बसवितो आहे. थोड्या वेळासाठी का होईना, राजा होणाऱ्या दुर्मुखाला हत्तीवर बसविणे, रास्त होईल!"

दुर्मुखाबरोबर दोन सैनिक त्या हत्तीवर बसले आणि चोरांचा नायक नागमल्ल



त्याचे दोघे अनुयायी आणि उरलेले दोघे सैनिक दुसऱ्या हत्तीवर बसले. रानटी शिकारी वाट दाखवीत पुढे हत्तीवर जात होता. अशा तऱ्हेने सर्वजण उदयगिरीच्या दिशेने निघाले. उग्रदंड आपली गदा खांद्यावर ठेवूत पायीच लांब पावले टाकीत चालू लागला.

अर्ध्या घटकेनंतर सर्वजण जंगल पार करून एका उघड्या मैदानावर आले. समोर एक मोठा किल्ला आणि त्याच्या मागे एक राजवाडा व भरगच्च भरलेली घरे दिसली. किल्ला पाहतांच दुर्मुख राजाच्या चेहऱ्यावर चिंतेची कळा दिसली. तो चांडाळ भल्लूकाला म्हणाला–"भल्लूक

प्रभो! या वेळी त्या दुष्ट मांडलिकाजवळ घोडेस्वारांचे एक दल आणि पायदळ सैन्याची एक तुकडी नक्कीच असणार. आपण मूठभरच आहों, त्यांच्याशी युद्ध करून त्यांना जिंकणे आपल्याला शक्य होईल का?"

"अस्सं! म्हणजे तुझ्या मनांत आतां ही शंका उत्पन्न झाली आहे, होय?" असे म्हणत चांडाळ भल्लूकाने आपला परशू उचलला आणि पाठीमागून येणाऱ्या उग्रदंड राक्षसाला जवळ बोलावून दुर्मुखाच्या मनातली शंका त्याला सांगितली.

उग्रदंड राक्षस आपली गदा जमिनीवर आपटून म्हणाला—"चांडाळ भल्लूका! तुझा परशू आणि माझी गदा शत्रूचा संहार करण्यास पुरणार नाहीत का? तरीसुद्धा जास्त रक्तपात न करता त्या मांडलिकाला कैद करून त्याचा शिरच्छेद करण्यासाठी दुसरी काही युक्ती असेल तर विचार करायला हरकत नाही."

[illegible] पूर्वीच नागमल्ल हत्तीवर उभा राहून म्हणाला—"प्रभो! मी या पूर्वीच एक युक्ती योजून ठेवली आहे! मी व माझे दोघे अनुयायी पहिल्याने किल्ल्यात गुप्तपणे शिरून त्या मांडलिक राजाला सांगू की आम्ही दुर्मुख राजाला कैद करून घेऊन आलो आहो. त्याबद्दल आम्हांला कोणते पारितोषिक देणार? तेव्हां तो आपल्या काही निवडक अनुयायांसह किल्ल्याबाहेर येईल!"

"वाहवा! तू काय उत्तम युक्ती काढली आहेस रे! तरमग जा, नीघ आधी!" उग्रदंडाने आज्ञा केली.

चोरांचा नायक आणि त्याचे अनुयायी हत्तीला पळवीत किल्ल्याच्या दिशेने थोडे अंतर चालून गेले असतील नसतील, त्याच वेळी किल्ल्याचे दार 'करकर' आवाज करीत चटदिशी उघडले गेले आणि आंतून टोळधाड यावी तसे घोडेस्वार आणि पायदळ सैन्य बाहेर आले. (क्रमशः)





# सैनिकाची वर्तणूक

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तू इतके श्रम करीत आहेस, हे कोणत्यातरी मित्रासाठी करतो आहेस का? कारण मित्राचे औदार्य हे विश्वास करण्यासारखं नसतं. त्याचे एक उदाहरण म्हणून तुला मी एक गोष्ट सांगतो. ती लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

कौशांबी या नगरीत राहणारा कुमारवर्मा नांवाचा एक शूर शिपायी होता. त्याने आपल्या मर्दुमकीने अनेक राजांच्या पदरी नोकरी करून पुष्कळ पैसे मिळविले. पुढे त्याला स्वदेशी जाण्याची फार इच्छा उत्पन्न झाली. कौशांबीला जाऊन लग्न



नंदगुप्ताने असे कोणत्या हेतूने सांगितले हे वर्माने चांगले ओळखले. म्हणून तो नंदगुप्ताला म्हणाला–"हे हिरे माझ्याजवळ राहल्याने मलाही चोरांची भीती राहणार. मी स्वतःचे रक्षण करीन. तू स्वतःचे रक्षण कर. मी तुझे रक्षण करू शकेनच, असे वचन मात्र देणे इष्ट होणार नाही." असे म्हणत तो आपल्या घोड्यावर बसून निघायला सिद्ध झाला.

नंदगुप्त फार घाबरला व त्याने त्याला एकट्याला सोडून न जाण्यासाठी कुमार-वर्माजवळ विनंती केली.

कुमारवर्मा म्हणाला–"मी एका अटीवर तुला कौशांबीला सुरक्षितपणे घेऊन जायची ज[illegible] [illegible] आहे. त्या उपकाराबद्दल तू आपल्या हिऱ्यांपैकी दोन मला दिले पाहिजेस."

नंदगुप्ताने मान्य केले. ती रात्र निर्विघ्न-पणे पार पडली. दुसऱ्या दिवशी उजाड-तांच दोघे कौशांबीला निघाले आणि त्याच दिवशी काळोख पडू लागण्यापूर्वीच सुखरूप पोचले. नंदगुप्ताने आपल्या चार हिऱ्यांपैकी दोन कुमारवर्माला दिले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"कुमारवर्माच्या या वागणुकीला आता काय म्हणावे? नंदगुप्त स्वार्थी असेलही! परंतु तो व्यापारी वाणीच होता. तो आपल्या वळणाप्रमाणे वागला. तरी त्याने कुमारवर्माशी लबाडी केली नाही. त्याच्या पैशाने विकत घेतलेले हिरे त्याने त्याला दिले आणि त्याचे उपकार आपल्या शिरावर राहू दिले नाहीत. कुमारवर्माजवळ पैसे राहिले असते तर त्यामुळे चोरांपासून जितकी भीती त्याच्या जिवाला वाटणे शक्य होती तितकी हिरे ठेवून घेतल्याने वाट-ण्याची गरज नव्हती. म्हणून नंदगुप्ताच्या व्यवहार निर्दोष होता. परंतु कुमार-वर्माच्या बाबतीत तसे म्हणता येत नाही. नंदगुप्ताचे रक्षण करतो असे सांगून त्याच्या हिऱ्यांपैकी दोन हिरे त्याने पट-कावले. हे अन्यायचे नव्हे का? नंदगुप्ताला [illegible] विकत [illegible] दिले होते त्या औदार्यात त्याचा कपटहेतूच नव्हता का? या शंकाचे समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस, तर परिणाम तुला माहीत आहेच. तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

तेव्हा विक्रमादित्य म्हणाला–"या बाब-तीत नंदगुप्त असो किंवा वर्मा असो एकाचीही प्रशंसा करण्यासारखे किंवा दोष दाखविण्यासारखे काही दिसत नाही. प्रत्येक आपापल्या जातीगत वृत्तीप्रमाणेच वागला. कुमारवर्माने जे पैसे दिले त्यात औदार्य म्हणण्यासारखे काही नव्हते. कमी किमतीला विकत घेऊन जास्त किमतीला विकणे हा त्याचा वृत्तिधर्म नव्हताच. कौशांबीला पोंहोचेपर्यंत त्याला पैशाची गरज नव्हती हे तो म्हणालाच होता. कुमारवर्माकडून पैसे घेतले असूनही नंद-गुप्ताने ते हिऱ्याच्या रूपाने परत करून त्यात त्याला फायदा करून दिला असे म्हणता येत नाही. कारण तसा फायदा करून घ्यायचाच असता तर त्याने नंद-गुप्ताच्या नंतर स्वतःच चार हिरे विकत घेतले असते. नंदगुप्तामुळे कुमारवर्माच संकटात सापडला होता. त्याने नंदगुप्ताला सुरक्षितपणे घरी पोचविण्याची जबाबदारी घेतल्याबद्दल त्याने मोबदला मागितला तर तो त्याचा वृत्तिधर्मच होता, त्यात गैर काहीच नव्हते. कारण त्याने सर्व पैसे अशाच तऱ्हेने तर मिळविले होते. कुमार-वर्माने त्याचे रक्षण केले असून त्याने रक्षण केले नाही असा विचार करण्यातही नंदगुप्ताची संकुचित वृत्तीच बाहेर येते. त्याच्या वृत्तिधर्माप्रमाणेच त्याची ती संकु-चित वृत्ती बाहेर पडली. स्वार्थाशिवाय कोणी कोणाला मदत करीत नाही असेच प्रत्येक वाण्याला वाटते."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



वादनाचा उपयोग जादू व मंत्रतंत्र करण्यासाठी करीत आहे. माझा या मंत्रांतंत्रांवर मुळीच विश्वास नाही. मूर्ख लोक पराचा कावळा करून एखाद्या लहानशा बाबीचं केवढे मोठे वर्णन करून सांगतात. मी दीपकाला आह्वान करतो आहे, वीणावादनाच्या चढाओढीला. मला संधी द्यावी."

राजाने दीपककडे निरोप पाठविला. दीपक मैनाकबरोबर जुगलबंदीस तयार झाला. पहिल्याने मैनाकने वीणा वाजविली. नंतर दीपकने त्याच रागात वीणेचे स्वर छेडले. मैनाक मंत्रमुग्ध झाल्यासारखा दीपकचे पाय धरून म्हणाला—"आपण सरस्वतीचे वरपुत्र आहांत. मी आपणाला कोणी मांत्रिक व जादुगार म्हणून समजून आपला अपमान केला. मला क्षमा करावी !"

दरबारी लोकांनी राजाला सुचविले की दीपकाचा सत्कार करायला याहून जास्त चांगली संधी पुन्हां मिळणे शक्य नाही. राजाने लोकाग्रहास्तव पुन्हां दीपकला वि[illegible] समारंभाला कबूल झाली.

राजाने चकित होऊन दीपकला विचारले—"दीपक! मागे देश दुष्काळाच्या संकटात पडला असतां तू 'मेघमल्हार' राग म्हणून पाऊस पाडलास त्यावेळी तुझा सत्कार करायची संधी आम्हांला दिली नाहीत आणि आतां मान्य केलेस, हे कसे काय?"

"महाराज, मला असे कधीच वाटले नाही की माझ्या वाद्यशक्तीमुळे पाऊस पडला. मी 'मेघमल्हार' राग वाजविला व पाऊस पडला हा केवळ 'काकतालीय' न्यायाप्रमाणे योगायोग असण्याची शक्यता असू शकेल. किंवा ती गोष्ट केवळ सरस्वतीच्या कृपा प्रसादाने घडली असेल. तिचा अनुग्रह माझ्यावर होता. पुन्हा दुसऱ्या सत्काराची गरज मला भासली नाही. आज एका वीणावादकाशी चढाओढ करून मी त्याला जिंकले आहे. त्याबद्दल आपण सत्कार करीत आहां. त्याला मी आनंदाने मान्य केले." दीपकने आपली बाजू स्पष्ट केली.





# रंग बदलणारी मणिमाला

कित्येक सहस्रवर्षे लोटली, एका जंगलात कालसुत नामक एक राक्षस रहात असे. तो नरभक्षी होता. एकदा एक तपस्वी मुनी त्याच्या हातात सापडले. मुनीने त्याला म्हणाले—"अरे राक्षसा, तू मला खाल्लेस तरी तुझी भूक भागणे शक्य नाही. मी आपल्या तपोबलाने तुझा वध करू शकेन. परंतु मला पुन्हा तेवढे पुण्य संपादन करायला शंभर वर्षे तप करावे लागेल. तू पूर्वजन्मी मोठे पाप करून हा जन्म मिळविला आहेस. तू मला सोडलेस तर तुला पुण्यप्राप्ती होईल."

कालसुतने थोडा वेळ विचार करून विचारले—"मुनिवर्य! तर मग या राक्षस जन्मातून मुक्ती संपादन करण्यास मी काय करावे, म्हणतां?"

मुनीने विचार केला,—"हा राक्षसजन्म घेऊन जन्माला आला आहे. म्हणून मुनींना खाऊ नकोस असे सांगितले तर तो ऐकणार नाही. परंतु या कलियुगात खरे पुण्यवान नसल्यासारखेच आहेत. म्हणून याला फक्त पुण्यवान पुरुषांनाच खा, असा सल्ला दिला तर याला नरभक्षण बंदच करावे लागेल."

असा विचार करून मुनी राक्षसाला म्हणाले—"माणसात पापी असतात व पुण्यवान पुरुषही असतात. शिळे, कुचके अन्नमांस वगैरे खाणे जसे अपायकारक असते तसेच पापी माणसाला खाणे अपायकारक असते. कारण त्यांचे पाप त्यांना खाणाऱ्याला लागते. म्हणून तू फक्त पुण्यवान पुरुषांना खाऊन आपल्या अंगात पुण्याचा सांठा कर. कोण पापी व कोण पुण्यवान आहे हे कळावे म्हणून मी तुला एक मणिमाळा देतो. तू ती आपल्या गळ्यात घालून कोणाला शिवलास आणि मणी हिरवे झाले तर तो पुण्यवान आहे.

असे समज. पापी असेल तर मणी लाल रंगाचे होतील." असे सांगून मुनीने एक पांढऱ्या मण्यांची माळ राक्षसाला दिली.

राक्षस ती माळ गळयात घालून हणाला—"तू पुण्यवान पुरुष आहेस म्हणून ी तुलाच खातो." असे म्हणत त्याने ुनीचा हात धरला. परंतु मणी हिरव्या रंगाचे न होता लाल रंगाचे झाले. म्हणून ाक्षसाने मुनीला सोडले.

मुनी विचार करू लागले—"मी राक्षसाला जो सल्ला दिला त्यामुळे माझे र्व पुण्य नष्ट झाले आणि पाप लागले ्राहे. मी काही चुकलो तर नाही?" ्यानंतर मुनी आपल्या आश्रमात परतला. ्याच चिंतेमुळे त्याचे मन कोणत्याही का[illegible] करून त्याने जे पुण्य संपादन केले होते, ते सर्व व्यर्थ गेले असे त्याला वाटू लागले. असे कां बरे व्हावे? आपल्या मनातली शंका दूर व्हावी यासाठी मुनी दुसऱ्या एका अरण्यात त्याचे गुरुवर्य तपश्चर्या करीत होते तेथे गेला.

सर्व ऐकून घेऊन गुरु म्हणाला—"तुझ्या मनातल्या सर्व शंकांचे समाधान करणारी चिरंजीवी नामक एक व्यक्ति आहे. तो विष्णुपुर येथे राहतो. तू त्यांच्याकडे जा."

मुनी विष्णुपूरला जाऊन चिरंजीवीला भेटले. चिरंजीवी एका सामान्य माणसासारखाच रहात होता. हा माणूस आपल्या शंकांचे समाधान कसे काय करणार, अशी [illegible] मुनींच्या मनात आली. [illegible] गुरूची आज्ञा होती, म्हणून त्यांनी आपल्या मनातली शंका चिरंजीवीसमोर व्यक्त केली.

चिरंजीवी सर्व काही शांतपणे ऐकून घेऊन म्हणाला—"तुम्ही तपश्चर्या करून बरेच पुण्य संपादन केले आहे. परंतु तुमच्या बुद्धीचा विकास अपेक्षेप्रमाणे झालेला दिसत नाही. तुम्हांला खायला आलेला राक्षस स्वतः किती दुष्ट आहे हे तुम्ही पाहिलेतच. या जगात पुण्यवान पुरुष मोजकेच आहेत. त्यांना त्या राक्षसाने खाऊन टाकले तर या जगात पापीच तेवढे उरतील. खरे बोलावयाचे म्हणजे जगाच्या रक्षणासाठी थोडे पुण्यवान पुरुषच असले पाहिजेत. एकटा सूर्य जगातला सर्व अंधकार नाहीसा नाही करीत का?"

"तर मग माझ्या हातून मोठीच चूक घडली, म्हणावयाची?" मुनीने विचारले.

"परंतु त्यासाठी दुःखी होण्याची गरज नाही. तुम्ही लगेच त्या राक्षसाकडे जा आणि त्याला तुमच्याकडून चूक झाल्याचे स्पष्टपणे त्याला सांगा." चिरंजीवीने सूचना केली.

"तो राक्षस माझ्या बोलण्यावर विश्वास करील म्हणता?" मुनीने शंका केली.

"तुम्ही दिलेला सल्ला चुकीचा होता असे सांगू नका. रंग सांगतांना चूक झाली. स्वतःच्या रक्षणासाठी ती चूक तुमच्या हातून घडली." चिरंजीवी म्हणाला.





तेव्हां मुनी पुन्हा राक्षसाकडे गेले. त्याने मुनीला विचारले–"तुझ्या सल्लचा-प्रमाणे वागून मी हात टेकले. एक देखील पुण्यवान प्राणी माणसात मला आढळला नाही."

राक्षस आपल्या सल्लचाप्रमाणे वागलेला पाहून मुनीला आनंद झाला. म्हणाला–"मनुष्यांत पापी माणसांपेक्षां पुण्यवानच जास्त आहेत. मानवजन्म पुण्यवानालाच लाभतो. मानवजन्मच सर्वात थोर होय. मी स्वत:ला वांचविण्याच्या हेतूने तुला मी खोटे सांगितले होते. रंगांची अदलाबदल करून सांगितली होती. वास्तविक पुण्यवान व्यक्तीचा स्पर्श केल्यास माळेतल्या मण्यांचा रंग लाल होतो. ती गोष्ट तुला सांगण्या-साठीच मी पुन्हां स्वत: तुझ्याकडे आलो."

"म्हणजे, तू आतां म्हणालास ते खरे आहे का?" असे विचारीत रागाने राक्षसाने मुनीला धरले. मुनीला हे माहीत होते की माळेला राक्षसाने हात लावताच मणी लाल होतील आणि राक्षस त्याला खाऊन टाकील. परंतु आपली चूक दुरुस्त करण्यासाठी मुनी आपला जीव गेला तरी त्याला तयार झाला होता. परंतु त्याच्या कल्पनेविरुद्ध माळेचे मणी हिरवे दिसले. तेव्हां चकित होऊन राक्षसाने विचारले–"हे कसे काय?"

"कारण मी तुला पुण्यवानांना ठार करायला पाठवीत आहे ना? ते पाप मला लागले." मुनी निर्भयपणे म्हणाला.

परंतु मुनीला एक गोष्ट स्पष्टपणे कळली की त्याने स्वत:च्या प्राणांचा मोह सोडून एक सत्कर्म केले, म्हणून त्याची सर्व पापे नष्ट झाली. त्याला हेही कळले की वाईट कामाची किंमत करू न शकणारे तप निरुपयोगी असते. तेव्हां त्याने मनाशी ठरविले की चिरंजीवी जवळ राहून सत्कर्म करण्यात पुढील आयुष्य घालवावे.

चिरंजीवी मुनीला म्हणाला–"तपश्चर्येचा फायदा तपश्चर्या करणारालाच होतो. परंतु सत्कर्म केल्यास अनेकांचे कल्याण होते.





# वसिष्ठ मुनि

देवर्षी या ऋषिवर्गात सप्तर्षी प्रमुख होत. देवर्षीत अग्रस्थात बृहस्पतीला दिले जाते, तर सप्तर्षीत वसिष्ठ मुनींना प्रथम स्थान दिले जाते. बृहस्पती, म्हणजे गुरु जसा सूर्याभोवती फिरणाऱ्या एका ग्रयाच्या रूपे आकाशात दिसतो तसे वसिष्ठ मुनी एका नक्षत्र रूपे दिसतात. सप्तर्षी ध्रुवाच्या चारीबाजूला फिरल्यासारखे भासतात. सप्त-र्षीत वसिष्ठ मुनींच्या बाजूला एक अंधुक तारा दिसतो, तोच वसिष्ठ मुनींची पत्नी अरुंधतीचा तारा होय.

एकदां वसिष्ठ मुनींनी लग्न करण्याचे ठरविले आणि वाळू शिजवून जी वाढू शकेल अशा कन्येचा शोध काढीत एका हरिजन वस्तीत पोचले. तेथे एका मुलीने वाळू शिजवून त्यांना जेवायला वाढले. तेव्हां वसिष्ठांनी जेवण्यापूर्वी अट घातली की त्यांनी तो वाळूचा भात खाल्ला तर त्या मुलीने त्यांच्याशी लग्न केले पाहिजे. तिने ते मान्य केले. तीच अरुंधती होय.

विश्वामित्र आणि वसिष्ठ यांचे पर-स्परांशी फार वैर होते. दोघे सरस्वती नदीच्या दोन किनाऱ्यांवर रहात. एकदां विश्वामित्र ऋषींनी वसिष्ठ मुनींचा वध करण्याचे ठरविले आणि त्यांना आपल्या घरी बोलावून आणायला सरस्वतीला सांगितले. परंतु सरस्वतीला मान्य नव्हते. परंतु विश्वामित्र मुनींच्या आज्ञेचे पालन केले नाही तर विश्वामित्र शाप देतील या भीतीने ती वसिष्ठांना नदी पार घेऊन आली आणि विश्वामित्र वसिष्ठांचा वध करू शकण्यापूर्वी त्यांना पैलतीरी घेऊन आली.

एकदा वसिष्ठ मित्रसह नामक राजाकडे अतिथी म्हणून आले. त्या राजाशी द्वेष करणाऱ्या एका राक्षसाने वसिष्ठांच्या

जेवणात नरमांस मिसळून ठेवले. वसिष्ठांना ते घृणित काम मित्रसह राजाचेच असावेसे वाटले व त्यांनी त्याला शाप दिला. राजाने देखील वसिष्ठांना शाप देण्यासाठी हातात मंत्रजल घेतले. परंतु मंत्रजलाचे प्रोक्षण त्याने वसिष्ठांवर न करतां आपल्याच पायावर करून घेतले आणि तो अशा तऱ्हेने कल्माषपाद झाला.

तरी कल्माषपादाला वसिष्ठांचा शाप लागलाच. त्यानंतर कल्माषपाद जाऊ लागला तेव्हां त्याला वाटेत वसिष्ठांचा शक्ती नावाचा मुलगा भेटला. दोघांचे परस्परांशी भांडण झाले. ते पाहून विश्वामित्रांनी कल्माषपादाच्या शरिरात एका राक्षसाचे आवाहन केले. त्यानंतर कल्माषपाद झालेल्या मित्रसह राजाने शक्ती व वसिष्ठ मुनींचे शंभर पुत्र यांना ठार केले.

आपल्या मुलांचा असा वध झालेला कळल्यावर वसिष्ठ आत्महत्या करायला तयार होऊन त्यांनी अग्नीत उडी टाकली. परंतु अग्नी थंड झाला. तेव्हां वसिष्ठांनी समुद्रात उडी टाकली. परंतु समुद्राने त्यांना सुरक्षित किनाऱ्यावर पोचते केले.

शेवटी ते निराश होऊन आपल्या आश्रमात परत आले. तेव्हां त्यांना त्यांच्या सुनेच्या गर्भाशयातून वेदपाठ होत असलेला ऐकू आला. वसिष्ठांनी विचार केला की नातवाचे तोंड पाहून कायमचे डोळे मिटावे. म्हणून ते आश्रमातच राहू लागले.

त्यानंतर राक्षस अंगात असतांनाच कल्माषपाद वसिष्ठ मुनींच्या आश्रमात त्यांच्या सुनेच्या पाठीस लागण्याच्या हेतूने आला. वसिष्ठांनी तेव्हां त्याच्यावर मंत्र-जल शिंपडले. कल्माषपाद शापमुक्त झाला.

वसिष्ठ सूर्यवंशीय राजांचे कुलगुरू होते. पुत्रसंतान प्राप्तीसाठी त्यांनी राजा दशरथा करवी पुत्रकामेष्ठी यज्ञ करविला. एकदां संवरण नामक राजा सूर्याची मुलगी तपती हिच्या प्रेमात विरहव्यथेनें व्याकूळ झाला असतां राजाचे पुरोहित म्हणून वशिष्ठ मुनींनी सूर्याला विनंती करून संवरण व तपतीचे लग्न करून दिले.



## सुरपुष्पमाला



विदर्भ देशाचा राजा भोज याच्या मुलीचे नाव इंदुमती होते. ती एक अप्सरा होती, परंतु शाप लागल्याने तिला मानवजन्म मिळाला. तिचे मूळ नाव हरिणी. ती इंद्रसभेत नृत्य करी.

तृणबिंदु नामक एक मुनी तपश्चर्या करीत होते. त्यांची घोर तपश्चर्या पाहून इंद्रासन डोलू लागले. इंद्राने भयभीत होऊन तृणबिंदूची तपश्चर्या भंग करण्यासाठी हरिणीला पाठविले.





हरिणीने तृणबिंदूची तपश्चर्या भंग केली खरी, परंतु त्याला आपल्या जाळ्यात अडकवू शकली नाही. तृणबिंदूने तिला मानवजन्म घेण्याचा शाप दिला. तिने घाबरून जाऊन मुनींजवळच शापमुक्तीचा उपाय सांगण्यास विनंती केली. तेव्हां मुनीने,



इंदुमतीचे लग्नाचे वय झाल्यावर भोजराजाने तिच्या लग्नासाठी स्वयंवर रचले आणि देशोदेशींच्या राजांकडे निमंत्रणे धाडली.

अयोध्येचा राजा अज स्वयंवरासाठीच चालला होता. वाटेत एका हत्तीने त्याला अडविले. अजने त्या हत्तीला ठार केले.





तो हत्ती मेल्याबरोबर त्याच्या शरिरातून एक गंधर्व प्रगट झाला. एका शापामुळे तो हत्ती झाला असल्याचे त्याने सांगितले. आता तो शापमुक्त झाला आहे. त्याने कृतज्ञता दर्शवून अजराजाला संमोहनास्त्र दिले.

स्वयंवर प्रसंगी इंदुमतीने अजच्या गळयात वरमाला घातली. इतर राजे व राजकुमार इंदुमती त्यांना वरील असे समजून आले होते, म्हणून ते चिडून जाऊन अजशी युद्धाला आले.





अज व इतर राजांचे घनघोर युद्ध झाले. त्या युद्धात अज राजाने गंधर्वाकडून प्राप्त संमोहन अस्त्राचा प्रयोग केला आणि सर्व राजांना बेशुद्ध केले.

त्यानंतर अज इंदुमतीला घेऊन अयोध्येला आला आणि आनंदाने राज्य करु लागला.





त्यांना एक मुलगा झाला तोच अयोध्येचा प्रसिद्ध राजा दशरथ त्याच्याच पोटी श्रीरामाचा जन्म झाला.



कित्येक वर्षे लोटली. एकदा नारद स्वर्गातून भूलोकी येत असतां त्याच्या वीणेवरची सुरपुष्पमाला सरकून खाली पडली.



त्यावेळी इंदुमती उद्यानात विहार करीत होती. तिच्या अंगावर ती माळा पडली. तत्क्षण तिला आपल्या पूर्वजन्माची आठवण झाली. म्हणून तिला शापमुक्ती मिळाली. तिने इंदु-मतीचा मानव देह सोडला व पुन्हा हरिणी होऊन स्वर्गलोकी इंद्रसभेत



# अग्नि

विश्वानर नामक एका ब्राह्मणाने पुत्र-प्राप्तीची कामना करून शंकराची अराधना केली. त्याच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन शंकराने त्याला पुत्रप्राप्तीचा वर दिला. वरप्रसादाने विश्वानराची बायको शुचिष्मती गरोदर होऊन तिला एक मुलगा झाला. तो विश्वानराचा मुलगा होता. म्हणून तो वैश्वानर झाला. परंतु देवांनी त्याचे नाव अग्नि असे ठेवले.

एकदा नारद विश्वानराला भेटण्यासाठी आला. त्यावेळी अग्नीला पाहून नारद म्हणाला—"या मुलाच्या जिवाला बाराव्या वर्षी धोका आहे. म्हणून विश्वानर काळ-जीत पडला. परंतु अग्नीने स्वतःच आपल्या वडिलांना धीर दिला आणि स्वतः काशीला जाऊन शंकराची आराधना करू लागला.

अग्नीला तपश्चर्येत लीन झालेला पाहून इंद्र घाबरून गेला. त्याची तपश्चर्या बंद पडावी यासाठी स्वतः येऊन त्याने अग्नीला विचारले—"तुला कोणता वर पाहिजे?"

अग्नी म्हणाला—"महात्मन्! मी आप-ल्याला प्रसन्न करण्यासाठी तपश्चर्या करीत नसून शंकराला प्रसन्न करण्यासाठी तप करीत आहे." थोडयाशा उर्मटपणाने अग्नीने इंद्राला ते उत्तर दिले. म्हणून इंद्राने वज्रायुधाने अग्नीवर प्रहार केला. अग्नी बेशुद्ध होऊन पडला. नारदमुनींनी वर्तल्याप्रमाणे अग्नीवर प्राणसंकट ओढवले.

परंतु त्याच वेळी शंकराने प्रकट होऊन अग्नीला आशीर्वाद दिला—"बाळ, ऊठ तू चिरंजीवी हो!" त्याला असा आशीर्वाद देऊन शंकराने त्याला एका लोकाचा अधिपती केले. तोच अग्निलोक होय आणि तो आग्नेय दिशेला आहे. अशातऱ्हेने अग्नी अष्टदिग्पालांपैकी एक ओळखला जाऊ लागला. तो अष्ट वसूंपैकी सुद्धा एक

आहे. यज्ञसमयी देवांना हव्य दान करते वेळी तो अग्नीलाच दिला जातो. अग्नीच्या बायकोचे नाव स्वाहा असे आहे, तिचे वाहन बकरी हे आहे.

एकदां भृगु महर्षी कोणत्या तरी कामासाठी निघतांना आपल्या पत्नीला अग्नीचे रक्षण करण्यासाठी सांगून गेले. त्यावेळी पुलोम नावाचा एक राक्षस आला. त्याने भृगूच्या पत्नीला पाहिले व अग्नीला विचारले–"ही कोणाची बायको?"

अग्नी म्हणाला–"ही भृगु महर्षींची बायको पुलोमा आहे."

"ही माझी बायको व्हायला हवी होती. परंतु भृगूने हिच्याशी विवाह कसा काय केला?" असे सांगून पुलोम राक्षस भृगुपत्नी पुलोमाचे अपहरण करून निघून गेला. त्यानंतर भृगुपत्नी पुलोमाचा मुलगा परशुराम याने त्या राक्षसाचा वध केला. तेव्हां पुलोमाने अग्नीच्या विरुद्ध पतीजवळ तक्रार केली. भृगूने संतापून अग्नीला सर्व भक्षक होण्याचा शाप दिला. तेव्हां अग्नी रागावला व त्याने देवांसाठी हव्य घेण्याचे सोडून दिले, देवांनी विष्णूकडे आपले गाऱ्हाणे नेले की अग्नी हव्य स्वीकारून पोचविण्याचे काम करीत नाही. विष्णू देवांना बरोबर घेऊन अग्नीकडे गेला. आणि अग्नीची स्तुती करीत म्हणाला–"तू सर्वभक्षक झालास तर त्यात काही बिघडले नाही. तू नित्य स्वच्छ व निर्मळ आहेस. सर्वांना पवित्र करतोस!" त्यानंतर अग्नीला त्याने हव्यवाहन केले.

त्याच सुमारास श्वेतकी नामक राजाने कित्येक यज्ञ केले, त्यामुळे अग्नीला अपचन झाले. अग्नीने त्याची पाचनशक्ती बिघडल्याची तक्रार केली. तेव्हां ब्रह्मदेवाने त्याला सुचविले की तू औषधी वनस्पतींनी युक्त अशा खांडववनाला जाळलेस तर तुला स्वास्थ्यलाभ होईल. अग्नीने कृष्ण व अर्जुन यांच्या मदतीने खांडववन जाळले आणि आपलं गेलेले स्वास्थ्य पुन्हा प्राप्त केले. तेव्हां अग्नीने अर्जुनाला पारितोषिक म्हणून गांडीव व कृष्णाला चक्रायुध दिले.



# सोन्याचा हंडा

कमलपूरचा जमिनदार फार मोठा उदार दानी होता. वार्धक्य आले तोपर्यंत त्याची सर्व जमिनदारी संपुष्टात आली होती. गावातल्या सरकारी कचेरीपासून उत्तरेकडे तीन मैलावरच्या एका सरोवरापर्यंत एक पाऊल वाट जात होती.

जमिनदार प्रमुख गावकऱ्यांना बोलावून म्हणाला–"मी तुम्हांला आजपर्यंत सांगितले नाही, ते आज सांगणार आहे. मला मूलबाळ नाही. मी आपल्या गावकऱ्यांनाच आपल्या सर्व इस्टेटीचे वारसदार मानतो. मी लहानपणापासून असे ऐकतो आहे की आमच्या आजोबांनी सरोवरापर्यंत डोंगरातून जाणाऱ्या वाटेवर कोठेतरी सोन्याच्या मोहोरा भरून एक हंडा पुरुन ठेवला आहे. मी वारल्यावर सर्व गावकऱ्यांचा त्यावर हक्क राहील. सर्वांनी त्या हंड्यातल्या मोहोरा वाटून घ्याव्यात. माझ्या आत्म्याला शांती कशी मिळेल हे मी एका चिट्ठीवर लिहून ठेवीत आहे. परंतु एक अट आहे. हंडा सापडल्यावरच चिट्ठी काढून वाचावी." असे सांगून जमिनदाराने डोळे मिटले.

गावकऱ्यांनी ती तीन मैलाची पाऊलवाट खणून पाहिली, परंतु हंडा सापडला नाही. त्यांनी पेटीतली चिट्ठी काढून वाचून पाहिली. तीत असे लिहिले होते–"सोने मिळाले नाही म्हणून निराश होण्याचे कारण नाही. पाऊलवाट खणल्याने एक पाट तयार झाला आहे. तो पाट तलावाला जोडल्यास तुमच्या जमिनीतून सोन्यासारखे पीक निघेल व तुमची कोठारे सोन्यासारख्या धान्याने भरून जातील.





# भुताच्या मालकीचे घर

एका खेडेगावात राहणारा व्यापारी शहरात व्यापारासाठी जायचे ठरवून आपली सर्व इस्टेट विकून आपल्या मुलांबरोबर शहरात जाऊन राहू लागला. त्याने जास्त पैसे व्यापारधंद्यात लावले व उरलेली रक्कम खर्च करून शहरातले एक जुने घर विकत घेऊन त्यात राहू लागला. व्यापार बुडीतच आला. त्यामुळे दु:खी होऊन तो अल्पवयातच मरण पावला.

व्यापाऱ्याचा मोठा मुलगा धाकट्या भावाला म्हणाला–"आपल्याला हे घर लाभले नाही. आपण हे घर विकून दुसरा काही तरी व्यापार करू या."

धाकट्या भावाने मानल्यावर दोघां भावांनी घरातल्या सामानसुमानाची यादी केली. नंतर घराला एक भुयार होते त्यात काय काय सामान काढून नेण्यासारखे आहे हे पाहण्यासाठी पायऱ्या उतरून गेले. भुयारात जिन्याखाली एक खोली होती. तिच्यात जुने लाकूड सामान होते. मूल्यवान वस्तू नव्हती.

मोठा भाऊ म्हणाला–"या खोलीत घेऊन जाण्यासारखं काही दिसत नाही. म्हणून आहे त्या अडगळीसकट घर विकून टाकू या."

मोठा भाऊ बोलतच होता, तेवढ्यात त्या खोलीतून एक विचित्र आकृती बाहेर येऊन म्हणाली–"काय म्हणालात, हे घर तुम्ही विकणार आहांत?" त्या भुताने दोघांना विचारले.

थोरल्या भावाने साहस करून उत्तर दिले–"होय, हे घर आम्हांला लाभले नाही. काही व्यापार करावा, म्हटले तर हातात पैसे नाहीत. एक फुटकी कवडीसुद्धा नाही."

"नको, नको, तुम्ही हे घर विकू नका. मी या तळघरात शांतपणे तपश्चर्या करीत बसलो आहे. तुम्ही हे घर विकून टाकलंत तर नवा घरमालक माझ्या या तपश्चर्येत विघ्न आणील किंवा हे घर जुने झालं आहे असा विचार करून पाडून नवे घर या जागी बांधील." भूत म्हणाले.

"आम्ही तुझ्या सोईकडे पाहू लागलो तर आमचं कसे भागेल?" दोघां भावांनी एकाच स्वरात विचारले.

"तुम्हांला पैसेच हवे आहेत ना? मी देतो, तुम्ही त्या भांडवलावर तुम्हांला वाटेल तो व्यापार करून पैसे मिळवा!" भूत म्हणाले आणि थोडे पैसे आणून देऊन ते अदृश्य झाले.

दोघां भावांनी घर विकायचा विचार सोडून आनंदाने त्या घराला कुलूप लावले. धाकटा म्हणाला–"आपल्याला किती सहजी एवढे धन मिळाले? आतां आपण कोणता व्यापार करूं या?"

"अरे, तुला वेडबीड तर नाही लागलं? कामधेनूसारख घरात भूत पाळून आपण व्यापार कशाला करायचा? गरज वाटेल तेव्हां भूताकडून मागून पैसे मागून घ्यायचे?" थोरला भाऊ म्हणाला.

तेव्हांपासून पैसे फुकटात मिळू लागल्यावर दोघां भावांनी दारू आणि जुगार यात सर्व पैसे खर्च केले आणि एकाच आठवड्याने



हातातले धन संपताच तळघरातली खोली उघडून दोघे भाऊ भुताला म्हणाले–"तू पैसे दिले होतेस. त्या भांडवलावर आम्ही कापडव्यापाराचा धंदा केला. काल रात्री गोदीला आग लागून सर्व माल भस्म होऊन गेला. या पूर्वीच आम्हांला वाटले होते की हे घर आम्हांला लाभलेले नाही. म्हणून आम्ही हे विकण्याचे ठरविले आहे."

"तुमच्या निष्काळजीपणामुळे तुमचे जे नुकसान झाले आहे, त्याचा दोष तुम्ही या घरावर कां लावतां? कापडाचा व्यापार सोडा दुसरा कसला तरी व्यापार सुरू करा." असे सांगून त्या भुताने आणखी

या खेपेसही त्यांनी दहाच दिवसात सर्व पैसे उडविले. "हे घर खरोखरच आम्हांला लाभलेले नाही. कदाचित हे माझ्या नावावर व्यापार केला म्हणून नुकसान झाले असावे. आतां यापुढे धाकट्या भावाच्या नावावर व्यापार करून पाहणार आहो!" मोठा भाऊ भुताला म्हणाला. भुताने पुन्हां पैसे दिले.

ते पैसेदेखील आठ दहा दिवसात खर्च झाले. तेव्हां थोरला भाऊ धाकट्याला म्हणाला–"आपण दर वेळी लहान रक्कम मागून घेत आलो आहो, या खेपेस मोठी रक्कम मागून घेऊ या."

असे मनात ठरवून दोघे भाऊ भुताकडे आले आणि भुतावर तावून म्हणाले– "अहो, आम्हांला व्यापारात लाभ असा आजपर्यंत झालाच नाही. म्हणून व्यापाराचा नाद आम्ही सोडला आहे. आम्ही जमीन विकत घेऊन त्यात पीक काढण्याचे ठरविले आहे. तेव्हां एवढेसे धन आम्हांला पुरणार नाही!"

भूत काही वेळ विचार करून म्हणाले– "माझी खात्री झाली आहे, खरोखरच, हे घर तुम्हांला लाभत नाहीसे दिसते आहे. तीन वेळ तुम्हांला व्यापारात नुकसान सोसावे लागले. तुझ्या वडिलांनासुद्धा हे घर लाभले नाही. मला आजपर्यंत वाटत होते की या घरात तपश्चर्या करून लाभ होईल. परंतु मला आतां वाटू लागले आहे की या घरात राहून मुक्ती मिळणेच शक्य नाही. हे घर मलासुद्धा लाभले नाही. तेव्हां हे घर तुम्ही विकून टाका. मी दुसरे एखादे घर शोधून तेथे रहायला जातो." असे सांगून भूत अदृश्य झाले.

अनपेक्षित असे काही घडल्यामुळे दोघे भाऊ निराश झाले.

त्याच दिवशी रात्री मुसळधार पाऊस पडला. त्या घरावर वीज पडली. दोघां भावांनी कसाबसा स्वतःचा जीव वांचविला आणि घराबाहेर आले. आतां विकण्यालायक ते घर उरलेच नव्हते.





# जादूची घंटा

मोतीपूरच्या राजघराण्यात काही विचित्र चाली व रूढी होत्या. सामान्यपणे राजाच्या मोठ्या मुलालाच गादीचा वारस हक्क होता. परंतु काही कारणाने जर मानसिक किंवा शारीरिक रोगामुळे त्याच्या अंगात काही व्यंग आले तर त्याला राज्याधिकार मिळत नसे. त्याच्याहून लहान राजपुत्राला तो अधिकार प्राप्त होई. परंतु जर मोठा मुलगा मरण पावला तर राज्याच्या प्राप्तीतील अर्धा वांटा एक पिढी पर्यंत देवालयाला मिळे.

मोतीपूरच्या राजाला दोन बायका होत्या. त्यांना अनुक्रमे कमल व कुनाल नावाचे दोघे मुलगे होते. मोठा मुलगा कमल चवदा वर्षांचा झाला तेव्हां राजाने त्याला एक समारंभ करून त्याला युवराज केले. ते कळल्यावर त्याची लाडकी राणी सुमती मत्सराग्नीने पेटली. तिने विचार केला की कमल राज्याभिषेकाला लायक नसल्याचे सिद्ध केले तर तिचा मुलगा कुनाल याला गादी मिळेल. परंतु कमलला शारीरिक व्यंग असल्याचे कसे दाखवायचे? हाच प्रश्न होता."

सुमती एकदा आपल्या माहेरी गेली. तेव्हां तिने तिच्या समोरचा तो प्रश्न तिची आते जटिला हिच्या कानावर घातला. तेव्हां तिच्या आतेने विचारले–"कमलचा हातपाय तोडून त्याच्या अंगात व्यंग निर्माण करणे शक्य नाही का?"

"ते काम सोपे नाही. शिवाय त्याच्यामुळे मीच धोक्यात पडते की काय ही भीती वाटते. त्या प्रयत्नात तो जर प्राणास मुकला तर राज्याचा अर्धा खजिना देवळाला जाण्याची शक्यता आहे. मला मदत करणारे माझ्या पिरुद्ध उलटतील तर, हाही प्रश्न आहेच!" सुमती म्हणाली.










रघुनाथने कमलला तपासून पाहिले व म्हणाला–"प्रधान, युवराजांवर विषाचा प्रयोग झाला आहे!"

प्रधानाने हेरगिरी करायला नेमलेल्या दासीला बोलावून विचारले. तिने सुमती कमलच्या दुधात एका बाटलीतल्या द्रवाचे एक दोन थेंब दररोज टाकीत असल्याचे सांगितले. प्रधानाने दासी करवी ती बाटली मागवून तशी दुसरी बाटली दुसराच एक द्रव घालून त्याच जागी नेऊन ठेवायला सांगितली.

त्यानंतर रघुनाथाकरवी इलाज सुरू करण्यात आला. युवराजाला पुन्हां वाचा आली. सुमती दररोज एक दोन थेंब घालीत आली असूनही त्याचा काही परिणाम झाला नाही.

शेवटी कमलची वैद्यकी चिकित्सा संपली. प्रधानाने राजाला सुमतीच्या कारस्थानाविषयी बाटली राजाला दिली. राजा सरळ सुमतीच्या दालनात गेला आणि विषाची बाटली राणी ठेवी त्या जागची दुसरी बाटली काढून म्हणाला–"राणी! हे विष नाही आहे, विषाची बाटली ही माझ्या हातात आहे! तू गेले काही दिवस विष समजून घातलेस ते विष नव्हतेच, औषध होते."

सुमती जणुकाही तिला काहीच न कळल्यासारखे सोंग करून म्हणाली–"महाराज! आपण हे काय म्हणालांत ते मला कळले नाही!"

राजाने आपल्या जवळची बाटली दाखवून बूच काढले व विचारले–"या बाटलीतले थेंब घालून तू आपल्या मुलाला काही दिवस दूध पाज!"

सुमतीला तिचे सर्व कारस्थान उघडकीला आल्याचे कळले, कारण तिच्या समोरच दासीने सर्व सांगितले. राजाने सुमतीला जन्मठेप शिक्षा सांगून तुरुंगात डांबून ठेवले.

परंतु गोलक नसूनही घंटा वाजली कशी? तशीच एक दुसरी घंटा रघुनाथाने आपल्या बाहीत बांधून लपवून ठेवली होती. सोमनाथाने तीच युक्ती सांगितली होती.





# देवाबरोबर बुद्धिबळांचा खेळ

फार प्राचीन काळची एक गोष्ट आहे. एक साधू होता. तो एक उत्तम गुरु म्हणूनही प्रसिद्ध होता. देशभर त्याचे शिष्य पसरलेले होते. ते आपल्या गुरूच्या दर्शनासाठी नेहमी उत्सुक असत.

साधू आपल्या आश्रमात फक्त सहा महिनेच रहात असे. त्या अवधीत त्याचे शिष्य येऊन त्याच्याकडे वेद व पुराण यांचा खोल अभ्यास करीत. बाकी सहा महिने गुरू देशभर हिंडून आपल्या शिष्यांना भेटे. शिष्य प्रेमाने त्यांना गुरुदक्षिणा व इतर भेटवस्तू देऊन गुरूला तृप्त करीत.

अशातऱ्हेने देशाटन करीत साधू खेडेगावात राहणाऱ्या आपल्या काही शिष्यांचे आतिथ्य स्वीकारून त्यांच्या गावी गेले. शिष्यांना फार आनंद झाला. ते आपल्या गुरुवर्यांना गावाच्या वेशीवर सामोरे जाऊन वाजतगाजत आपल्या गावी घेऊन आले. विष्णूच्या देवळात गुरुवर्यांच्या राहण्याची व्यवस्था करण्यात आली.

साधू आला त्या दिवसापासून गावात आनंदी आनंदच होता. भजन, कीर्तन, पुराण प्रवचन इत्यादी कार्यक्रमात गावकरी व शिष्य मग्न होऊन डेले. गावकऱ्यांना त्यांचा जन्म धन्य झाल्यासारखे वाटले.

त्या गावच्या लोकांचा उद्धार करून साधू दुसऱ्या गांवी प्रस्थान करण्यासाठी तयारीला लागला. त्यापूर्वी आपल्या सर्व शिष्यांना खूष करावे असे साधूला वाटले. आतां गाव सोडून जायला फक्त एक तासच उरला होता. परंतु साधू उतरल्या जागी चिंतामग्न स्थितीत येरझाऱ्या घालू लागला.

त्यावेळी साधूच्या डोक्यात शेजारच्या जंगलात राहणाऱ्या एका व्यक्तीद्वारे होणाऱ्या अत्यद्भुत गोष्टींविषयी विचार

बांधून निघाला. परतीच्या वाटेवर त्याला त्याच गावी उतरावे लागले.

त्या गावी येताच साधूला त्या विचित्र माणसाची आठवण झाली. त्याने अरण्यात जाण्याचे ठरविले आणि त्याला तो माणूस त्याच जागी दिसला. साधू जवळ जाऊन त्याला म्हणाला—"बाबा रे! आजच्या खेळात कोण जिंकला रे?"

त्याने पहिल्याप्रमाणेच एकदां झाडाकडे पाहिले व खदखदां हंसून म्हणाला—"राजा! प्याद्याची मात!"

"कायरे! तुला आज एवढा आनंद कसा काय? तू जिंकलास, होय ना?" साधूने विचारले.

"होय, साधू बुवा! मी जिंकलो. आज मी तुमच्या कृपेने कित्येक डाव जिंकले. आज माझे भाग्य उदयास आले. हा शेवटचा डाव सुद्धा मीच जिंकला. या खेपेस मी शंभर मोहरा पणाला लावल्या होत्या अन् त्या सर्व जिंकल्या." आणि पुन्हां मोठ्याने खदखदां हसला.

साधूला ते सर्व कळले नाही. स्वतःला येत असलेले हसू आवरीत साधूने विचारले—"देव तुला हे धन कसे देणार रे?"

"देव स्वतः कधीच आपल्या हाताने घेत नाही की देत नाही. तो कोणत्या तरी थोर साधूच्या रूपात येतो आणि माझ्या कडून घेतो व मला देतो! आज माझ्या भाग्याने आपणच मला दर्शन दिलेत!" तो माणूस म्हणाला.

ते सर्व ऐकून साधूची बोबडीच वळली. साधूचे तोंड पांढरे फट्ट पडले. लगेच तो विचित्र माणूस म्हणाला—"आपण द्याव्यात त्या मोहोरा, देवावरचे कर्ज फेडावे!" असे म्हणत तो दुष्ट माणूस शेजारच्या झाडीत त्याने लपवून ठेवलेले दांडके घेऊन आला.

साधू घाबरून गेला. देशाटनाच्या वेळी शिष्यांकडून त्याला गुरुदक्षिणा व भेटवस्तू ज्या काही मिळाल्या होत्या ते सर्व धन साधूने त्या लबाडासमोर ठेवले व रिकाम्या हाताने आपल्या गावी परत आला.






राजा शंतनू त्याची बायको मुलाला घेऊन निघून गेल्यामुळे अत्यंत दुःखी झाला. त्यानंतर काही वर्षे राज्य केल्यावर तो एकदा शिकारीला निघाला. गंगेकडे पाहून त्याला आश्चर्य वाटले. गंगेची धारा बारीक झालेली होती. थोड्या अंतरावर एक तरुण मुलगा धनुर्विद्येचा अभ्यास करीत असलेला दिसला. त्याने गंगेचे पाणी आपल्या धनुर्विद्येच्या कौशल्याने अडविले होते. मुलाला पाहून शंतनूचे मन त्याच्याकडे फार आकर्षिले गेले.

शंतनूला वाटले, हा मुलगा आपलाच तर नसेल? असेल तर किती बरे होईल? असा विचार करून शंतनू त्या मुलाजवळ गेला आणि त्याला विचारले—"बाळा! तुझे नाव काय रे? तुझे वडील कोण?"

परंतु मुलाने त्याचे काही एक उत्तर दिले नाही, तो आपल्या धनुर्विद्येच्या अभ्यासातच गुंग होता. थोड्या वेळाने तो तेथून निघून गेला. तेव्हां शंतनूने गंगेचे स्मरण केले. तत्क्षण गंगा नदी आपल्या मानवी रूपात प्रगट झाली. शंतनूने तिला विचारले—"मला येथे एक सुंदर स्वरूपवान मुलगा धनुर्विद्येचा अभ्यास करीत असलेला थोड्या वेळा पूर्वी दिसला. तो कोण, त्याला पुन्हा पहावेसे वाटते आहे?"

गंगा स्मित करून म्हणाली—"तोच आठवा वसू, आपलाच मुलगा! मी त्याला घेऊन येते. आपण त्याला घेऊन जा." असे सांगून गंगेने आपला मुलगा देवव्रत याला बोलावले आपले व म्हणाली—"या मुलाचे



वसिष्ठ मुनींजवळ वेदाध्ययन केले आहे आणि परशुरामाजवळ धनुर्विद्येचा अभ्यास केला आहे. हाच आपल्या कुळाचा उद्धार करील." असे सांगून गंगा अदृश्य झाली.

शंतनूने आपल्या मुलाला प्रेमाने पोटाशी धरले व त्याला रथात बसवून हस्तिनापूरला आला. मंत्री व पुरोहितांच्या सल्लयाने त्याचा युवराज्याभिषेक केला.

चार वर्षे पितापुत्रांच्या परस्पर स्नेह वात्सल्यात केव्हां गेली कळलेसुद्धा नाही. त्यानंतर एकदा शंतनू शिकारीला गेला असतां कालिंदी नदीच्या एका झाडाखाली विश्रांती घेण्यासाठी बसला. त्याला गोड

राजाला आश्चर्य वाटले. तो उठला व वास येत होता त्या दिशेने चालू लागला आणि आश्चर्य म्हणजे त्याला अप्सरेसारखी सुंदर 'एक तरुण स्त्री दिसली. तिच्या देहाचाच तो सुवास होता. राजाला वाटले की ही कोणी देवी, किन्नरी किंवा नागकन्या असावी.

असा विचार करून राजा शंतनूने तिच्या जवळ जाऊन तिला विचारले—"कोण ग तू? तुझ्या वडिलांचे नाव काय? तू एकटी या अरण्यात कोणासाठी फिरत आहेस? तुझ्या पतीचे नाव काय?" तिला पाहून त्याचे मन तिच्यावर मोहित झाले असल्याचेही त्याने सांगितले.

ती तरुण स्त्री स्मित करून म्हणाली—"मी दाशराज धीवराची मुलगी आहे. माझे लग्न झालेले नाही. माझे बाबा मला 'नाव चालवीत रहा, मी येतोच' म्हणून सांगून गेले आहेत. पलीकडे दिसते आहे, तेच आमचे घर."

"मी कुरुवंशी राजा शंतनू. तू आपले हे यौवन असे व्यर्थ कां घालविते आहेस? माझी राणी हो व सर्व सुखांचा उपभोग तुला प्राप्त होईल. मला आतां पत्नी नाही. पूर्वी एकीने माझे वरण केले होते, परंतु ती मला सोडून गेली. त्यानंतर कोणत्याही इतर

परंतु तुला पाहिल्यावर मला पुन्हां संसारसुखाची इच्छा उत्पन्न झाली आहे. मी तुझा दास होऊन पुढले आयुष्य घालवीन." राजा शंतनू म्हणाला.

शंतनू म्हणाला ते ऐकून त्या तरुणीच्या मनातही चलबिचल होऊ लागली. ती लाजतलाजत म्हणाली—"आपल्याला पाहिल्यापासून माझे मनही माझ्या ताब्यात राहिले नाही. परंतु आम्हां स्त्रियांना आपल्या कर्तव्याचे पालन करावे लागते. त्यांचे लग्नसंबंध वडील धाऱ्यांनीच ठरवायचे असतात. स्वतःच आपले लग्न ठरवून आईवडिलांचा अपमान करणे आम्हां स्त्रियांना शोभत नाही. म्हणून आपण माझ्या वडिलांना भेटून त्यांच्या परवानगीने माझ्याशी विवाह करावा."

ती म्हणाली ते राजा शंतनूलाही रास्त वाटले. त्याने तिच्या वडिलांना भेटण्याचे ठरविले.

दाशराजाने शंतनूला येत असलेला पाहून दुरूनच प्रणाम केला व म्हणाला—"मी आपला दासानुदास आहे. आपण माझ्या या कुटीत आपल्या पायाची धूळ झाडून मला उपकृत केले आहे. मी आपली कोणती सेवा करू? आज्ञा व्हावी!"

"तुला हरकत नसेल तर तुझ्या अनु-



माझी एवढीच इच्छा आहे!" राजा शंतनू म्हणाला.

ते ऐकून दाशराज खूष झाला. म्हणाला—"महाराज, आपण माझ्या मुलीशी लग्न करून माझ्या कुळाची प्रतिष्ठा वाढवीत आहां, हे माझे केवढे मोठे भाग्य? तरी एक विनंती करावी म्हणतो. आपल्या कृपेने माझ्या मुलीला होणाऱ्या मुलालाच आपला वारस म्हणून आपल्या मागे राज्याचा अधिकार मिळाला पाहिजे."

ते ऐकतांच राजा शंतनूला त्याचा एकुलता एक मुलगा गांगेय देवव्रत आठवला. म्हणून त्याला काय उत्तर द्यावे सुचेना.



तेथून निघून गेला. परंतु त्याचे मन दाश-राजाच्या मुलीवरच अडकून राहिले होते. तो भूकतहान विसरला व त्याला झोपही येईना. त्या स्थितीत उदास मनाने तो आपल्या शयनगृहाबाहेरही आला नाही.

त्या स्थितीत आपल्या वडिलांना पाहून गांगेयाने विचारले–"बाबा! आपण दुःखी व उदास दिसतां आहां! मला त्याचे कारण सांगाल का? कोणी मोठ्या शत्रूने आपल्या-वर हल्ला किंवा स्वारी तर केली नाही? की काही अनपेक्षित घडले आहे? मी असतां आपल्याला काळजी करण्याचे कारणच काय? आपल्या मनात काही इच्छा पुरी करण्यासाठी मी सर्व काही करीन."

मुलगा म्हणाला ते ऐकून शंतनू थोडा लाजल्यासारखा झाला आणि म्हणाला– "मुला तू माझा एकुलता एक मुलगा आहेस. मग काळजी कां असू नये. असे सांगतात की एकच एक मुलगा व एकच एक डोळा यांचा भरंवसा नसतो. एकुलत्या एका मुलाला अनपेक्षित असे काही घडले तर बापाची स्थिती कशी होईल?"

गांगेयने मंत्री व प्रधानाला विचारून खरी गोष्ट समजून घेतली व मंत्र्यांना बरो-बर घेऊन दाशराजाकडे आला. म्हणाला– "दाशराजा! आपल्या मुलीचा विवाह माझ्या वडिलांशी करून दे! मी तुझ्या मुलीला आपली माता मानून तिची योग्य सेवा करीन. मी तुला हे वचन देतो."

दाशराज सर्व ऐकून घेऊन म्हणाला– "माझ्या मुलीशी युवराजांनी स्वतःच लग्न करून घेण्यास काय हरकत आहे? आपण असतां माझ्या मुलीच्या मुलाला राज्य देणे योग्य होणार नाही."

"तू आपल्या मुलीला माझ्या मातेच्या रूपे दे. तिच्याच मुलाला राज्य प्राप्ती होईल." गांगेय म्हणाला.

"युवराज आपण राज्यत्याग करू शकाल.

राज्याचा अधिकार खुशीने देतील याचे काय प्रमाण?" दाशराजाने शंका केली.

"तरमग दाशराजा, ऐक. मी प्रतिज्ञा करतो की मी लग्नच करणार नाही व आजन्म ब्रह्मचारी राहीन. म्हणजे माझ्या-कडून तुझ्या नातवाला कोणी प्रतिस्पर्धीच जन्माला येणे शक्य नाही. माझ्या स्वतःच्या विषयी तू शंका करण्याचे कारणच नाही. तेव्हां तू आपल्या मुलीला माझ्या मातेच्या रूपे पाठवून दे." गांगेयाने अशी प्रतिज्ञा करून दाशराजाला निश्चित केले.

ती प्रतिज्ञा ऐकून दाशराजाने मान्य केले. त्यानंतर सत्यवतीचा शंतनूशी विवाह झाला. गांगेय देवव्रताने अशी 'भीष्म' म्हणजे भयंकर प्रतिज्ञा केल्यामुळे त्याला पुढे सर्व जग 'भीष्म' या नावानेच ओळखू लागले.

असेच काही दिवस गेले. शंतनूला सत्यवतीच्या पोटी दोन मुलगे झाले. त्यांची नावे अनुक्रमे चित्रांगद व विचित्रवीर्य अशी होती. परंतु दुर्दैवाने ते दोघेही पुत्र-प्राप्ती होण्यापूर्वीच मरण पावले.

त्यानंतर सासू सत्यवतीच्या आज्ञेप्रमाणे विचित्रवीर्याची मोठी बायको अंबिकेला व्यास मुनींकडून नियोगाद्वारे एक मुलगा झाला. परंतु तो मुलगा आंधळा निघाला. त्याचे नाव धृतराष्ट्र. सत्यवतीने विचार केला कि आंधळ्या धृतराष्ट्राला राजपद देणे योग्य होणार नाही. म्हणून तिच्या आज्ञेप्रमाणे तिची धाकटी सून अंबालिका





हिला व्यासमुनींकडून नियोगाद्वारे एक मुलगा झाला. परंतु तोपांडुरोगाने जन्मत:च आजारी निघाला. त्याला पांडुराज हे नांव प्राप्त झाले.

अशातऱ्हेने दोन्ही प्रयत्न अयशस्वी झालेले पाहून सत्यवतीने अंबिकेला सल्ला दिला की व्यासांकडून नियोगाद्वारे आणखी एका मुलाची प्राप्ती करून घे. परंतु ती गोष्ट अंबिकेला मान्य नव्हती. म्हणून तिने आपल्या दासीला व्यासांकडे पाठविले. त्या दासीच्या पोटी जो मुलगा झाला त्याला विदुर हे नांव मिळाले.

यथासमयी भीष्माने पांडूचा राज्याभिषेक केला. पांडूने विदुराला आपला मंत्री नेमले. कालक्रमाने धृतराष्ट्राचा गांधारीशी व एका वैश्य स्त्रीशी विवाह झाला. गांधारीच्या पोटी त्याला शंभर मुले व वैश्य स्त्रीच्या पोटी एक पुत्र झाला. पांडुराजाचा विवाह कुंती व माद्रीशी झाला. कुंतीला तीन मुलगे आणि माद्रीला दोन मुलगे झाले. तेच पंचपांडव,—अनुक्रमे युधिष्ठिर, भीम. अर्जुन, नकुल व सहदेव.

कुंतीला लग्नापूर्वी सूर्याच्या कृपेने एक मुलगा झाला होता. त्याला तिने लोकलाजेस्तव गुप्तपणे नदीत सोडले होते. तोच कर्ण होय. तो शैशवावस्थेत एका सूताला मिळाला व त्याच्याच घरी वाढला.

पांडव जन्मल्यावर पांडू आपले राज्य धृतराष्ट्राला देऊन आपल्या दोघां पत्नींबरोबर वनविहाराला गेला असतां तेथेच वारला. माद्रीने सहगमन केले. कुंती पांचपांडवांना घेऊन धृतराष्ट्राकडे आली.

पांच पांडवांनी द्रुपद राजाची मुलगी द्रौपदीशी लग्न केले आणि तिला त्यांच्यापासून पाच मुलगे झाले. अर्जुनाने श्रीकृष्णाची बहीण सुभद्रेबरोबर लग्न केले. तिच्या पोटी अभिमन्यू जन्मला. अभिमन्यू महाभारत युद्धात मारला गेला तेव्हां त्याची बायको उत्तरा गरोदर होती. तिच्या पोटी परीक्षिताचा जन्म झाला.

महाभारत युद्धात सर्व मुलगे धारातीर्थी पडल्यावर धृतराष्ट्र व गांधारी युधिष्ठिराच्या











आश्रयाला काही काळ राहिले. युधिष्ठिराने त्यांना प्रेमाने व आदराने वागविले. परंतु भीमाने पदोपदी त्यांचा अपमान करून त्यांना जिणे नकोसे केले.

शेवटी धृतराष्ट्राने गांधारी, विदुर आणि संजयला बरोबर घेऊन वानप्रस्थाश्रमात प्रवेश केला. कुंतीसुद्धा तेव्हां त्यांच्याबरोबर गेली. सहा वर्षे लोटली. एके दिवशी युधिष्ठिराला स्वप्न पडले. त्याला कुंती कृश झालेली दिसली. त्याने आपल्या भावांना ती गोष्ट सांगितली व म्हणाला–"धृतराष्ट्र गांधारी, कुंती इत्यादींना भेटून येऊ या."

सर्वांनी होकार दिला. पांडव, द्रौपदी, सुभद्रा, उत्तरा व इतर नागरिकांसह शतयूपाश्रमात गेले. तेथे विदुराशिवाय सर्व भेटले. विदुर एकांतात तपश्चर्या करीत असल्याचे धृतराष्ट्राने सांगितले.

तेव्हा युधिष्ठिर विदुराचा शोध काढीत गंगाकाठी गेला. एका जागी विदुराला घोर तपश्चर्या करीत असलेला पाहून युधिष्ठिराने आपले नांव सांगितले व नमस्कार केला. परंतु विदुराने उत्तरच दिले नाही. त्याच वेळी विदुराच्या मुखातून एक ज्योती निघाली व तिने युधिष्ठिराच्या मुखात प्रवेश केला. विदुर निस्तेज होऊन जमिनीवर पडला.

त्यानंतर युधिष्ठिर धृतराष्ट्राकडे परतला आणि त्याने विदुर निवर्तल्याची गोष्ट सांगितली. काही काळ त्यांच्या बरोबर आश्रमात राहून सर्वांबरोबर युधिष्ठिर हस्तिनापूरला परतला.

त्यानंतर काही दिवसांनी एका मोठ्या दावानलात सांपडून धृतराष्ट्र, गांधारी व कुंती भस्मीभूत झाले. त्यापूर्वीच संजय कोणत्यातरी तीर्थस्थानी निवर्तला होता.

आतां कौरव व पांडवांच्या वंशात एकटा परीक्षितच काय तो उरला होता. तो सुद्धा एका मुनीच्या शापामुळे तक्षक चावल्याने मरण पावला. परीक्षिताचा मुलगा जनमेजय याने पित्याच्या मृत्यूचा प्रतिकार करण्याच्या हेतूने नागयज्ञ केला. त्यात अनेक नागांची आहुती पडल्यावर यज्ञ संपला.





# साधूंपासून सावध

राधाबाई सैंपाकघरात सैंपाक करीत होत्या. एका बाईचा आवाज त्यांना ऐकू आला. आई! अहो आईसाहेब!" राधाबाईनी बाहेर येऊन पाहिले. एक बाई मुलाला कडेवर घेऊन उभी होती. राधाबाई म्हणाल्या–"सैंपाकसुद्धा झाला नाही बाई!"

"आईसाहेब! मी भीक मागायला नव्हते आले. मी लक्ष्मीपूरची राहणारी आहे. माझे नाव गौरी. चार दिवसांपूर्वी माझे यजमान शेतावरून घरी परत येत होते आणि एक मुंजा त्यांच्या मानेवर बसला. माझ्या यजमानांच्या पोटात दुखू लागले. औषधपाणी केले. परंतु त्यांना रक्ताच्या उलट्या होऊ लागल्या. सकाळी देवासारखे एक साधूबुवा आमच्याकडे आले. त्यांनी मंत्र टाकून तत्क्षण पोटदुखी थांबविली आणि उलट्या बंद झाल्या. त्या साधूबुवांना आम्ही पैसे देऊ लागलो. परंतु त्यांनी एका पैलासुद्धा हात लावला नाही आणि निघून गेले. काल पुन्हां त्यांच्या पोटात दुखू लागले. गावकऱ्यांनी ते साधुबुवा या गावात आले असल्याचे मला सांगितले. मी त्यांचा शोध काढते आहे. परंतु कोठे दिसले नाहीत. आईसाहेब, ते तुम्हांला कोठे दिसले तर त्यांना माझ्या घरी पाठवून द्या." गौरी म्हणाली.

"बरं, पाठवते हं!" असे सांगून राधाबाई सैंपाकघरात निघून गेल्या. सैंपाक झाल्यावर राधाबाई थोडा वेळ आडव्या झाल्या. इतक्यात दाराबाहेर कोणी म्हणाले–"अन्नपूर्णेश्वरी! माते!"

राधाबाईने पुढे येऊन दार उघडले. समोर एक साधू उभा होता. राधाबाईला गौरी म्हणाली होती ते आठवले. साधूला म्हणाली–"साधुबुवा! तुम्हांला गौरी नावाची बाई आठवते का?"



"कोण हो गौरी? माते!"" साधूने विचारले.

"ती लक्ष्मीपूरची राहणारी आहे. तिच्या नवऱ्याच्या मानेवर मुंजा बसला होता आणि त्याला आपण सोडविलेत. त्या बाईच्या नवऱ्याला पुन्हां पोटशूल सुरू झाले आहे. म्हणून ती आपल्या शोधार्थ आली होती." राधाबाई म्हणाल्या.

"होय, होय! आठवले. मला आज याच गावात मला काम आहे. मी उद्यां जातो तिच्या गावी." साधू म्हणाला.

त्या साधूवर राधाबाईचा विश्वास बसला. त्यांनी त्याला बोलावून आपल्या समोरचा प्रश्न साधूसमोर निवेदन केला.

[illegible] व म्हणाला–"बेटी, तू लग्नानंतर सासरी आलीस तेव्हां तू शेतावर नवऱ्यासाठी जेवण घेऊन निघालीस. त्यावेळी तू कोणाचा तरी मंत्रवलेला ताईत खाली पडलेला होता, तो ओलांडून गेलीस. त्या दिवशी रात्री तुला फणफणून ताप आला होता. दहा दिवस तू बेशुद्धावस्थेतच होतीस. म्हणून तुला मूल होत नाही. गंडा बांधून घे. ताईत घातलास तर फारच छान. तुला मुलगा होईल."

त्यानंतर साधूने एक लांबलचक यादीच वाचली. राधाबाईंनी त्या सर्व वस्तू आणून साधूसमोर ठेवल्या. साधूने हळद कुंकवाने उभ्या आडव्या रेषा काढल्या आणि त्या रेषांवर एक पाट ठेवला आणि त्यावर राधाबाईंना बसायला सांगितले. नंतर मंत्र म्हणत त्याने लिंबे कापली आणि ती राधाबाईंच्या डोक्या भोंवती फिरवून एक नारळ फोडला आणि नारळाचे पाणी राधाबाईंच्या डोक्यावर शिंपडले. पिशवीतून एक ताईत काढून राधाबाईच्या डोक्यावर ठेवला आणि कापूर लावून त्यांना ओवाळले. कापराच्या वासाने राधाबाईंना एकाएकी घेरी आल्या सारखे झाले. साधूने ताईत त्यांच्या गळयात बांधला आणि त्यांच्या गळयातली सोन्याची माळा काढून घेतली. राधाबाई बेशुद्धावस्थेतच होत्या. त्यानंतर साधूने त्यांच्या

[illegible] त्या शुद्धीवर आल्या. "आतां तुम्हांला मुलगा होईल बाई!" असे सांगून साधूने मंत्रवलेल्या सर्व वस्तू आपल्या झोळीत ठेवल्या. राधाबाई घरातून पंचवीस रुपये साधूला देऊ लागल्या. साधूने निर्लोभपणाचा आव आणून ते रुपये घेतले आणि निघून गेला.

त्यानंतर राधाबाई आनंदाने त्यांना होणाऱ्या मुलाचे स्वप्न पहात झोपल्या. थोड्या वेळाने यजमानांनी हाक मारली ती ऐकून दचकून उठून दार उघडले. सोमदेवाने घरात पाऊल टाकतांच बायकोला हळद आणि कूंकवाने माखलेली पाहून कारण विचारले. राधाबाईने सर्व वृत्त सांगितले.

सोमदेव थट्टेत म्हणाला–"प्रत्येकाचे आपलं आपलं एक वेड असते. ते कोण बदलणार?"

त्या दिवशी रात्री जेवण झाल्यावर सोमदेव खाटेवर आडवे झाले. राधाबाईंनी विडा लावून दिला. त्यावेळी बायकोच्या गळयातला ताईत पाहून सोमदेवने विचारले–"हाच का ताईत, तुला मुलगा देणारा?"

"तुम्हांला प्रत्येक गोष्टीत थट्टाच सुचते!" असे म्हणत राधाबाईंनी गळयातला ताईत हातात धरला. त्यावेळी त्यांना सोन्याची माळा हाताला लागली नाही. त्यांचा चेहरा एकदम पांढराफट्ट झाला. त्यांनी लगेच उठून सर्व घर पालथे घातले. परंतु माळा सापडली नाही. शेवटी नवरा



झोपला होता ते अंथरूण नवऱ्याला उठवून झाडून पाहिले.

बायकोला घाबरलेली पाहून सोमदेवने विचारले–"काय शोधते आहेस?"

राधाबाईंनी रडक्या आवाजांत उत्तर दिले–"माझी माळ दिसत नाही."

"कोठे ठेवली होतीस ती तू?" सोमदेवने विचारले.

"आज सकाळी नहाले, तेव्हा काढून ठेवली होती, ती मी पुन्हा घातली, चांगले आठवते आहे मला." राधाबाई म्हणाल्या.

तेव्हां सोमदेवाला साधूची शंका आली. त्याने गावभर साधूला हुडकून पाहिले. परंतु तो कोठे दिसला नाही. गांवाच्या उत्तरेला एका मैलावर एक पडके देऊळ होते. तेथे त्या साधूला हुडकण्यासाठी आपल्या नोकराला बरोबर घेऊन सोमदेव निघाला.

देवळापर्यंत पोचे तोंवर काळोख पडू लागला होता. देवळाच्या पायऱ्यांवर एक लहान मुलगा बसला होता. सोमदेवला देवळाच्या कोपऱ्यात एक बाई सैपाक करीत असल्या-सारखी दिसली.

इतक्यात एक जण दारू पिऊन बरळत गाणे म्हणत येत असलेला दिसला. सोमदेव व नोकर भितीआड लपून उभे राहिले. दारूड्या हातातली बाटली खाली ठेवून म्हणाला–"अग ए, पहा तर मी तुझ्यासाठी काय आणलं आहे ते!" असे म्हणत त्याने माळ काढून दाखविली.

दुसऱ्या क्षणाला सोमदेव व त्याच्या नोकराने त्या दारूड्याची मानगुटी धरली आणि माळ काढून घेऊन त्याला खूप बडविले. त्याची दारू उतरली. त्याने सोमदेवाचे पाय धरून माफी मागितली.

नंतर सोमदेव घरी परत आला. राधाबाईला तिची माळ परत देत त्याने तिला विचारले–"साधूने तुझ्या गळ्यातली माळ काढली तेव्हां तुझी अक्कल कोठे गेली होती?"

परंतु राधाबाईच्या तोंडातून एक शब्दही उमटला नाही.



# सदुपयोग

सोनूशेट श्रीमंत होते, परंतु पहिल्या नंबरचे चिकट होते. ते बायकोच्या खर्चीपणामुळे कंटाळून जाऊन तीर्थयात्रेला निघाले. निघते वेळी घराची सर्व जबाबदारी त्यांनी मुलावर टाकली. त्यांच्या परसात विहीर नव्हती. शिवरामने वडिलांना कित्येकदा विचारले–"विहीर खणू या का?" परंतु सोनूशेटला खर्च करायचा नव्हता. ते टाळाटाळ करीत होते.

बाप तीर्थयात्रेला निघून गेल्यावर शिवरामने विचार केला, बाबांनी नको म्हणून नव्हते सांगितले. तेव्हां ते परत यायच्या आधी विहीर खणून घ्यावी. विहीर खणण्याचे काम सुरु झाले. जेमतेम दोन फूट जमीन खणली असेल, त्यातून एक तिजोरी निघाली.

मजूर म्हणाले–"मालक! हा आपल्या वाडवडिलांनी पुरून ठेवलेला धनाचा सांठा आहे. ते पुण्यवान होते. तुम्ही हे धन दान करून पुण्य संपादन करा."

शिवराम उदार स्वभावाचा होता. म्हणून त्याने सर्व धन व सोने गोरगरिबांना वांटून टाकले. सोनूशेटने घरी आल्यावर विहीर खणलेली पाहिली. त्यांनी मुलाला विचारले–"काय रे, मी याच जागी एक तिजोरी पुरून ठेवली होती?" शिवरामने सारा वृत्तांत थोडक्यात सांगितला. त्या लोभी माणसाचे मन दुःखी झाले. त्याने तिजोरी त्या जागी पुरून ठेवली असल्याची गोष्ट बायकोलासुद्धा सांगितली नव्हती.





# प्रश्नोत्तरे

**अशोक मंगशूलि, अथणी (कर्नाटक)**

प्र.: धूमकेतु (शेंडे नक्षत्र) म्हणजे काय?

उ.: सूर्याला केंद्र मानून त्या सौरमंडळात त्या केंद्राभोवती फिरणारे ग्रह, उपग्रह, उल्का, शेंडे नक्षत्रे वगैरे असतात. ते फार दूर वृत्ताकार कक्षेत फिरतात व फिरत असता सूर्याच्या जवळ येऊन पुन्हा दूर निघून जातात. ते सूर्याच्या जवळ येतात तेव्हांच आपल्याला त्यांना शेपूट असल्यासारखे दिसते. दूर असतांना ते गोलच वाटतात. यांच्या केंद्रस्थानी घनीभूत पदार्थांबरोबर घनीभूत वायूही असतात. सूर्यप्रकाश पडताच हे घनीभूत वायू वाफेसारखे प्रसरण पावून दूरवर शेपटीसारखे भासतात. ग्रहांचा परिणाम मानव जीवितावर होतो असे अंधविश्वासाने जसे लोक मानतात तसाच परिणाम शेंडे नक्षत्रामुळे होतो असे आपण मानतो.

**बाळ के. जांभेकर (महाराष्ट्र)**

प्र.: ढग काळे असतात, पण पावसाचे पाणी पांढरे कसे काय असते?

उ.: पाणी पांढरे नसतेच. परंतु सूर्यप्रकाशाच्या आड जेव्हां ढगातले पाणी येते तेव्हां ते काळासर भासते. पाण्याला वास्तविक स्वतःचा रंग नसतोच.

प्र.: पर्वत कसे होतात?

उ.: भूगर्भात दगडाचे कित्येक थर असतात आणि सारा भूगर्भच सतत हालत असतो, हे भूगर्भशास्त्रज्ञांना चांगले माहीत आहे. ही हालचाल होत असल्यामुळे अंतर्भागातील भूखंडांची परस्पर टक्कर होते व परिणामी दगडाचा थर वर ढकलला जातो. पर्वतांच्या रांगा अशा तऱ्हेने तयार होतात. आपण ज्या भूखंडाला भारत म्हणतो त्याची आशिया भूखंडाशी टक्कर झाली आणि हिमालय पर्वताच्या रांगा वर आल्या. या रांगा आणखी वर येत आहेत. एके काळी हिमालयाची शिखरे समुद्रात होती. हिमालयाच्या शिखरांवर जलचर प्राण्याचे फासिलरूपे अवशेष मिळतात यावरून ही गोष्ट सिद्ध होते. परंतु दोन भूखंडातील टक्कर बंद होताच पर्वताची उंची वाढणे बंद होते. त्याचबरोबर पाऊस, ऊन आणि वारे यांचे आघात झाल्याने उंची कमी होऊ लागते. याच तऱ्हेने पूर्वेकडील पर्वतांच्या



# अघटित अनपेक्षित

[७१]

न्हाव्याने मणिभद्रासमोर कोणाला काही सांगणार नाही, असे शपथ घेऊन सांगितले आणि निघून गेला. जात असता तो विचार करू लागला :

दिगंबर जैनाच्या कपाळात दाणके हाणले तर सोन्याच्या पुतळ्यात तो बदलतो, हे मी प्रत्यक्ष डोळ्यांनी आज पाहिले. मला पूर्वी कधी हे माहीत नव्हते, म्हणून आज-पर्यंत किती मूर्खपणाने गरीबीत दिवस काढावे लागले! मी दररोज सहासात तास निरनिराळ्या लोकांची हजामत करतो आणि सहासात चांदीचे तुकडे माझ्या हातात पडतात. तेवढ्यावर माझा एवढा संसार चालायचा कसा? हे दिगंबर जैन दिवसभर किती फिरताना दिसतात? परंतु काय उपयोग? मला ही गोष्ट पूर्वी माहीत असती तर मणिभद्रासारखी त्यांची डोकी फोडून मी सोन्याच्या विटांनी घर बांधले असते! तसे ह्यात आश्चर्य करण्यासारखे काय आहे म्हणा? पैसे मिळविण्यात मी न्हावी वाण्याची बरोबरी कशी काय करणार? लोक एकाएकी श्रीमंत कसे होतात हे मला कळत नव्हते व मी चकित होऊन नुसता पहात होतो. आतां कळले की त्यांची हुशारी आणि व्यापारात प्राविण्य म्हणजे काय? आणि त्यामुळे ते लक्षाधीश कसे होतात. आज मला कळले की दिगंबर जैन, एक चांगलेसे दांडके आणि जोराने वार करण्याची तयारी या तीन गोष्टी असल्या पाहिजेत. परंतु वाणी हे गुपित कोणाला कळू देत नाहीत. कारण त्यांना आपल्या जातीतले लोकच श्रीमंत व्हावेत असे वाटते. परंतु मला आतां ते गुपित ही कळले आहे. उद्यां मी गावातल्या सर्व



दिगंबर जैनांना आपल्या घरी जेवायला बोलावितो आणि त्यांची डोकी फोडून सोन्याचा ढीग आपल्या घरात लावतो. समजा ते सर्व सोने खर्च झाले, तरी भ्यायचे कारणच काय? देशात दिगंबर जैन थोडे थोडके आहेत का?"

असा विचार करून न्हाव्याने बऱ्याच काठ्या आणून एका पेटीत लपवून ठेवल्या. तो दिवस फार लांब असल्यासारखे त्याला वाटले, इतके उतावीळ झाले होते त्याचे मन. दुसऱ्या दिवशी, गावातल्या एका कोपऱ्यात दिगंबर जैनांचे देऊळ होते, तेथे तो गेला. त्याने महावीराच्या मूर्तीला प्रदक्षिणा घालून तीनदा साष्टांग नमस्कार घातला, आणि ओरडून म्हणाला—"जैनांचा जय असो. जिन आमचे रक्षण करो. जिन पत्नी यशोधरा आमचे रक्षण करो!" नंतर तो जैनांचे प्रमुख आचार्य होते त्यांचे दर्शन करून व नम्रपणे त्यांना नमस्कार करून म्हणाला—"गुरुवर्य! आज आपण आपल्या सर्व शिष्यांबरोबर आमच्या घरी जेवायला येण्याची कृपा करावी!"

तेव्हां जैन गुरुने विचारले—"श्रावका! आज जेवणाचे निमंत्रण देण्याचे विशेष कारण काय? आम्हांला तू भोजनभट ब्राह्मण समजलास की काय? आम्ही कोणाचे आमंत्रण स्वीकारीत नाही. भूक लागल्यावर एखाद्या गृहस्थाच्या घरी जातो व तो जी भिक्षा घालतो ती प्राणरक्षाणासाठी आवश्यक तेवढीच स्वीकारतो."

"भिक्षुवर्य! आपल्या या नियमाची मला माहिती आहे. परंतु माझी विनंती ऐकावी! आमच्या घरी अनेक वस्त्रे पडून आहेत. शिवाय अपार धन आहे. यांचा उपयोग आपणास ग्रंथ लेखनास व दानधर्म करण्यास होऊ शकेल. त्यानंतर आपली इच्छा! आपणांस मान्य नसेल तर मी इतर भिक्षुकांकडे जाईन." न्हावी म्हणाला.

ते ऐकून देवळात राहणारे सहा भिक्षू एक स्वरात म्हणाले—"ऐक रे! आम्ही येतो, जेवायला तुझ्या घरी! तू जो दानधर्म करशील तो कोण्या विशिष्ट व्यक्तीस दृष्टीसमोर ठेवून करणार नाहीस. म्हणून ते ग्रहण करण्यास आम्हांला हरकत नाही. तू आणखी कोणा भिक्षुकांकडे जाण्याची गरज नाही!"

विचित्र गोष्ट अशी की ब्रह्मचारी एकटा, सर्वसंगपरित्याग करणारा व भिक्षापात्र घेऊन दिगंबर राहणारा असूनही तो एक मानवच असतो. तृष्णा त्याला सोडीत नाही. याहून जास्त आश्चर्याची गोष्ट म्हणजे तो आपल्या बुद्धीच्या बळाने या लोभाचे समर्थन करतो. वृद्धावस्थेत, केस पिकल्यावर, दांत पडल्यावर, दृष्टी मंद झाल्यावर आणि कान बधिर झाल्यावर वाढतो तो हा लोभ व मोहच!

तिकडे न्हावी जैन भिक्षूंना आपल्या घरी बोलावून घेऊन गेला. आंतल्या अंगणात सर्वजण गेल्यावर त्याने सर्व दरवाजे बंद केले आणि मोठी पेटी उघडली. पेटीतून वस्त्र किंवा धन यांच्याऐवजी एक भले मोठे दांडके काढले. आणि अंगातले सर्व बळ एकवटून एकेका भिक्षुकाच्या टाळक्यात हाणीत सुटला. परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे मणिभद्राने काठी मारली तेव्हां स्मित करणाऱ्या दिगंबर जैनासारखे एकाच्याही चेहऱ्यावर हास्य झळकले नाही, की कोणी एक वार करताच मेला नाही. म्हणून न्हाव्याला भयंकर राग आला.



सर्व जैन साधू स्वतःचा जीव वाचविण्यासाठी उंदरासारखे पळापळ करू लागले. दरवाजे बंद होते, म्हणून पळून जाणे शक्यच नव्हते. शेवटी दोघे जण बेशुद्ध होऊन जमिनीवर लोळू लागले. न्हाव्याला आनंद झाला. त्याला वाटले, त्यांचे सोन्याचे पुतळे होणार. परंतु रक्ताने माखलेले त्यांचे मृत देहच तेवढे तेथे त्याला दिसले.

इतर चार भिक्षू न्हाव्याचे पाय धरून त्याची मनधरणी करू लागले—"बाबा रे! आम्हांला जीवदान दे! आम्ही असा काय अपराध केला की तू आम्हांला मारीत सुटला आहेस? आमच्याजवळ काही नाही. तू दोघांना तर ठार केलेसच.

आतां आम्हां दोघांना तरी सोड." न्हावी रागाने ओरडला–"तुमच्यापैकी एकही सोन्याचा पुतळा झाला नाही. तुम्ही आपला हा फाजिलपणा सोडून लौकर सोन्याचे पुतळे व्हा!" असे म्हणत न्हाव्याने आणखी जोराने मारहाण सुरू केली.

भिक्षूंचा आक्रोश ऐकून बाहेरून जाणाऱ्या राजाच्या शिपायांनी दारे फोडून आत प्रवेश केला. त्यांनी चौघां भिक्षूंना वाचविले. नंतर न्हावी, चार भिक्षुक आणि दोन भिक्षुकांची प्रेते न्यायाधिशांसमोर शिपायांनी नेऊन ठेवली.

न्यायाधिशाने सर्व प्रकार ऐकून घेऊन न्हाव्याला विचारले–"तू हा सर्व अनर्थ कशासाठी केलास?"

न्हाव्याने जबानी दिली–"काल मणिभद्राने जे केले तेच तर मी केले. त्यात माझा दोष असा काय आहे?"

"मणिभद्र कोण व त्याने काय केले ते सर्व स्पष्ट सांग!" न्यायाधिशाने सविस्तर जबानी द्यायला सांगितली.

एका दिगंबर जैनाच्या टाळक्यात दांडके हाणले तेव्हां तो जैन एक सोन्याचा पुतळा झाला. ते दृश्य मी स्वत: या डोळ्यांनी पाहिले." न्हावी म्हणाला.

न्यायाधिशाने मणिभद्राला बोलावून विचारले–"काल तू एका दिगंबर जैनाचा वध केलास, हे खरे का?"

मणिभद्राने सर्व वृत्तांत सांगितला. तेव्हां न्यायाधिशाने शिपायांना आज्ञा केली की "तुम्ही या मूर्ख न्हाव्याला कैद करून घेऊन जा आणि भाले खुपसून याला मृत्युदंड द्या." नंतर म्हणाला–"मूळ गोष्ट न कळल्यामुळे जे मूर्खपणाने असली कृत्ये करतात त्यांची अशीच दुर्गत होते. प्राचीन काळी अशाच तऱ्हेने एका ब्राह्मणाने मागचा पुढचा विचार न करता एका इमानदार स्वामिभक्त मुंगुसाचा वध केला होता!"

"ती गोष्ट ऐकू तर द्याल!" मणिभद्राने विनंती केली. न्यायाधिशाने गोष्ट सांगितले.





# भल्लूक मांत्रिक

[ ११ ]

[ राजा दुर्मुख रानोमाळ हिंडत असता त्याच्या राजधानीवर एका सामंत राजाने हल्ला केला व आपला अधिकार स्थापन केला. त्याचे डोके भल्लूक मांत्रिकाला अर्पण होण्यापूर्वी काही क्षण का होईना, आपण राजा म्हणून रहावे असे दुर्मुखाला वाटले. चांडाळ भल्लूक, वगैरे राजधानीपर्यंत पोचताच आतून घोडेस्वार व सैनिक बाहेर आले. पुढे–]

आपले भालेवर उचलून येत असलेल्या घोडेस्वारांना व त्यांच्या बरोबरच्या पायदळ सैनिकांना पाहून चोरांचा नायक नागमल्ल व त्याचे अनुयायी घाबरून गेले. त्यांच्या बरोबर हत्तीवर बसून जाणारे दुर्मुख राजाचे सैनिक घाबरून जाऊन परस्परांशी हलक्या आवाजात 'आतां'? अशा विचारात जागच्याजागी थबकून उभे राहिले.

नागमल्ल मात्र स्वत:ला सावरून त्याच्या अनुयायांना म्हणाला–"काय रे, त्या सामंत राजाचे इतके सैनिक आपल्यावर एकाएकी चालून येतील, असे स्वप्नात देखील वाटले नव्हते! ते कांही असो, आपल्याला भ्यायचे कारण नाही, आपल्या पाठीशी चांडाळ भल्लूक आणि उग्रदंड राक्षस आहेत."

"तरमग हत्तीला मागे वळवू का, नागमल्ला?" एका चोराने या शब्दात विचारले.



"छे छे! तसा विचारसुद्धा मनात आणू नकोस! सर्व आपल्याला पळपुटे भित्रे म्हणतील! आणखी एक युक्ती सुचली आहे, मला! पाहू या तर कोठवर ती यशस्वी होते ती. अयशस्वी झालीच तर आपल्या रक्षणाला चांडाळ भल्लूक आणि उग्रदंड राक्षस आहेतच!"

"तरमग ते घोडेस्वार सैनिक आपल्या जवळ यायच्या आत काय करायचे ते कर." असे नागमल्लला सांगून एक चोर, आपसात फुसफुस करीत असलेल्या बरोबरच्या सैनिकांकडे वळून म्हणाला—"काय रे, काय चालला आहे तुमचा विचार? पळून जाऊन शत्रूला सामील व्हायचा विचार चालू आहे वाटतं? तुम्हांला उभा फाडून खाईन, लक्षांत ठेवा!"

नागमल्लाने रागाने एकदां हत्तीवरच्या दोघां सैनिकांकडे पाहिले आणि चटदिशी डोक्याचा फेटा सोडून तो हवेत हालवून उडवीत, त्यांच्यावर धावून येणाऱ्या शत्रु-सैनिकांना संबोधन करून म्हणाला—"मी तुमचा एक मित्र म्हणून येत आहे. तुम्ही आहांत तेथेच थांबा. तुमचे महाराज कोठे आहेत? आम्ही जुने महाराज, दुर्मुखराज यांना कैद करून बरोबर घेऊन येत आहो. आम्हांला चांगलसे पारितोषिक मिळाल तर आम्ही जुन्या कैदी महाराजांना सोपवून परत आपल्या वाटेने निघून जाऊ."

नागमल्ल म्हणाला ते ऐकून जवळ येत असलेले घोडेस्वार व सैनिक थांबले. घोडेस्वारांचा नायक इतर घोडेस्वारांना मागे थांबायला सांगून एकटा थोडा पुढे येऊन म्हणाला—"यात काही दगलबाजी तर नाही? किल्ल्याच्या तटावरून आमच्या महाराजांनी व प्रधानांनी तुम्हांला जंगलातून येत असतांना पाहिलेच आहे!"

"दगलबाजीच करायचा हेतू असता तर दिवसा ढवळ्या इतक्या थोड्याशांना बरोबर घेऊन कोणी येण्याचा विचार तरी केला असता का? तुम्ही बळकावलेला किल्ला जुने महाराज जिवंत असेपर्यंत सुरक्षित नाही व तुमच्या महाराजांचा जीवही धोक्यातच राहणार. म्हणून तुमच्या महाराजांनी आम्हांला चांगलेसे बक्षिस दिले तर आम्ही कैद करून आणलेल्या जुन्या महाराजांना तुमच्या महाराजांच्या हाती देऊ. परंतु त्यांना दुर्मुख महाराजांना विकत घेण्याचा ठराव मान्य नसेल तर आम्ही त्यांना घेऊन परत अरण्यात जाऊ." नागमल्ल म्हणाला.

ते ऐकून घोडेस्वारांचा नायक, काय करावे या विचारात, एकदोन मिनिटे, डोके खाजवीत उभा राहिला व हे वीरपुरुषाला शोभणारे काम नाही हे ओळखून कडक शब्दात मिशा पिळवटून व आपली तलवार उगारीत म्हणाला—"परंतु तू कोण, तुझं नाव काय हे तर तू सांगितलेसच नाही?" अद्याप काय करावे हे तो ठरवू न शकल्यासारखा दिसला.

हा कोणीतरी मंदमती मूर्ख दिसतो आहे, असा विचार करून नागमल्लाने आपला फेटा डोक्याला घट्ट बांधला व म्हणाला—"माझं नाव नागमल्ल, मला सर्व नागमल्ल मालक म्हणून हाक मारतात. जंगलात चांगली दुर्मिळ अशी रानटी जनावरे धरून ती विकत घेण्याची शक्ती असणाऱ्यांना विकण्याचा मी धंदा करतो."

"असं म्हण की! तू म्हणालास ते मी आमच्या महाराजांना जाऊन सांगतो."



असे सांगून घोडेस्वारांचा नायक घोड्याला मागे वळवू लागला, परंतु थांबून त्याने विचारले—"तुझ्या पाठीमागून दूर काहीजण मिळून येत आहेत त्यांत राक्षसासारखा एक आणि परशू हातात घेऊन अस्वल येत आहे तो खरोखरचा राक्षस आणि अस्वल आहेत की आमचे मंत्री म्हणाले तसे त्यांची सोंगे करून आलेले कोणी आहेत?"

"ते कळावे या साठी तुमच्या महाराजांनीच स्वतः इकडे येणे बरोबर होईल? त्यांच्याकडून बक्षिसाची रक्कम हाती पडतांच दुर्मुख महाराजांना सोपवून नंतर राक्षसाची व अस्वलाची माहिती मी सांगेन." नागमल्ल स्मित करून म्हणाला.



घोडेस्वारांचा नायक समाधान झाल्यासारखी मान हलवून तलवार वर उचलून सैनिकांना म्हणाला—"अरे, हे पहा तुम्ही एक पाऊलही मागे टाकलेत किंवा पुढे टाकलेत तर तुमची डोकी तुमच्या मानेवर राहणार नाहीत. आपल्या प्रधानांनी सांगितल्याप्रमाणे हे सोंग धारण करून आलेलेच दिसत आहेत. मी जाऊन महाराजांना या सर्व गोष्टी कळवून परत येतो." असे सांगून तो आपला घोडा वळवून पळत निघून गेला.

किल्ल्याच्या फाटकाजवळ उभा राहून सामंत राजा सूर्यभूपती ते सर्व पहात होता. त्याने व प्रधानाने घोडेस्वारांचा नायक जवळ आल्यावर त्याला विचारले—"शत्रूवर हल्ला करायचे सोडून त्यांच्याशी मंत्रणा करीत होतास का?"

घोडेस्वारांच्या नायकाने सर्व गोष्टी सविस्तर सांगितल्या व म्हणाला—"आपण त्याला बक्षिस म्हणून काही पैसे दिले तर दुर्मुख महाराजांना आपल्या हाती देऊन ते परत जाणार म्हणताहेत!"

दुर्मुखाचे नाव ऐकताच सामंत दचकून म्हणाला—"म्हणजे दुर्मुखराज अजून जिवंतच आहे तर! त्याला रानटी श्वापदांनी खाऊन टाकले हे आपल्या हेरांनी येऊन सांगितले ते खोटे होते तर! प्रधान, तुम्ही त्या हेरांची ताबडतोब डोकी उडवा!" त्याने रागाने हुकूम केला. मंत्री विचारात पडला. चिंता आणि काळजी त्याच्या तोंडावर झळकली. म्हणाला—"महाराज, ते दोघे हेर तूर्त किल्ल्यात नाहीत. मी त्यांना पुन्हां अरण्यात पाठविले आहे. आणखी एक गोष्ट जास्त खोलात शिरून चौकशी केल्यावर कळले की तो खरोखरचा राक्षस आहे व ते अस्वल म्हणजे युद्धविद्या चांगले शिकलेले आहे असे वाटते. या सर्वांहून भीती वाटण्यासारखी गोष्ट म्हणजे ते कैद करून आणीत आहेत ते दुर्मुख महाराज नसतीलही."

ते ऐकून सूर्यभूपती सामंताला कमालीचा राग आला. म्हणाला—"तुला एका सल्लागाराच्या पदवीवरून मंत्रीपदावर बसविले, ही माझीच चूक झाली. तुझी योग्यता एखाद्या सामंत राजाला सल्ला देण्यापुरतीच आहे, राजाला सल्ला देण्याची योग्यता तुझ्यात नाही." असे सांगून घोडेस्वारांच्या नायकाकडे वळून म्हणाला—"सेनापती, ते पुरते दहाजणसुद्धां नाहीत, त्यांच्याशी समेटाची बोलणी करण्याची गरजच काय? त्यांना निमूटपणे शरण यायला सांगा! मान्य केले नाही तर मुसक्या बांधून त्यांना किल्ल्यात ओढून घेऊन या. बक्षिस वगैरेच्या गोष्टी मागाहून पाहूं!"

"तो खरोखरच राक्षस असेल तर धोका आहे, महाराज!" घोडेस्वारांचा नायक कांपऱ्या आवाजात म्हणाला.

सूर्यभूपती दातओठ चावून खेकसून म्हणाला—"तुझ्या बरोबर जेवढे सैन्य आहे ते एकच राक्षस काय, शंभर राक्षस असले तरी त्यांच्या मुसक्या बांधून आणायला पुरेसे आहे. मीच येतो बरोबर. कोठे आहे माझा घोडा?" असे म्हणत घाईघाईने बुरुजावरून खाली उतरून आला.

एका नोकराने घोडा आणून उभा केल्याबरोबर सूर्यभूपती त्यावर चटदिशी बसला. मंत्री आणखी एका घोड्यावर बसला. समोर सामंतराजा, दोन्ही बाजूला मंत्री आणि सेनापती निघाले. किल्ल्याचे फाटक ओलांडून बाहेर मैदानात आले.



त्यांना येत असलेले पाहून नागमल्ल अत्यंत उत्साहाने म्हणाला—"माझी युक्ती यशस्वी झाली. सामंत राजा, मंत्री आणि सेनापती आपल्या जाळ्यात सापडणार!"

"या तिघांना धरून दिल्याबद्दल दुर्मुखराजा चांगलंस बक्षिस देईल असं वाटतं का, नागमल्ला?" दोघां चोरांनी विचारले.

"अरे, इनाम बक्षिसच काय म्हणतोस? दुर्मुख महाराज आपल्याला एखादे संस्थानच बहाल करतील!" नागमल्ल म्हणाला. दोघे सैनिक म्यानेतून तलवारी उपसू लागलेले पाहून त्याने त्यांना दटावले.

सामंत राजा नागमल्लाच्या हत्तीजवळ येऊन म्हणाला—"तू सांगितलेस ते माझ्या















सेनापतींनी सर्व सांगितले, व ते ऐकूनच आलो आहे. माझ्या राज्यात शिरून माझ्या किल्ल्यासमोर उभा राहून माझ्यासारख्या एका राजाशी सौद्याच्या गोष्टी करतो आहेस का? ताबडतोब जा आणि आणि हत्तीवर दुर्मुखाबरोबर जेजे कोणी आहेत त्या सर्वांना आणि त्या दोघां सोंगाड्यांना बोलावून घेऊन ये. किल्ल्यात गेल्यावर तुला व त्या दोघां सोंगाड्यांना त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणे काय ते बक्षिस देईन. दुर्मुख राजाचे डोके किल्ल्याच्या ध्वज स्तंभाला की फाटकाला लोंबकळत ठेवायचे ते मी नंतर ठरवीन."

सामंत राजाने ते म्हटल्यावर नागमल्लाची खात्री झाली की आपली युक्ती फसली. त्याला दुर्मुखराजाविषयीं किंवा सामंतराजा सूर्यभूपती यांच्याविषयी प्रेम आदर किंवा द्वेष कमी किंवा जास्त असण्याचे काही कारण नव्हतेच. सूर्यभूपती आपल्याच घमेंडीत उग्रदंड किंवा चांडाळ भल्लूक यांचा अपमान करायला निघाला तर त्यात विनाकारण रक्तपात मात्र फार होणार यात त्याला थोडी देखील शंका नव्हती. तसा रक्तपात होणे नागमल्लला बरोबर वाटत नव्हते.

नागमल्ल काय उत्तर द्यावे या विचारात असता हत्तीवर बसून येत असलेले दुर्मुखाचे दोघे सैनिक तलवारी उपसून ओरडले– "दुर्मुख महाराज की जय!" आणि उभे राहून सामंत राजाला संबोधन करून म्हणाले–"कायरे ए, सूर्यभूपती! तुझं मरण आता चुकत नाही, बघ! दुर्मुख महाराजांना मदतीला खरा राक्षस आणि मंत्रबळ असलेला चांडाळ भल्लूक आले आहेत!"

'दुर्मुख महाराज की जय!' असा जयघोष ऐकतांच सामंत सूर्यभूपती संतापला आणि सैनिक जे म्हणाले होते ते जणुंकांहीं त्याला ऐकूच आले नाही. शेजारी मंत्री होता, त्याला म्हणाला–"या मूर्खांना आणि त्यांच्या पाठीमागून येणाऱ्या त्या सोंगाड्यांना, माझ्या शक्तिसामर्थ्याची ओळख नाहीशी दिसते आहे. लौकर घोडेस्वारांना आणि सैनिकांना बोलावून यांना जंगलांत पळून जाऊ न देतां यांच्या चारीबाजूला वेढा घालून कैद करा पाहू!" असे मोठ्याने सांगत सूर्यभूपतीने तलवार उपसली आणि चोरांचा नायक नागमल्ल ज्या हत्तीवर बसून येत होता, त्या बाजूला घोड्यावर बसून निघाला.

आलेल्या संकटाची कल्पना येताच नागमल्ल विचार करीत फार वेळ थांबला नाही. लगेच त्याने तो बसला होता त्या हत्तीला मागे वळविले आणि उग्रदंड राक्षस व चांडाळ भल्लूक दोघे होते त्या बाजूला जाऊन ओरडून म्हणाला–"चांडाळ भल्लूक मालक! उग्रदंड प्रभो! माझी युक्ती फसली. सामंत राजा आपल्या सर्व सैन्यानिशी आपल्यावर चालून येत आहे!"

सामंत राजाने अपमान केला होता तरी दुर्लक्ष करून, आपली स्वामिभक्ती दाखवायला हीच खरी संधी आहे, असा विचार करून मंत्र्याने आपल्या घोड्याला जोराने चाबकाचे दोन तडाखे ओढून त्याला नागमल्लाच्या हत्ती मागे फिरवून पळवू लागला, त्याचा पाठलाग करण्यासाठी घोड्याला सोडला आणि म्हणाला–"अरे देशद्रोही! थांब! तुमच्या सर्वांची डोकी उडविल्या-



शिवाय महाराज सूर्यभूपतींच्या मनाला शांती मिळणार नाही!"

मध्यंतरी सेनापतीने आपल्या घोडेस्वारांना आणि सैन्याला पुढे यायला खूण केली. त्या आधीच पुढे मंत्री व पाठीमागून सामंत सूर्यभूपती उग्रदंड व चांडाळ भल्लूक होते त्या जागी पोचले.

किल्ल्यावर अधिकार करणाऱ्या सामंत सूर्यभूपतीला पाहताच दुर्मुखराजा उग्र होऊन तलवार उपसून ओरडला–"अरे, सामंत भूपती! मी परराज्य जिंकण्यासाठी निघालो असतां संधी साधून तू माझा किल्ला बळकावलास का? ये, तुझे डोके मी आतां या क्षणाला उडवितो." असे

म्हणत तो हत्तीवरून सामंत राजाच्या घोड्यावर उडी मारण्यासाठी पुढे सरसावला. सैनिकांनी त्याला अडविले तरी तिकडे दुर्लक्ष करून त्याने उडी मारलीच. परंतु घसरून खाली पडला. तरी चटदिशी उभा राहिला.

ते पाहून चांडाळ भल्लूक जोराने टाळी वाजवीत म्हणाला–"ओहो! केवढं धाडस रे! जंगलात एका चित्त्यासमोर तलवार उपसून पुढे यायची छाती झाली नाही या दुर्मुखाला. आतां किल्ला दिसतांच व सिंहासनाची आठवण होताच शत्रूवर त्वेषाने हल्ला करायला निघाला आहे!"

आपला शत्रू जमिनीवर पडलेला पाहून आणि नंतर उभा झालेला पाहून सामंत सूर्यभूपतीला परमानंद झाला. म्हणाला–"ओहो! शत्रुऋण उरता कामा नये! ये असा पुढे, तुझे डोके उडवितो!" असे म्हणत त्याने घोड्याला दुर्मुखाकडे वळविला.

त्याच वेळी चांडाळ भल्लूकाच्या हत्तीवर बसून येत असलेल्या शिकाऱ्याने चटदिशी [illegible] सूर्यभूपतीवर सोडला. परंतु नेम चुकला आणि बाण घोड्याच्या पाठीला लागला. घोडा हिणहिणत मागच्या पायांवर उभा राहिला.

सामंत राजा खाली पडण्याच्या बेतात होता तरी लगाम घट्ट धरून बसला. म्हणून त्याच्या जिवाचा धोका टळला. दुर्मुखाने सामंत राजाच्या मंत्र्याला घोड्यावरून खाली ओढले आणि स्वतः त्या घोड्यावर बसून सूर्यभूपतीच्या बाजूला घोड्यावर बसून आला.

आपण शत्रूच्या मध्ये अडकलो आहो, हे सामंताला कळले. त्याने घोड्याला मागे फिरवून किल्ल्याच्या दिशेने पळविले आणि सैन्याला सावध केले. दुर्मुख राजाने घोड्याला टाच मारली आणि तलवार आकाशात उभी धरून कर्कश आवाजात ओरडला–"अरे सामंता! पळपुट्या, थांब!" आणि त्याचा पाठलाग करीत निघाला. (क्रमशः)





# माणुसकी

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीं प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, या जगात गुन्ह्याप्रमाणे शिक्षा नसते. त्याला उदाहरण म्हणून मी तुला रंगा नावाच्या दिवसा ढवळ्या चोरी करणाऱ्या एका चोराची गोष्ट सांगणार आहे. तू लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

कधी काळी कांजीवरम् नावाच्या गावी दिवसा ढवळ्या चोरी करणारा एक फार बस्ताद चोर होता. तो चोरी करण्यात इतका हुशार होता की दुकानात गिऱ्हाइकाचे आणि दुकानदाराचे पैसे ऐन दुपारी नाहीसे होत व चोरी कशी झाली कोणी केली कोणाला कळत नसे. धर्मशाळांतून सुद्धा

## वेताळाच्या गोष्टी



अशा चोऱ्या होत. चोराला कोणी कधी पाहिले नव्हते. म्हणून त्याला ओळखणे शक्यच नव्हते. ज्यांच्या घरी किंवा खिशा-तून चोरी होई तेदेखील केव्हां कशी चोरी झाली, सांगू शकत नव्हते. शेतकरी, व्यापारी सरकारी नोकरी करणारे सर्वांना या दिवसा ढवळ्या होणाऱ्या चोरीचा तडाखा बसत होता. घरात असेपर्यंत त्यांच्या पैशाला कोणी हात लावीत नसे, एवढेच.

या चोरीच्या तक्रारी नगराच्या कोत-वालाकडे दररोज येत. त्याने चोराला पकडण्यासाठी आपले हेर नेमले. परंतु काही उपयोग झाला नाही. त्या चोराचे नाव रंगा होते. त्याला पाहून कोणी त्याला [illegible] तले त्याचं कसब अत्यद्भुतच होते.

अधिकारी चोराला पकडू शकले नाहीत त्याचे कारण तो सामान्य चोर नव्हता. सामान्य चोर ज्या परिस्थितीत व ज्या तऱ्हेने चोरी करतात त्या परिस्थितीत व त्या तऱ्हेने रंगा चोरी करीत नसे. त्याने ज्यांच्या घरी किंवा दुकानात चोरी केली तेसुद्धा त्याला पाहून चोर म्हणणे शक्य नव्हते. म्हणून रंगाला कैद करायचे तर या सर्व गोष्टी लक्षात ठेवणे आवश्यक होते.

एकदा रंगाने भर रस्त्यात एका व्यक्ती-कडून पैशाची थैली चोरली. त्या पिशवीत पैशाबरोबर एक चिट्ठी ठेवलेली होती. ती एका बाईने लिहिलेली चिट्ठी होती. तिचा नवरा मरणाला टेकला होता व त्याच्याकडे खर्चायला पैसे नव्हते आणि औषध पाण्यासाठी पैशाची गरज होती. त्यासाठी ताबडतोब पैसे पाठवून तिच्या कपाळाचे कुंकू राखण्यासाठी विनवणी करून तिने आपल्या भावाला पत्र लिहिले होते.

ते पत्र वाचल्यावर रंगाच्या अंगाचा थरकांप उडाला. तो ते पैसे घेऊन ते पत्र लिहिणाऱ्या स्त्रीला जाऊन भेटला. त्याने घरात पाऊल टाकतांच त्याला शिपायांनी अटक केली. त्याच वेळी रंगाने ज्या व्यक्तीकडून ती पिशवी चोरली होती ती व्यक्ती घरातून बाहेर आली. ती व्यक्ती दुसरीतिसरी कोणी नसून वेष पालटून फिरणारा कोतवालच होता. दिवसा ढवळ्या चोरी करणाऱ्या चोराला धरण्यासाठी जवळजवळ एक महिनाभर तो वेष पालटून व पिशवी घेऊन गावात फिरत होता. त्याने टाकलेल्या जाळ्यात चोर सापडला.

न्यायालयात चोराच्या गुन्ह्याची चवकशी झाली. त्यात तोच दिवसा ढवळ्या चोरी करणारा चोर असल्याचे सिद्ध झाले. परंतु कोतवालाने, यापुढे चोरी करणार नाही अशी शपथ रंगाला घ्यायला लावून त्याला सोडून दिले.

वेताळाने येथवर गोष्ट सांगून विचारले– "राजा, कोतवालाने इतके दिवस परिश्रम-पूर्वक मेहनत करून चोराला पकडले आणि त्याला काही एक शिक्षा न करतां कसं काय सोडून दिले? त्याला शिक्षा करायची नव्हती तर त्याला धरले कशाला आणि त्याची चवकशी केली कशाला? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"कोतवालाला चोराला कैद करण्यात कष्ट काय झाले? चोरांत माणुसकी असल्याकारणाने चोर सापडला. माणुसकी नसती तर कोत-वालाच्या जाळ्यात तो सापडलाच नसता. कोतवालाने चोराला थोडीसुद्धा शिक्षा केली नाही व चवकशी सर्वांसमक्ष केली त्याचे कारण, रंगा आहे कसा हे कोणाला माहीत नव्हते. त्याचा तोंडावळा पाहायला मिळाल्या-नंतर त्याच्या हातून चोऱ्या होणे शक्य नव्हते. तोच चोर असल्याची गोष्ट सर्वांना कळावी याचसाठी कोतवालाने जाहीर चवकशी ठेवली होती. म्हणून त्याला शिक्षा केल्याशिवाय सोडून दिले."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# दिवाणाची निवड

कांभोज देशाचा दिवाण सुमंत्र फार हुशार होता. उतारवय येत चालले तेव्हां त्याने आपल्या जागी' एका योग्य व्यक्तीची निवड करण्याचे ठरवून महाराजांना तसे कळविले आणि या पदासाठी योग्य तरुण मंडळींना अर्ज पाठवावे असे जाहीर केले. त्यासाठी त्याने देशभर दवंडी पिटविली. दवंडी ऐकून कित्येक उमेदवार त्याला भेटायला आले. दिवाणाने राजधानीपासून एका मैलावर एक डेरा घालून सर्वांनी तेथे भेटायला यावे असे कळविले. पुष्कळ लोक भेटायला आले. परंतु सुमंत्राने त्यांपैकी दोघांचीच निवड केली. त्यांची शेवटची परीक्षा घेण्याचे ठरवून त्याने दोघांना बोलाविले व म्हणाला–"तुम्ही स्वत:चा जीव धोक्यात घालीत आहां, हे पद स्वीकारुन. तरी ही जबाबदारी तुम्ही स्वत:वर घेतली पाहिजे. मी एक पत्र देतो, ते तुम्ही महाराजांना नेऊन द्या. ते अर्ध्या वाटेवर एकाने व उरलेल्या वाटेवर दुसऱ्याने न्यायचे आहे; परंतु कोणी ते वाचता कामा नये.

धर्मदत्त व सुमित्र या नावाचे ते दोघे उमेदवार पत्र घेऊन निघाले. प्रथम अर्धी वाट सुमित्र पत्र घेऊन निघाला. त्याने ते पत्र वाटेत लखोट्यातून काढून वाचले आणि घाबरून जाऊन लखोटा धर्मदत्ताच्या हातात देऊन तो पळून गेला. धर्मदत्त पत्र घेऊन सरळ दरबारात गेला आणि विदूषकाच्या हाती महाराजांकडे ते पत्र पोचते केले. त्या पत्रात–"हे पत्र आपल्या हातात पोचते करणाऱ्याला तावडतोब फाशी द्यावी," असे लिहिले होते.

राजाने धर्मदत्ताला फाशी द्यावी अशी आज्ञा केली.

धर्मदत्त लगेच म्हणाला–"महाराज, आपल्या हातांत पत्र पोंचते करणारा विदूषक आहे. मग मला कां शिक्षा?"

सुमंत्राने धर्मदत्तालाच दिवाणगिरी द्यायला महाराजांना सांगितले.





# गुणी मुलगा

राघवराव नावाच्या एका श्रीमंत शेतकऱ्याकडे सदू नावाचा एक तरुण मुलगा नुकताच कामाला लागला होता. राघवराव हे भयंकर तापट व क्रूर स्वभावाचे असल्याचे सदूला नोकरीवर लागण्यापूर्वीच कळले होते. तरी सदूने राघवरावांकडे नोकरी करण्याचे ठरविले. राघवरावांच्या घरी काम करून त्यांची नोकरी सोडून आलेल्या इतर पोऱ्यांनी सदूला राघवरावांच्या दुष्टपणाची तिखटमीठ लावून पुष्कळ माहिती सांगितली होती, तरी सदूने तिकडे दुर्लक्ष केले.

सदू कामावर लागला त्या घटकेपासून राघवरावांचा कडकपणा आणि करडेपणा सुरू झाला. राघवराव सदूला स्वस्थपणे जेवूंसुद्धा देत नसत. तो पाणी पिऊ लागला की, मोकळेपणे पिऊ देत नसत. तो जेवायला बसला असला की काहीतरी काम सांगून त्याला पानावरून उठवीत असत. मध्यरात्री सदू गाढ झोपेत असतां त्याला उठवून त्याला काहीतरी काम सांगत. परंतु सदू हसत उठून उभा राही व त्यांनी सांगितलेले काम करी.

म्हशीने दूध दिलं नाही की त्याबद्दल सदूलाच शिव्या खाव्या लागत. एकदां शेतात कोपऱ्याल पीक वाळून गेलेले दिसले तेव्हा कारणाशिवायच राघवरावांनी सदूला ठोकून काढले. आणखी एकदा घरच्या कोंबड्यांपैकी एकीला बोक्याने धरले तर त्याबद्दल सदूला चोप बसला.

अशा तऱ्हेने राघवराव सदूला किती दुष्टपणाने वागवीत असले तरी सदू ते सर्व हसत हसत सहन करीत आला. कधी सदू हे सर्व कां सहन करीत आहे, याचा विचारही राघवरावांच्या मनाला कधी शिवला नाही.

राघवराव सदूला इतक्या क्रूरपणाने वागवीत असलेले त्यांच्या बायकोला मुळीच आवडत नसे. अशा राक्षसासारख्या पतीबरोबर बिचारी कित्येक वर्षे संसार करीत आली होती. बायकोच ती तिला सहन केल्याशिवाय मार्गच नव्हता. पूर्वी कित्येक मुलं राघवरावांच्या मारहाणीला आणि शिव्याशापाला कंटाळून सोडून निघून गेली होती. सदू तसाच पगार घेऊन निघून जाईल असे तिला वाटत होते. परंतु सदूने तसे केले नाही. त्याला मालकाच्या त्या वागणुकीचा काही त्रास होत आहे, असे देखील तिला कधी दिसले नाही. सदू उत्साहाने सर्व कामे तर करीच करी, शेतातली कामे सुद्धा करी. त्याचा कामसूपणा पाहून इतर आश्चर्य करीत की, राघवराव अशा मुलाला इतक्या क्रूरपणाने कां वागवीत आहेत!

शेवटी राघवरावांच्या बायकोनेच सदूला बोलावून विचारले—"कायरे, तू इतक्या प्रेमाने व आस्थेने काम करतोस आणि [illegible] तुला ठोकून काढतो आणि वर शिव्या देतो! तू हे कसं काय सहन करतोस? मी तुला तुझा पगार देते आणि वर चार पैसे देते, तू नोकरी सोडून जा कसा! दुसरीकडे नोकरी करून सुखाने चार घास खा!"

"असं कां हो म्हणतां आई? तुम्ही मला आईसारख्या आणि मालक बापासारखे आहेत. मुलाला बाप नाही का रागावत आणि मारीत? माझ्या हितासाठीच तर ते असं करतात! तुमची दोघांची सेवा माझ्या हातून घडावी, एवढीच इच्छा आहे!" सदू म्हणाला.

ते सर्व आड उभे राहून राघवरावांनी ऐकलं. त्यांना कोणीतरी थोबाड फोडल्यासारखं वाटलं. स्वतःचा मुलगा सुद्धा एवढे प्रेम दाखविणार नाही, एवढे प्रेम व विश्वास एक पगारी पोऱ्या दाखवतो आहे. त्या क्षणापासून राघवरावांनी सदूला स्वतःच्या मुलासारखं पहायचं ठरविलं व त्याला मारहाण करणे व शिव्या देणे सोडून दिले.





# प्रामाणिक पोऱ्या

चंद्रराव पैशाच्या पेटीजवळ बसून हिशोब करीत असतां त्यांची बायको लक्ष्मी येऊन म्हणाली—"काय हो, अजून आपल्या बकऱ्या परत आल्या नाहीत. तुम्ही नव्या पोऱ्याला कामाला लावलंत आणि त्याच्यावर विश्वास टाकून बकऱ्या चरायला घेऊन जा, म्हणून त्याला पाठविलेत. अजून तो आला नाही, आतां काय करायचं?"

चंद्रराव बकऱ्या चरायला घेऊन जायला एका पोऱ्याच्या शोधात असतां त्यांचे मित्र रामदास गोपू नावाच्या मुलाला घेऊन आले आणि कामावर लावून घे, म्हणून त्याला ठेवून गेले. त्याच दिवशी गोपूला बकऱ्या घेऊन जायला चंद्ररावांनी सांगितले. बकऱ्या परतायची वेळ झाली, परंतु गोपूचा पत्ता नाही

"मुलगा विश्वासाचा नसेल तर रामदास त्याला कशाला घेऊन येईल? येईल लौकर भिण्याचं कारण नाही." असे सांगून चंद्ररावांनी बायकोची समजूत घातली.

परंतु त्यांना मनात मात्र धाकधूक वाटत होती. कारण समजा, तो बकऱ्यांना घेऊन कोठे निघून गेला तर त्याला कोठे शोधायचे?

चंद्ररावांनी काम संपवून पेटी बंद केली आणि बाहेर ओटयावर येऊन उभे राहिले. तेवढ्यात पोऱ्या बकऱ्यांना घेऊन परत आला. चंद्रराव आणि लक्ष्मी दोघांचा जीव भांड्यात पडला.

गोपू दिसायला भोळा आणि विश्वासपात्रच असा वाटे. परंतु चंद्ररावांनी त्याची परीक्षा घ्यायचे ठरविले. गोपू घरात झाडलोट करी. तेव्हां चंद्रराव दररोज पावली, पैसा किंवा असंच काही, कोठेतरी टाकून ठेवीत. गोपूने एक पैसा देखील न घेता, त्याला जे सापडलं ते मालकाला








किंवा मालकिणीला आणून दिले. म्हणून चंद्ररावांचा गोपूवर आणखी थोडा विश्वास बसला.

"गोपूवर उगीच संशय करीत बसण्यात अर्थ नाही. तो चांगला दिसतो आहे!" असं मनाशी ठरवून त्यांच्या मनात काही एक संशय नसल्याचं त्यांनी बायकोला सांगितले.

बायको म्हणाली–"अहो, सुरवातीला ही मुलं चांगली वागतात, पुढे चार दिवस गेले की यांचे गुण बाहेर पडू लागतात."

गोपूच्या प्रामाणिकपणाची आणखी एक शेवटची परीक्षा घ्यायचा विचार करून चंद्ररावांनी आपल्या एका मुसलमान मित्राला काही पैसे देऊन त्याला काही सांगून पाठविले.

गोपू बकऱ्या चरायला घेऊन गेल्यावर तो मुसलमान मित्र गोपूला रानात भेटला. म्हणाला–"काय रे मुला, मी दहा रुपये देतो तुला, तू मला एक बकरा देतोस का?"

"[illegible] नाहीत हो! तुम्ही माझ्या मालकाला जाऊन विचारा!" गोपू म्हणाला.

त्या मुसलमान मित्राने बकऱ्याचा भाव वाढविला आणि शेवटी एका बकऱ्याला शंभर रुपये देतो म्हणाला. गोपूने थोडा विचार केला व म्हणाला–"बरं द्या!" आणि शंभर रुपये घेऊन त्याने त्या मुसलमानाला एक बकरा दिला.

संध्याकाळी गोपू बकऱ्या घरी घेऊन आला तेव्हां चंद्ररावांना जाऊन भेटला व म्हणाला–"अहो कोणीतरी वेडा पीर मुसलमान आला आणि शंभर रुपये देऊन एक बकरा विकत घेऊन गेला. हे घ्या, ते पैसे. या पैशांनी आपल्याला दहा बकरे विकत घेता येतील असा विचार करून मी तो बकरा विकला." असे सांगून त्याने शंभर रुपये चंद्ररावांना दिले.

तेव्हांपासून चंद्रराव किंवा लक्ष्मी दोघांपैकी कोणीच गोपूवर संशय घ्यायचे सोडून दिले.



# देवाशीच लबाडी

एका गावात गणूशेट नावाचा व्यापारी रहात असे. तो दररोज दुकान बंद करतेवेळी सर्व पैसे तिजोरीत ठेवून म्हणे, "देवा! या पेटीत ठेवलेल्या पैशांना कोणी हात लावला नाही तर मी तुझ्या समोर एक नारळ फोडीन." हा दररोजचा प्रघात होता.

असा एक महिना लोटला, परंतु गणूशेटने एक देखील नारळ देवासमोर फोडला नाही. तेव्हां देव एकदा गणूशेटच्या स्वप्नात आला व म्हणाला–"कित्येक दिवसांपासून तू नारळ फोडीन, म्हणतो आहेस, परंतु एक नारळ देखील फोडला नाहीस. असे का?"

"कसा फोडू रे देवा? नारळ फोडायचा म्हणजे विकत घेतला पाहिजे नाही का? विकत घ्यायचा म्हणजे तिजोरीतून पैसे काढले पाहिजेत नाही का? तिजोरीतून पैसे काढायचे म्हणजे पैशांना हात लावला पाहिजे की नाही? पैशाला कोणी हात लावू नये यासाठीच नारळ फोडायचा म्हटले होते नाही का? आतां तूच सांग, मी नारळ फोडला असता तर तूच हसला असतास की नाही?" गणूशेट म्हणाला.

आतां देव तरी काय करणार, सांगा! ते उत्तर ऐकून निरुत्तर झाला आणि अंतर्धान पावला.













# खरे धैर्य कशात?

चंपाची आई लहानपणीच वारली. म्हणून बापाच्या लाडात मुलगी लहानाची मोठी झाली. ती कमालीची धाडसी होती. काळोखात एकटी हिंडायची. वारा नाही म्हणून दारं खिडक्या उघड्या टाकून झोपायची. गावाच्या टोकाला देऊळ होते तेथून काळोख पडल्यावर परत यायची. कोणाशी, कसे व काय बोलायचे वगैरे गोष्टींची तिने कधी पर्वा केली नाही.

चंपाचे लग्नाचे वय जवळ येत चालले, तसतशी तिचे वडील राजाराम यांना काळजी वाटू लागली. त्यांनी तिला कितीदा समजावून सांगितले की मुली, तू ही जी धाडसाची कामे करते आहेस ती मुलींच्या जातीला शोभत नाहीत. परंतु चंपा हंसून निघून जाई.

तिच्या साठी स्थळ शोधायला राजाराम परगावी निघाला तेव्हां तिला बजावून गेला–"रात्रीच्या वेळी संभाळून रहा बरं का? तू घरात एकटी आहेस!"

"बाबा! मला असं पुन्हां पुन्हां सांगून भितरी का हो करतां? तुम्ही अगदी निश्चिंतपणे जाऊन या, कोठे ते!" चंपाने चिडक्या स्वरात उत्तर दिले.

राजारामाने घरातले सर्व पैसे आणि दागिने एका फडक्यात गुंडाळून जुन्या कपड्यात झाकून ठेवले आणि निघून गेला. बाबा, फारच काळजी करतात बुवा, म्हणून बापाची थट्टा करीत चंपाने दार बंद करून दाराला कडी लावली. नंतर जेवून खाऊन परसात खाट टाकून पडून राहिली.

तिचा थोडा डोळा लागला असेल, बाहेरचे दार कोणी जोराजोराने बडवायला सुरवात केली. चंपाने चटदिशी उठून दार उघडले तर समोर सुमारे पंचवीस वर्षांचा एक तरुण उभा.

"कोण तुम्ही, काय पाहिजे तुम्हांला?" तिने त्याला विचारले.

त्याने चटदिशी घरात शिरून दार आतून बंद करून घेतले आणि सुरा दाखवून म्हणाला–"बऱ्या बोलाने घरातले दाग-दागिने व पैसे कोठे आहेत ते दाखव."

अकस्मात् घडलेल्या त्या घटनेमुळे चंपाची बोबडीच वळली.

चोराने आपला सुरा तिच्या गळ्यावर ठेवला व म्हणाला–"ही तुझी सोंगं चालणार नाहीत. चटकन काय ते कर."

"आमच्या घरात दागिने आहेत कोठे? होते ते माझे बाबा लग्न ठरवायला गेले आहेत त्यांच्या घरी घेऊन गेले आहेत." प्रसंगावधान राखून चंपा म्हणाली.

तिच्या बोलण्यावर चोराचा विश्वास बसला नाही. त्याने सर्व पेट्या उघडून पाहिल्या. त्याला फुटकी कवडी सुद्धा सापडली नाही. बापाच्या हुशारीबद्दल चंपाला आनंद झाला.

चोर संतापून चंपाच्या गळ्यातली सोन्याची साखळी तोडून घेऊन मागच्या दाराने पळून गेला. ती साखळी तिच्या बाबांनी तिच्या लग्नाच्या वेळी गळ्यात काही असावे म्हणून बरेच पैसे खर्च करून करविली होती. ती गेली म्हणून चंपा ओक्साबोक्शी रडू लागली. तिला तिच्या हट्टीपणाचे फळ भोगायला लागले.

दुसऱ्या दिवशी तिचे बाबा आल्यावर तिने घडलेले सर्व वृत्त सांगितले.



"आता रडत बसण्यात काय अर्थ आहे? धाडस म्हणजे मूर्खपणा नव्हे! मध्यरात्रीच्या वेळी कोणी दार वाजविले तर तू एकटी मुलगी असतांना दार उघडणे म्हणजे धैर्य का? केवळ मूर्खपणा आहे! भय आणि सावधगिरी यात फरक आहे. पैसे काळजीपूर्वक ठेवणे, रात्री दार लावून झोपणे, काळोखात दिवा घेऊन जाणे म्हणजे भीती नव्हे, त्याला सावधगिरी म्हणतात. धैर्य म्हणजे, समोर आलेली समस्या, किंवा संकट आले तर निधड्या छातीने त्याला तोंड देणे होय. तशा परिस्थितीत किंकर्तव्य विमूढ होणे म्हणजे भीती."

चंपाला तिचा मूर्खपणा आणि बेफिकीरी हळूहळू कळू लागली.

ही गोष्ट घडली त्यानंतर एका महिन्याने चंपाला पहायला लोक आले. मुलाच्या आईने चंपाला पाहून ती पसंत असल्याचे सांगितले आणि त्याची खूण म्हणून तिच्या गळ्यात एक सोन्याची साखळी घातली. ती पाहून चंपा दचकली. तिच्या गळ्यातून चोराने काढून नेलेलीच साखळी होती ती! तिने मान वर करून नवऱ्या मुलाला पाहिले आणि जास्तच घाबरून गेली. तोच होता तिच्या गळ्यातून सांखळी तोडून नेणारा चोर!

ती चटदिशी घरात निघून गेली आणि बापाला म्हणाली—"बाबा! माझी साखळी चोरून नेणाराच तो नवरामुलगा आहे! जीव गेला तरी मी त्याच्याशी लग्न करणार नाही!"

राजाराम हसून म्हणाला—"पोरी! तू पुन्हा आपला मूर्खपणाच जगाला दाखवीत आहेस! खरी परिस्थिती समजून घेतल्याशिवाय बोलून टाकणे म्हणजे धैर्य नव्हे! त्याने तुला देवळात पुष्कळदा पाहिले आणि तुझ्याशी लग्न करायचे ठरविले. परंतु तुझ्यातली ही उणीव जावी म्हणून त्याने चोराचे सोंग केले होते. तुझ्यात फरक झालेला कळल्यावर ती मंडळी तुला पहायला आली आहेत."

लाजेने चंपाची मान खाली झाली.





# गौतम

ब्रह्मदेवाने अहिल्या नावाच्या एका अपरूप लावण्यवती स्त्रीची सृष्टी केली आणि जो कोणी पृथ्वी प्रदक्षिणा करून आधी येईल त्याला ती स्त्री पत्नी म्हणून मिळेल, असे त्याने सांगितले. अहिल्येची प्राप्ती व्हावी या हेतूने देव, दानव व मानव सर्वांत चढाओढ लागली आणि ते पृथ्वी प्रदक्षिणेला निघाले. गौतम मुनींनी एका वीत असलेल्या गाईला प्रदक्षिणा घातली व गाईला प्रदक्षिणा ही भूप्रदक्षिणेसारखीच असल्याचे ब्रह्मदेवाकडून मान्य करवून घेऊन अहिल्येशी विवाह केला. अहिल्येच्या पोटी गौतम मुनींना शतानीक नावाचा मुलगा झाला.

अहिल्येच्या सौंदर्यावर इंद्र भाळला व मध्यरात्र उलटल्यावर कोंबड्यासारखा आरवला. गौतम ऋषींना वाटले की पहाट झाली व ते प्रातर्विधी व स्नानसंध्या आटोपण्यासाठी निघून गेले. लगेच इंद्र गौतम मुनींच्या आश्रमात शिरला आणि रात्रभर अहिल्येच्या सहवासात राहिला. ते कळल्यावर गौतम ऋषींनी अहिल्येला व इंद्राला शाप दिला.

ब्रह्मदेवाने गौतम मुनींना वर दिला की, त्यांनी धान्य पेरल्याबरोबर त्याला अंकुर येऊन रोप वाढेल व पीक तयार होईल.

एकदा दुष्काळ पडला व देशाला विपरीत स्थितीला तोंड द्यावे लागले. सर्व मुनी गौतम मुनींच्या आश्रमात आले. गौतमाने सर्वांना कित्येक दिवस अन्नाचा पुरवठा केला. गौतमाचे ते वैभव पाहून मुनी ईर्ष्या करू लागले. त्यांनी मायेने एका गायीची सृष्टी केली आणि तिला गौतम मुनींच्या शेतात सोडले व गौतम मुनींना गायीने सर्व शेत फस्त केल्याचे सांगितले.

गौतम मुनींनी तोंडाने त्या गाईला हाकीत हातातले मंत्रवलेले पाणी तिच्यावर

घिपडले, त्या पाण्याचे दोनच थेंब त्या गाईवर पडले आणि तत्क्षण ती गाई मरण पावली.

"छे, बुवा! या गोहन्तकाच्या घरी आम्ही नाही जेवणार!" मुनी म्हणाले.

गौतम मुनींनी त्यांच्या समोर हात जोडून त्यांना विचारले–"गोहत्येच्या पापां-तून मुक्ती कशी मिळणार?"

मुनी म्हणाले–"मेलेली गाय ज्या जागी पडली आहे त्या जागेवरून गंगा नदी वाहू लागेल असे केल्यास तुम्हांला गोहत्येच्या पापातून मुक्ती मिळेल."

गौतमाने शंकराचे ध्यान करून तपश्चर्या सुरू केली व गंगेचा प्रवाह त्यांच्या शेता-वरून जाईल असे देवाला साकडे घातले. शंकराने दर्शन देऊन आपल्या केसाची एक बट काढून देऊन ती पिळायला सांगितले.

गौतमाने ती बट नेऊन गाईच्या अंगावर पिळताच गाय जिवंत झाली व स्त्रीरूपे तेथून निघून गेली. गौतमाने ती नदी आणली म्हणून तिचे नाव गौतमी झाले आणि तिचे

हे नावही पडले.

आपल्या घरी अन्न ग्रहण करीत असतां असा कृतघ्नपणा केल्याबद्दल मुनींवर रागा-वून मुनींनी त्यांना 'पाखंडी व्हा' असा शाप दिला.

एकदा गौतम मुनी, ब्रह्मदत्त नावाच्या राजाच्या घरी गेले व 'जेवायला वाढा'-म्हणाले. त्या राजाने त्यांना एक वर्षभर जेवायला वाढले. एके दिवशी जेवणात मांस वाढले गेले. गौतमाने राजाला 'तू गिधाड हो' असा शाप दिला. राजाने क्षमा मागितल्यावर गौतम मुनी म्हणाले–"तुला रामाचा स्पर्श झाला की गिधाडाचे रूप जाईल."

गौतमाने न्यायसूत्रांची रचना केली. व्यासांनी त्या सूत्रांची निंदा केली. गौतमाने व्यासांना, तुझे तोंड पाहणार नाही, अशी प्रतिज्ञा केली. गुडघ्यात डोळ्याची सृष्टी करून त्या डोळ्याने तो व्यासांना पहात असे.





# घरात शिरलेली फितूरी

सुमेरु पर्वतावर वज्रनाभ नावाच्या एका राक्षसाने तपश्चर्या करून ब्रह्म-देवाला प्रसन्न केले आणि देवाच्या कडून त्याला मरण येणार नाही, असा वर प्राप्त केला.



वज्रनाभ जसा देवांच्या समोर अजेय झाला तशीच त्याची राजधानी वज्रपुर ही अभेद्य झाली. वायूलासुद्धा वज्र-नाभाच्या अनुमती शिवाय किल्ल्यात प्रवेश मिळणे शक्य नव्हते.



वज्रनाभाला अपार गर्व झाला. त्याने एकेक करून अनेक राजांचा पराभव करून त्यांची राज्ये जिंकली आणि त्याच्या अत्याचाराने सर्वत्र हा:हाकार उडून गेला.



सर्व भूलोक जिंकला तरी त्याच्या मनाचे समाधान झाले नाही. त्याला



वज्रनाभाने इंद्राला आव्हान केले की युद्धाला ये, नाहीतर शरण माग. इंद्र काय करावे, या विचारात पडला.

देवांनी वज्रनाभाला युद्धात जिंकणे अशक्य आहे, असा विचार करून ठरविले की वज्रनाभाला कळू न देतां त्याच्या किल्ल्यांत प्रवेश करायचा व तो किल्ला नष्ट करायचा. परंतु किल्ला दुर्भेद्य होता.





वज्रनाभाचा वध करणे देवांना शक्य नसले तरी मानवांना ते साध्य होते. द्वारकेला कृष्णाचा मुलगा प्रद्युम्न आहे, त्याचा या कामी यांना उपयोग होईल असे इंद्राला वाटले.

वज्रनाभाची मुलगी प्रभावती. फार सुंदर होती, वज्रनाभाचे तिच्यावर स्वतःच्या पंचप्राणांपेक्षा जास्त प्रेम





एके दिवशी प्रभावती सरोवराच्या काठी विहार करीत असतां इंद्राने पाठविलेले राजहंस तेथे आले व तिच्या समोर बागडू लागले. प्रभावती त्यांच्याकडे आकर्षिली गेली.



ते हंस परस्परांशी बोलू लागले–"ही प्रभावती किती सुंदर आहे ! हिच्याशी लग्नाला द्वारकेचा राजकुमार प्रद्युम्नच योग्य आहे." ते प्रभावतीने ऐकले.

त्याच सुमारास वज्रनाभाने आपल्या मुलीला नृत्य शिकवायला भद्र नावाच्या एका जगप्रसिद्ध नट्टाचार्याला बोलाविले. परंतु भद्र वज्रपुरीला जात असतां देवांनी त्याला पळवून नेले.












देवांनी, भद्रने धारण केलेली जुनी वस्त्रे व आभूषणे काढून घेऊन त्याऐवजी त्याला उत्तम व मूल्यवान वस्त्राभूषणे देऊन त्याची वस्त्राभूषणे प्रद्युम्नाला घालायला दिली व त्याला प्रभावती जवळ पाठविले.



भद्रच्या वेषात प्रद्युम्न वज्रपुरीत शिरला व त्याने प्रभावतीला तो कोण हे सांगितले. प्रभावतीला परमानंद झाला.



प्रभावती व प्रद्युम्नाने गुप्तपणे विवाह करून घेतला. वज्रनाभ फार पूर्वी स्वारीवर निघून गेला असल्या कारणाने त्याला हे कारस्थान कळले नाही. कालक्रमाने प्रभावतीच्या पोटी प्रद्युम्नाला एक मुलगा झाला.



प्रभावतीला मुलगा झाल्यावर वज्रनाभाला वस्तुस्थिती कळली व तो प्रद्युम्नाशी युद्धाला आला. कृष्णाने



# आस्तिक

पुराणात वर्णिलेल्या मुलांत आस्तिक हा विचित्र मुलगा होता. त्याच्या बापाचे नाव जरत्कारू. तो ब्राह्मण होता. जरत्कारूचे मन संसारात नव्हते. त्याने आजन्म ब्रह्मचारी रहायचे ठरवून तपश्चर्येत सर्व आयुष्य घालविले.

एके दिवशी जरत्कारूने अगदी विक्षिप्तपणे तपश्चर्या करीत असलेल्या काही विचित्र माणसांना पाहिले. ते एका झाडाला उलटे लोंबत होते.

जरत्कारूने त्यांना विचारले–"काय हो, तुम्ही कोण? तुम्ही करीत असलेली ही तपश्चर्या विचित्रच दिसते आहे. ही तपश्चर्या कोणत्या प्रकारची आहे, मला तरी कळू द्या."

ते म्हणाले–"आम्ही जरत्कारू नावाच्या व्यक्तीचे पितर आहो. त्याला पुत्रसंतती नसल्यामुळे आम्हाला ही अधोगती प्राप्त होणार आहे. म्हणून आमची ही स्थिती झाली आहे.

ते ऐकून जरत्कारूने लग्न करण्याचे ठरविले. त्याला फार वाईट वाटले की त्याच्या ब्रह्मचारी राहण्याच्या हट्टामुळे पितरांना अधोगती मिळत आहे. आपलेच नाव असलेल्या मुलीशी लग्न करायचे ठरवून तो मुलीच्या शोधार्थ निघाला. परंतु या निश्चयाचा अर्थ असा झाला की त्या नावाची मुलगी मिळाली नाही तर तो लग्न करणार नाही.

परंतु त्या नावाची एक मुलगी होती. तिचे नाव जरत्कारु. ती नागराज वासुकीची बहीण होती. जरत्कारू आपल्याच नावाची मुलगी मिळाली तर तिच्याशीच लग्न करणार व तिच्या शोधार्थ हिंडत असल्याचे कळल्यावर वासुकीने आपली बहीण जरत्कारू हिच्याशी त्याचे लग्न करून













द्यायचे ठरविले. या लग्नामुळे आर्य आणि नाग यांच्यात संबंध जुळून येईल व त्यांचे परस्परातील वैर कमी होईल असेही त्याला वाटले.

जरत्कारूचे नागकन्या जरत्कारूशी लग्न झाले व त्यांना एक मुलगा झाला. त्याचे नाव आस्तिक असे ठेवण्यात आले. पुत्रोत्पत्ती झाल्यावर पितृऋणांतून जरत्कारू मुक्त झाला व त्याचे मन पुन्हां ब्राह्मचर्याकडे वळले. काहीतरी कारण सांगून बायकोला, मुलाला व संसाराला सोडण्याचे मनात आल्यावर जरत्कारूला अनुरूप असे कारण-ही सहजी मिळाले. एके दिवशी सूर्यास्ताची वेळ होती. तेव्हा पत्नीने जरत्कारू झोपला असतां त्याला जागे केले. बायकोने आपला अपमान केला याबद्दल संतापून गेल्याचे सोंग करून जरत्कारू बायकोला मुलाला व संसाराला सोडून निघून गेला.

आस्तिकाने च्यवनाचा मुलगा प्रमती याच्या जवळ वेदशास्त्रांचा अभ्यास केला आणि लहान वयातच थोर विद्वान म्हणून त्याला ख्याती प्राप्त झाली. त्याच सुमारास परीक्षित राजाला तक्षक नावाचा नाग चावला व परीक्षित राजा मरण पावला. त्याचा प्रतिकार करण्याच्या हेतूने परीक्षित राजाचा मुलगा जनमेजय याने नागयज्ञ आरंभिला.

नागवंशावर आलेला प्रसंग पाहून आस्तिकाची आई नागकन्या जरत्कारु आपल्या मुलाला म्हणाली—"तू जनमेजयाने आरंभलेल्या नागयज्ञाला जा आणि काय वाटेल ते करून तो नागयज्ञ थांबव."

आस्तिक नागयज्ञाला गेला. त्याची विद्वत्ता पाहून जनमेजय प्रसन्न झाला. यज्ञ-समयी जनमेजय ब्राह्मणांना इच्छित दान देत होता. आस्तिक इतक्या लहान वयात इतका थोर विद्वान झालेला पाहून राजाने आस्तिकाला काय वाटेल ते मागून घ्यायला सांगितले.

आस्तिकाने नागयज्ञ बंद करावा, अशी इच्छा प्रगट केली. त्याप्रमाणे जनमेजय राजाने यज्ञ थांबविला.





# केर काढणारा राजा

सुमारे चारशे वर्षापूर्वीची गोष्ट आहे कलिंग प्रांतात एका राज्याच्या गादीवर पुरुषोत्तम नावाचा राजा राज्य करीत होता. तो गंगवंशाचा राजा होता. तो एक गौरवशाली राजा होता. अविवाहित होता. योग्य कन्या मिळाल्याशिवाय लग्न करायचे नाही असे त्याने मनाशी पक्के ठरविले होते.

त्या काळात कांजीवरमचा राजा कंचि-राज याला एक मुलगी होती. ती फार सुंदर होती. तिच्या सौंदर्याची ख्याती आस-पासच्या राज्यात सर्वत्र पसरली. पुरुषोत्तम राजाला हीच मुलगी योग्य होईल असे लोक म्हणत. तशीच सुंदर व गुणवती होती ती.

ती बातमी पुरुषोत्तमाच्या वडिलांना कळताच त्यांनी कांचिराजाकडे पुरोहिताला पाठवून मुलीला मागणी घातली. मुलीला पाहण्यासाठी आवश्यक सर्व तयारी झाली. कंचिराजाने पाहुण्यांच्या उतरण्याची उत्तम व्यवस्था करून राजोचित सर्व बडदास्त राखली आणि त्याला हव्या असलेल्या सर्व गोष्टींची माहिती काढून घेतली.

पुरुषोत्तम हा उच्च कुळात जन्मलेला आणि सर्व विद्यांत निष्णात होता. तो शक्तिशाली राजकुमार सुद्धा होता. शिवाय त्या ठिकाणी जन्मलेल्यात तो सर्वात उच्च कुळात जन्मलेला होता. याहून जास्त महत्वाची गोष्ट म्हणजे सर्व राजकुमार जमले असतां पुरुषोत्तम व कंचिराजाची राजकन्या यांनी परस्परांना पाहतांच परस्परांना मनाने वरले होते.

अशा तऱ्हेने सर्व प्रकारे पुरुषोत्तम आणि कंचिराजाची राजकन्या यांचा विवाह योग सहजी जुळून आला होता. ते कंचि-राजालाही पसंत होते. ती गोष्ट कळवून



संबंध पक्का झाल्याचे कळवावे असे कंचिराजाच्या मनात होते. पुरुषोत्तमाला सुद्धा वाटले की हा संबंध पक्का ठरल्यासारखाच आहे व तो स्वदेशी परतला.

परंतु पुरुषोत्तम निघून गेल्यावर कंचिराजाच्या मनात एक शंका आली. ती अशी—

गंगवंशीय राजे फार मोठे भक्त होते. पिढ्यान्‌पिढ्या ते जगन्नाथाची आराधना करीत आले होते. जगन्नाथपुरीचे सुप्रसिद्ध देवालयसुद्धा या गंगवंशीयांनीच बांधले होते. त्या देवाची सेवा करणे हेच आपले परमभाग्य असल्याचे गंगवंशीय पिढ्यान पिढ्या मानीत आले होते.

वंशपरंपरागत एक चाल या राजकुळात होती. प्रत्येक राजकुमाराला सोन्याची केरसुणी घेऊन देवालय झाडावे लागे. त्याप्रमाणे पुरुषोत्तमही देवळात जाऊन उत्सव चालू झाला की देवाची सेवा करीत असल्याची एक सूचक सेवा म्हणून देवळातली जागा सोन्याच्या केरसुणीने दरवर्षी झाडीत असे.

ते कळल्यावर कंचिराजाच्या मनात बदल झाला. "आपण केर काढणाऱ्याला का आपली मुलगी देऊन त्याला आपला जांवई मानायचे? ते कोणत्याही परिस्थितीत शक्य नाही." त्याला आपल्या कुलीन, तेचा फार अभिमान होता. असे सांगून एका दूताकरवी पुरुषोत्तमाच्या वडिलांकडे दूत पाठवून कंचिराजाने कळविले.

कंचिराजाकडून आलेला संदेश ऐकून पुरुषोत्तमाला भयंकर राग आला. त्यांत आपण देवाची सेवा करतो ते वैगुण्य आहे. हीन कुळाचे लक्षण आहे. हे मानून कंचिराजाने असा नकार द्यावा याचा पुरुषोत्तमयाला फारच राग आला. त्याने कंचिराजाला त्याबद्दल चांगला धडा द्यायचे ठरविले.

पुरुषोत्तमाने मनाशी असे ठरविल्यानंतर युद्धाची आवश्यक सर्व तयारी केली. लौकरच गंगराजाचे सैन्य कंचिराज्यावर

दिला. परंतु कंचिराजा सुद्धा सामान्य योद्धा नव्हता. त्याने गंगराजाच्या सैन्याचा पराभव करून शत्रूला पळवून लावले.

पुरुषोत्तम हार मानून स्वस्थ बसायला तयार नव्हता, त्याने युद्धाची पुन्हां खूप जोराने तयारी केली व या खेपेस दुप्पट सैन्य घेऊन युद्धाला निघाला, शत्रू इतक्या लौकर युद्धाला येईल याची कोणालाच कल्पना नव्हती म्हणून मोठा पराक्रमी असूनही कंचिराज या युद्धात शत्रूसमोर टिकाव धरू शकला नाही.

कंचिराजाचा पूर्ण पराभव झाला आणि पुरुषोत्तमाने कंचिराजाला व राजकन्येला अटक करवून तुरुंगात टाकण्यास आज्ञा केली.

आता राजा व राजकन्या कैद झाले असतां पुरुषोत्तमाने राजकन्येशी लग्न करायचे ठरविले तर या लग्नास अटकाव करण्याची छाती कोणालाही असणार नाही, असेच सर्वांना वाटत होते.

"ठीक!" असे सांगून व राजाचा निरोप घेऊन प्रधानाने त्याच क्षणी कोणालाही कळणार नाही अशा गुप्तस्थानी कंचिराजाच्या राजकन्येची उतरण्याची व्यवस्था करविली. राजघराण्याला शोभेल अशाच थाटात तिची सर्व बडदास्त



राखण्यात आली. परंतु ही व्यवस्था इतकी गुप्तपणे झाली की ब्रह्मा, विष्णु व महेश यांनादेखील कळणे शक्य नव्हते.

तशी व्यवस्था झाल्यावर पुरुषोत्तम राजकन्येविषयी जणुकाही त्याला काही आठवत नसल्यासारखी तिला विसरून गेला आणि राज्याच्या कारभारात निमग्न होऊन गेला.

कंचिराजाचा राग हळूहळू ओसरला. आपण हट्टाला बळी पडून राजकन्येच्या भावना दुखावल्याबद्दल त्याला फार पश्चात्ताप वाटला.

नंतर काही दिवसांनी जगन्नाथाचा उत्सव सुरू होणार होता. रुढीप्रमाणे

पुरुषोत्तम जगन्नाथाच्या सेवेत मग्न झाला. पुजाऱ्याने सोन्याची मूठ असलेली एक केरसुणी आणून राजकुमाराच्या हातात दिली. पुरुषोत्तमाने अत्यंत भक्तिपूर्वक केरसुणी घेऊन जगन्नाथाच्या गर्भगृहात केर काढायला सुरवात केली.

ठीक त्याच वेळी प्रधान हात जोडून राजासमोर अत्यंत नम्रपणे उभा राहिला. त्याच्या बरोबर सर्वालंकार धारण करून एक अलौकिक सुंदरी पुष्पमाला हातात घेऊन येऊन उभी राहिली.

"महाराज! क्षमा करावी. प्रभूच्या आज्ञेचं पालन करण्यास मला आतांच सवड मिळाली आहे. प्रभू जगन्नाथाच्या सेवेत मग्न होऊन त्याची चरणधूली केरसुणी घेऊन झाडणाऱ्याशींच लग्न करीन, अशी प्रतिज्ञा या राजकन्येने केली आहे. मी पुष्कळ शोध केला. परंतु तसा योग्य पुरुष मला आढळला नाही. म्हणून महाराजांनाच ही कन्या स्वतःला अर्पण करीत आहे!" असे

उभा राहिला.

तेव्हां कंचिराजकन्येने अत्यंत भक्तीने हातातली वरमाळा पुरुषोत्तमाच्या गळ्यात घातली. एकाएकी देवळाच्या वरच्या बाजूनं पुष्पवृष्टी झाली. पुरुषोत्तम आश्चर्यचकित झाला. सुदैवाने त्याला मागे घडलेल्या सर्व गोष्टी आठवल्या.

ही सर्व प्रभू जगन्नाथाची लीला आहे, असे समजून पुरुषोत्तमाने त्या विवाहास होकार दिला.

त्यांच वेळी कंचिराजा कैदेतून मुक्त होऊन तेथे आला. पुरुषोत्तम व कंचि-राजाची राजकन्या यांचा विवाह थाटा-माटाने पार पडला.

अशा तऱ्हेने विवाह झाल्याबद्दल प्रजेलाही फार आनंद झाला. प्रधानाने जुळवून आणलेला हा गोड समारंभ आनंदाने पार पडला. सर्वांनी त्याबद्दल प्रधानाला धन्यवाद दिले. कंचिराजाला सुद्धा विवाह समारंभ आनंदाने पार पडल्याबद्दल धन्यता वाटली.



# तीळ कसे खायचे?

सोनूशेटने तीळ वाळत घातले व दोन्ही हात नसलेल्या एका थिट्याला ते उचलून खाणे शक्य नाही असा विचार करून राखण करायला ठेवले. अर्ध्या तासाने सोनूशेट वाळत घातलेले तीळ पहायला आले. त्यांना शंका होती की थिट्याने तीळ उचलून खाल्ले असणार. तसे त्यांनी त्याला विचारलेही–"काय रे, तीळ कमी झाल्यासारखे दिसताहेत?"

"मी थिटाच तर आहे, मी कसे खाणार हो?" राखणदाराने आपले थिट्टे हात दाखवीत विचारले.

"ते मला कळत नाही, वाटले का रे तुला? थिट्टा हात भिजवून तिळाला लावला की तीळ चिकटतात, मग नाही का खाता येणार?" सोनूशेटने विचारले.

"असली कामे मी कधी करीन का हो?" असे विचारीत थिट्याने आपल्या बापाची, आईची, मुलांची शपथ घेतली. सोनूशेटचे त्या उत्तराने समाधान झाले आणि निघून गेले.

थिट्याला तीळ कसे खायचे हे कळले. तो त्याप्रमाणे तीळ उचलून खाऊ लागला.





# गीतेचे सार

विवेकवर्धन महाराजांना आपली प्रजा नेहमी सुखासमाधानाने रहावी असे वाटे. त्यासाठी काय करावे, याचा सल्ला घेण्यासाठी त्यांनी काही पंडितविद्वानांना बोलावून त्यांना विचारले. तेव्हां ते म्हणाले– "वैभव व संपत्तीमुळे माणसाला खरे सुख मिळत नाहीं. संतोष आणि समाधान असेल तरच खरे सुख मिळते."

"संतोष आणि समाधान कशी मिळतात?" राजाने विचारले.

"प्रजेला वेदांत म्हणजे काय हे चांगलं समजले पाहिजे. वेदांताचे सार म्हणजे भगवद्गीता. तो ग्रंथ घोळून प्यायला पाहिजे. तेव्हां कोठे त्यांना संतोष व समाधान म्हणजे काय हे कळेल." सर्व थोरपंडितांनी सल्ला दिला.

विवेकवर्धनने काही ज्ञानी विद्वानांना नेमले व स्वतः गीतेचा अभ्यास करू लागला. त्याला सुद्धा ज्ञानी म्हणतात ते खरे असल्याचे पटले. परंतु सर्व प्रजेला गीतेचा अर्थबोध व्हावा यासाठी अनेक थोरविद्वानांची गरज असल्याचा विचार करून त्याने दवंडी पिटून ते जाहीर केले.

"भगवद्गीतेचे सार सर्वसामान्यांच्या लक्षात येईल अशातऱ्हेने गीतेचा उपदेश करणाऱ्या विद्वानांची गरज आहे. महाराज अशा विद्वानांना नेमून त्यांना यथोचित मानधनही देतील."

दवंडी ऐकून अनेक पंडित दरबारात हजर झाले. राजाने त्या विद्वानांच्या योग्यतेची परीक्षा घेण्याची जबाबदारी दरबारी पंडितावर टाकली. दरबारी विद्वानाने एकेका विद्वानाला बोलावून त्यांच्याशी चर्चा केली व महाराजांना भेटून म्हणाला.

"महाराज, हे सर्व विद्वान फार थोर विद्वान आहेत. भगवद्गीतेचे त्यांना किती ज्ञान आहे, हे पारखणे मला जमणार नाही."

राजाला काय करावे, सुचेना.

सुदैवाने त्याच वेळी राजधानीत चिरंजीवी आला. देशातले सर्व थोर विद्वान राजधानीत आल्याचे कळल्यावरुन त्यांच्याशी शास्त्रार्थ करण्यापूर्वी चिरंजीवी दरबारी विद्वान पंडिताला भेटला.

दरबारी विद्वानाला पूर्वीपासून चिरंजीवीच्या विषयी चांगली माहिती असल्या कारणाने त्याला घेऊन दरबारी विद्वान महाराजांना भेटायला गेला व म्हणाला– "कितीही गुंतागुंतीचा प्रश्न असला तरी प्रश्न सोडविण्याची शक्ती या थोर पंडितात आहे. सुदैवाने हे आपल्या राजधानीत आले आहेत. आपल्या समोरचा प्रश्न हे नक्कीच सोडवू शकतील."

राजाने आपल्या समोरची समस्या चिरंजीवीला थोडक्यात सांगितली.

"मी एवढा मोठा विद्वान नाही. तरी प्रयत्न करून पाहातो." चिरंजीवी म्हणाला.

दुसऱ्या दिवशी दरबारात सर्व पंडितांना बोलावण्यात आले. चिरंजीवीने एकदां त्या सर्वांकडे पाहून विचारले–"आपण सर्व थोर विद्वान आहां. परंतु महाराजांची इच्छा आहे की कोण किती विद्वान आहे याचा अंदाज लागलेला बरा. म्हणून एक प्रतिस्पर्धा म्हणजे चढाओढ ठेवण्याचा विचार आहे. तुम्हांला मान्य असणारच?"



सर्वांनी मान्य असल्याबद्दल माना हलविल्या.

चिरंजीवीने प्रत्येक विद्वानाला विचारले– "भगवद्गीतेचे संपूर्ण भाष्य लिहायला सर्व आयुष्य पुरणार नाही, असं म्हणतात! होय की नाही? या परिस्थितीत या थोर ग्रंथाचे सार इतक्यात तुम्हांला कसे काय कळले?"

"आपण म्हणालात ते बरोबर आहे. परंतु मी मनाचा पूर्ण निग्रह करून खूप मेहनत केली आणि गीतेचे सार घोळून प्यालो." प्रत्येक पंडिताने हेच उत्तर दिले








आणि आपल्या अभ्यासाची व विद्वतेची थोरवी सांगितली.

सर्वांची भेट घेतल्यावर चिरंजीवी महाराजांना ...टून म्हणाला–"प्रभो! ही सर्व थोर विद्वान मंडळी आहेत. परंतु यांच्यापैकी एकालाही गीतेचे सार कळलेले नाही."

"मीसुद्धा गीतेचा अभ्यास केला आहे. मला गीतेचे सार वाटले ते हे की प्रत्येकाने 'मी' पणा सोडला पाहिजे. मी हे काम करतो आहे, असे म्हणण्याऐवजी देव हे माझ्याकडून करवितो आहे, आपण निमित्त मात्र आहो, असे समजले पाहिजे. 'मी' याचा उच्चार केल्याने माणसाचे अज्ञान व अहंकार दिसतो. गीतेचे सार घोळून प्यालो आहे असे म्हणणारे हे विद्वान स्वतःच्या मेहनतीने ते प्राप्त करू शकले असे मानत आहेत." चिरंजीवी म्हणाला.

सर्व पंडितांनी चिरंजीवी म्हणाला ते कबूल केले. गीतेचे तेच सार असल्याचे मान्य करून त्यांनी निरर्थक विद्येचा गर्व केल्याचे कबूल केले. चिरंजीवीने त्यांचे ... दिसत होते.

राजाने सर्व पंडितांचा यथाशक्ति सत्कार करून त्यांना निरोप दिला व चिरंजीवीला म्हणाला–"प्रजेने नेहमी सुखासमाधाने रहावे यासाठी मी त्यांना गीतेचा बोध करावा म्हणतो. यासाठी काही मार्ग सुचवा."

चिरंजीवी म्हणाला–"सुख समाधान या शब्दाला वास्तविक अर्थच नसतो. देशात आळशी म्हणून कोणी राहता कामा नये. सर्व तरुण मेहनत करू लागले तर देशात सर्वत्र सुख व शांती नांदेल. स्वतःच्या मेहनतीने मिळविलेल्या संपत्तीचा उपभोग करण्यात नकळत एक अपूर्व आनंद असतो. वेदांताचा उपदेश केल्याने आळशी लोकांची संख्याच देशात वाढेल. स्वतः एकाद्या वस्तूची निर्मिती केल्यावर त्यावर प्रेम जडते व मनाचे समाधान होते. तुम्ही त्यासाठी निराळे काही करण्याची गरजच नाही."



# चोर तो चोरच!

एके दिवशी रात्री एक चोर धर्मूच्या घरात धावत धावत येऊन शिरला आणि आतून कडी लावून धर्मूचे पाय धरून म्हणाला–"मालक! मला वांचवा! मला शिपाई धरायला येत आहेत. मी त्यांच्या हातात सापडलो तर माझं मरण निश्चितच आलं. मी इकडे आलो नसल्याचे सांगून मला वांचवा! मी आपले उपकार कधी विसरणार नाही"

शिपाई पाठोपाठ आलेच. धर्मूने त्याच्याकडे कोणी आला नसल्याचे सांगून शिपायांना परतविले आणि चोराला वांचविले. शिपाई निघून गेल्यावरोबर चोराने सुरा दाखविला व धर्मूला म्हणाला–"घरातले दागिने, पैसे व चांदीची भांडी काढतो की---"

"तू माझे उपकार विसरणार नाहीस, असे आत्तांच तर म्हणालास?" धर्मूने विचारले. "मी तसे केव्हांच म्हटले नव्हते!" चोर म्हणाला.

"तू चोर असलास तरी एवढ्यात इतके खोटे बोलतोस?" धर्मूने विचारले.

"तू तरी मोठा हरिश्चंद्र लागून राहिला आहेस वाटते? तू मघाशी शिपायांना खोटे नव्हतेस का सांगितलेस?" चोराने उलटी धमकी दिली.












# सांपडलेला ठेवा

एका गावी लखुजी नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याने खूप मेहनत करून त्याच्याजवळ होते त्यावरच संतुष्ट न होता आणखी शेती खरेदी केली आणि एक सुखवस्तू शेतकरी म्हणून प्रसिद्ध झाला. त्याची बायको दोघां लहान मुलांना मागे सोडून निवर्तली. लखुजीने मुलाला आईची उणीव भासू दिली नाही. मुलं बापाला काही मदत करणे तर बाजूलाच दररोज त्यांच्या हौशी पुरविण्यासाठी बापाकडे पैसे मागत.

त्यांना थोडी अक्कल यावी यासाठी एके दिवशी लखुजी त्यांना म्हणाला– "मुलांनो! तुमच्या हौशी पुरवायला माझ्याकडे पैसा नाही. परंतु तुमच्या आजोबांनी एका जागी पैसे पुरून ठेवले आहेत. ते घेऊन या, आणि करा खर्च, मला स्वतःच्या मेहनतीने मिळविलेले पैसे पुरत आहेत. म्हणून मी तो ठेवा आणायला गेलो नाही."

"तो ठेवा कोठे आहे?" मुलांनी विचारले.

लखुजी म्हणाला–"आपल्या गावाहून उत्तरेला सुमारे दोनशे मैलांवर धर्मपुरी नावाचे एक गाव आहे. त्या गावाच्या दक्षिणेला रत्नगिरी नावाच्या पर्वताच्या पश्चिमेला एक गुहा आहे. त्या गुहेत एका जागी तुमच्या आजोबांचे नाव कोरलेला एक दगड आहे. ती शिळा बाजूला सारली की तो ठेवा मिळेल. तो पाहिजे असेल तर दोन वर्षे तरी तुम्हांला मेहनत करावी लागेल."

लगेच दोघे मुलगे वाट खर्चाला थोडेसे पैसे बापाकडून मागून वाटेत खायला भाकऱ्या पोहे, सातूचे पीठ वगैरे घेऊन निघाले. दोन गावे पार करून ते पलीकडच्या वाटेने पुढे निघाले. तिसऱ्या गावी पोचले तोपर्यंत जवळचे पैसे व खायला आणलेल्या भाकऱ्या वगैरे संपल्या. पुढे काय करायचे, या विचारात ते पडले असतां त्यांना समोर एक शेतकरी दिसला. त्याने त्यांना विचारले–

"मजुरी करणार का? माझ्या शेतात लावणीचे काम सुरू होणार आहे. काम केलेत तर मजुरी देईन व जेवायला पण वाढीन!"

त्यांना देव पावल्यासारखाच तो शेतकरी भेटला. त्यांच्या समोरचा प्रश्न सुटत होता. त्यांनी चार दिवस त्या शेतकऱ्याच्या शेतात काम करायचे मान्य केले. त्यांनी उत्साहाने काम केले आणि चार पैसे मिळविले. शेतकऱ्याने जेवायला वाढले, म्हणून सर्व पैसे वाचले. पुढला प्रवास कसा करायचा, हे त्यांना या अनुभवावरून कळले.

त्यांनी जवळचे पैसे संपेपर्यंत प्रवास चालू ठेवला आणि पुन्हां कोठे काम मिळते का, पाहू लागले. एका घोड्याच्या व्यापाऱ्याने त्यांना घोड्यांच्या सेवेला नोकर म्हणून ठेवून घेतले. घोड्यांची विक्री होईपर्यंत दोघे भाऊ त्या व्यापाऱ्याकडेच नोकरीला राहूले. त्यांच्या कामसूपणाबद्दल त्यांना शाबासकी दिली व त्यांना मजुरीबरोबर इनामही दिले.

उदयगिरीला पोचेपर्यंत त्यांच्याजवळ होते नव्हते ते पैसेसंपून गेले. त्या गावातल्या एका व्यापाऱ्याने त्यांना आपल्याकडे नोकर



म्हणून ठेवून घेतले. दोघांना व्यापार कसा करायचा हे हळूहळू कळू लागले आणि स्वत: व्यापार करावा असे त्यांना वाटू लागले. व्यापार केला तर पुष्कळ पैसे मिळविता येतील. असा विचार करून त्यांनी व्यापारी जो पगार देई त्यातले त्यांना खर्चाला लागत तेवढे पैसे खर्च करून बाकी शिलकेत टाकले. भांडवलापुरते चार पैसे जमा झाल्यावर त्यांनी एक स्वत:चे दुकान काढले.

व्यापारात त्यांना पुष्कळ फायदा होऊ लागला. त्यांची गणना श्रीमंत व्यापाऱ्यात होऊ लागली. नंतर ते आजोबांचा ठेवा कोठे आहे, त्याच्या शोधार्थ निघाले. त्यापूर्वी त्यांनी लग्न केले व घराची सर्व व्यवस्था-बायकांवर टाकली.

ते धर्मपुरीला आले तर तेथे कोणताही डोंगरच नव्हता. मग रत्नगिरीची गोष्ट सांगून वडिलांनी आपल्याला फसवले वाटते, असे वाटून त्यांना फार राग आला.

ते आपल्या गावी जाऊन खोटे सांगून फसविल्याबद्दल बापावर रागावले.

खोटे नाही बोललो. तुमची आताची स्थिती पाहून तुम्हांला ठेवा सापडल्यासारखाच तर दिसतो आहे!"

"हे आम्ही स्वकष्टाने मिळविलेले धन आहे!" असे सांगून दोघांनी त्यांना मिळालेला अनुभव थोडक्यात सांगितला.

"मग काय, ठेवा तुमच्यातच आहे तर! तुम्ही कोणाच्या आधारावर राहण्याची गरजच काय? स्वत:च्या मेहनतीने वाटेल तेवढा पैसा मिळतो. तुम्हांला हे कळावे यासाठीच मी ठेव्याची गोष्ट सांगितली होती. हा ठेवा असला की इतर ठेव्याची गरजच राहणार नाही!". बापाने त्यांना खरे ते सांगून त्यांना स्वत:च्या पायावर उभे केले.

मुलांनी वडिलांचे पाय धरून त्यांची क्षमा मागितली व वडिलांच्या सांगण्या-प्रमाणे मेहनत करून पुढील आयुष्य घालविले





# देवी भागवत

कोशल देशाची राजधानी अयोध्या येथे ध्रुवसंधी नावाचा राजा राज्य करीत होता. त्याला दोन बायका होत्या. मोठीचे नाव मनोरमा व धाकटीचे नाव लीलावती होते. मनोरमेला सुदर्शन नावाचा व लीला-वतीला शत्रुजित नावाचा मुलगा होता. दोघां मुलात सुदर्शन एका महिन्याने मोठा होता. शत्रुजित रूपवान होता व बुद्धिमानही होता. तो बापाचा, मंत्र्यांचा, नोकरा-चाकरांचा सर्वांचा लाडका होता. प्रजेला देखील तोच जास्त आवडे.

एकदा ध्रुवसंधी शिकारीला गेला असता अकस्मात एका झाडीतून एक सिंह बाहेर आला व त्याने ध्रुवसंधीवर उडी मारली. ध्रुवसंधी सामान्य पराक्रमी नव्हता. त्याने सिंहाला जेरीस आणले व त्याला ठार केले. परंतु तोही थोड्या वेळाने मरण पावला. राजाबरोबर जे सैनिक गेले होते त्यांनी अयोध्येला जाऊन मंत्र्याला सर्व वृत्त निवेदन केले. सर्व मंत्र्यांनी मिळून राजाची अन्त्येष्टी केली आणि सुदर्शनला गादीवर बसविण्या-साठी राज्याभिषेकाची सर्व तयारी केली. सर्वांस ती गोष्ट मान्यच होती.

कलिंग देशाचा राजा वीरसेन, म्हणजे मनोरमेचे बाबा व सुदर्शनचे आजोबा जावई गेल्याचे वृत्त ऐकून चौकशीसाठी अयोध्येला आले. नातवाच्या राज्याभिषेकाचा उत्सव पाहण्याचीही इच्छा त्यांना होतीच. त्याच प्रमाणे उज्जैनीहून शत्रुजितचे आजोबा व लिलावतीचे वडील युधाजित सुद्धा आले.



दोघां आजोबांनी आल्यावर आपापल्या नातवाच्या हिताचा विचार करून मंत्र्यांशी बोलणी सुरू केली.

त्यावेळी युधाजित वीरसेनाला म्हणाला—"तुमचा नातू माझ्या नातवाहून थोडा मोठा असेल! परंतु माझा नातू तुमच्या नातवापेक्षा इतर बाबतीत वरचढ आहे. वयाने मोठा असला म्हणून काय झाले? गुणाने कोण मोठा आहे, हे महत्वाचे आहे. म्हणून माझा नातूच गादीला योग्य आहे."

वीरसेन म्हणाला—"त्यात काही अर्थ आहे का? माझी मुलगी मनोरमा राजाची पट्टराणी होती. तिच्या पोटी जन्मलेला मुलगाच गादीला वारस आहे. वडील

कोणत्या नियमाप्रमाणे मिळणार?"

तेव्हां युधाजित मंत्र्यांना म्हणाला—"तुम्ही सर्वांनी एकत्र होऊन सुदर्शनाला गादीवर बसविलेत तर माझा नातू दोन्ही हात जोडून त्याच्यासमोर नोकरासारखा उभा राहील, असे वाटतं आहे का तुम्हांला? त्याला बुद्धि आहे आणि त्याच्या अंगात शक्तीही आहे. मीसुद्धा त्याच्या बाजूला उभा आहे. तो गादीवर बसेल. पाहतो तुम्ही काय करतां ते! जो आडवा येईल त्याला मी कापून काढीन, लक्षात असू द्या!"

दोघां आजोबांचे भांडणच झाले. ऐकणाऱ्याला कंटाळा आला. ध्रुवसंधी मेल्याची बातमी कळल्यावर शृंगवेरपूरच्या जंगलातील रानटी जातीचे लोक राजधानीवर चालून आले. ते एका ओढ्याच्या पलीकडे पोचले असतां युधाजित व वीरसेन दोघांचे परस्परांशी युद्ध सुरू झाले. या युद्धात युधाजितने वीरसेनाचा पराभव केला व त्याला ठार केले. वडील वारल्याने मनोरमेला फार दुःख झाले. पतीच्या निधनाने तिच्यावर आकाशच कोसळले होते. आतां वडील वारल्याचे दुख, मुलगा फार लहान होता. त्याला परिस्थितीची कल्पना येणेच शक्य नव्हते. आतां आपल्याला कोण विचारणार? आपल्या वडिलांचा वध युधाजितने केला.

तो सुदर्शनचा वध करायला मागेपुढे पाहणार नाही. आपल्या नातवाला गादीवर बसविणे हाच हट्ट त्याच्या मनात आहे. लीलावती येऊन जाऊन सवतच. ती आपल्याला किंवा सुदर्शनला सुखाने चार घास जेवू देणार नाही. सर्व आयुष्य तुरुंगात काढावे लागेल. मंत्री सुदर्शनला वारस मानून त्याच्या राज्याभिषेकाची तयारी करीत होते खरे, परंतु आतां त्यांना युधाजितच्या म्हणण्याप्रमाणेच बागावे लागेल. आपल्याला कोण आधार?

असा विचार करून मनोरमेने विदुल्ल नावाच्या मंत्र्याला एकांतात भेटून, त्या परिस्थितील तिने काय करावे या गोष्टीचा सल्ला त्याला विचारला.

विदुल्ल तिला म्हणाला—"आई! मी खरं सांगू का? तुम्ही किंवा तुमच्या मुलाने येथे राजधानीत राहणे धोक्याचे आहे. काशीचा राजा सुबाहू हा माझा मामा आहे. तो मोठा पराक्रमी व बलिष्ठ आहे. तो आपलं रक्षण करू शकेल. आपण त्याच्याकडे जाऊ या."

मनोरमा त्या गोष्टीस कबूल झाली. आपल्या वडिलांचं श्राद्ध तर्पण वगैरे करवून ती मुलाला व सैरंध्री नामक दासीला बरोबर घेऊन विदुल्लाबरोबर काशी नगरीला निघाली. दुर्दैवाने त्या दिवशी रात्री त्यांना



वाटेत चोरांनी लुटले. अंगावरच्या कपड्यानिशी चोरांनी त्यांना सोडले, हेच त्यांचे नशीब. दुसऱ्या दिवशी ती नावेत बसून गंगापार भरद्वाज मुनींच्या आश्रमात गेली.

भरद्वाजांनी तिला विचारले—"कोण ग बाई तू? कोठून आलीस? तुझ्यावर फार मोठे संकट आल्यासारखे तुझ्या चेहऱ्यावरून दिसत आहे. असे काय कारण झाले?"

ती उत्तर द्यायच्या ऐवजी रडूच लागली. तेव्हां विदुल्लने मुनिवर्यांना ध्रुवसंधीच्या मृत्यूपासूनची सर्व माहिती सांगितली. सर्व वृत्तांत ऐकून घेतल्यावर भारद्वाज मनोरमेला म्हणाले—"मुली! तुला कोणतेही भय असण्याचे कारण नाही. तुझा हा मुलगा



लहान असला तरी पुढे हाच राजा होणार. तू माझ्या अ ात निश्चितपणे रहा." नंतर मुनीश्वरांनी दाखविलेल्या कुटीरात ती, विदुल्ल, सुदर्शन व सैरंध्री राहू लागले.

तिकडे अयोध्येला शत्रुजिताचा राज्याभिषेक मोठ्या थाटामाटाने झाला. मनोरमा व सुदर्शन कोठे निघून गेले प्रजेला किंवा कोणालाच काही कळले नाही. परंतु शत्रुजिताचा आजा, युधाजित याला मनोरमा व सुदर्शन भरद्वाज मुनींच्या आश्रमात असल्याचे कळले. शत्रूचा अवशेषही राहता कामा नये या न्यायप्रमाणे त्याने सुदर्शनाचा वध करण्याचे ठरविले. तो चित्रकूट पर्वतावर गेला आणि निषादांचा राजा बल यालाबरोबर घेऊन शृंगवेरपुराचा राजा दुर्धर्ष याच्याकडे गेला.

मनोरमेला ती गोष्ट कळली. ती घाबरून जाऊन भरद्वाजांकडे धावली व तिच्यावर येऊ घातलेल्या संकटाची त्यांना कल्पना करून दिली. भरद्वाज मुनींनी आपल्या आश्रमाबाहेर युधाजित आला होता त्याला भेटून विचारले–"कशाला रे आला आहेस?"

"मनोरमेसाठी!" युधाजित म्हणाला.

"पती व पिता दोघांनी स्वर्गलोकी प्रयाण केल्यावर त्या दु:खाने आपल्या मुलाला बरोबर घेऊन बेचारी येथे आश्रयाला आली आहे. ती आतां येथून परत जायला कशी तयार होईल?" भरद्वाजांनी विचारले.

"तुम्ही बऱ्या बोलाने तिला माझ्या बरोबर पाठविणार असाल तर पाठवा. नाहीतर बळजबरीने मी तिला घेऊन जाईन." युधाजित म्हणाला.

भरद्वाज मुनींना राग आला. म्हणाले–"मूर्खा, तू तिला बळजबरीने नेणार का? पाहतो मी! आम्ही ऋषी मुनी म्हणजे तुम्हां राजेलोकांना थट्टा वाटली होय?"

तेव्हां युधाजित आपल्या मंत्र्याला एकांतात म्हणाला–"हा मुनी म्हणाला ते ऐकलेत ना? मनोरमेला व तिच्या मुलाला घेऊन जायला काही मार्ग काढलाच पाहिजे. सुदर्शनाचा वध केल्याशिवाय माझ्या नातवाचे










राज्य निर्विघ्न चालणार नाही. आतां माझ्या विरुद्ध उभे रहायची कोणाची छाती आहे? मुनी म्हणतो आहे ते ऐकून आपण भिऊन जाऊन स्वस्थ बसायचे काय?"

मंत्री म्हणाला–"असे एकेरीला येऊन काही करणे हिताचे नाही. मुनी शक्तिशाली असतात. मागे नाहीं का वसिष्ठांशी वैर करून विश्वामित्राला पराभव सहन करावा लागला? त्या एका धसक्याने विश्वामित्राने राज्यच करण्याचे सोडले आणि तपोबल संपादन करण्यासाठी तपश्चर्या करून ऋषी झाला. शिवाय सुदर्शनची आतां तरी दीन अवस्था आहे. त्याच्याजवळ पैसा नाही.

युद्ध करण्याचे धाडस कसे काय करील? आलाच तर पाहून घेऊ. मला तर असं वाटतं आहे की या मुनीच्या वाटेला जाऊ नये."

मंत्र्याचा सल्ला मानून युधाजिताने भरद्वाज मुनींना भेटून त्यांची क्षमा मागितली व त्यांचा निरोप घेऊन आपल्या घरी निघून गेला.

त्यानंतर मनोरमा निश्चितपणे आश्रमात राहू लागली. सुदर्शन हळूहळू मोठा झाला. त्याला अकरावे वर्ष लागले व तो मुनींजवळ वेदाभ्यास करू लागला. त्याचप्रमाणे त्याने सर्व शास्त्रे व धनुर्विद्या शिकून घेतली. एके दिवशी महादेवीने सुदर्शनाला स्वप्नात दर्शन देऊन त्याला अस्त्रविद्या दिली.

त्याच सुमारास काशी राजाची कन्या शशिकला हिच्या रूप लावण्याची गोष्ट सुदर्शनला कळली आणि त्याने तिच्याशीच लग्न करण्याचे ठरविले. त्याचप्रमाणे शशिकलेने भरद्वाजांच्या आश्रमात सुदर्शन रहात असल्याचे व तो रूपगुणसंपन्न असल्याचे ऐकले व त्याला मनाने वरले.

भरद्वाज आश्रमात सुदर्शन दिवसां शशिकेलेच्या विषयीच विचार करीत राहायचा आणि रात्री त्याला तिच्या विषयीच स्वप्ने पडायची. अशा परिस्थितीत त्याच्याकडे शृंगवेरपुरचा राजा निषाद

चार घोड्यांचा एक सुंदर रथ व त्याच्या वरचा ध्वज आणि त्याने त्याच्या वरची सर्व अस्त्रे भेट भेट म्हणून दिली.

त्याच वेळी भरद्वाज आश्रमातील मुनी सुदर्शनला म्हणाले–"तू लौकरच राजा होणार आहेस! तुझ्यावर महादेवीचा वरदहस्त आहे. तो कधी वृथा जाणेच शक्य नाही." नंतर ते मनारमेला म्हणाले–"आई! तुम्ही वीर माता आहां! तुमचे चिरंजीव लौकरच राजपद प्राप्त करणार आहेत."

"तुमच्या तोंडात साखर पडो, तसेच होवो! एक जणही त्याच्या मदतीला नसताना तो राजा कसा काय होणार? काही असो तुमच्या तोंडून निघालेले वाक्य कधीं खोटे होणार नाही. तुमचा आशीर्वादच त्याला सर्वांत मोठी मदत आहे!" मनोरमा असे म्हणाली. तिचे हृदय आनंदाने उचंबळून आले.

सुदर्शन आपल्या रथात बसून कोठेही गेला तरी त्याच्या चारीबाजूला एक अक्षौहिणी सेना असल्यासारखे भासे. सुदर्शनला मनाने वरल्यापासून शशिकला भूक, तहान, झोप विसरून गेल्यामुळे अशक्त झाली. तिच्या मनाला होत असलेल्या तापाची थोडी कल्पना तिचेवडील सुबाहू यांना होती. त्यांनी स्वयंवराचा मुहूर्त ठरवून सर्व राजांकडे संदेश पाठविले.



स्वयंवरे तीन प्रकारची असतात: पण लावून होते ते पहिल्या प्रकारचे स्वयंवर धन किंवा शुल्क ठरवून होते ते दुसऱ्या तऱ्हेचे स्वयंवर आणि स्वतःच्या इच्छेने होते ते तिसऱ्या प्रकारचे स्वयंवर. रामाने धनुर्भंग केल्यावर सीतेने त्याला वरले ते पहिल्या प्रकारचे स्वयंवर होते. सुबाहूने मुलीसाठी रचले होते ते तिसऱ्या प्रकारचे स्वयंवर होते. स्वयंवराची बातमी कळतांच नांना देशांचे राजे व राजकुमार काशी नगरीला येऊन दाखल झाले.

कोणकोण राजकुमार आले आहेत हे सखींकडून शशिकलेला कळत होते. तिचे डोळे भरून आले व ती आपल्या सखींना

म्हणाली–"हे सर्व कशाला आले आहेत? मी सुदर्शनला सोडून आणखी कोणाला कशी वरमाळा घालणार? धन आणि राज्ये ही घेऊन काय जाळायची आहेत? लग्न करायचे तर प्रज्ञावंताशी आणि गुणवंताशीच करायचे. सर्व गुण फक्त सुदर्शनातच आहेत."

तिच्या एका सखीने ती गोष्ट राणीला जाऊन सांगितली. म्हणाली–"आपल्या शशिकलेने सुदर्शनला मनाने वरले आहे. तो भरद्वाज आश्रमात राहतो आहे, असे कळते."

राणीने ती गोष्ट पतीच्या कानावर घातली. ते ऐकून राजा तिला म्हणाला–"त्याच्याविषयी मला सर्व माहीत आहे. तो राज्यभ्रष्ट होऊन खायला प्यायला मिळेनासे झाले तेव्हां आईबरोबर रानात मुनीच्या आश्रमात राहातो आहे. त्याला मुलीला मी कसा काय देऊ म्हणतेस? भाग्यवान सहस्रावधी इतर आहेत. मुलीचे मन बदलण्याचा तू प्रयत्न करून पहा."

राणी होकार देऊन शशिकलेकडे गेली व तिला गोडगोड शब्दात समजाऊन सांगू [illegible] म्हणतेस तो रानात कंदमुळे खाऊन रहात आहे. त्याला कोणी नातेवाईक नाहीत की इतर कोणी मदतीला येण्याची शक्यता नाही. धनवैभव नाही, राज्य नाही असा एक दुर्दैवी माणूस आहे तो. तुझ्याशी लग्न करण्यासाठी मोठमोठे राजकुमार आले आहेत. त्या सुदर्शनाचा एक धाकटा भाऊच आला आहे. तो रूपवान आहे, शूर व पराक्रमी आहे आणि शिवाय राज्य करतो आहे. त्याचे नाव शत्रुजित असे आहे. तुला अगदी योग्य असाच वर आहे. याच्यासाठीच नाही का याच्या आजाने कलिंग देशाचा राजा व सुदर्शनचा आजा वीरसेन याचा वध केला? ते राहू दे. त्याहून जास्त भयंकर गोष्ट ही की युधाजितला संधी मिळाली की तो सुदर्शनचा वध करणार! याच भीतीने तर तो भरद्वाज मुनींच्या आश्रमात जाऊन राहातो आहे? तुझे बाबा कोणत्याही परिस्थितीत तुझे लग्न सुदर्शनशी करून द्यायला तयार होणार नाहीत. म्हणून तू तो विचार सोडून दे!"





# सुनबाई आली

गोविंदरावांच्या मनात त्यांचा मुलगा सुधाकर याचे लग्न करून द्यावे असे होते. परंतु सुधाकर लहानपणी उडाण-टप्पूच होता. लहान मोठ्या चोऱ्या ही तो करू लागला होता. मग ओळखीच्या लोकां पैकी त्याला आपली मुलगी कोण देणार? गोविंदरावांना मुलाचे लग्न होण्याची शक्यता दिसली नाही, तेव्हां चिडून जाऊन ते मुलाला म्हणाले–"तुझं लग्न करून देणे माझ्या शक्तीबाहेर आहे. तुझ्यामुळे लोकांना तोंड दाखविणे सुद्धा अशक्य होऊ लागले आहे. तू माझ्या घरातून चालता हो. तू लग्न करून आलास तरच मी तुला घरात पाऊल टाकू देईन."

सुधाकर घर सोडून दुसऱ्या गावी गेला. चोरी हा एकच धंदा त्याला येत होता. तो एका घरात शिरला. ते घर द्वारकाबाईंचे होते. पती गेल्यापासून द्वारकाबाईंना त्यांची मुलगी गौरी हिचे लग्न कसे होईल, याचीच चिंता वाटे, मुलीला चांगलेसे स्थळ मिळावे असे त्यांना वाटे. त्यासाठी त्या गोवऱ्या थापून, दुधाचे रतीब लावून चार पैसे जमवू लागल्या. चार दागिने सुद्धा त्यांनी मुलीसाठी करून ठेवले. सर्व पैसे आणि दागिने त्यांनी एका पेटीत जपून ठेवून दिले. सुधाकरला ती गोष्ट कळली. त्याने सर्व दागिने व पैसे चोरले आणि गावा बाहेर डोंगरावर एक देऊळ होते त्याच्या समोर एक खड्डा खणून त्यात पुरून ठेवले आणि तो स्वत: एका साधूचे सोंग करून तेथे राहू लागला.

दुसऱ्या दिवशी गौरीला तिच्या आईने बाजारात फुले विकायला पाठविले. त्या गावात मुरलीधर नावाचा एक दांडग्या होता. त्याची नजर गौरीवर होती. त्याने कित्येकदां द्वारकाबाईंना धमक्या सुद्धा



दिल्या होत्या. परंतु द्वारकाबाईंनी त्याच्या धमक्यांकडे दुर्लक्षच केले. तो काय वाटेल ते करून गौरीला आपली बायको करून घ्यायची संधी पहात होता.

संध्याकाळी गौरी बाजारातून एकटी घरी परत येत होती. मुरलीधरला ती संधी मिळाली, त्याने दोघां तिघां मित्रांच्या मदतीने गौरीला उचलून डोंगरावरच्या देवळात नेले. गौरी रडत ओरडत असूनही मुरलीधर बळजबरीने तिच्या गळयात मंगळसूत्र बांधण्याच्या खटपटीत होता.

साधूचे सोंग करून देवळात सुधाकर बसला होता. तो हातात एक सोटा घेऊन दरडावून विचारू लागला—"हे काय चालले आहे?"

मुरलीधरने दरडावून विचारले—"तू कोण रे आला आहेस तोंड खुपसायला?"

सुधाकर लक्षपूर्वक त्याच्या चेहऱ्याकडे न्याहाळून पहात आश्चर्यचकित झाल्याचा अभिनय करीत म्हणाला—"तुझं नशीब बलवत्तर आहे रे! लक्ष्मी तुझ्या पायाखाली वर लोळू लागली आहे."

"तुझं डोकं! हो बाजूला!" मुरलीधर दटावून म्हणाला.

"अरे वेड्या! मी तुझी थट्टा करतो आहे असे वाटलं का तुला? तू उभा आहेस तेथली पाया खालची जमीन खणून तर पहा!" सुधाकर गंभीरपणाचा आव आणून म्हणाला.

मुरलीधरने पायाखालची जमीन खणून पाहिली. सुधाकरने जमिनीत पुरून ठेवलेले दागिने व पैसे तेथे होते, ते मुरलीधरला सापडले. त्याने ते सर्व दागिने व पैसे खिशात टाकले व हात जोडून सुधाकरला म्हणाला—"तुम्ही कोणीतरी थोर पुरुष दिसतां आहां!"

त्यानंतर सुधाकरने नाक मुरडून विचारले—"ही दुर्दैवी मुलगी कोण?"

मुरलीधरने चकित होऊन विचारले—"साधूबुवा! आपण असे कां म्हणालात!"

"या मुलीची जन्मकुंडली पाहिल्याशिवाय तू लग्न करतो आहेस. अरे, हिच्याशी जो लग्न करील त्याला तिसऱ्या दिवशी इहलोकाची यात्रा संपवावी लागेल." सुधाकर म्हणाला.

ते ऐकून मुरलीधरच्या सर्व अंगाचा थरकाप उडाला. गौरीशी लग्नाचा विचार त्याने सोडला. त्याने तिला घरी निघून जायला सांगितले. दुसऱ्या दिवशी सुधाकर गौरीच्या घरी गेला. तेव्हां द्वारकाबाई घरी नव्हत्या. गौरीने त्याला नमस्कार करून घरात बोलावून नेले.

सुधाकरने तिला विचारले—"तुमच्या घरी परवां चोरी झाली, ती गोष्ट तुला माहीत आहे का? आणि काल मुरलीधरला जे दागिने व पैसे मिळाले ते तुमचेच होते ही गोष्ट तरी तुला माहीत आहे का?"

"मला काही माहीत नाही!" ती चकित होऊन म्हणाली.

सुधाकरने आपले साधूचे सोंग काढून फेकून दिले व स्वतःची खरी ओळख सांगून त्यानेच चोरी केली असल्याचेही सांगितले.

गौरी म्हणाली—"तू चोरी करायची सोडायला तयार असलास तर मी तुझ्याशी लग्न करीन."

सुधाकरने गौरीसमोर आजन्म चोरी करणार नाही, अशी शपथ घेतली.

द्वारकाबाईंना मुलीकडून चोरीची गोष्ट कळतांच त्यांनी गावच्या पोलीस पाटलाला सांगून मुरलीधरच्या घरातून सर्व दागिने व पैसे परत मिळविले. मुरलीधरला दंड झाला व तुरुंगात शिक्षा भोगावी लागली.

त्यानंतर सुधाकर व गौरीचे लग्न झाले. तिला घेऊन तो आपल्या गावी परतला आणि दार वाजवून म्हणाला—"बाबा! मी सुधाकर, दार उघडा."

बाप आतून ओरडून म्हणाला—"मी नाही उघडीत, बायकोला घेऊन आलास तरच घरात पाऊल टाकू देईन."

"अहो बाबा! तुमच्या सूनबाईला घेऊन आलो आहे!" सुधाकर म्हणाला.

गोविंदरावांनी लगेच दार उघडले व मुलाला व सुनेला प्रेमाने घरात घेऊन गेले.





# रूपकुमारीचे लग्न

माधपूरची राजकन्या रूपकुमारी जेव्हां लग्नाला योग्य झाली तेव्हां तिच्या रूपलावण्याची गोष्ट ऐकून राजरजवाड्यां-कडून तिला मागण्या येऊ लागल्या. परंतु रूपकुमारीच्या पित्याच्या मनात मुलीचे लग्न मणिपूरचे महाराज श्रीकुमार यांना आपले जामात करून घ्यावयाचे होते. स्वतःच्या राज्याशिवाय त्यांचे आजोबा, म्हणजे आईचे वडील वारल्यावर त्यांचे राज्य 'माना' हेही त्यांना मिळणार होते.

परंतु श्रीकुमार महाराजात एक अवगुण आहे, असे रूपकुमारीला वाटे, ते रंगाने काळे होते. परंतु जन्मतः ते काळे नव्हते. त्यांना शिकारीला गेले असतां एक साप चावला त्यावेळी ते वाचले खरे, परंतु त्यांच्या रक्तात सापाचे विष इतके भिनले की त्यांचा रंगच काळा झाला. हळहळ तो काळा रंग जाईल व पुन्हां गौर कांती येईल असे वैद्य सांगत.

राजकुमारीला काळा रंग मुळीच आवडत नसे. तरी प्रधान धीमान यांनी राजकन्येच्या मनात बदल आणून महा-राजांच्या मनासारखा लग्न संबंध जुळवून आणायचे ठरविले.

राजकन्येने साफ सांगून टाकले—"मी काळ्या व्यक्तीशी लग्न करणार नाही. मला मुलं होतील ती काळी होतील.'

"मुली! काळी मुलं, मुलं नसतात का ग? माणसाला पाहिजे चांगला स्वभाव. रंगात काय ठेवले आहे? रंग हा डोळ्यांचा एक भ्रम आहे. हा भ्रमही नाहीसा होतो. मी तुला एक चित्र दाखवितो." प्रधान धीमान तिची समजूत घालीत म्हणाला.

प्रधानाने टाळी वाजविली आणि एका नोकर एका मोठे ताट टेबलावर आणून ठेवले. त्यावर एक रुमाल टाकलेला होता. दुसऱ्या बाजूने राजा व राणी दोघांनी खोलीत पाऊल टाकले.

राजकन्येने चकित होऊन विचारले—"प्रधान, हे सर्व काय आहे?"

प्रधानाने ताटावरचे वस्त्र काढले व म्हणाले—"मुली! ही तुझ्या दृष्टीची परीक्षा आहे. या ताटात ठेवलेल्या काचेच्या ग्लासात दरबारी जादुगार सोमनाथाने मंत्रवलेले पाणी ठेवले आहे. या पाण्यात चमचे ठेवलेले आहेत. तुला जो चमचा कमी पॉलिशचा मंद रंगाचा वाटत असेल तो तू उचल.

ग्लासात ठेवलेल्या चमच्यांपैकी एक लकाकत होता तर एक अगदी मंद रंगाचा होता. रूपकुमारीने मंद रंगाचा चमचा बाहेर काढला.

"आतां तू लकाकणारा चमचा काढ" प्रधान धीमान म्हणाला.

रूपकुमारीने दुसरा चमचा काढला व चकित होऊन पहात राहिली. तो धुळकट रंगाचा व काळसर होता. धीमानने सांगि-तल्यावरून रूपकुमारीने तो पुन्हा पाण्यात बुडविला. तत्क्षण तो लकाकू लागला. चांदीपेक्षा जास्त त्याची लकाकी होती.

धीमान राजकुमारीला समजावून सांगू लागला—"मुली! तू पाहिलेस ना? गडद काळ्या रंगाच्या वस्तू चकाकू लागलात. रंग हा केवळ दृष्टीचा भ्रम आहे. श्रीकुमार मध्ये सुद्धां तेजस्विता आहे. मी सर्व गोष्टींची चवकशी केली आहे. त्याच्याहून जास्त चांगला पती तुला कोठे मिळणेच शक्य नाही."

त्यानंतर राजकन्या श्रीकुमारशी लग्न करण्यास तयार झाली. वैद्यांनी सांगितल्या-प्रमाणे लौकरच श्रीकुमारचा काळा रंग कमी होत गेला आणि त्याचा गोरा रंग पहिल्यासारखा झाला.

काळ्या रंगाचा चमचा पांढरा दिसला त्यात जादू कोणती आहे? काही नाही; काजळ लावलेला चमचा पाण्यात अदभुत प्रकारे चकाकत असतो.





# प्रश्नोत्तरे

**वाय. चंद्रशेखर राव, रूरकेला (ओरिसा)**

प्र. : 'अगस्त्य' याच्या विषयीच्या कथेत इल्वल हा वातापीला बकरा करून. त्याचे मांस शिजवून अतिथी म्हणून आलेल्या ब्राह्मणांना वाडी असे तुम्ही लिहिलेत, याचा अर्थ प्राचीन काळात ब्राह्मण बकऱ्याचे मांस खात असत असाच नाही का?

उ. : होय. वेदकाळातील आर्य १३ प्रकारचे प्राणी यज्ञपशू म्हणून मानीत. त्यांत गाय एक होती. परंतु वेदकाळ संपण्यापूर्वीच गोवध निषेध अमलात आला. ब्राह्मणांनी मांसाहार सोडला त्याला कारण जैन मताचा प्रभाव असण्याची शक्यता आहे. बौद्ध अहिंसेचे पुरस्कर्ते. तरी त्यांच्यापैकी एका शाखेने मांसाहार सोडला नाही. अनावर भुकेने ब्राह्मण युवकांनी गोमांस खाल्लयाची कथा कथा-सरित्सागरात आहे.

**बी. एल. श्रीनिवास, वरंगल (आंध्र)**

प्र. : रामायण व महाभारत ह्यांतील कथा केवळ कवि कल्पितच आहेत का? की प्रत्यक्ष घडलेल्या? घडलेल्या असतील तर या दोन्हींपैकी प्रथम कोणती घडली?

उ. : रामायण व महाभारत वीरगाथा रूपेच गायिली जात, ती पारंपरिक कथा म्हणूनच त्यामुळे प्रांताप्रांतात कविकल्पनेप्रमाणे निरनिराळ्या स्वरूपात संग्रहित झाली. त्यानंतर त्यांना लिखित रूप प्राप्त झाले. रामायणांत निरनिराळ्या कथा येण्याचे आणि महाभारतात मूळकथेशी संबंध नसलेल्या उपाख्यानांचा समावेशहोण्याचे हेच कारण होय.

वीरगाथा पूर्णपणे काल्पनिक नसतात. त्यांचा आधार कोणतीतरी वास्तविक घटनाच असते. ती घटना रंजविणारी व्हावी यासाठी कवी व गायक त्यांत काल्पनिक गोष्टी भरतात. काही काळ लोटल्यावर मूळकथा मागे पडून काल्पनिक कथांनाच प्रामुख्य मिळते. रामायणातला राम आणि महाभारतातला कृष्ण अवतारपुरुष झाले. रामायणातला राम प्रत्यक्ष होता की नाही हे सांगता येत नाही. तरी भारतातील कृष्ण (देवकीनंदन वासुदेव) हा उपनिषदात आहे. त्याचप्रमाणे रामायणातल्या सीतेचा पिता म्हणून मानला गेलेला जनकही उपनिषदात आहे. तो सीतेचा पिता



# अघटित अनपेक्षित

## [७२]

### प्रामाणिक मुंगूस

देवशर्मा नावाच्या एका गरीब ब्राह्मणाला पुष्कळ उशिरां एक मुलगा झाला. मुलाचे तोंड पाहिल्याबरोबर त्या जोडप्याला परमानंद झाला. सर्वांगाला चंदन लावलं तरी त्यापेक्षा मुलाच्या अंगाचा स्पर्श झाला तर मनाला जो गारवा वाटतो तो अपूर्वच असतो. मुलासाठी, भावंडाशी, आईवडिलांशी किंवा प्रत्यक्ष अन्नदात्याशी भांडायला आई-बाप मागेपुढे पहात नाहीत ही गोष्ट सर्वांच्या परिचयाचीच आहे.

देवशर्मा दंपतीने मुलगा झाला नव्हता तोंपर्यंत घरात एक मुंगूस पाळलेले होते. ते मनाला वाटेल तेव्हां वाटेल तसे घरात चहूकडे हिंडे फिरे. तोंपर्यंत त्या मुंगुसाला ते जोडपे स्वतःच्या मुलासारखे पाही. परंतु मुलगा झाल्यावर त्या मुंगुसाचा मुलाला काही अपाय तर होणार नाहींना, अशी त्यांना शंका वाटू लागली. मुलावरच्या अपार प्रेमामुळेच ही शंका त्यांच्या मनात उद्‌भवली होती, हे सांगायला नकोच.

मुलगा झाल्यावर दहाव्या दिवशी मुलाची आई तान्ह्या मुलाला घरांत ठेवून नदीवर नहायला गेली. जातांना ती नवऱ्याला बजावून गेली—"मी आंघोळीला जाते आहे, मुलावर चांगलं लक्ष ठेवा, बरं का?"

ती गेल्यावर काही वेळाने राणीची एक दासी येऊन ब्राह्मणाला म्हणाली—"राणी-सरकारांनी शिधा दक्षिणा तयार ठेवला आहे, येऊन घेऊन जा, म्हणून सांगायला सांगितले आहे."

राणीसरकारांनी दाखविलेल्या अनुग्रहाला बळी पडून ब्राह्मण आपले मूल आणि घर मुंगुसावर सोडून लगेच निघाला.



तो गेल्यावर थोड्याच वेळाने भितीतल्या भोकातून एक साप सरसर पुढे आला आणि मुलगा निजला होता त्या बाजूला निघाला. मुंगुसाचे सापाशी हाडवैर असल्याकारणाने मुंगुसाने सापाला धरले व त्याची खांडकी करून त्याला ठार केले.

इतक्यात मुंगुसाने ब्राह्मणाला परत येतांना पाहिले आणि आपण काही मोठे काम केले हे दाखविण्यासाठी मोठ्या उत्साहाने, रक्ताने माखलेल्या तोंडाने दारापर्यंत गेला. ब्राह्मणाने मुंगुसाच्या तोंडावर रक्त पाहिले व त्याला संशय आला की मुंगुसाने मुलाला ठार केले असावे. असा विचार करून त्याने मागचा

दांडक्याने ठार केले.

परंतु घरात गेल्यावर त्याला मुलगा शांतपणे झोपलेला व सापाचे तुकडे पडलेले दृष्टीस पडले.

"बाप रे! मी केवढा मूर्खपणा केला? मी पापी आहे! माझ्या मुलाला वाचविणाऱ्या मुंगुसालाच मी आपल्या हातांनी ठार केले." तो स्वतःला आवरू शकला नाही आणि स्वतःचे डोके आपटून जमिनीवर लोळू लागला.

त्याच वेळी त्याची बायको नदीवरून परतली व तिने तसे करण्याचे कारण विचारले. ब्राह्मणाने घडलेले वृत्त सांगितले. तेव्हां त्याची बायको त्याला म्हणाली– "तुम्ही लोभाला बळी पडून मुलाला एकट्याला सोडून निघून गेलात, आणि अविचाराने मुलाला वाचविणाऱ्या मुक्या प्राण्याचा जीव घेतलात! माणसात आशा कामना असणे साहजिक आहे, परंतु लोभ असू नये. लोभी लालची माणसाच्या डोक्यावर कपाळावरचे चक्र नव्हते का फिरले?

"ती कोणती गोष्ट?" ब्राह्मणाने विचारले व त्याची बायको सांगू लागली.

## लालची लोभी

एका गावात अल्प लोभी, मित लोभी, अति लोभी आणि अत्यंत लोभी नावाचे



आपसात गाढ मैत्री होती. ते सर्व गरीबच होते. एकदां जेव्हां चारही तरुण एका जागी एकत्र जमले तेव्हां अत्यंत लोभी इतर मित्रांना म्हणाला.

"मित्र हो! गरिबी पेक्षा दुसरा मोठा शाप नाही व अपमानास्पद गोष्ट ही नाही. भाऊबंद आणि नातेवाइकांमध्ये राहून गरीबीत दिवस काढण्यापेक्षा हिंस्र रानटी जनावरांबरोबर जंगलांत आणि कांटेरी रानात राहणे पत्करले. अत्यंत विश्वासपात्र नोकराशी सुद्धा त्याचा मालक अगदी नीचपणाने वागतो. इतरत्र सज्जन म्हणविणारे नातेवाईक देखील गरीब व्यक्तीशी निर्दयपणाने आणि अपमानास्पद वागतात. गरिबाच्या चांगल्या गुणांना किंमत नसते. मुलेसुद्धा त्यांना सोडून देतात. बायकोसुद्धां त्यांची परवा करीत नाही. मित्र त्यांच्याकडे वळूनसुद्धा पहात नाहीत. या जगातला नियमच असा काही विचित्र आहे की साहस, सौंदर्य, वाक्चातुर्य, चमत्कार, ज्ञान, विद्या, युद्धकौशल्य इत्यादी चांगले गुण असूनही जर थोडे फार धन आणि दौलत नसेल तर मानवाला प्रतिष्ठा व मान मिळत नाहीत. धन असेल तरच अशा गुणांचा उपयोग होतो व जगावर जय मिळविता येतो. त्याशिवाय हे सर्व व्यर्थ आहे.



म्हणून आपण देशाटन करून धनार्जन करू या."

बाकी मित्रांनी तो म्हणाला त्याला दुजोरा दिला. नंतर चौघे मित्र धनार्जन करण्यासाठी आपल्या गावाहून निघाले. एक वेळ पोटाला मिळणारा माणूस आपल्या बंधुबांधवांना, आईबाप व गाव सोडून देशभर भटकत फिरला नाही तर त्याशिवाय त्याला करता येण्यासारखे काय आहे?

काही दिवसांनी ते अवंती राज्यात पोचले. क्षिप्रा नदीत स्नान करून नदी काठावरच्या देवळात त्यांनी महाकाळाचे, म्हणजे शंकराचे दर्शन केले. देवळातून ते बाहेर पडले तेव्हां भैरवानंद नावाचा एक

तांत्रिक साधू त्यांना भेटला. सर्वांनी त्याला नमस्कार केला आणि त्याच्याबरोबर जवळच असलेल्या त्याच्या मठात गेले.

साधूने विचारले–"कोण तुम्ही? कोठून आलात? कोठे जायचं आहे?"

ते म्हणाले–"आम्ही धनाच्या शोधार्थ निघालो आहो. त्यासाठी जीव द्यावा लागला तरी आम्ही तयार आहो. परंतु धनान्वेषणाचे काम मात्र आम्ही सोडणार नाही. आम्ही असे ऐकले आहे की मंत्रबळाने जमिनीत पुरलेले धन किंवा ठेवा कोठे आहे हे कळते. अशा एका मांत्रिकाकडे जाण्याच्या हेतूने आम्ही आलो आहो. साहसी व्यक्तीचे आकाशातून अधःपतन होते, तर दुसरा नरकातून निघून चारही समुद्रांवर अधिकार गाजवितो. उत्थान व पतन यांचे कारण प्रारब्ध नसून प्रयत्नाची उणीव आहे. परिश्रम आणि प्रयत्न यांचे फळ सहजी हाती लागले तर त्याला नशीब म्हणतात. परंतु साहसी अधिकाराची पर्वा करीत नाहीत. त्यांचे ते दुःसाहस उदात्त

कोणतेही सुख लाभत नाही. नारायणाने लक्ष्मीला प्राप्त करण्यासाठी हाताला घट्टे पडेपर्यंत समुद्रमंथन केले होते. जो मेहनत करीत नाही, त्याच्या जवळची संपत्ती त्याच्या पासून पाठ फिरविते. ज्याच्या अंगात शौर्य नाही असा राजा परराज्य कसा जिंकणार? स्वतःचे राज्यसुद्धा तो घालवून बसतो. धन खोल भुयारात असो, नागसाप रक्षणार्थ नेमलेले असोत, भुतांना संतुष्ट करावे लागो, स्मशानांत प्रेतांतले मांस काढून भुतांना विकावे लागो किंवा निधी जेथे आहे ती जागा विझलेल्या मंत्र दीपांवरून सूचित होणाऱ्या असोत, आम्ही त्या सर्वाला तयार आहो. तुम्हांला पाहल्यावर तुमच्या अंगात अतीत शक्ती आहेत, असे आम्हांला वाटले. तुम्ही आम्हांला मदत करा. मदत केलीच पाहिजे. मोठी कामें मोठ्यांच्या हातूनच झाली पाहिजेत. वडवाग्नीचा ताप समुद्रच सहन करू शकतो." चार मित्र त्या साधूला म्हणाले.





# भल्लूक मांत्रिक

[ १२ ]

[दुर्मुख राजाच्या किल्ल्यावर बळजबरीने अधिकार करणाऱ्या सामंताने भल्लूक चांडाळ इत्यादींवर आपल्या सैनिकांना पाठविले. नागमल्लाने सेनापतीला दुर्मुख राजाला कैद करून आणल्याचे सांगितले तेव्हां सामंत चांडाळ भल्लूक होता तेथे आला. राजा दुर्मुख सामंतावर तुटून पडला. सामंत पळू लागला. पुढे–]

सामंत भूपतीने आपला घोडा थांबविला, राजा दुर्मुखाशी द्वंद्वयुद्ध करण्याऐवजी किल्ल्याच्या फाटकाच्या दिशेने घोड्याला पळविले. सेनापतीने त्याचा राजा शत्रूसमोर माघार घेऊन पळत असल्याचे ओळखले. त्यानेसुद्धा आपल्या सैनिकांना माघार घ्यायला सांगितले व स्वतः त्याने आपला घोडा किल्ल्याच्या दिशेने वळविला.

सेनापतीला परत पळून जाण्याच्या प्रयत्नात असलेला पाहून त्याच्या पाठीमागचे दोघे धाडसी सैनिक त्याला म्हणाले–"मालक! आपल्यावर हल्ला करणारे सैनिक दहा जण तर आहेत. म्हणून आपण जुन्या व नव्या महाराजांना आपसात द्वंद्व युद्ध करू द्यावे. दोघेही परस्परांचे गळे कापतील. मध्यंतरी आपण या दहा एक जणांना ठार करू या. त्यानंतर आपल्याशी



युद्ध करणारा कोणी उरणारच नाही. मग आपणच स्वतःला उदयगिरीचे महाराज जाहीर करावे."

त्या दोघां सैनिकांनी म्हटले ते ऐकून सेनापतीच्या मनात राज्याचा लोभ उत्पन्न झाला. त्याने आपला घोडा वळविला आणि हत्तीवर बसलेल्या चांडाळ भल्लूक इत्यादीं-कडे पाहिले. परंतु त्याच वेळी चांडाळ भल्लूक आपला परशू उगारून नागमल्ल, त्याचे अनुयायी आणि दुर्मुखाचा अंगरक्षक या सर्वांना सावध करून मोठ्याने ओरडला– "ऐका रे, राजा दुर्मुख स्वतःचा जीव धोक्यात घालून आपल्या राज्याबरोबर आपले प्राणही घालवत बसणार आहे. आमच्या मदतीशिवाय तो एकट्याने किल्ल्यात शिरून इतक्या शत्रूंच्या हातात सापडून नक्कीच ठार होणार! म्हणून आपण समोर जो कोणी आडवा येईल त्याला ठार करून राजा दुर्मुखाच्या मदतीला वेळीच आत पोचले पाहिजे!"

ते ऐकून उग्रदंड आपली गदा उचलून एका भयंकर आवाजात गरजला– "ए, सामंत सूर्यभूपतीच्या सैनिकांनो! खबरदार! राजा दुर्मुखाच्या केसालाही धक्का लागला तर, लक्षात असू द्या, मी तत्काळ तुम्हां सर्वांची डोकी फोडीन!" असे म्हणत तो लांबलांब पावले टाकीत किल्ल्याच्या फाटकाकडे निघाला.

उग्रदंडाला फाटकाकडे निघालेला पाहून सेनापती आपल्या सैनिकांकडे वळून म्हणाला– "अरे, आपल्याला या राक्षसाशी आणि परशू घेऊन येणाऱ्या अस्वलाशी युद्ध करणे शक्यच नाही. आपला जीव वाचवा-यला किल्ल्याच्यां भिंतीआडच गेले पाहिजे. पाय उचला, आपण किल्ल्यात शिरू या व फाटक बंद करून घेऊ या." असे सांगून त्याने आपला घोडा किल्ल्याच्या दिशेने भरधाव सोडला.

सेनापतीला पळून जातांना पाहून सैनिकांचा धीर खचला. तेसुद्धा पळू लागले. चांडाळ भल्लूक आपल्या सोंड तटलेल्या हत्तीच्या गंडस्थलावर बसलेल्या रानटी शिकारी नोकराला म्हणाला– "माझ्या रानटी प्रिय सेवका! तू आपल्या सवयी-प्रमाणे पक्ष्यांना तीर सोडून मारतोस तसा या पळणाऱ्या सैनिकांना टिपू नकोस! आपण राज्य घालवून बसलेल्या दुर्मुख राजाला काही वेळ का होईना, सिहासना-वर बसवायचे आहे. त्यानंतर त्याचे डोके उडवून ते भल्लूक मांत्रिकासमोर हजर करावयाचे आहे. व्यर्थ रक्तपात करायचा नाही!"



त्यानंतर हत्तीवर बसून चांडाळ भल्लूक, नागमल्ल, दुर्मुखाचा अंगरक्षक सर्वजण उग्रदंड राक्षसाच्या पाठीमागून आपापल्या वाहनांना पळवीत किल्ल्याच्या फाटका-पर्यंत पोचले. परंतु त्या आधी सामंत राजाचा सेनापती आपल्या काही सैनिकां-सह किल्ल्याच्या आत पोचला आणि त्याने लगेच फाटक बंद करविले. थोड्या वेळा-नंतर सामंत राजाचे जे सैनिक आले ते फाटक बंद पाहून फाटकाबाहेर काही वेळ ओरडत घुटमळत राहून निरुपायाने तटाच्या बाजूने पळून गेले.

उग्रदंड राक्षसाने सर्वात आधी फाटका-पर्यंत पोचतांच आपल्या दगडी गदेने फाट-कावर प्रहार केला. परंतु त्याचा काही एक परिणाम होत नसलेला पाहून तो आश्चर्य-चकित झाला आणि चांडाळ भल्लूकाला म्हणाला– "भल्लूका! सामंत राजाचा हा सेनापती जसा भित्रा आहे तसा हुशार सुद्धा दिसतो. आतां पुढे आपण काय करायचे रे? राजा दुर्मुख किल्ल्यात एकटा शत्रूच्या हातात सापडला आहे. तो मेला तर त्याबद्दल मला दुःख करण्याचे कारण नाही, परंतु तू त्याचे डोके कापून भल्लूक मांत्रिकाकडे पोचते करणार होतास, त्याचे काय होणार याचीच काळजी मला वाटते आहे!"

उग्रदंड म्हणाला ते ऐकून चांडाळ भल्लूकाच्या अंगाचा थरकाप उडून गेला. कारण त्याने राजा दुर्मुखाचे डोके भल्लूक



मांत्रिकाला नेऊन दिले नाही तर त्याला आयुष्यभर अस्वलाच्या रूपातच रहावे लागणार होते. म्हणजे, रानात मधमाशांची पोळी शोधायची व त्यांतला मध खाऊन अगर असेच काहीतरी मिळेल ते खाऊन आयुष्य कंठायचे! आयुष्यभर हा शाप उपभोगावा लागणार तर!

असा विचार करून भल्लूकाने काय वाटेल ते करून राजा दुर्मुखाचा जीव वाचविण्यासाठी प्रयत्न करायचे ठरविले व परशू उचलून म्हणाला–"शिरीषवन भैरवा!" आणि किल्ल्याच्या फाटकावर परशूने आघात करायला सुरवात केली. परंतु किल्ल्याचे फाटक अभेद्य होते. त्यावर लोखंडी जाड पत्रा बसविलेला होता. त्या फाटकावर काही परिणाम होण्याचे तर दूरच भल्लूकाचा परशू वार करीत असतां हातातून सुटून दूर जाऊन पडला.

हत्तीवर पुढे बसलेला रानटी शिकारी उडी मारून खाली जमिनीवर आला आणि परशु उचलून मोठ्याने ओरडून म्हणाला– "मालक! आपण उगाच आवेशाने भल्लूक मांत्रिकाने मंत्रवलेल्या परशूला तोडून टाकू नका. आपल्याला किल्ल्यात शिरायचेच झाले तर हा बंद लाकडी दरवाजा आपल्याला जाळून टाकता येईल. ती एकच एक युक्ती आहे!"

"अरे रानटी सेवका! तुझा सल्ला तर फार छान दिसतो आहे! परंतु एवढ्या अवधीत सामंत राजाने दुर्मुखाला ठार केले तर माझे काय होणार? तू याचा काही विचार केला आहेस का?" चांडाळ भल्लूकाने घाबऱ्या चिडक्या आवाजात विचारले.

"होय, तेही बरोबर आहे!" असे म्हणत राक्षस आपली दगडी गदा उचलीत चारपाच पावले मागे आला आणि धावत जाऊन त्याने तटाच्या भिंतीवर जोराने प्रहार केला.

दगडी गदेच्या प्रहाराने दार तर तुटले नाहीच परंतु भिंतीचे दगड मात्र कोसळले आणि भिंतीला एक छोटेसे भगदाड मात्र पडले. राक्षस उग्रदंड, चांडाळ भल्लूक वगैरे अंगावर भिंत कोसळते की काय या भीतीने मागे सरकले आणि वर माना करून भिंत किती कोसळली पाहू लागले.

त्यावेळी तटावरचे एक दृश्य पाहून सर्व आश्चर्यचकित झाले. काळा वेष धारण करून एका मोठ्या माकडासारखी एक आकृती त्यांना भिंतीवर बसलेली दिसली. त्या मर्कटाच्या हातात एक मोठा मंत्रदंड होता. त्याची मूठ एकाच हिऱ्याची व अस्वलाचे तोंड असलेली सूर्यप्रकाशात चमकत असलेली दिसली.

माकडाची आकृती असलेली ती व्यक्ती व तिच्या हातातला मंत्रदंड पाहून चांडाळ भल्लूक दातओठ चावून उग्र स्वरात म्हणाला–"काय रे, माकडाच्या आकाराच्या पोरा! तू माकड आहेस की पिशाच्च! महाशक्तिशाली भल्लूक मांत्रिकाचा मंत्रतंत्र तुझ्या हातात कसा काय आला? काय ते लौकर बोल, नाही तर..."

तो प्रश्न ऐकून ते माकड कर्कश आवाजात म्हणाले–"अरे अस्वलाचे सोंग करणाऱ्या, तू खरोखरचे अस्वल आहेस की भूत?"

ते ऐकून भल्लूकाला राग आला आणि तो आपला परशू माकडावर फेंकणार



इतक्यात उग्रदंडाने हलक्या आवाजात त्याला समजावून म्हटले–"भल्लूका! तू ज्या महाशक्तिशाली मांत्रिकविषयी सांगत होतास तो कोणत्यातरी धोक्यात सापडला आहे. पहिल्याने आपण या भुतासारख्या माकडाकडून माहिती विचारून काढून घेऊ या की त्या मांत्रिकांवर एखादे संकट तर ओढवले नाही?"

उग्रदंडाच्या तोंडचे वाक्य पुरे होण्यापूर्वीच रानटी तरुण शिकाऱ्याने एक तीर त्या माकडाच्या आकृतीवाल्याचा नेम धरून सोडला, तो बाण येऊन लागण्यापूर्वीच त्या माकडाने 'किच किच' असा आवाज काढून तो बाण डाव्या हाताने धरला आणि मोडून



फेकून देत हसला. नंतर उजव्या हाताने मंत्रदंड उचलून धरून म्हणाला—"मूर्खांनो! तुम्हांला माझ्या शक्तीची ओळख झालीच असेल. मी एक मायावी मर्कट आहे!"

चांडाळ भल्लूक दोन्ही कान बंद करण्यासाठी दोन्ही कानांवर हात ठेवीत उग्रदंडाला म्हणाला—"आतां या माकडाशी बोलत वेळ घालविण्यात अर्थ नाही. राजा दुर्मुख सामंताच्या हाती मेला की जिवंत आहे, हे कळायला काही मार्ग दिसत नाही. आपल्याला किल्ल्याचे फाटक फोडून काढता आले नाही तर भिंतीवर चढून जाता येईल का पाहिले पाहिजे. कसे जाऊ

उग्रदंड चकित मुद्रेने भल्लूकाकडे पहात म्हणाला—"भल्लूका! तुला अजून परिस्थितीची पूर्ण जाणीव झालेली दिसत नाही. स्वतःला मायावी मर्कट म्हणविणारा भल्लूक मांत्रिकाचा मंत्रदंड बळकावू शकला आहे, तर खात्रीनेच त्या मांत्रिकाचा वध झाला असावा. तरमग तू राजा दुर्मुख जिवंत आहे की मेला याची चवकशी करण्यासाठी कशाला आपला जीव धोक्यात घालतोस? चल आपण जंगलात किंवा डोंगराळ प्रदेशात जाऊन पुढले आयुष्य घालवू या."

"चांडाळ भल्लूक प्रभो! राक्षस उग्रदंड मालकांचा सल्ला विचार करण्यासारखा आहे!" असे म्हणत नागमल्ल हत्तीवरून उडी मारून खाली उतरण्यास सांगून म्हणाला—"काय वाटते तुम्हांला? राक्षस उग्रदंड मालकाचा सल्ला बरोबर आहे की नाही? आपण सर्व जंगलात मिळून राहू. मग आपण वाटसरूंना लुटले तर आपल्याला कोण अडवू शकेल?"

चांडाळ भल्लूक ते ऐकून रागाने फणफणला व म्हणाला—"काय रे रानटी सेवका! हा चोर कोठे पळून जाईलसे वाटते आहे. तू याच्यावर आपल्या बाणाचा नेम धर!" नंतर इतर सर्वांना संबोधन करून म्हणाला—"मी भल्लूक मांत्रिक व

शोध काढणार आहे. तुमच्यापैकी माझ्याबरोबर जे कोणी यायला तयार असतील त्यांनी हात उचलावे!"

उग्रदंड राक्षसाशिवाय सर्वांनी हात वर करून आपला होकार दर्शविला. जंगली सेवक शंकेच्या स्वरात म्हणाला—"भल्लूक प्रभो! हा चोर नागमल्ल व त्याचे अनुयायी आपल्याबरोबर यायला वचन देत आहेत. परंतु यांच्यावर विश्वास कसा करायचा?"

"यांच्यावर विश्वास करणे धोक्याचे आहे तर येथेच यांची डोकी उडवून टाकावी. म्हणतो. उग्रदंड, तुला काय वाटते? तू मागे एकदां म्हणाला होतास की तुझे मांत्रिकाजवळ काहीतरी काम आहे?" भल्लूकाने विचारले.

"तो मांत्रिक जिवंत असेल तर ना माझे काम असणार आणि होणार?" उग्रदंड म्हणाला.

मध्यंतरी मायावी मर्कट भिंतीवरून कर्कश आवाजात म्हणाले—"ओहो! या किल्ल्यात तर भयंकर युद्ध चालू झाले आहे! की हा लपंडावाचा खेळ आहे? सैन्य दोन भागात वाटले गेले आहे! काही लोक जुन्या राजाला विजयी करण्याच्या प्रयत्नात आहेत तर इतर काही सूर्यभूपतीचा जय व्हावा म्हणून जिवावर उदार होऊन युद्ध करीत आहेत! हे दोघे मित्र मात्र आपल्या



बाजूच्या सैनिकांच्या आड उभे राहून आपल्या सैनिकांना कुत्र्याला करतात तसे "छू" करीत आहेत!"

ते ऐकून चांडाळ भल्लूकाला हायसे वाटले तो म्हणाला—"उग्रदंडा! मला वाटू लागलं आहे की राजा दुर्मुख जिवंत आपल्या हाती लागणार! मला या भल्लूकाच्या आकृतीपासून लवकरच मुक्ती मिळणार आहे!"

राक्षस उग्रदंड चिडून जाऊन आपली गदा जमिनीवर आपटून म्हणाला—"अरे मूर्ख भल्लूका! अजून तुझे तेच रडगाणे चालू आहे! भल्लूक जिवंत असतां कोणी

शकला असता का?" नंतर टाळी वाजवून मायावी मर्कटाला संबोधन करून म्हणाला– "काय रे मर्कटा! तू भल्लूक मांत्रिकाचा मंत्रदंड बरोबर आणला आहेस, हे बरे केलेस! परंतु तू त्याचे प्रेत कोठे टाकून आलास?"

"मी त्याच्या शरिराचे तुकडे करून कुत्र्यांना, कावळ्यांना व गिधाडांना खायला दिले. परंतु कालीवर्मा त्या पक्ष्यांना व कुत्र्यांना जवळ येऊ देत नाही. तो पाहारा देतो आहे!" असे म्हणत त्याने मंत्रदंड भिंतीला टेकून ठेवला आणि भिंतीवर चढून दूरवर पहात आश्चर्यचकित होऊन म्हणाला–"अरे, तो भल्लूक मांत्रिक संजीवनी बूटी खाऊन की आणखी काहीतरी करून पुन्हा जिवंत झाला आहे! तो एका रेड्यावर बसून आणि शेजारी एका घोड्यावर बसून कालीवर्मा दोघे इकडेच येत आहेत. त्यांना कैद करण्यासाठी चंद्रशिला नगरीच्या राजाचा जितकेतू मंत्री सैन्य घेऊन त्यांचा पाठलाग करीत येतो आहे. त्या दोघांचा शिरच्छेद कसा होतो हे पाहिल्यावरच मी येथून हलेन. तोंपर्यंत नाही."

मायावी मर्कटाच्या तोंडचे ते ऐकून चांडाळ भल्लूक घोष करू लागला– "शिरीषवन भैरव की जय!" नंतर म्हणाला–"काय रे माकडा! तू ही सर्व बडबड काय चालविली आहेस? तुझं डोके तर नाहीना फिरले? की आम्हांला वेड लावण्याच्या विचारात आहेस?"

चांडाळ भल्लूकाच्या तोंडचे वाक्य पुरे व्हायच्या आत पाठीमागून वायुवेगाने रेड्यावर भल्लूक व घोड्यावर कालीवर्मा तेथे येऊन पोचले. किल्ल्याच्या भिंतीवर बसलेल्या मर्कटाला संबोधन करून म्हणाले– "चांडाळ भल्लूका, मंत्रदंड चोरून नेणाऱ्या या मायावी मर्कटाला जिवंत सोडता कामा नये!"

ते ऐकून मर्कट 'किच किच' असा आवाज करीत हसू लागले आणि उडी मारून किल्ल्याच्या आत गेले.

(क्रमशः)





# शांतताप्रेमी

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तुझी ही आस्था पाहून मी चकित झालो आहे. तरी मला, तुझा निश्चय अढळ आहे की नाही, याची शंका वाटते. कारण माणसाचा स्वभाव पाहून निर्णायक असे काही सांगणे कठीण असते. याचे उदाहरण म्हणून मी तुला श्रीकेतूची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक. असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फारपूर्वी श्रीकेतू हा विक्रमपूर नामक एका लहानशा देशाचा राजा होता. विक्रमपूरचे अधिपती कित्येक वर्षांपासून विदर्भ देशाच्या राजाचे मांडलिक राजे होते. दरवर्षी खंडणी देत. श्रीकेतूला ती गोष्ट

वेताळाच्या गोष्टी








मान्य नव्हती. तो साहसी व पराक्रमी होता. श्रीकेतूच्या सल्लागारांनी त्याला, विदर्भ देशाशी युद्ध करून त्याचे राज्य स्वतंत्र असल्याचे विदर्भ राजाकडून कबूल करवून घेण्यास सुचविले. परंतु श्रीकेतूला युद्ध करणे किंवा रक्तपात करणे मान्य नव्हते. तो स्वभावाने शांतताप्रेमी होता.

म्हणून श्रीकेतू त्यांना म्हणाला—"आपल्या देशात कोणत्या गोष्टीची उणीव आहे? विदर्भचा राजा आपल्याकडून खंडणी घेतो खरा. परंतु तो शत्रूपासून आपले रक्षणही करतो. परंतु आपण स्वतंत्र असल्याचे जाहीर झालं तर आपल्याला लहान थोर संस्थानिकांशी युद्ध करावे लागेल. परिणामी प्रजेचे फार मोठे नुकसान होईल."

[illegible] परतंत्र व्यक्तीस कधी सुख मिळत नाही. ते जिणे अपमानास्पद आहे."

"एवढ्यासाठी सहस्रावधी लोकांचे प्राण बळी देणे मला पसंत नाही. मला हे पटत नाही की आपण पूर्ण स्वतंत्र झालो तर आपली प्रजा जास्त सुखी व समृद्ध होईल. उलट प्रजेला अनेक परकीय स्वाऱ्यांना तोंड द्यावे लागेल." राजा म्हणाला.

राजाच्या या शांतताप्रेमाची त्याच्या सल्लागारांनी खूप स्तुती केली.

मध्यंतरी विदर्भ देशात दुष्काळ पडला. प्रजेचे इतके हाल होऊ लागले की प्रजा राजाच्या विरुद्ध उलटली. एवढेच नव्हे तर ती शेजारच्या राज्यांत शिरून अन्नसामुग्री मिळविण्यासाठी लूटपाट करू लागली आहे.

ते कळल्यावर श्रीकेतूने एकाएकी आपले मंत्री, सेनापती व सल्लागार यांना बोलाविले व म्हणाला—"दोन दिवसांच्या आत आपले सैन्य सज्ज करा. आपण विदर्भ देशावर स्वारी करावयाची आहे."

राजा म्हणाला ते ऐकून मंत्री व सल्लागार थक्क झाले. कारण त्यांच्या राजासारख्या शांतताप्रेमी राजाच्या मनांत परकी राज्यावर स्वारी करण्याचा विचार आलाच कसा, हे त्यांना कळेना. शिवाय शत्रू संकटात आहे. अशा प्रसंगी त्याच्यावर स्वारी करण्याचे श्रीकेतूच्या मनात आलेच कसे, हे त्यांना कळेना.

श्रीकेतूने थोड्याशा करड्या आवाजात हुकूम केला की एक क्षणाचाही उशीर होता कामा नये. सैन्य सज्ज करा."

दुसऱ्या दिवशी विक्रमपूरचे सैन्य विदर्भ देशावर चालून गेले. विदर्भचा राजा व त्याचे सैन्य टिकाव धरून समोर उभे राहू शकले नाही. श्रीकेतूला सहजी विजयप्राप्ती झाली. श्रीकेतूचा विदर्भ देशाचा राजा म्हणून राज्याभिषेक झाल्यानंतर त्याने चवकशी केली तेव्हां त्याला कळले की विदर्भ देशाच्या राजाने दुष्काळी परिस्थितीत संकटाला तोंड देण्यासाठी धान्याचा संग्रह केलेला नव्हता. त्याच प्रमाणे शेतीला पाणी पुरवठा करण्यासाठी तलाव, कालवे इत्यादींची व्यवस्था केली





नव्हती. श्रीकेतूने याच दोन गोष्टींकडे विशेष ध्यान दिले, परिणामी राज्यात सर्वत्र शांतता नांदू लागली व श्रीकेतू प्रजेचा एक आवडता राजा झाला.

वेताळाने येथवर गोष्ट सांगून विचारले– "राजा! श्रीकेतूने जे शांतताप्रेम दाखविले आणि युद्धाचा व रक्तपाताचा तिटकारा असल्याचे जे दर्शविले, ते सर्व वरपांगीच होते का? कारण विदर्भ देशावर जेव्हा दुष्काळाचे संकट आले तीच वेळ त्याने स्वारी करायला निवडली. त्यात त्याचा भितरेपणासुद्धा जाहीर होतो. अशा भित्र्याला पराक्रमी कसे काय म्हणावयाचे? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस, तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"श्रीकेतू शांतता प्रेमी व युद्ध विरोधी होता यात मुळीच शंका नाही. प्रजेच्या हितासाठी व रक्तपात टाळण्यासाठी त्याने स्वातंत्र्याचा आग्रह दाखविला नाही. त्याचबरोबर शांतता राखण्यासाठी प्रजेचे व देशाच्या कल्याणाकडे दुर्लक्ष करण्याइतका तो मूर्खही नव्हता. विदर्भ देशावर दुष्काळाचे सावट आले व प्रजा बंड करायला मागेपुढे पहात नाही हे पाहतांच विक्रमपुरीवरही संकट येण्याची शक्यता पाहून विक्रमपुरीत होणारा रक्तपात टाळण्यासाठी आणि खुद्द विदर्भ देशात बंडाळी होऊन प्रजेला होणारा त्रास टाळण्यासाठी श्रीकेतूला विदर्भ देशावर स्वारी करणे हा एकच अनिवार्य मार्ग वाटला व त्यासाठी त्याने दिरंगाई केली नाही. भयंकर रोगाला औषधही तितकेच भयंकर व वेळेवर देणे आवश्यक असते. वास्तव त्याने केलेली स्वारीही शांतिस्थापनेसाठीच होती हे मान्य करावे लागेल."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# चोरांचा नायनाट

सिंदूर देशाच्या सीमेवर दाट रानात चोरांची एक टोळी रहात असे. चोरांच्या धाडी खेडे गावांवर येत. शिपायी धरायला येण्यापूर्वीच चोरांची टोळी निघून जाई.

सिंदूर देशाच्या राजाने अनेक प्रयत्न केले, परंतु तो चोरांना कैद करू शकला नाही. शेवटी त्याने असे जाहीर केले की जो कोणी चोरांच्या नायकाचे डोके कापून दरबारात हजर करील त्याच्याशी राजकन्येचा विवाह करून देण्यात येईल, व तोच गादीचा वारस होईल.

ही गोष्ट जाहीर होताच चोरांच्या नायकाने विचार केला की त्याचेच अनुयायी त्याच्याशी दगा करून बक्षिसाच्या लोभाने राजाला आपले नाव कळवितील. म्हणून एके दिवशी आपल्या अनुयायांना न कळविता तो कोठेतरी पळून गेला.

चोरांनी आणखी एकाला आपला नायक निवडण्याचे ठरविले. परंतु कोणी सरदार व्हायला तयार होईना. चोर स्वतःला वाचविण्यासाठी पळून गेले. सुंठे वाचून खोकला गेला.





# अधिकाऱ्याची बायको

राजा प्रचंडसेन राज्य करीत असतां प्रत्येक गावात एक ग्रामाधिकारी दरबारातर्फे नेमलेला असे. तो गावातले सर्व व्यवहार पहात असे. परंतु या ग्रामाधिकाऱ्यांचा प्रजेला त्रास होऊ नये यासाठी त्यांच्यावर देखरेख करायला राजाने काही अधिकाऱ्यांना नेमले होते. हे अधिकारी कळविल्याशिवाय कोणत्याही खेडेगावात जाऊन चवकशी करीत आणि गैर प्रकार आढळले तर राजाला कळवीत.

रामभद्र नावाचा असाच एक अधिकारी होता. तो कोणत्याही गावी चवकशीसाठी जाई तेव्हां बरोबर बायकोला घेऊन जाई. लोक थट्टा करीत हा गृहस्थ जोरू का गुलाम असावा.

रामभद्रच्या बायकोला वाटे की ती कोणत्यातरी फार मोठ्या अधिकाऱ्याची बायको आहे. ती जेथे जेथे जाई त्या गावच्या ग्रामाधिकाऱ्यांवर अधिकार गाजवी. ग्रामाधिकारी विचार करीत की वरच्या अधिकाऱ्याची बायको, रागावली तर अधिकारी आपल्याविरुद्ध काही कळवून राजाकडून आपल्याला नोकरीवरून काढून टाकवील.

कृष्णपूर येथे हरी व गिरी नावाचे दोन ग्रामाधिकारी एकाच घरात आजूबाजूच्या बिऱ्हाडात रहात. रामभद्र एकदा बायकोबरोबर कृष्णपूरला आला आणि हरी व गिरी रहात त्या घरात उतरला.

हरी व गिरी दोघेही स्वामिभक्त व इमानदार अधिकारी होते. सर्व गावकरी त्यांच्या सचोटीची प्रशंसाच करीत. म्हणून त्यांच्या विरुद्ध काही शेरा लिहून पाठविणे शक्यच नव्हते. त्यांनी रामभद्रच्या उतरण्याची उत्तम व्यवस्था करून दिली. नंतर ते रामभद्रला गावात तपासणीला घेऊन गेले.

तेव्हां रामभद्रच्या बायकोने हरी व गिरी दोघांच्या बायकांवर अधिकार गाजवण्याचे ठरविले. तिची सेवा करून गिरीची बायको दमली तेव्हां ती खुर्चीवर विश्रांती घ्यायला बसली.

ते पाहून रामभद्रची बायको फणफणून तिला म्हणाली–"काय ग, तू एवढ्याशा ग्रामाधिकाऱ्याची बायको आणि तू माझ्या समोर खुर्चीवर बसतेस? ऊठ, उभी रहा?"

गिरीच्या बायकोला ते नाही आवडले. ती संतापून म्हणाली–"खुर्चीवर बसले, त्यात काय बिघडले ग? तुझ्याहून आम्ही कोणत्या बाबतीत लहान आहो? शिवाय हे आमचे घर आहे?"

"हे घर तुझे असेल. परंतु तुला हे कळायला हवं की माझे पती हे तुझ्या पतीवरचे अधिकारी आहेत!" रामभद्रची बायको दरडावून म्हणाली.

ते ऐकून हरीच्या बायकोला सुद्धा राग आला. म्हणाली–"तुझा नवरा आमच्या पतिराजांचा अधिकारी असेल, परंतु तू आमच्यावरची अधिकारीण आहेस का?"

रामभद्रच्या बायकोला थोबाडीत बसल्यासारखे झाले. परंतु नवरा परत आल्यावर हरी व गिरीच्या बायकोविरुद्ध तिखटमीठ लावून तिने तक्रार केली.

रामभद्रने रागावून हरी व गिरीला त्याबद्दल जाब विचारला. दोघांनी आपापल्या बायकांकडून सर्व वृत्तांत ऐकून



घेतला व म्हणाले–"या बाबतीत आमच्या बायकांची काही चूक दिसत नाही. आपण आमच्यावर अधिकार गाजविणे एक वेळ रास्त होईल, परंतु आपल्या पत्नींनी आमच्या बायकांवर अधिकार गाजविणे आम्हांला मान्य नाही."

ते उत्तर ऐकून रामभद्र चिडून म्हणाला–"माझी बायको तुमच्या बायकांची अधिकारीण नसेलही, परंतु ती माझी अधिकारीण आहे. म्हणून ती सांगेल त्याप्रमाणे मी वागले पाहिजे. मी तुम्हां दोघांना कामावरून कमी करतो."

त्यानंतर हरी व गिरी दोघांनी रामभद्रला अनेक प्रकारे समजावून सांगण्याचा प्रयत्न करून पाहिला. परंतु तो ऐकायलाच तयार नव्हता.

रामभद्र निघून गेल्यावर गांवकऱ्यांना वस्तुस्थिती कळली. त्यांनी एका वृद्ध व पोक्त गावकऱ्याला राजाकडे निवेदन करण्यास पाठविले. राजाने हेर पाठवून सर्व गोष्टींची माहिती काढविली. त्याला खरी गोष्ट कळली. त्याने रामभद्रचा त्या महिन्याचा पगार कापला. तो घाबरून खजीनदाराकडे धावला. खजिनदार म्हणाला–"मला या संबंधी काही एक माहीत नाही. महाराजांचा हुकूम आहे. त्याच्याबाहेर मी काहीच करू शकत नाही. आपण महाराजांना समक्ष भेटून विचारावे!"

रामभद्र महाराजांना भेटायला गेला व पगार न मिळाल्याचे निवेदन केले.

राजा म्हणाला–"मला वाटत होतं की तुम्ही माझ्या हुकुमाप्रमाणे काम करीत आहां, परंतु मला नुकतेच कळले की तुम्ही आपल्या पत्नींच्या हुकुमाप्रमाणे राज्याची कामे करीत आहां. तेव्हां तुम्ही आपला पगार आपल्या पत्नींकडूनच घेत जा. मला जास्त काही बोलायचे नाही. तुम्ही जाऊ शकता."

रामभद्रला नोकरीवरून कमी करण्यात आले. हरी व गिरी आपल्या पदावर कायम राहाले.





# नकली हार

एका भटांच्या वठारात रामशास्त्री नावाचे एक पंतोजी मुलांना शिकवीत व त्यांच्याकडून शिकवणी, दक्षिणा वगैरे जे काही मिळे त्यावर आपला व कुटुंबाचा उदरनिर्वाह सुखाने चालवीत. त्यांची बायको पार्वतीबाई माहेरी जावेजावे म्हणत राहवले नाही तेव्हां नवऱ्याजवळ ते उत्रडपणे बोलली.

"बरं तर तू जा. मीसुद्धा निघालो तर मुलांचे अभ्यास मागे पडतील. शिवाय एवढा खर्च करणे तरी शक्य आहे का आपल्याला?" रामशास्त्री बायकोला म्हणाले.

"ते खरं आहे हो, परंतु लग्न झाल्यानंतर मी अगदी पहिल्याने माहेरी जाते आहे, तुम्ही एक तरी दागिना माझ्या अंगावर घातला नाहीत, हे पाहून माहेरचे लोक काय म्हणतील? माझी मान खाली नाही का होणार? म्हणून मी निघण्यापूर्वी एक माळ तरी करून द्यावी गडे!" पार्वती आर्जवाच्या स्वरात म्हणाली.

"आपली स्थिती तुला माहीत नाही का? शिकवणीचे पैसे येतात ते आपल्या घरखर्चाला तरी पुरताहेत का? दागदागिने कोठून करू?" नवरा म्हणाला.

"लाकडाच्या पेटीत आमच्या आईच्या चांदीच्या पाटल्या आहेत. तसले दागिने मी नाही कधी घालणार. त्या विकून येतील त्या पैशांचा सोन्याचा हार करून द्या." पार्वती नवऱ्याला म्हणाली.

दुसऱ्याच दिवशी रामशास्त्री शहरातल्या सराफाकडे गेले आणि चांदीच्या गोठपाटल्या विकून त्या पैशात सोन्याचा हार एखादा तो देऊ शकेल का, दुकानदाराला त्यांनी विचारले.

"चांदीच्या गोठपाटल्यांच्या किमतीला खऱ्या सोन्याचा कोणताही दागिना मिळणे

शक्यच नाही हो! पाहिजेतर अलीकडे येऊ लागलेले नकली सोन्याचे हार मिळू शकतील. रंग अगदी खऱ्या सोन्याचाच असतो. रंग फिक्का पडत नाही. तो हार घेतल्यावर काही पैसे रोख परत सुद्धा मिळतील." दुकानदार म्हणाला.

त्याने दाखविलेला हार फारच सुंदर होता. रामशास्त्री तो घेऊन गेले व बायकोला देऊन म्हणाले–"आतां तर तू यावरच भागव. तू पुन्हां माहेरी जाशील तेव्हां काही पैसे जमवून मी खऱ्या सोन्याचा एखादा दागिना करून-देईन."

"मी माहेरच्यांना खऱ्या सोन्याचाच आहे, असे सांगेन. तुम्हीसुद्धां सर्वांना तसेच सांगा." पार्वती पतीला म्हणाली.

सासरी गेल्यावर बरेच दिवसांनी पार्वती माहेरी आली म्हणून तिचा भाऊ माधव आणि भावजय रुक्मिणी आनंदाने तिला घ्यायला पुढे आली. रुक्मिणीची नजर नणंदेच्या गळ्यात चमचमणाऱ्या सोन्याच्या माळेवरच होती. "केव्हां करविलीत हो, ही माळ?" म्हणून तिने विचारलेही.

"परवां परवांच हो वहिनी! ह्यांच्याकडे शिकवणीला मुलं येतात ना, शिक्षण पुरं झाल्यावर निरोप घेतांना जमिनदारांच्या मुलाने दिली एक मोठी रक्कम. ह्यांनी ती रक्कम खर्च करून हा हार घेतला हो! मी नकोनको म्हणत होते. तरी निघण्यापूर्वी चार दिवस करवून घातला माझ्या गळ्यात." असे तिखट मीठ लावून पार्वतीने तिच्या माळेची कथा सांगितली.

ती माळ पाहिली त्या घटकेपासून आपल्यालासुद्धा असाच एक हार असावा, असे रुक्मिणीला वाटू लागले. रात्री ती नवऱ्याजवळ हट्ट धरून बसलीच.

माधव तसा जास्त शिकला सवरलेला नव्हता. वाडवडिलोपार्जित जी थोडी शेती भाती होती, ती तो संभाळून होता. स्वतःच शेत नांगरी व पीक काढी. तेवढ्यावर मुलाबाळांना काही कमी पडत नसे. ती गोष्ट तो बायको म्हणाला. परंतु बायको हिरमुसल्यासारखी बसून राहिली.

ते पाहून माधव म्हणाला–"बरं तर मी उद्यां जातो शहरात आणि मी धान्य विकलं होतं त्याचे पैसे वसूल करून हार घेऊन येतो."

परंतु शहरात जाऊन पैसे वसूल केल्यावर शेवटी हातात जेवढे पैसे आले तेवढ्यावर सोन्याचा हार काय मिळणार? वर्षभर मेहनत करून विकलेल्या धान्याचे पैसे एका हारात घालवून बसायला त्याचे मन मानेना.

परंतु दुकानदार म्हणाला–"एक नकली सोन्याचा सुंदर हार आहे, खूप स्वस्त, पाहतां का?"

त्याने दाखविलेला हार पाहून माधव चकितच झाला. पार्वतीच्या हारासारखाच हुबेहूब होता तो, एकाच साच्यातून काढल्यासारखा. फरक एवढाच की पार्वतीचा खऱ्या सोन्याचा व हा खोटया सोन्याचा.





परंतु दोन्हीतला फरक कोणाला कळणार? माधवने जास्त विचार न करतां तो हार विकत घेतला.

नवऱ्याने आणलेला हार पाहून रुक्मिणी तो नणदेच्या हारासारखाच हुबेहूब असल्याचे ओळखून खूष झाली. परंतु माधवने लपवा-लपवी न करतां तो खऱ्या सोन्याचा नसून खोटया सोन्याचा असल्याचे सांगून टाकले व म्हणाला—"पुढल्या वर्षी कोणाचं तरी शेत घेऊ खंडावर व पैसे येतील त्यात खऱ्या सोन्याचा हार करू." नणदेच्या तोडीचा आपल्याला हार मिळाला एवढ्या-वरच रुक्मिणी फुलून गेली होती.

पार्वतीने भावजयीचा हार पाहिला व आपल्या हारासारखाच असल्याचे ओळखून चकित झाली व त्याचबरोबर तो खऱ्या सोन्याचा आहे असे मानून मनातल्या मनात हेवा करू लागली.

दिवसभर दोघी परस्परांकडे पाहून मनातल्या मनात ईर्ष्याग्नीने पेटल्या होत्या. रात्री एकीलाही झोप आली नाही.

दुसऱ्या दिवशी सण होता. रुक्मिणीने मुलांना न्हाऊ घातले आणि नवीन कपडे घालायला दिले आणि स्वत: न्हायला गेली. ती संधी साधून पार्वतीने रुक्मिणीच्या व स्वत:च्या हाराची अदलाबदल केली.

त्याचप्रमाणे पार्वती न्हायला गेली तेव्हां रुक्मिणीने स्वत:च्या व पार्वतीच्या हारांची अदलाबदल केली. प्रत्येकीला परकीचा हार खऱ्या सोन्याचा व स्वत:चा नकली सोन्याचा वाटला. अदलाबदल केल्यावर दोघींना वाटले की आपल्याला खऱ्या सोन्याचा हार मिळाला व दुसरीला नकली सोन्याचा. सण संपला व पार्वती आनंदाने सासरी परतली.

पुढल्या वर्षी सोन्याचा हार करून द्यायला बायकोने आठवण करून दिली नाही, म्हणून माधव आश्चर्य करीत खूष होता. त्याने सुद्धां स्वत: होऊन तिला आठवण करून दिली नाही.

रामशास्त्रीसुद्धा बायकोने आठवण न करून दिल्याबद्दल आश्चर्य करीत होते.





# नारद

सप्तर्षी सात प्रकारचे आहेत असे सांगतात. त्यांपैकी एकात नारद हा होता. त्याच्याबरोबर या सप्तर्षीवर्गात संवर्त, मेरुसावर्ण, मार्कंडेय, सांख्य, योगी व दुर्वास हे होते. पुराणात नारदाला देवर्षी म्हणून वर्णिले आहे. तो ब्रह्मदेवाचा मुलगा. दक्षाच्या मुलींपैकी प्रिया नांवाच्या मुलीपासून ब्रह्मदेवाला नारद हा मुलगा झाला, अशी एक कथा आहे. त्याचप्रमाणे तो एक आजन्म ब्रह्मचारी होता, अशीही एक समजूत आहे. परंतु नारदाचे सृंजय नावाच्या एका राजाची मुलगी सुकुमारी हिच्यावर प्रेम होते व त्याने तिच्याशी लग्न केले होते, अशीही एक कथा आहे.

नारद या शब्दाचा "पाणी देणारा" (मेघ) असा अर्थ आहे. तो एका जागी स्थिर रहात नाही आणि सर्वकाळ रात्रंदिवस संचार करीत असतो. एका जागेची बातमी दुसऱ्या जागी पोचती करतो, महती नावाच्या वीणेवर नित्य गान करीत असतो, तो देवांच्यापैकी एक असूनही त्याचे राक्षसांबरोबरही सलोख्याचे संबंध असतात, दोघांत कलह लावून त्यांत तो आनंद मानतो, इत्यादी गोष्टी नारदाविषयी आपण ऐकतो. कळीचा नारद किंवा कळ लावणारा नारद म्हणून तो प्रसिद्धच आहे. नारदाने जलंधर राक्षसाला पार्वतीची आशा दाखविली. त्यामुळे तिच्याकडे तो आकृष्ट झाला. अशा तऱ्हेने शंकराशी त्याचे भांडण लावून त्यात जलंधरचा जो वध झाला त्याच्या मुळाशी नारदच तर होता. त्याचप्रमाणे नारदाने गरुड आणि कद्रूची मुलं म्हणजे साप, यांच्या मध्ये भांडण लावलं व तो कशी मजा पहात राहिला ही कथाही आहेच. कालिया नागाला कृष्णाच्या विरुद्ध भडकवून कृष्णाकडून

त्याचा वध करविण्याचा घाट नारदानेच रचला होता.

नारदाच्या गायनकले विषयी एक विचित्र कथा सांगतात.

नारद व तुंबरु हे संगीत विद्येत प्रसिद्धच होते, वास्तविक नारद व तुंबरु यांचा प्रत्यक्ष काहीच संबंध नाही. तुंबरु हा एक गंधर्व होता. तो कलावती नावाची वीणा वाजवीत असे.

कौशिक हा स्वर्गात गायन करीत असतां तेथे लक्ष्मी, तिच्या सखी व दासी, नारद आणि तुंबरु आले. लक्ष्मीने तुंबरूच्या गानविद्येत अभिमान असल्यामुळे त्याला कौशिकाबरोबर गाणे म्हणायला सांगितले व त्याला पारितोषिकही दिले. नारदाला तो त्याचा अपमान वाटला.

विष्णू नारदाला प्रोत्साहन देऊन म्हणाला—"तुला गायन विद्येत प्राविण्य संपादन करावयाचे असेल तर मानस सरोवराच्या उत्तरेकडील पर्वतावर गानबंधु नावाचे एक घुबड आहे त्याच्याजवळ तू संगीत शीक." त्याप्रमाणे नारदाने त्या घुबडाजवळ संगीत शिकून तुंबरुशी चढाओढ लावली आणि तीत हारला.

आणखी एकदा हारल्यावर नारदाने विष्णूकडे जाऊन त्याची मान खाली झाल्याची गोष्ट सांगितली.

"तेव्हां मी कृष्णावतारात जन्म घेईन तेव्हां तू माझ्याजवळ संगीत शिकून घे." असे विष्णु म्हणाला.

त्याप्रमाणे नारदाने कृष्णाजवळ संगीत शिकून घेऊन संगीत शास्त्रात पूर्णत्व संपादन केले.

नारदाला पर्वत नावाचा एक भाचा होता व दोघे मिळून त्रिलोकात संचार करीत अशीही एक कथा आहे. परंतु पर्वत नारदाचा भाचा कसा झाला, हे मात्र कोणाला माहीत नाही. पर्वत हे नाव नारदाचेच होते असेही काही लोक सांगतात.

नारद व पर्वत यांच्यामध्ये वास्तविक फरक असा काहीच नव्हता.



# अंबरीष राजा



अंबरीष राजा हा एक थोर विष्णुभक्त होता. त्याच्या भक्तीवर प्रसन्न होऊन विष्णूने त्याला आपले सुदर्शन चक्र देऊ केले. परंतु अंबरीषाला त्याचा उपयोग करण्याची कधीच गरज भासली नाही.





अंबरीष राजाने अनेक अश्वमेध यज्ञ केले. यज्ञ समाप्तीच्या वेळी तो अपार दानधर्म करी.



एकदा अंबरीष राजा निर्जळ एकादशी व्रत केल्यानंतर द्वादशीचे पारणे करण्यासाठी जेवायला बसला.



त्याच वेळी दुर्वास ऋषी आल्याचे कळल्यावरून तो पानावरून उठला आणि दुर्वास ऋषींचे यथोचित स्वागत करून जेवायला येण्याची विनंती केली. स्नानसंध्यादी आटोपून येतो, असे सांगून दुर्वास ऋषी नदीवर गेले.

परंतु बराच वेळ झाला तरी ऋषी परत आले नाहीत. द्वादशीची घटका टळण्याची वेळ झाली. पारणे केले पाहिजेच. परंतु पाहुण्याला सोडून जेवायचे कसे, असा विचार करून फक्त तुळशीचे पान खाऊन राजा पाणी प्याला.





ठीक त्याच वेळी दुर्वास ऋषी आले व संतापून म्हणाले–"मला जेवायला वाढल्याशिवाय तू पारणे करतोस काय ?"

दुर्वास ऋषींनी आपल्या केसांची एक बट उपटून जमिनीवर आपटली. त्या पाठोपाठ एक कृत्या उत्पन्न झाली व ती अंबरीष राजाला खायला धावली.







त्यावेळी अंबरीष राजाला सुदर्शन चक्राचे स्मरण झाले. त्या चक्राने कृत्याचा वध केला.

त्या राक्षसिणीचा वध करून सुदर्शन चक्र दुर्वास ऋषींच्या पाठीस लागले. ते थांबवायला दुर्वास ऋषींची तपःश्चर्या उणी पडली.





दुर्वास ऋषी स्वतःचा बचाव करण्यासाठी अरण्यात जाऊन लपले. सुदर्शन चक्राचा स्पर्श होताच अरण्यात दावानल पेटला. दुर्वास ऋषी समुद्रात दडून बसले. सुदर्शन चक्र समुद्रात शिरताच समुद्र खवळला.



कोठेही रक्षण होत नसलेले ओळखून दुर्वास ऋषी विष्णूकडे धावले व त्याचे पाय धरले. अंबरीष राजाकडेच शरण माग, असा सल्ला देऊन विष्णूने त्याला निरोप दिला.



दुर्वास निरुपाय होऊन अंबरीषाला शरण गेले. तोंपर्यंत सुदर्शन चक्राने त्याला सोडले नाही. एका सज्जनाच्या सौजन्यामुळे एका अहंकारी गर्विष्ठाला चांगलाच धडा मिळाला.



# भरत

पुराणांत भरत नावाच्या अनेक व्यक्ती आढळतात. एका भरताला तक्ष व पुष्कळ असे दोन मुलगे होते. त्याने द्विग्विजय करून दोन नगरांची स्थापना केली व आपल्या दोघां मुलांना एकेका नगराचा राजा केले. तक्षाचा मुलगा ज्या नगरीवर राज्य करी तिचे नाव तक्षशिला पडले. ती एक इतिहास प्रसिद्ध नगरी होती. ती नगरी ज्या प्रदेशात होती त्या प्रदेशाला एके काळी गंधर्व देश (कन्दाहार) म्हणत. पुष्कलाची राजधानी पुष्कलावती गंधर्व देशातच होती.

रामायणात दशरथ राजाला कैकेयीपासून जो मुलगा झाला त्या मुलाचे नावसुद्धा भरतच होते. त्याची कथा रामायणात प्रसिद्धच आहे.

आणखी एक भरत ऋषभ व जयंती यांच्या पोटी जन्मलेल्या पुत्रांपैकी एक होता. त्याच्या भावांची नावे अनुक्रमे कुशावर्त, इलावर्त, भद्रसेन, विदर्भ अशी होती. या भरतामुळेच आपल्या देशाला भारतवर्ष हे नाव प्राप्त झाले. याच्या भावांनी आपल्या देशाच्या निरनिराळ्या प्रांतांत राज्य केले आणि त्या प्रांतांना त्यांचीच नावे प्राप्त झाली असे सांगतात. भरताने राज्य केले त्या प्रदेशाचे नाव अजनाभ असे होते.

या भरताच्या हृदयात फार मोठी भूतदया होती. याने कित्येक वर्षे राज्य करून आपले राज्य आपल्या मुलांना वाटून दिले आणि स्वतः वानप्रस्थाश्रमात प्रवेश केला. तो वानप्रस्थाश्रमात तपश्चर्येत लीन झाला. एकदा तो नदीत स्नान करीत असतां एक गाभण असलेली हरणी त्या नदीचे पाणी पिऊ लागली. तेव्हां आकाश एकाएकी ढगाळ झाले, दाट काळोख पडला आणि गडगडाट झाला. ती हरणी घाबरून

गेली व तेथेच व्यायली आणि मरण पावली. त्या असहाय पाडसाला पाहून वृद्ध भरताला कीव आली. तो त्या पाडसाला आपल्या आश्रमात घेऊन आला. त्याने अत्यंत वात्सल्याने त्याची सेवा केली. मरणसमयीं सुद्धा त्याला त्या पाडसाची माया सोडवेना. म्हणून तो हरण होऊन जन्मला असे सांगतात.

या भरताव्यतिरिक्त जडभरत नावाचा आणखी एक भरत होता.

परंतु बालपणी प्रसिद्धीस पात्र झाला तो शकुंतलेचा मुलगा भरत हा होय! मेनका व विश्वामित्र शकुंतलेला अर्भकावस्थेत टाकून गेल्यार तिला शकुंत नावाचे पक्षी खाऊपिऊ घालून वाढवीत असलेले कण्व-ऋषींनी पाहिले व तिला आपल्या आश्रमात नेऊन तिचे नांव शकुंतला असे ठेवले. त्यांनी स्वतःच्या मुलीसारखे तिला वाढविले.

एकदां दुष्यंत नावाचा राजा शिकारीला गेला असता कण्व मुनींच्या आश्रमात आला. तेथे शकुंतलेला पाहून तो तिच्यावर मोहित झाला व त्याने तिच्याशी गंधर्व विवाह केला. पुढे तिच्या सहवासात काही काळ राहून तो निघून गेला. आश्रमातच शकुंतलेच्या पोटी भरत जन्मला आणि हळूहळू वाढू लागला.

असे सांगतात की हा मुलगा लहानपणा-पासूनच सर्व प्राण्यांना धरून बांधून ठेवीत असे. म्हणून सर्व त्याला 'सर्वदमन' म्हणू लागले. त्याने आश्रमातच सर्व शास्त्रांचे अध्ययन केले.

तो मोठा झाल्यावर कण्व मुनींनी शकुंतलेला व तिच्या मुलाला दुष्यंत राजा-कडे पाठविले. परंतु दुष्यंताने तो मुलगा त्याचा असल्याचे मान्य केले नाही. तेव्हां आकाशवाणी झाली–"राजा, हा तुझाच मुलगा आहे, याचे भरणपोषण तूच कर." म्हणून या मुलाला भरत हे नाव प्राप्त झाले.

भरताला तीन बायका होत्या. त्यांना मुले झाली. परंतु मरण पावली. म्हणून त्याने भरद्वाजांना दत्तक म्हणून वाढविले, असे भागवतावरून कळते.





# जयपराजय

फार प्राचीन काळी विदर्भ देशावर विजयपाल नावाचा राजा राज्य करीत असे. त्याच्या शौर्य व पराक्रमा-संबंधी कथा आसपासच्या प्रदेशात ऐकायला मिळत. त्याच्या शौर्यासंबंधीचे पोवाडे शाहीर गावोगाव हिंडून म्हणत.

विजयपालला मुलगा नव्हता. जलजादेवी नावाची त्याला एकुलती एक मुलगी होती. तिचे लग्नाचे वय झाले होते. परंतु विजय-पालने तिच्या लग्नासाठी काहीच प्रयत्न केला नव्हता. कारण त्याला वाटे की त्याच्या-सारख्या पराक्रमी वीराच्या मुलीशी लग्न करायला कोणी पराक्रमी वीर नसणारच. जलजाशी विवाह करण्याची इच्छा अनेक राजकुमारांच्या मनात होती. परंतु विजय-पालशी युद्ध करून अपमान सहन करण्या-पेक्षा गप्प राहणेच त्यांना श्रेयस्कर वाटले. परंतु जयपूरचा युवराज मणिभद्र याने जलजाशीच विवाह करण्याचे ठरविले. मणिभद्राचे वडील विजयपालशी युद्ध करून हारले होते. म्हणून मणिभद्राने मनाशी ठरविले होते तो अपमान धुवून काढावयाचे. त्यासाठी त्याने सर्व शस्त्रास्त्रांचा अभ्यास केला शिवाय व्यूहरचना व व्यूहभेद इत्यादींचे शिक्षणही घेतले होते.

मणिभद्राने जेव्हां ससैन्य विदर्भावर स्वारी केली, त्यावेळी विजयपाल अंथ-रुणाला खिळलेला होता. राजवैद्यांनी अनेक प्रकारे औषधोपचार करूनही गुण पडला नाही. त्या आजारात शत्रूने राज्यावर स्वारी केली. त्याचा परिणामही त्याच्या प्रकृतीवर झाला. तरी विजयपाल पलंगावर उठून बसला. प्रधानाने आणि वैद्यांनी राजाचे मन वळविण्याचा खूप प्रयत्न केला. त्यामुळे त्याला फार वाईट वाटले. रात्रं-दिवस त्याला त्या युद्धाची काळजी वाटे.















रणांगणावरच्या बातम्या त्याच्याकडे येत. शत्रूने कोणता व्यूह कसा फोडायचा. नंतर प्रतिव्यूह कसा रचावयाचा, या सर्व गोष्टींची चर्चा अंथरुणावर पडल्या पडल्या तो आपल्या सरदारांशी करीत असे. कधी त्याचा व्यूह शत्रूने फोडल्याचे त्याला कळले की त्याला फार वाईट वाटे.

आणखी काही दिवस असेच गेले. विदर्भ देशाचे सैन्य माघार घेऊ लागले आणि पराभवाची चिन्हे जास्त जास्त स्पष्ट होत चालली. त्याबरोबर राजाची प्रकृती जास्त जास्त बिघडत चालली होती. प्रधानाने विचार केला की राजाला युद्धाच्या खऱ्या बातम्या दिल्याने त्याच्या प्रकृतीवर उलटा परिणाम होण्याची शक्यता आहे. म्हणून तो खोटया बातम्या देऊ लागला. शेवटी एकदां राजवैद्याने स्पष्ट सांगून टाकले की महाराज फक्त साठ तासांचे पाहुणे आहेत. दोन दिवसांच्या आत विदर्भ देशाचा पूर्ण पराभव होऊन मणिभद्र राजधानीत प्रवेश करणार, हे स्पष्ट दिसत होते. तेव्हां राजाला आधीच मणिभद्र विजयी होत असल्याचे कां सांगू नये? असे प्रधानाला वाटू लागले. त्याच बरोबर महाराजांना दुःखी करणेही प्रधानाला बरे वाटेना.

प्रधानाने शेवटी अगदी खोटया बातम्या द्यायला सुरवात केली. तो राजाला म्हणाला–"महाराज, आपले सैन्य शत्रूशी निकराची लढाई लढत आहे. आतां शत्रू माघार घेऊ लागला आहे." त्या अशक्त अवस्थेतही राजाच्या चेहऱ्यावर स्मित झळकले.

प्रधान व राजवैद्य दोघांचा अंदाज चुकला. ६० तासांचा अवधी संपला. महाराज आणखी काही दिवस जगणार हे स्पष्ट दिसू लागले व मणिभद्र ससैन्य राजधानीत शिरण्याच्या मार्गावर होता.

राजाने डोळे उघडून क्षीण स्वरात विचारले–"युद्धाची बातमी काय आहे?"

प्रधान म्हणाला–"महाराज, विजयलक्ष्मी आपल्या गळयात जयमाला घालण्यास तयार उभी आहे. शत्रू आपल्याशी संधी करून घेण्यासाठी केव्हांही दूत पाठविण्याची शक्यता आहे." परंतु प्रधानासमोर मोठा प्रश्न उभा होता. शत्रूसैन्य प्रथम राजधानीत शिरते की राजाचे प्राणोत्क्रमण प्रथम होते. राजाच्या मृत्यूनंतर काय वाटेल ते झाले तरी त्याची फिकीर प्रधानाला नव्हती. परंतु तसे झाले नाही. मणिभद्र ससैन्य राजधानीच्या मुख्य फाटकावर येऊन उभा राहिला. जयघोष ऐकून राजाने प्रधानाला विचारले–"प्रधान! आपला जय झाला का? हा जयघोष कसला?"

"महाराज! आपले सैन्य विजय प्राप्त करून फाटकापर्यंत आले आहे." प्रधानाने अडखळल्याशिवाय उत्तर दिले.

"मला माहीतच होते, आपला पराभव होणे शक्यच नाही!" असे समाधानाने म्हणत राजा डोळे मिटून पडून राहिला.

थोडयाच वेळात मणिभद्राने राजवाडा व अंतःपुर काबीज केले आणि दरबार बोलावून विदर्भ देशाचे प्रधान, मंत्री व सरदार सर्वांना उपस्थित राहण्यास हुकूम पाठविला. प्रधानाला जाणे भाग होते. प्रधान विजयपालाच्या बोटातून राजमुद्रा काढू लागला तेव्हां राजाने विचारले–"हे काय करतां आहां, प्रधान?"



प्रधान शांत स्वरांत म्हणाला–"महाराज! पराभव पावलेल्या शत्रूशी संधीच्या बोलाचाली सुरू आहेत. संधिपत्रावर राजमुद्रा द्यावयाची आहे!"

इतक्यात राजाला वाटू लागले की त्याच्या अंगात नवीन शक्तीचा संचार झाला आहे. तो प्रधानाच्या मदतीने अंथरुणावर उठून बसला आणि म्हणाला–"मी स्वतः दरबारात येणार आहे, सर्व तयारी करावी!"

प्रधान पेंचात पडला, परंतु क्षणभरच. स्वतःला सावरून म्हणाला–"आपली आज्ञा महाराज!" असे सांगून प्रधान घाईघाईने पुढे दरबारात गेला. तेथे मणिभद्र सिंहा-

सनावर बसलेला होता. संधिपत्राच्या अटी लिहिण्याचे काम चालू होते.

प्रधान मणिभद्राला म्हणाला–"महाराज, एक निवेदन आहे." एवढे सांगून त्याने मणिभद्राला वस्तुस्थितीची पूर्ण कल्पना करून दिली व म्हणाला–"महाराज! आमचे प्रभू फारतर दोन घटकांचेच पाहुणे आहेत. आपण वस्तुस्थिती त्यांच्यापासून लपवू शकलांत तर मी व विदर्भाचे सर्व सैन्य सर्वदा आपले ऋणी राहील."

मणिभद्र प्रथम रागवल्यासारखा झाला. परंतु तरुण असल्या कारणाने परिस्थिती ओळखून प्रधान म्हणाला ते त्याने मान्य केले.

त्याच वेळी सेवकांच्या खांद्यावर हात ठेवून महाराज विजयशालाने दरबारात प्रवेश केला आणि सिंहासनावर जाऊन बसला. बाजूला त्याने मणिभद्राला हात जोडून उभा असलेला पाहिले.

विजयपाल म्हणाला–"बेटा, तू एक शूर योद्धा आहेस. तू व्यूहरचनेत निष्णात आहेस. मी पलंगावर पडल्या पडल्याच प्रतिव्यूह रचवून तुझा पराभव केला. नाही तर तूच जिंकला असतास. माझ्या हाती तुझा पराभव होण्यात तू अपमान मानण्याचे मुळीच कारण नाही. मी तुझ्याशी तुझा मान राहील असाच संधी करणार आहे. मी आपल्या मुलीचा हात तुझ्या हातात देतो. तू हारला असलास तरी हे सर्व राज्य तुझेच आहे."

मणिभद्र ते ऐकून चकित झाला. त्याच वेळी जलजाने दरबारात प्रवेश केला. म्हणून त्याच्या तोंडातून विरोधसूचक एकही शब्द उमटला नाही. यथासमयी दोघांचा विवाह थाटामाटाने पार पडला.

काही दिवसांनी त्यांना एक मुलगा झाला. वृद्ध राजा नातवाला मांडीवर घेऊन आनंदाने खेळवीत तासन्तास बसे. सर्वात आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्याला आपल्या पराभवाची गोष्ट शेवटपर्यंत कळालीच नाही.



# परोपकारी

कित्येक वर्षांपूर्वी शिवपुरीला मोठा पूर आला होता. सर्व गावकरी शिवपुरी रिकामी करून सुरक्षित जागी जाण्याच्या फिकीरीत होते. त्यांना सुरक्षित प्रदेशात जावयाचे झाले तर नावेत बसूनच जाता येणे शक्य होते. तेथे एकच एक नाव होती. सर्व नावेत जाऊन बसले. परंतु गावातला सर्वांत श्रीमंत व चिक्कू म्हणून प्रसिद्ध रामगुप्त आणि एक भिकारी तेवढे उरले. रामगुप्त आणि तो भिकारी अगदी शेवटी नावेत बसायला धावले.

परंतु नाववाला नावेत बसले त्यांना म्हणाला–"आतां नावेत फक्त एका पुरतीच जागा आहे. दुसरा बसला तर नाव बुडून जाण्याची भीती आहे. म्हणून तुम्हीच ठरवा या दोघांपैकी कोणाला घ्यायचे?"

"हा चिक्कू माणूस कधी कोणाला मदत करीत नाही. या चिक्कू श्रीमंताला राहू द्या. भिकाऱ्याला घ्या चढवून." गावकरी म्हणाले.

"मी गावातला सर्वात जास्त श्रीमंत आहे. या भिकाऱ्याहून मी जास्त उपयोगी आहे की नाही?" श्रीमंत माणसाने विचारले.

"ते बरोबर आहे हो! परंतु या भिकाऱ्याला काही देऊन, आम्हाला थोडे का होईना पुण्य मिळवायला हा संधी देतो. तुम्ही आज पर्यंत कधी कोणावर उपकार केला असला तर सांगा!" गावकरी म्हणाले.















# नावावर व्यापार

कोंडदेव एका सामान्य कुटुंबातला माणूस होता. त्याला कोणतीही नोकरीसुद्धा मिळाली नाही. जी थोडी प्राप्ती होई ती त्याच्या कुटुंबाला पुरेशी होत नसे. म्हणून त्याची बायको त्याला काहीतरी व्यापार करायला सांगू लागली. परंतु व्यापार करायचा झाला तर भांडवल पाहिजे. त्यांच्याजवळ फक्त दोनशे रुपये होते.

कोंडदेव विचार करू लागला की एवढ्याशा भांडवलावर कोणता व्यापार करतां येईल? एके दिवशी दुपारी एक वयस्कर बाई त्यांच्याकडे आली आणि तिने प्यायला पाणी मागितले. कोंडदेवाच्या बायकोने गूळपाणी आणून दिले. पाणी प्याल्यावर त्या बाईला थोडे हलके वाटले. तिने विचारले—"मला तुमच्या घरी मदतीला ठेवून घेतां का? मी सगळी कामे करीन." तिचे नाव सावित्रीबाई होते.

कोंडदेव सावित्रीबाईला म्हणाला—"ताई! आम्ही स्वतःच कसाबसा संसाराचा गाडा चालवीत आहो. तुम्हांला कोणते काम देऊ आणि काय खायला घालू? काही व्यापार करावा म्हटलं तर भांडवल कोठून आणणार? शिवाय आम्ही फक्त नवराबायकोच आहो. आमच्या मदतीला आणखी कोणाची गरजच काय?"

"माझ्या करितां तुम्ही काही निराळा खर्च करण्याची गरजच नाही. तुम्ही जी मीठभाकर खातां त्यातलीच मला थोडी वाढा. मला खीरबासुंदीची गरज नाही. तुम्हांला थोडे फार भांडवल मी पुरवीन, तेवढीच माझी मदत" सावित्रीबाई म्हणाल्या.

"कोणता व्यापार करावा म्हणतां?" कोंडदेवाने विचारले.

"आंब्याचा मोसम आहे ना हल्ली? मला सर्व प्रकारची लोणची घालता येतात. आंब्याची लोणची घालायला तेवढा वेळही लागत नाही." सावित्रीबाई म्हणाल्या.

कोंडदेवाला ती सूचना आवडली. तो सावित्रीबाईंच्या सूचनेप्रमाणे लोणच्याला लागणारी सर्व सामुग्री घेऊन आला. सावित्रीबाईंनी लोणची घातली.

कोंडदेवाने लोणच्याच्या बाटल्या भरल्या आणि एका हातगाडीत घालून "सावित्रीबाईंची लोणची!", "सावित्रीबाईंची लोणची!" म्हणून ओरडत गावातल्या रस्त्या गल्लयांतून हिंडू लागला. लौकरच सर्व बाटल्या विकल्या गेल्या. कारण लोणची खरोखरच गिऱ्हाईकांना आवडली होती. गिऱ्हाइकांनीच आपल्या शेजारपाजारच्या लोकांना लोणच्यांचे वर्णन करून प्रचार केला होता.

आंब्यांचा मोसम होता, तोपर्यंत सावित्रीबाईंनी रात्रंदिवस मेहनत करून लोणची घातली. खूप विक्री झाली आणि कोंडदेवाला खूप नफा झाला.

आंब्यांचा मोसम संपला म्हणून सावित्रीबाई स्वस्थ बसल्या नाहीत. त्यांनी एका मागून एक लिंबाची व आवळयांची लोणची व मुरावळे करायला सुरवात केली. "सावित्रीबाईंची लोणची" असे म्हणत कोंडदेवाने गांवभर हिंडून लोणची विकली.

एका वर्षभरात कोंडदेवाचा लोणच्यांचा धंदा खूप वाढला. नंतर त्याने लोणच्यांचे दुकान काढले. दुकान भरून लोणच्यांच्या



बाटल्या व बरण्या भरून ठेवल्या. सर्व बाटल्यावर "सावित्रीबाईंची लोणची" अशी लेबले लावण्यात आली. लोणच्यांना गिऱ्हाइकेसुद्धा खूप येऊ लागली. सावित्री-बाईंचे नाव सर्वांच्या तोंडावर राहू लागले.

सावित्रीबाईंच्या नावाचाच गजर चहूकडे होत असलेला पाहून कोंडदेवाच्या बायकोला तो सहन होईनासा झाला. ती नवऱ्याला म्हणाली–"व्यापार तुम्ही करतां, मेहनत तुमची आणि मध्येच ही सावित्रीबाई कशाला? तुम्ही "कोंडदेवांची लोणची" म्हणून कां नाही विकत?"

कोंडदेव बायको म्हणाली त्याच्या विरुद्ध काही बोलू शकला नाही. त्याने आपल्या दुकानातल्या सर्व बाटल्यांवरची लेबले काढून टाकून "कोंडदेवांची लोणची" नावाची लेबले लावली. परंतु ते नाव पाहूल्यावर कोणी लोणची घ्यायला येईना आणि लोणच्यांचा व्यापार एकदम बंदच झाला. जे लोक 'सावित्रीबाईंची लोणची' घ्यायला येत ते 'कोंडदेवांची लोणची' [illegible] सांगितले की लोणची तीच आहेत, फक्त नाव बदलले आहे. परंतु काही उपयोग झाला नाही.

कोंडदेवाला लौकरच कळले की बाय-कोच्या सांगण्याप्रमाणे वागून आपण घोडचूक केली त्याने पुन्हा बाटल्यांवर व बरण्यांवर 'सावित्रीबाईंची लोणची' ही लेबले चिकटविली. थोड्याच दिवसात त्याला व्यापारात पुन्हा चांगली बरकत होऊ लागली.

व्यापार दिवसे दिवस वाढतच गेला. दोनएक वर्षातच सावित्रीबाईंनी इहलोकाची यात्रा संपविली. कोंडदेवाला वाटू लागले की त्याचा व्यापार बसणार. परंतु त्याच्या बायकोने त्याला समजावून सांगितले की सावित्रीबाई गेल्या तर काय झाले, तिने त्यांच्याकडून लोणची कशी घालायची हे चांगले शिकून घेतले आहे.

बायकोचे म्हणणे खरे ठरले. सावित्री बाई निवर्तल्या परंतु 'सावित्रीबाईचे नाव' चालू राहाले.



# भुकेचे औषध

गंगाराम हा रंगरावांचा एक विश्वासपात्र नोकर होता. तो त्यांच्या घरातली सर्व कामे करी, परंतु त्याला भूक आवरत नसे. किती खायला वाढले तरी त्याचे पोट भरत नसे. म्हणून तो रंगारावांच्या घरातच नाही, तर त्याला जो कोणी खायला घाली त्यांच्या घरची कामे करायला सुद्धा जाऊ लागला. ही गोष्ट रंगारावांना आवडली नाही. त्यांना वाटले की याची भूक भागवण्या काही तरी उपाय केला पाहिजे, म्हणजे हा इतर लोकांच्या घरी धावणार नाही. म्हणून रंगरावांनी एका साधूला विचारून भूक आवरायला काही तरी औषध आणले. ते चूर्ण रंगराव गंगारामाला दररोज प्यायला देऊ लागले.

त्या दिवसापासून गंगारामाची भूक कमी होऊ लागली. त्याने इतर लोकांकडे जायचे बंद केले. भूकच लागत नव्हती, मग काम तरी कशाला करायचे, म्हणून तो कामसुद्धा करीनासा झाला. म्हणून रंगरावांना भूक वाढवायला साधूकडून औषध मागून आणावे लागले.





# आजाराचे गुपित

राजशेखर एका सुखवस्तु कुटुंबातच जन्मला होता. परंतु दुर्दैवाने त्याचे आईवडील लौकर वारले व त्यांच्या पाठोपाठ त्यांच्या घरची सर्व इस्टेटही तो घालवून बसला. म्हणून तो तक्षशिला येथे विद्याभ्यासासाठी गेला; एका सुप्रसिद्ध आचार्याकडे त्याने वैद्यकीचा अभ्यास केला आणि 'रुद्रपूर' नावाच्या गावी येऊन त्याने वैद्यकी सुरू केली. लौकरच तो एक उत्तम वैद्य म्हणून प्रसिद्ध झाला. रामशर्मा नामक एक तरुण वैद्यकी शिकण्यासाठी त्याच्याकडे येऊन राहू लागला.

एके दिवशी गुणशेखर नावाचा एक माणूस आपल्या मोहिनी नावाच्या मुलीला राजशेखरकडे घेऊन आला. मुलीला काय आजार आहे, तपासून सांगायला त्याने राजशेखरला विनंती केली. मोहिनी दिसायला सुंदर होती. गुणशेखर तिचे लग्न करून देण्याच्या विचारात होता. परंतु त्याच वेळी मुलीच्या पायावर पांढरे डाग दिसू लागले. म्हणून तो राजशेखरकडे धावला.

राजशेखरने मुलीच्या पायावरचे डाग पाहिले व म्हणाला–"मुलीला पांढरे कोड झाले आहे. परंतु नुकतीच सुरवात झाली आहे." ते कळल्यावर गुणशेखर काळजीत पडला की मुलीला कोड असलेले लोकांना कळले तर मुलीशी लग्नाला कोणी तरुण तयार होणार नाही.

राजशेखरने गुणशेखरला धीर दिला. म्हणाला–"तुम्ही घाबरण्याचे मुळीच कारण नाही. या आजाराचे गुपित आपल्या दोघां व्यतिरिक्त तिसऱ्याला कळणार नाही. खुद्द मोहिनीलासुद्धा कळतां कामा नये की तिला अंगावर कोड निघाले आहे. दोन वर्षे औषध घेत राहिली तर सर्व कोड नाहीसे होईल. त्यानंतर निश्चित होऊन मुलीचे लग्न करून देता येईल."

राजशेखर मोहिनीला जे औषध देई ते निराळे एका पेटीत कुलूप लावून ठेवी? मोहिनीचा आजार काय व इलाज काय याचे गुपित त्याने कोणालाही कळू दिले नाही. लिहून त्या पेटीत ठेवून दिले. मोहिनीचे डाग हळूहळू नाहीसे होऊ लागले. तिच्या आजाराचे गुपित फक्त राजशेखरला व गुणशेखरलाच माहीत होते.

राजशेखरचा शिष्य रामशर्मा याला कळेना की मोहिनी इतके दिवस कोणत्या आजाराचे औषध घेत आहे. तिच्या रूपावर तो इतका भाळला होता की त्याने आपल्या मनात तिच्याशीच लग्न करायचे ठरवून टाकले होते. म्हणून तिच्या आजाराचे गुपित जाणून घ्यायचे औत्सुक्य त्याच्या मनात वाढत होते. परंतु उघड काही बोलणे त्याला शक्य नव्हते. कारण गुणशेखरला समाजात चांगलाच मान होता. त्याची बरोबरी करणे त्याला शक्यच नव्हते. परंतु काही युक्ती करून गुणशेखरच्या समाजातील प्रतिष्ठेला थोडा कलंक लावता आला तर मोहिनीला आपली करून घेता येईल, असे मात्र त्याला वाटले.



परंतु रामशर्मा विचार करीतच राहिला आणि मोहिनीचे लग्न एका कुलीन मुलाशी ठरले व मुहूर्तही ठरला. इकडे रामशर्माला मोहिनीच्या आजारास गुपितही कळलेच. एकदा राजशेखर घाईघाईत कोणत्यातरी रोग्याला औषध द्यायच्या गर्दीत मोहिनीच्या औषधाच्या पेटीला कुलूप लावायचे विसरून गेला. रामशर्मा टपूनच बसला होता. त्याने पेटी उघडून औषधे पाहिली व ती कोडा-वरची औषधे असल्याची त्याची खात्री झाली. रोगाचे नावही त्याला कळले. मोहिनी आतां दुसऱ्याची होणार या विचाराने त्याच्या मनातला ईर्ष्याग्नी पेटला. म्हणून ठरलेले लग्न मोडून मोहिनीला आयुष्यभर कुंवारीच राहू द्यायचे त्याने ठरविले. त्याने गावभर मोहिनीच्या आजाराचे गुपित सांगून टाकले.








रामशर्मा राजशेखरचा शिष्यच होता. त्याच्यापासूनही आजाराचे गुपित लपवून ठेवले गेले होते. म्हणून तो म्हणाला ते सर्वांना खरे वाटले.

म्हणून मोहिनीचे लग्न मोडले. गुणशेखरला संशय आला की राजशेखरनेच आपल्या शिष्याला मुलीच्या आजाराचे गुपित सांगितले असावे. म्हणून त्याने राजशेखरला भेटून त्याच्या या दुष्टपणाबद्दल त्याला दोष दिला.

राजशेखर शपथ घेऊन म्हणाला–"अहो, मी तुमच्या मुलीच्या आजाराचे गुपित आजपर्यंत कोणाला सांगितले नाही. परंतु माझ्याच चुकीमुळे माझ्या शिष्याला ते कळले. त्याबद्दलही मीच स्वतःला जबाबदार मानतो. आपण कृपा करून त्याच्या विरुद्ध फिर्याद करावी की त्याने खोटा प्रचार करून आपल्या मुलीचे लग्न मोडले. मी आपल्या बाजूने साक्ष द्यायला तयार आहे."

गुणशेखरने राजशेखरच्या सल्ल्याप्रमाणे रामशर्माच्या विरुद्ध मानहानीची फिर्याद [illegible] आले. त्यावेळी राजशेखर आपल्या जबानीत म्हणाला–"मोहिनीला कोड आतां उरलेले नाही. रामशर्माने ही गोष्ट माहीत नसता लोकांना सांगितले की तिला कोड आहे. लोकांना अर्थातच ती गोष्ट खरी वाटली. म्हणून जे लग्न मोडले आहे, ते मोडण्याचे मुळात कारणच नव्हते. वराच्या स्थानी मी असतो तर मी मोहिनीशी लग्नाला तयार झालो असतो.

त्यानंतर रामशर्माला गावात तोंड दाखविणे अशक्य झाले आणि तो गाव सोडून निघून गेला.

नंतर गुणशेखरने मोडलेले लग्न पुन्हा जुळविण्याचा प्रयत्न करण्याचा विचारच केला नाही. तिला त्या भयंकर आजारातून मुक्त करणाऱ्या राजशेखरसारख्या तरुण वैद्याशीच त्याने तिचे लग्न करून दिले. राजशेखरने तोपर्यंत लग्न केले नव्हते. म्हणून तो विवाह करून देणे गुणशेखरला शक्य झाले.






सुदर्शनशीच लग्न करण्याचा हट्ट शशिकलेने सोडावा असा सल्ला तिच्या आईने दिला. शशिकला म्हणाली–"आई, सुदर्शन रानावनात हिंडो किंवा सिंहासनाधीश असो; नवनिधी त्याच्याकडे नसतील. परंतु प्रेमाच्या समोर नवनिधींचे मोल काय? माझ्या मनांत सुदर्शनशिवाय इतर कोणाचा विचार सुद्धा येत नाही. कपाळावर जे लिहिलेले असते ते ब्रह्मदेवदेखील पुसून टाकणे शक्य नाही. "विधिलिखित ललाटे प्रोज्झितुं कः समर्थः?" निस्वार्थ बुद्धीने पतीची सेवा करणाऱ्या साध्वीला स्वर्ग प्राप्त होते. माझ्या भवितव्याचा निर्णय स्वतः जगदंबेने घेतला आहे. मी सुदर्शनशीच विवाह करणार!"

शशिकलेचे ते उत्तर तिच्या आईने पतीला कळविले.

स्वयंवराची वेळ जवळ येऊन ठेपली; परंतु सुदर्शन आला नाही. शशिकला आपल्या एका हितचिंतक ब्राह्मणाला गुप्तपणे बोलावून घेऊन म्हणाली–"गुरुवर्य! वडिलांना कळू न देता तुम्ही भरद्वाज आश्रमात जावे व सुदर्शनला भेटून माझ्या वतीने निवेदन करावे की महादेवीने स्वतः सुदर्शनशी विवाह करण्याचा आदेश दिला आहे. स्वयंवरासाठी सर्व देशांचे राजे व राजकुमार आले आहेत. परंतु माझे मन तर आपणच हिरावून घेतले आहे. आपल्याशी विवाह करणे शक्य झाले नाही तर मी अग्निप्रवेश करून आपले नाव घेत प्राण-



त्याग करीन. देवीच्या अनुग्रहाने आपल्याला सर्व सुख प्राप्त होईल. जगन्मातेवर भरंवसा ठेऊन आपण माझे पाणिग्रहण करावे."

ब्राह्मणाला निरोपाबरोबर दक्षिणा देऊन शशिकलेने त्याला भरद्वाज मुनींच्या आश्रमाकडे पाठविले. त्या ब्राह्मणाने सुदर्शनला भेटून शशिकलेचा निरोप सांगितला. सुदर्शन लगेच स्वयंवराला निघाला.

ते कळल्यावर त्याची आई मनोरमा घाबरली. ती अत्यंत दु:खी मनाने म्हणाली– "इतके मोठे राजे व राजकुमार जेथे एकत्र झाले आहेत तेथे तू एकटा जाऊ नकोस. युधाजित तर तुझा जीव घ्यायला टपून बसलेला आहे. म्हणून मी सांगते ते ऐक."

सुदर्शन तिची समजूत घालीत म्हणाला– "आई, मी देवीच्या आज्ञेचे पालन करीत आहे. तू क्षत्रिय नारी आहेस, भिऊन कसे चालेल? जे व्हायचे असेल त्याला हसत हसत तोंड द्यायलाच हवे!" या शब्दात आईला धीर देऊन तो निषाद राजाकडून मिळालेल्या रथात बसून निघाला.

मनोरमा मुलाला आशीर्वाद देऊन म्हणाली–"बाळा! मी तुला सोडून एक क्षणभरही राहू शकणार नाही. मलासुद्धा बरोबर घेऊन चल."

सुदर्शनने आईला व तिच्या सेवेला सैरंध्री दासीला रथात बसवून घतले आणि काशीला आला. राजा सुबाहू त्याला सामोरा आला आणि त्याने सुदर्शनच्या उतरण्यासाठी सुरक्षित जागी व्यवस्था केली. सेवेला दासदासी नेमले.

युधाजित आपल्या नातवाला घेऊन स्वयंवरासाठी त्या पूर्वीच येऊन दाखल झाला होता. इतर राजे व राजकुमार त्याला येऊन भेटले व सुदर्शन आल्याबद्दल आश्चर्य व्यक्त करीत म्हणाले–"इतक्या सर्व राजे रजवाड्यांच्या गर्दीत सुदर्शनही स्वयंवराला आला आहे? त्याला स्वप्न पडले असावे की राजकन्या सर्व थोर राजे रजवाड्यांना सोडून त्यालाच वरमाळा घालायला येते आहे!"

ते ऐकून युधाजित म्हणाला–"तुम्ही सर्व पहात रहा. मी या सुदर्शनचा सर्वांसमक्ष वध करतो."

तेव्हां केरळचा राजा युधाजितला म्हणाला–"हे पहा, हे स्वयंवर आहे. वधूला जो पसंत असेल त्यालाच ती वरमाळा घालणार! शिवाय आपण अन्यायाने सुदर्शनचे सिंहासन बळकावून आपल्या नातवाला त्यावर बसविले आहे. तरी कदाचित आपल्या नातवालाच राजकन्या पसंत करील. कदाचित सुदर्शन युद्धात आपला पराभव करील. काय वाटेल ते होवो, शेवटी 'यतोधर्मस्ततो जय:' शेवटी धर्माचाच सत्याचाच जय होईल. आपण अन्याय करण्याचे मनाशी ठरविले आहे. राजकन्या शेवटी एकाचीच निवड करणार. इतरांनी त्याबद्दल राग किंवा ईर्ष्या करण्याचे कारणच काय?"

ते ऐकून युधाजित म्हणाला–"तुमच्या म्हणण्याप्रमाणे हे स्वच्छेने होणारे म्हणजे 'स्वयंवर' आहे. आम्हांला आनंदच होईल, राजकन्येने हजर असलेल्या राजांपैकी किंवा राजकुमारांपैकी कोणालाही माळा घालावी. परंतु राजकन्येने एखाद्या अनाथ माणसाला वरमाळा घातली तर आम्ही सर्वांनी ते निमूटपणे पहात राहायचे काय? ब्राह्मणांची शक्ती वेदविद्या आहे, तर क्षत्रियांची



धनुर्विद्या. क्षत्रिय आपल्या पराक्रमाने आपली वधू प्राप्त करतो. ही वधू पराक्रमी शूर पुरुषाची दौलत आहे!"

त्यानंतर या गोष्टीवर राजकुमारात परस्पर पुष्कळ बाचाबाची झाली. शेवटी सर्वांनी सुबाहूला बोलाविले. सुबाहूने सर्वांचे म्हणणे शांतपणे ऐकून घेतले व म्हणाला–"सन्माननीय राजपुरुष हो! माझ्या मुलीने मनाने सुदर्शनला वरले आहे. म्हणून जे व्हायचे असेल तेच होईल. तेव्हां हा वादविवाद फुकट आहे!"

सुबाहूचे मत सर्वांना कळले. म्हणून सर्व राजांनी सुदर्शनलाच बोलाविले व म्हणाले–"हे पहा, सुदर्शन! तू एकटा



आला आहेस. दुसरे सर्व राजे व राजकुमार ससैन्य शशिकलेशी विवाह करण्याचे मनाशी ठरवून आले आहेत. ते गरज पडल्यास युद्ध करून तिचे पाणिग्रहण करणार आहेत. तुझा धाकटा भाऊ शत्रुजित शूर व पराक्रमी आहे. योग्य आणि रूपवानही आहे. त्याच्या मदतीला तुझा वध करण्याची प्रतिज्ञा करून त्याचे आजोबा युधाजित आले आहेत. तू या स्वयंवराला हजर राहण्याचे ठरवून मोठी चूक केली आहेस. तुला स्वयंवराचे निमंत्रण तरी कोणी दिले आहे का? ते काही असो, आम्ही तुला सावध करीत आहो! त्या ऊपर तुझी मर्जी!"

"नृपवृंद हो! तुम्ही माझ्यावर जी एवढी कृपा केलीत त्याबद्दल मी तुमचा ऋणी आहे. परंतु मी इतका दूर आलोच आहे, तर भिऊन कसे चालेल? सर्व जबाबदारी मला इकडे पाठविण्याची प्रेरणा करणाऱ्या महादेवीची आहे. ती मला या सर्व शत्रूंच्या समोर बळी म्हणून टाकून देऊन स्वस्थ बसेल का? मला स्वतःचा असा कोणी शत्रू नाही की मित्र नाही. मला सर्वत्र महादेवीच दिसते. तिच्या आज्ञेप्रमाणे मी या स्वयंवराला आलो आहे. याबद्दल कोणाला राग आला असेल तर त्याला देवी जाब विचारील. तुम्ही म्हणालात, मी एकटा आहे, माझ्या जवळ सैन्य नाही; मला सैन्याची गरजच वाटत नाही. जी महादेवी दुर्बलांना बल देते व संपत्ती देते ती माझ्या पाठीशी उभी आहे. म्हणून मला इतर शक्तीची गरज नाही व कोणाला भिण्याचे कारणही नाही. महादेवीचा ज्याच्यावर अनुग्रह होतो तोच बलवान होतो. देवीचा अनुग्रह नसेल तर प्रत्यक्ष ब्रह्मदेवसुद्धा दुर्बल ठरतो. माझा जय होवो, किंवा पराजय होवो, तो जगदंबेचा आहे, माझा नाही! म्हणून आपण सर्वांनी माझी चिंता करण्याचे कारण नाही."

ते ऐकून काही राजकुमार खूष झाले व म्हणाले—"मित्रा! तू म्हणालास ते सर्व खरे आहे. तू पुण्यवान आहेस! परंतु युधाजित तुझा वध करण्याची प्रतिज्ञा करून आला आहे, ही गोष्ट विसरू नकोस!"

तेव्हां सुदर्शन म्हणाला—"नृपवृंद हो! तुम्हां सर्वांची माझ्यावर अपार कृपा आहे. म्हणूनच तुम्ही सर्व माझे हिताचे काय ते सांगण्यासाठी आलात. परंतु विधात्याच्या या सृष्टीत मृत्यू हा कोणाच्या म्हणण्याप्रमाणे वागत नसतो. प्रत्येक प्राणी आपापल्या कर्माप्रमाणे फळ प्राप्त करतो. कोणाला स्वतःची अशी स्वेच्छा नसतेच. काल व कर्म हेच सर्व बाबतीत निर्णायक असतात. वेळ आल्याशिवाय कोणी कोणाचा वध करू शकत नाही. स्वतः यमदेखील निमित्तमात्र असतो. माझ्या पित्याचा वध करणारा सिंह आणि माझ्या आजोबांचा वध करणारे युधाजित हेदेखील निमित्तमात्र आहेत. मृत्यू व्हायचाच असेल तर तो कोणी थांबवू शकत नाही. मानव स्वतःचे किंवा इतराचे रक्षण म्हणून काय करतो? ईश्वराची कृपा असेल तर मनुष्य एक हजार वर्षे जिवंत राहील. मी देवावर भरवसा ठेवून येथे आलो आहे. माझ्या



होय! किंबहुना, माझा कोणी शत्रू असेल तर तोदेखील ईश्वरच आहे!"

ते ऐकून सर्व सुदर्शनच्या तत्वज्ञानाची स्तुती करीत निघून गेले.

दुसऱ्या दिवशी स्वयंवराचा मुहूर्त होता. सुवाहूचे निमंत्रण ज्यांना ज्यांना मिळाले होते ते सर्व स्वयंवराच्या मांडवात उपस्थित होते व शशिकलेची वाट पहात होते. शशिकला कोणाला वरण करील, हाच विचार प्रत्येकाच्या मनात होता. काही जण निश्चयपूर्वक सांगत होते की ती सुदर्शनला सोडून इतर कोणाला वरमाळा घालणार नाही. काही जण, तसे



मंगलवाद्ये वाजू लागली. शशिकला स्नान करून वधूसाठी ठरलेली वस्त्राभूषणे धारण करून व हातात वरमाळा घेऊन आपल्या सखींबरोबर मांडवात आली. परंतु ती एका खांबाजवळ काहीतरी विचार करीत उभी राहिली.

राजा सुबाहूने जवळ जाऊन तिला स्मित वदनाने विचारले–"मुली! आज तुझे पाणिग्रहण करण्यासाठी मोठमोठे रूपवान व पराक्रमी राजकुमार या मांडवात हजर आहेत. तुला त्यांच्यापैकी जो पसंत असेल त्याला पुष्पमाला घाल!"

शशिकला म्हणाली–"बाबा! हे सर्व एकाहून एक कामुक, उन्मत्त, दुष्ट व घेऊन नये. [illegible] पतीशिवाय इतर कोणाचे तोंडही पाहू नये. वरमाला हातात घेऊन अनेक पुरुषांसमोर जाणारी स्त्री वारांगनाच नाही का? मी वारांगना आहे का, या सर्वांसमोर जायला? मी सुदर्शनची पत्नी आहे, त्यांनाच मी मनाने वरले आहे. इतर कोणाला पाहण्याची मला गरजच काय? मी स्वतःचा अपमान करून कां घेऊ? जग पालटले तरी मी इतर कोणाकडे पाहणार नाही व कोणाला वरमाला घालणार नाही. तेव्हां आपण आज किंवा उद्यां माझे सुदर्शनशी लग्न लावून द्यावे!"

शशिकला म्हणाली ते ऐकून सुबाहू संकटात पडला. स्वयंवरासाठी आलेले राजकुमार शूर व पराक्रमी होते. त्यांची संख्यासुद्धा थोडीथोडकी नव्हती. त्यांना नम्रपणे विनंती केली तर ती मान्य करून ते परत जाणे अशक्य होते. त्याला या संकटातून सोडवू शकणारा एकटा सुदर्शनच होता. इतर राजे तर त्याचे प्राण हरण केल्याशिवाय परतणे शक्य नव्हते.

असा विचार करून राजा सुबाहू नम्रपणे राजे व राजकुमार बसले होते तेथे गेला आणि हात जोडून म्हणाला–"हे दयावान व थोर राजपुरुष हो! मी आपणांसमोर हात जोडून एक विनंती करावी

म्हणतो. आपण माझ्या या अपराधाबद्दल मला क्षमा करावी. मी आपला सत्कार करून अत्यंत आदरपूर्वक आपणांला निरोप देणार आहे. आपण आपापल्या राजधानीस परत जाण्याची कृपा करावी. मी आपल्या मुलीला किती समजावून सांगितले. परंतु ती सुदर्शनला सोडून इतर कोणाला वरण्यास तयार नाही. माझ्यामुळे आपणां सर्वांना विनाकारण त्रास सोसावा लागला. आपण माझ्या या अपराधाबद्दल मला क्षमा करू शकलात तर मी आपणांला हत्ती, घोड गावे, दासदासी, रत्न, धन, जास्त काय आपले सर्व राज्य द्यायला तयार आहे!"

सुबाहूची ती विनंती ऐकून कोणीही काही बोलला नाही. एकटा युधाजित दांत ओठ चावून म्हणाला—"तू हे सर्व काय बरळतो आहेस रे? तू मूर्खपणाने मुलीचे स्वयंवर सुदर्शनशी करण्याचे ठरविलेस आणि येथे हजर असलेल्या राजांना व राजकुमारांना पळवून लावण्यास स्वतःला असमर्थ समजून तू नम्रपणाचे सोंग करतो आहेस! आम्ही सर्व मूर्ख आहो, असे वाटले आहे का तुला? तुझ्या मनात तशी शंका पूर्वी पासूनच होती तर तू आम्हां सर्वांना बोलावण्याचा मूर्खपणा केलासच कां? आतां तुझे रडणे आणि विनवण्या फुकट आहेत. तू पहात रहा, मी तुझा गर्वभंग करून सुदर्शनचा वध करतो आणि आपल्या नातवाशी तिचे लग्न लावून देतो. सुदर्शनला मी डासामुंगीसारखा चिरडून टाकीन. हे सर्व राजे एकत्र होऊन माझ्याशी युद्धाला उभे राहिले तर मी त्यांना सर्वांना यमसदनी पाठवीन. मी एकदा सुदर्शनला भरद्वाज मुनींच्या आश्रमात पाहून मी जीवदान दिले. आज मात्र मी कोणत्याही परिस्थितीत त्याला सोडणार नाही. तू आपल्या मुलीचा विवाह माझ्या नातवाशी करून स्वतःचे व स्वतःच्या राज्याचे रक्षण कर. नाहीतर तू आपल्या मुलीला समजावून सांग की सुदर्शनला सोडून तिने आणखी वाटेल त्याला वरमाळा घालावी."





# आळशी करतो शेती

नारायण एक कमालीचा आळशी तरुण युवक होता. परंतु त्याला स्वतःच्या कर्तबगारीवर अपार विश्वास होता. त्याचा बाप दिवसभर शेतात काम करी. ते पाहूनही नारायणाला शेतावर कामाला जायची स्फूर्ती झाली नाही. तो ओटयावर बसून आपल्या कर्तबगारीच्या फुशारक्या मात्र मारी.

कोणी वडीलधारी व्यक्ति त्याला म्हणे—"काय रे, तू तरुण मुलगा, बापाला थोडी मदत केलीस तर शेतात सोने पिकेल. दुसरी मुलं नाही का बापाबरोबर कामाला जात? तू बापाबरोबर काम केलेस तर सहजी काम शिकशीलही. बापालासुद्धा थोडा हातभार मिळेल!" तेव्हां नारायण त्यांना उत्तर देई—"अहो काका, शेतीभातीच्या कामासाठी वर्षभर मरण्याची गरजच काय? शेतीची सर्व कामे घरबसल्या मी तुमच्याहून कमी खर्चात करून दाखवीन, माहीत आहे?"

नारायणाच्या बापाने विचार केला, आपण घरात आहो तोपर्यंत मुलाचा आळशीपणा जायचा नाही. असा विचार करून त्याने शेतीच्या कामाची सर्व जबाबदारी मुलावर टाकली आणि तीर्थयात्रेसाठी म्हणून निघून गेला.

नारायणाला आतां त्याचे कौशल्य व कर्तबगारी दाखवायला चांगली संधी मिळाली. लावणीची वेळ आली. त्याने विचार केला, त्यासाठी शेतावर जाण्याची गरजच काय? तो त्याच्या शेजारी लखुजी रहात असे, त्याच्याकडे गेला आणि म्हणाला—"काका, तुम्ही लावणीची कामे करणार आहां ना, मग माझ्या शेतातली लावणीची कामे आपल्याबरोबर करून टाकता का? मी नोकराला पाठवितो



तुमच्याबरोबर. तुमच्या हाताला चांगला गुण आहे, असं बाबा सांगत असत मला म्हणून तुम्हांला त्रास देतो आहे."

लखुजीने नारायणाला खालपासून वरपर्यंत एकदा पाहिले व म्हणाला—"बरोबर म्हणालास! एवढयाशा कामासाठी तुला घाबरण्याचे कारणच काय? तुला आणखी कोणत्याही कामाची मदत हवी असेल तर मला निःसंकोच सांग, बरं का? मी करीन" अशा तऱ्हेने नारायणाला लावणीच्या कामातून सुटका मिळाली. तो आपल्या चातुर्याबद्दल स्वतःच खूष होता. खत घालायला, पाणी लावायला नारायणाला शेताकडे जाण्याची गरज उरली नाही. कारण ते काम लखुजीच करी. बेणण्याच्या वेळी नारायणाचा नोकर मजुरांना घेऊन शेतावर गेला आणि ते काम पण परस्पर झाले.

एके दिवशी पारधी येऊन नारायणाला नमस्कार करून म्हणाला—"मालक! तुमच्या शेतातले उंदीर दरवर्षी मीच पकडतो. हुकूम असेल तर या वर्षीही ते काम मी करतो."

"तू काय घेणार रे?" नारायणाने विचारले.

"उंदराला पावली दर आहे, मालक!" पारधी म्हणाला.

"मी फक्त वीस पैसे देईन!" नारायण म्हणाला.

दुसऱ्या दिवशी पारधी बासष्ट उंदीर धरून घेऊन आला आणि वीस पैसे प्रमाणे मजुरी घेऊन गेला. जातांना सांगून गेला, "पुन्हां मळणीच्या वेळी येईन."

नारायण उंदरामागे पांच पैसे वाचविल्याबद्दल स्वतःच्या अकलेची स्वतःच स्तुती करू लागला व इतरांना मूर्ख ठरवू लागला.

एके दिवशी नारायण गावाच्या कचेरीतून परत येत असता सदू शेतकरी त्याला म्हणाला—"हे पहा, मुला! तुझ्या शेताला कीड लागल्यासारखी दिसते आहे. म्हणून तू एकदा डीडीटीचा फवारा कां नाही मारून घेत?"

नारायण लगेच म्हणाला—"तुम्ही नाही का फवारा मारणार आपल्या शेतावर, तेव्हां मीसुद्धा मारून घेईन."

"मी उद्यांच फवारा मारून घ्यावा, म्हणतो. पाहिजे तर तूसुद्धा चल बरोबर!" सदू शेतकरी म्हणाला.

नारायण थोडा मागेपुढे करीत म्हणाला—"सदू काका! तुम्ही माझ्यावर थोडी मेहरबानी करा व मला थोडी मदत करा. मला उद्या एक जरूरी काम आलं आहे. तुम्हांला हरकत नसेल तर आपल्या शेताबरोबर माझ्या शेतावरसुद्धा फवारा मारवून घ्या. मी त्याबद्दल आतांच पैसे देऊन ठेवतो."

सदू शेतकरी त्या गोष्टीस कबूल झाला व पैसे घेऊन निघून गेला.

कापणीचे काम सुद्धा नारायण गेल्याशिवायच झाले. नारायण विचार करू लागला, लोक काय वेडे आहेत? शेतीच्या कामासाठी उगाच केवढा त्रास सोसतात? त्याला स्वतःच्या कर्तबगारीवर अभिमान वाटू लागला.

मळणीच्या वेळी सुद्धा लखुजी, सदू शेतकरी आणि पारधी तिघांनी नारायणाला मदत देण्याचे कबूल केले. नारायणने झोड-



पणी व मळणीच्या वेळी तरी खळयावर जाणे आवश्यक आहे, असा विचार केला. त्या दिवशी तो आळशीपणा सोडून पहाटे उठून खळयाकडे धावला.

सर्वांच्या शेतात पहाटेच कामे सुरू झाली होती. परंतु नारायणने जाऊन पाहिले तर त्याच्या शेतात अजून मजूर कामाला उठले नव्हते. सर्व बसून चकाटया पिटीत होते. नारायण त्यांच्या दृष्टीस न पडतां ते काय बोलत आहेत, ऐकत राहिला.

लखुजी नारायणच्या नोकराला म्हणत होता—"तू नशीबवान आहेस, बुवा! चांगलं फसविलं आहेस की मालकाला. त्याच्या मेहेरबानीने माझ्या शेतातली लावणीची

कामे फुकटात झाली. सर्व कामें मी त्याची … केली तर फुकटात करीन का? आपल्या शेतातला लावणीचा खर्च सुद्धा त्याच्या बोडक्यावर मारला. तू किती पैसे मिळविलेस, बोल!"

नोकर स्मित करून म्हणाला—"मी काही तसे जास्त कमावले नाहीत. दहा जणांना कामाला लावलं आणि मालकाकडून पंधरा जणांची मजुरी वसूल केली."

"माझ्या पिकाला कीड लागू लागली तेव्हां माझ्याजवळ फुटकी कवडीसुद्धा नव्हती. तेव्हां मला नारायणाची गोष्ट आठवली. मी त्याला म्हणालो—"नारायणा! फवारा नाही का मारवणार?" त्याने ते सर्व काम करवून घ्यायला मलाच पैसे दिले. आळशी माणूस आहे. त्याच्या मेहेरबानींने माझ्या शेतावरचा फवारा फुकटात निघाला." सदू शेतकरी म्हणाला.

"मालक! मी सुद्धा एक गंमत सांगून मोकळा होतो. मी दिवसभर काम करून चार जणांच्या शेतातले उंदीर धरून … पैसे घेतले व नारायण मालकांकडे जाऊन ते उंदीर दाखवून म्हणालो—"मालक! आपल्या शेतात या उंदरांनी काय धुमाकूळ मांडला होता! मालकांनी खरे मानून इतरांकडून मी उंदरामागे चार आणे घेतले होते तर मला उंदरामागे फक्त वीस पैसे दिले व त्यांना खुशी वाटली की त्यांनी उंदरामागे पांच पाच पैसे वांचविले. खरी गोष्ट सांगू, त्यांच्या शेतात फक्त दहाच उंदीर निघाले." पारधी म्हणाला.

"तर मग उठा लागू या कामाला!" लखूजी म्हणाला.

"कसली आहे रे घाई? उजाडल्यावर करू सावकाश." सदू शेतकरी म्हणाला.

आड बसून नारायण सर्व ऐकतच होता. सर्वांनी आपल्याला फसविले तर! त्याने कानाला खडा लावला. दुसऱ्या वर्षापासून तो शेतीची सर्व कामं जातीने पाहू लागला. त्याला आळशीपणाचा बराच दंड सोसावा लागला होता.



# भांडखोर बायको

एका गावी जगपती नावाचा एक तरुण माणूस रहात असे. त्याने एका सुंदरमुलीला पाहून तिच्याशी लग्न केले. ती होती भांडखोर. तो अगदी बेजार झाला. शेवटी एका मित्राजवळ त्याने आपली रडकथा सांगितली. त्याच्या मित्राने सुचविले की त्यांच्या गावात कोणी साधू आला आहे आणि गावकरी त्याच्यासमोर आपली दुःखे सांगतात व साधू त्यांना तोड सुचवितो. जगपतीने साधूला आपली रडकथा सांगितली.

सर्व शांतपणे ऐकून घेऊन साधू म्हणाला—"तरुण गृहस्था! मी आपल्या भांडखोर बायकोच्या त्रासाने वैतागून साधू झालो आणि भटकतो आहे. मी तुला काय सल्ला देणार?"

त्यानंतर शेजारच्या गावी कोणी नित्यानंदस्वामी नावाचा योगी आला होता त्याच्या दर्शनाला गेला व आपले दुःख निवेदन करून काही मार्ग काढायला विनंती केली.

नित्यानंद म्हणाले—"बाबा रे! मी जन्मलो तेव्हांपासून दरिद्र म्हणून माझे लग्नच झाले नाही. मला गृहस्थीचा अनभव मुळीच नाही. मी तुला काय सल्ला देणार?"

जगपती तेथून निघाला. त्याच वेळी त्याच्या पाठीमागून येऊन कोणीतरी विचारले—"काय रे, बाबा! तुझ्यावर कोणते एवढे संकट आले आहे? माझे नाव चंद्रभानू. बोल मग."

जगपतीने चंद्रभानूला सर्व सांगितले. तेव्हां चंद्रभानू म्हणाला—"बाबा रे! मी आपल्या भांडखोर बायकोच्या त्रासाने वैतागून आत्महत्या करून घेतली, आता माझी बायको यमराजाची वाट पहाते आहे. मला भीती वाटू लागली आहे की ती मेल्यावर माझ्या पाठीस तर लागणार नाही ना!" असे म्हणत चंद्रभानू अदृश्य झाला.












**टी. गोपीकृष्ण, नेल्लूर (आंध्र)**

प्र.: पृथ्वीचे वजन कसं कळलं हे सांगाल का?

उ.: एखाद्या वस्तूचे 'वजन' किती आहे हे गुरुत्वाकर्षण शक्तीमुळे, त्या शक्तीचा किती प्रमाणात प्रयोग करावा लागतो यावरून कळते. एकाच वस्तूचे वजन जमिनीवर, उंच डोंगरावर, भूमध्य रेषेच्या जवळपास व ध्रुव प्रदेशात निरनिराळे असते. म्हणजे वस्तूंत "स्वेच्छा पतन" म्हणून असते असे म्हणावे लागते. ती स्थिती विना वजनाची स्थिती असते. कृत्रिम उपग्रहात हिंडणाऱ्याला वजन नसते. त्या प्रमाणे सूर्याभोवती पृथ्वी फिरते ती तिची 'स्वेच्छा पतन' अवस्था असते. पृथ्वीला वजन नसते. प्रदर्शनात आपण 'जायंट व्हील' वर बसतो ना? त्यांत आपण वर जातों तेव्हां आपले वजन थोडे वाढते, खाली येतो तेव्हां थोडे घटते. पृथ्वीत गुरुत्वाकर्षण शक्ती असल्यामुळे त्यावरच्या प्रत्येक वस्तूचे कमी जास्त वजन असते. चंद्रात सुद्धा गुरुत्वाकर्षण शक्ती असते, परंतु ती पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणाच्या मानाने सहाण्ट कमी असते. म्हणजे पृथ्वीपेक्षा चंद्रावर वस्तूचे वजन सहापट कमी असते. गुरुत्वाकर्षण वस्तूतल्या 'द्रव्या' वरून [illegible]. वजन बदलते, परंतु वस्तूतले 'द्रव्य' मात्र नेहमी एकच असते. पृथ्वीत व चंद्रातही 'द्रव्य' असतेच. म्हणून दोन्ही परस्परांना आकर्षित करतात. परंतु चंद्राच्या आकर्षण शक्ती पेक्षा पृथ्वीची आकर्षण शक्ती पुष्कळ जास्त आहे. म्हणून रॉकेट्सच्या मदतीने अंतरिक्ष यात्रा करणाऱ्यांच रॉकेट जळत असेपर्यंत वेग वाढत असतो. शेवटी रॉकेट जळण्याचे थांबताच अंतरिक्ष नौकेचे "स्वेच्छा पतन" सुरू होते. आवश्यक वेग असेल तर ती नौका पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षण शक्तीच्या कक्षेबाहेर जाऊन चंद्राच्या गुरुत्वाकर्षण शक्तीच्या कक्षेत गेल्यावर तिचा वेग [illegible] तेव्हां अंतरिक्ष यात्रिकाचे वजन पुन्हा थोडें वाढते. परंतु चंद्राच्या चहूकडच्या कक्षेत [illegible] चारीबाजूला कक्षेत फिरणाऱ्या कोणत्याही





# अघटित अनपेक्षित

[७३]

चौथे मित्र म्हणाले ते ऐकून घेऊन भैरवानंदांनी आनंदाने त्या चौघांना चार मंत्रवलेले दिवे तयार करून दिले व म्हणाले—"तुम्ही हिमालय पर्वतावर जा. त्या प्रांतांत ज्या जागी दिव्याची बत्ती पूर्णपणे जळून जाऊन खाली पडेल त्या जागी नक्की निधी सापडेल. ती जागा खणून जो निधी सापडेल तो घ्या. निसर्ग नियम मात्र मोडू नका. तुमचं दारिद्र्य पूर्णपणे नष्ट होण्यापुरते धन मिळाले की तुम्ही सर्व आपापल्या घरी जा."

चौघांनी भैरवानंदांचे आभार मानले व हिमालय पर्वताकडे निघाले. ते हिमालयाची चढण थोडीच चढून गेले असतील, अल्प लोभीचा दिवा जोराने जळू लागला आणि बत्ती पूर्णपणे जळून जाऊन खाली पडली. त्याने बत्ती जेथे पडली तेथे खणून पाहिले तर त्याला तांब्यांच्या नाण्यांचा निधी सापडला.

तो आनंदाने म्हणाला—"आपण आपल्या सर्वांना उचलून नेता येतील तेवढी नाणी उचलून घरी जाऊ या."

"अरे वेड्या! या तांब्याच्या नाण्यांनी का आपले दारिद्र्य जाणार आहे? पुढे जाऊ या, चल." बाकी तिघे म्हणाले.

"तुम्ही जा, मी नाही येत. मला हा तांब्याचा निधी पुरे." असे सांगून अल्प-लोभी तीन हजार नाण्याची एक मोट तयार करून ती घेऊन घरी निघून गेला.

दुसऱ्या दिवशी पुढे जात असतां मित लोभीच्या दिव्याची बत्ती जळून जाऊन खाली गळून पडली. तेथे त्याने खणून पाहिले तर त्याला चांदीच्या नाण्याचा ठेवा सापडला.



त्याला परमानंद झाला. तो म्हणाला– "मित्रानो! आपल्याला उचलून नेता येतील तेवढी नाणी उचलून नेऊ या, चला. आणखी पुढे जाण्याची गरजच काय?"

तेव्हां इतर दोघे म्हणाले–"वेडया, पहिल्याने तांब्याची नाणी मिळाली. त्यानंतर चांदीची मिळाली. पुढे सोन्याची मिळतील. म्हणून पुढे जाऊ या, चल."

"माझं समाधान चांदीच्या नाण्यावर झालं आहे. मी नाही पुढे येत." असे सांगून मितलोभी पांच हंजार चांदीची नाणी घेऊन घरी निघून गेला.

बाकी दोघे पुढे निघाले. दुसऱ्या दिवशी गळून पडली. त्या जागी खणून पाहिले तेव्हां सोन्याच्या मोहरांचा सांठा सांपडला.

"आपण नेता येतील तितकी नाणी घेऊन जाऊ या, चल." तो मनाचे पूर्ण-समाधान झाल्यासारखा अत्यंत लोभीला म्हणाला.

तेव्हां अत्यंतलोभी म्हणाला–"अरे मूर्खा! पहिल्याने तांब्याची, नंतर चांदीची व आतां सोन्याची नाणी मिळाली. आतां मिळेल तो निधी हिऱ्यामाणक्यांचा असेल. त्यातला एकच हिरा आयुष्य भराचे दारिद्र्य कायमचे नष्ट व्हायला पुरेसा होईल! तेव्हां जेवढी उचलून नेता येतील तितकी रत्ने उचलून नेऊ या. राज्येच विकत घेता येतील आपल्याला. तू सोन्याचे जेवढे ओझे उचलून नेऊ शकशील तेवढे सोने एक रत्न दिले तर मिळेल. हे भिकारडे सोने उचलून नेले नाही तर काय बिघडणार आहे?"

अतिलोभी त्याला म्हणाला–"मित्रा! मला सोने मिळतं आहे तेवढे पुरे. आपण निघालो ते दारिद्र्य नष्ट व्हावे यासाठीच नाही का? राज्ये विकत घेण्यासाठी नाही. आपण आयुष्यभरात कधी हातसुद्धा लावून पाहिले नाही, अशा सोन्याला तू भिकारडे सोने म्हणतोस कारे? मला हे अती मूल्यवान वाटते आहे. मी याच्या मदतीने आयुष्यभर श्रीमंतासारखा राहीन व दारिद्र्यावर विजय प्राप्त करीन. त्याहून जास्त मला कसलीच अभिलाषा नाही. फार लोभ करणे बरोबर नाही."

अत्यंतलोभी म्हणाला–"महत्वाकांक्षा जेवढी मोठी तेवढी प्राप्ती! ही गोष्ट मी सिद्ध करून दाखवीन."

"मी पुढे आतां येणार नाही बुवा! मला मिळाले ते धन पुरे! परंतु मी येथे बसून तुझी वाट पहातो. आपण दोघे मिळून परत जाऊ." अतिलोभी म्हणाला.

अत्यंत लोभी एकटा पुढे निघाला. थोडया वेळाने चढण जास्त जास्त उभी होत गेली व चढणे जास्त कठीण होऊ लागले. तीन दिवस झाले तरी दिवा जळून वात खाली पडण्याची लक्षणे दिसत ना. तो एका खोलगट जागेत शिरला. ते अगदी निर्जन स्थान होते. तेथे पाणीसुद्धा दिसत नव्हते. ऊन वाढत होते. कोठे पाण्याचे चिन्ह सुद्धा नव्हते आणि एकही प्राणी दृष्टीस पडत नव्हता. त्याने खूप प्रयत्न करून पाहिला, परंतु कीड मुंगीसुद्धा दृष्टीस पडली नाही. सरळ रस्ता संपत आला होता, पुसट पाऊल वाट दिसत होती, परंतु तिच्यावर कांटेरी झाडे उगवलेली होती. मनात आशा होती म्हणून पावले पुढे पुढे टाकीत होता, परंतु अतिलोभी वाट पहात



असेल तिकडे परतण्याचा किंवा सोन्यावर समाधान मानून परतण्याचा विचार त्याच्या मनाला शिवला नाही.

आणखी पुढे गेल्यावर एक सपाटशी जागा आली. त्या जागेच्या चारीबाजूला उभे डोंगर होते. तेथे एक मनुष्य भेटला. त्याच्या डोक्यावर एक चक्र होते व ते त्याचे रक्त घुसळून काढीत होते. त्याचे सर्व तोंड व अंग रक्तबंबाळ झाले होते.

अत्यंतलोभीने जवळ जाऊन त्याला विचारले–"कोण रे तू? तू येथे उभा राहून डोक्यावर हे चक्र कसलं फिरवितो आहेस? रत्नांची राशी मिळावी म्हणून

       



हा यज्ञ तर नाही? इकडे जवळपास कोठे पाणी आहे का?"

त्याने तो प्रश्न विचारताच त्याच्या डोक्यावरचे चक्र उडाले व अत्यंतलोभीच्या डोक्यावर येऊन पडले आणि फिरू लागले. तो घाबरून विचारू लागला–"मित्रा! हे रे काय, फार त्रास होतो आहे की रे?"

तो माणूस म्हणाला–"हे चक्र तुझ्या डोक्यावर उडून जाऊन बसले तसेच ते माझ्या डोक्यावर चढून बसले होते व मला ते असह्य झाले होते."

"तरमग हे केव्हां सोडील? डोक्यावर न थांबतां फिरते आहे आणि रक्तस्राव करून फार खुपतं आहे की रे!" अत्यंत-लोभी म्हणाला.

तुझ्या सारखाच कोणी मंत्रवलेला दिवा घेऊन आला आणि तुझ्याशी बोलू लागला की हे तुझ्या डोक्यावरून उडून त्याच्या डोक्यावर चढून बसेल." तो माणूस म्हणाला.

"हे चक्र तुझ्या डोक्यावर फिरू लागून किती काळ लोटला?" अत्यंतलोभीने विचारले.

"तूर्त राजा कोण आहे?" त्या माणसाने उलट प्रश्न केला.

"वीणा वत्सराज उदयन." अत्यंत-लोभी म्हणाला.

"मी येथे उभा राहून किती काळ लोटला सांगता येणार नाही. परंतु राम राज्य करीत असतां मी दारिद्र्याला कंटाळून जाऊन तुझ्या सारखाच एक मंत्र-वलेला दिवा घेऊन निघालो. आयुष्यभर सुखाने राहता आले असते, त्यात समाधान न मानून मी लोभाला बळी पडून मित्रांना सोडून पुढे आलो आणि येथे एका माणसाला पाहिले. त्याच्या डोक्यावर हे चक्र फिरत होते. मी त्याला कोठे पाणी मिळेल का रे, विचारले मात्र, हे चक्र माझ्या डोक्यावर येऊन बसले. कित्येक युगे लोटली, मी या चक्राखाली पिळून निघतो आहे. कारण इकडे कोणी येत नाही. देवाच्या कृपेने मंत्रवलेला दिवा घेऊन तू आलास व मला सोडविलेस." तो माणूस म्हणाला.





# भल्लूक मांत्रिक

[ १२ ]

[ राजा दुर्मुख त्याच्या बरोबरचे इतर सर्व लोक मागे राहिले असतां एकटा त्याचे राज्य बळकावणाऱ्या सामंताचा पाठलाग करीत किल्ल्यात शिरला. किल्ल्याचे फाटक फोडण्या-साठी भल्लूक व उग्रदंड प्रयत्न करीत असतां तेथे एक मायावी माकड आले. भल्लूक मांत्रिकाला व कालीवर्माला येत असलेला पाहून ते तटावरून उतरून निघून गेले. पुढे–]

कालीवर्माला व भल्लूक मांत्रिकाला पाहून आनंदातिरेकाने चांडाळ भल्लूक नाचू लागला आणि परशू फिरवीत म्हणाला–"मालक लोकांचे दर्शन किती दिवसांनी घडते आहे! आतां माझे सर्व कष्ट कायमचे नाहीसे झाल्यासारखेच!"

भल्लूक मांत्रिक रेड्यावरून उतरून चांडाळ भल्लूकाजवळ येऊन म्हणाला–"हो रे, भल्लूका! इतका खूष होण्याचे कारण नाही! ते मायावी सोंगाडे माकड आले आहे ना, ते खरोखरचे माकड नाही. मिथ्या मिश्र नांवाच्या मांत्रिकाचा तो भ्रांतिमती नावाचा शिष्य आहे. सर्वांत प्रथम त्याने माझा मंत्रदंड चोरून आणला आहे तो परत मिळविला पाहिजे!"

चांडाळ भल्लूकाला काय उत्तर द्यावे, सुचेना, तो मान हलवीत उभा असतां कालीवर्मा आश्चर्यचकित मुद्रेने उग्रदंडाकडे



पहात म्हणाला–"काय रे, भल्लूका! हा राक्षस आणि हा हत्ती आणि हा सर्व परि-वार कोठून मिळवून आणलास?"

तो प्रश्न ऐकून उग्रदंड राक्षस थोडा हसला व म्हणाला–"तूच वाटते कालीवर्मा नावाचा क्षत्रिय वीर? तुझ्याविषयी चांडाळ भल्लूकाने सांगितले होते मला! आणि हेच वाटते भल्लूक मांत्रिक?" आणि दूर उभा असलेल्या चंद्रशिला नगरीचा राजा जितकेतू याच्या मंत्र्याला आणि त्याच्या बरोबरच्या काही घोडेस्वारांना आणि सैनिकांना हात वर करून दाखवीत म्हणाला–"कालीवर्मा! तुमच्या लोकांच्या मध्ये माझ्यासारख्या राक्षसाला पाहून तू आश्चर्य करीत वेळ

तोडून मी ऐकलं की तुमचा पाठलाग करीत आलेले हे सैनिक राजा जितकेतूने पाठविले आहेत, म्हणे."

कालीवर्माने आपला घोडा वळवून मागे पाहिले व तलवार उपसीत उग्रदंडाला म्हणाला–"तुझं नाव मला माहीत नाही. परंतु मला हे विचारावयाचे आहे की तुम्ही इतके जण येथे आहां, तुमच्यात प्रमुख कोण आहे? तू की चांडाळ भल्लूक?"

राक्षस त्या प्रश्नाचे उत्तर देणार इतक्यात चांडाळ भल्लूकाने जयघोष केला–"शिरीषवन भैरवा!" आणि म्हणाला–"कालीवर्मा मालक! या उग्रदंड राक्षसाचा, चोरांचा नायक मल्ल याचा आणि दुर्मुखाचे अंगरक्षक सर्वांचा प्रमुख मीच! बोला, काय हुकूम आहे?"

कालीवर्माने, किंकर्तव्यविमूढ परि-स्थितीत चारही बाजूला पहात असलेल्या भल्लूक मांत्रिकाकडे पाहून विचारले–"गुरुवर्य! आपली आज्ञा काय आहे? एकदां आपल्या अंगात मंत्रबळ किती आहे हे जितकेतूच्या त्या मंत्र्याला चांगले कळले आहे, म्हणून तो जीवगुप्त आपल्यावर चालून येण्याचे धाडस करीलसे वाटत नाही. थोडे लक्षपूर्वक पाहिलेत तर कळेल की तो,

घोड्यावर दूर उभा राहून कसा थरथर कापतो आहे ते!"

भल्लूक मांत्रिक निरुत्साहित नजरेने एकदां किल्ल्याच्या बंद फाटकाकडे पहात म्हणाला–"माझ्या गुरुवर्यांना फसविणाऱ्या-तांत्रिकाचा तो शिष्य मायावी मर्कट माझ्या पाठीमागून येत असल्याची मला कल्पनाही नव्हती, म्हणून माझा मंत्रदंड मी घालवून बसलो. ती गोष्ट मला माहीत असती तर मी मंत्रदंड नदीकाठावरच्या झाडाला टेकून ठेवून नदीत स्नानाला उतरलोच नसतो."

चांडाळ भल्लूक आपला परशू आपल्या दोन्ही तळहातावर आडवा धरून मांत्रिका-समोर पुढे येऊन म्हणाला–"मांत्रिक प्रभो! तो मंत्रदंड गेला तर त्यासाठी एवढे दुःखी होण्याचे कारण काय? हा परशू सुद्धा मंत्रविलेलाच तर आहे, नाही का? याचा प्रताप पाहून उग्रदंडसारखा राक्षसच घाबरून गेला. हा आपण घ्यावा व मला लगेच सामान्य मानव रूप देण्याची कृपा करावी."

"तू दुर्मुख राजाचे डोके कापून आणून देणार होतास त्याचे काय? आतापर्यंत सामंत सूर्यभूपतीने आपल्या तलवारीने त्या डोक्याची शकले उडवून टाकली असतील!" उग्रदंड राक्षस म्हणाला.

दुर्मुख राजाचे नाव ऐकताच भल्लूक मांत्रिकाने दचकल्यासारखा होऊन विचा-



रले–"काय रे, चांडाळ भल्लूका, तो राजा अजून जिवंतच आहे, का रे? आणि हा सामंत भूपती कोण रे? किल्ल्याच्या आत यावेळी कोणाकोणामध्ये युद्ध चालू आहे, लौकर सांग!"

चांडाळ भल्लूकाने, तो दुर्मुख राजाचा पाठलाग करीत जंगलात शिरला तेव्हां पासून त्या क्षणापर्यंत घडलेला सर्व वृत्तांत थोडक्यात सांगितला व म्हणाला–"मांत्रिक प्रभो! आपल्याला वाटले होते तेवढा तो राजा दुष्ट असेलसे मला वाटत नाही. त्यानंतर आपल्याला वाटेल ते करीन. प्रथम मला पुन्हां माणूस करा. या अस्वलाच्या रूपात आतल्या आत मी इतका



भाजून पोळून निघालो आहे की जीव नकोसा वाटू लागला आहे.”

“गुरुवर्य, मला वाटते, चांडाळ भल्लूकाच्या विनंतीला नकार देणे बरोबर नाही!” कालीवर्मा म्हणाला.

भल्लूक मांत्रिकाने मंत्रवलेला परशू हातात घेऊन कोणता तरी मंत्र म्हटला आणि चांडाळ भल्लूकाच्या पायाला लावला. त्याबरोबर त्याचे अस्वलाचे पाय जाऊन त्यांच्या जागी माणसाचे पाय झाले. त्यानंतर भल्लूक मांत्रिक तो परशु चांडाळ भल्लूकच्या पायापासून डोक्यापर्यंत लावीत गेला. त्याबरोबर त्याचे सर्व शरीर माणसाचे झाले, फक्त डोके मात्र अस्वलाचेच राहून गेले.

आपण आतां माणूस झालो असे वाटून आनंदाने चांडाळ भल्लूकाने भल्लूक मांत्रिकाला सांष्टांग नमस्कार केला आणि उठून हात जोडून म्हणाला—“मांत्रिक प्रभो! किती किती दिवसांनी मला पुन्हां हे मानव रूप लाभले! मला आज जो आनंद झाला आहे तो मी बोलून शब्दात सांगू शकणार नाही.”

ते ऐकून चोरांचा नायक नागमल्ल व इतर सर्व खदखदां हसू लागले. चांडाळ भल्लूक त्यांच्याकडे आश्चर्य करीत पाहू लागलेला पाहून उग्रदंड राक्षस आपली गदा चांडाळ भल्लूकाच्या डोक्याला लावून म्हणाला—“होय रे तुझे अंग, पायांपासून डोक्यापर्यंत माणसाचेच झाले आहे, डोके मात्र आहे तसेच आहे!”

चांडाळ भल्लूक रडक्या आवाजात दोन्ही हात जोडून म्हणाला—“मांत्रिक प्रभो! हा अन्याय कां? माणसाचा देह आणि डोके मात्र अस्वलाचे? तर मग अस्वलाचे रूप होते तेच बरे होते. हे तर जास्तच हास्यास्पद रूप मिळाले की?”

भल्लूक मांत्रिक दुःखी झाल्यासारखा म्हणाला—“चांडाळ भल्लूका! तू इतका दुःखी होऊ नकोस! तूर्त तू अस्वलाच्याच डोक्यावर मनाचे समाधान करून घे. अस्वलाचे डोके असले म्हणून काय बिघडले? त्यांत जो मेंदू आहे तो माणसाचाच आहे! माझा मंत्रदंड त्या सोंगाड्या माकडाच्या रूपातल्या दुष्ट भ्रांतिमतीने चोरून नेला तेव्हांपासून माझं मंत्रबळ थोडे कमी झालं आहे. म्हणून तुला मी माणसाचे पूर्ण रूप देऊ शकलो नाही.”

चांडाळ भल्लूक डोळ्यातून ढळाढळा अश्रु ढाळीत म्हणाला—“मला या विचित्र रूपात पाहून जितकेतू महाराज पुन्हां चांडाळ पदावर कसे राहू देतील? मी पुढील आयुष्य कसे घालवायचे?”

चांडाळ भल्लूकाला त्या स्थितीत पाहून कालीवर्माला कीव आली. तो त्याच्या खांद्यावर हात ठेवून सहानुभूतीच्या स्वरात म्हणाला—“चांडाळ भल्लूका! इतका दुःखी होऊ नकोस. मांत्रिक गुरुवर्य आपला मंत्रदंड घालवून बसल्याचे कळतांच जितकेतू राजाचा मंत्री जीवगुप्त आमच्यावर सूड उगवण्यासाठी सैन्य घेऊन आमच्या पाठोपाठ येथवर आला आहे. तो पहा, मंत्री दूर उभा आहे आणि त्याच्याबरोबर सैन्य पण आहे.”

चांडाळ भल्लूकाने वळून जीवगुप्त मंत्र्याकडे पाहिले व जागच्या जागी थरथर कापत म्हणाला—“त्या राजाच्या मनात काय आहे, नकळे, परंतु हा मंत्री मात्र नक्कीच माझं डोके उडवील. आतां मी काय करू? मी सर्व बाजूंनी भयंकर संकटात सापडलो आहे!”



भल्लूक मांत्रिक परशू पुन्हां चांडाळ भल्लूकाच्या हातात देत म्हणाला—“चांडाळ भल्लूका! तुझं धैर्य खचले असले तरी तुझ्या हातातला हा परशू नक्कीच तुझे रक्षण करील, तू निश्चिंत रहा!” असे म्हणत त्याने कंबरेला लोंबत असलेल्या म्यानेतून तलवार उपसली आणि म्हणाला—“ते माकड माझा मंत्रदंड घेऊन गेल्यामुळे माझ्या अंगातले मंत्रबळ पूर्वी इतके राहिले नसले तरी ही तलवार मला स्वतःचे रक्षण करायला पुरी आहे.”

“मग माझं पोट कसे भरायचे? आणि माझ्या नोकराचं कसं भागायचं? येथे हा जो चोरांचा नायक नागमल्ल आहे त्याच्या
















सारखं मी वाटसरूंना लुटून ते क्षुद्र जीवित घालवू म्हणता?" चांडाळ भल्लूक म्हणाला.

त्याचे बोलणे चालूच असतां मध्येच जोराने ओरडून नागमल्ल कंबरेला लोंबत असलेली तलवार जमिनीवर फेकीत म्हणाला–"काय रे, अस्वलतोंड्या! संकर जातीतल्या माणसा! मी क्षुद्र व नीच जीवित घालवितो होय? सैन्याच्या मदतीने शस्त्रास्त्रे घेऊन कोणीही मूर्ख माणूस राज्य करू शकेल, परंतु जंगलात एकट्याने राहून वाटसरूंना लुटायला जे शौर्य व पराक्रम पाहिजे त्याची तुला काय कल्पना असणार? मी आपल्या हातातली तलवार फेकली, त

मल्ल युद्धाला!" असे म्हणत त्याने दंड थोपटले.

भल्लूक मांत्रिकाने एकदा सर्वांकडे डोळे वटारून पाहिले व कालीवर्माला म्हणाला– "या सर्वांना त्यांच्यावर केवढे मोठे संकट आले आहे त्याची कल्पनासुद्धा नसल्यासारखे दिसते आहे. सर्वांना धरून त्यांची कत्तल करायला एका बाजूने तिकडे जितकेतूचा मंत्री तयार उभा आहे. नंतर किल्ल्यात दुर्मुख राजाचा जय होवो किंवा सामंत राजाचा आपणावर प्रसंगच ओढवणार आहे. तो सोंगाड्या भ्रांतिमती आपल्या विरुद्ध त्यांना चिथवून आपल्यावर सोडल्याशिवाय राहणार नाही."

कालीवर्मा रागाने आपली तलवार उपसून म्हणाला–"मांत्रिक गुरुवर्य म्हणाले ते ऐकलेत ना? येथे तुमचा सर्वांचा प्रमुख कोण हे ओळखलेत ना?"

उग्रदंड राक्षसाशिवाय बाकी सर्व जयघोष करू लागले–"कालीवर्माचा जय असो!"

कालीवर्मा त्यांच्याकडे पाहून व त्याच्या मनाचे समाधान झाल्यासारखा मान हलवून उग्रदंड राक्षसाजवळ जाऊ लागला, तितक्यात मंत्री जीवगुप्ताचा एक घोडेस्वार आपली तलवार खाली उलटी धरून वेगाने

त्यांच्याजवळ येऊन व घोडा थांबवून म्हणाला–"मी जितकेतू महाराजांचे मंत्री जीवगुप्त यांच्याकडून एक महत्वाचा संदेश घेऊन आलो आहे."

"अस्सं! म्हणून वाटतं तू आपली तलवार उलटी धरून आला आहेस? बरं बरं, काय निरोप आहे?" कालीवर्माने करड्या आवाजात विचारले.

"येथे तुमच्या मध्ये नगराचा जो प्रमुख चांडाळ आहे त्याने ताबडतोब त्यांच्यासमोर हजर व्हावे, अशी प्रधानांची आज्ञा आहे. येतांना त्याने महाराजांनी शिरच्छेदाची ज्याला शिक्षा फर्माविली होती त्या अपराधी कालीवर्मालासुद्धा बरोबर कैद करून आणावे, असे त्यांनी आज्ञा

केली आहे." मंत्री जीवगुप्ताचा घोडेस्वार म्हणाला. ते ऐकून भल्लूक मांत्रिक थोडे स्मित करून म्हणाला–"काय म्हणतोस चांडाळ भल्लूका, प्रधानांचा हुकूम ऐकलास ना? काय करणार आहेस तू?"

चांडाळ भल्लूक काय उत्तर द्यावे याचा विचार करीत काही न सुचल्यासारखा काही वेळ मान खाली करून उभा राहिला. नंतर मानवर करून म्हणाला–"कालीवर्मा मालक, आपला काय हुकूम आहे? अस्वलाचे हे तोंड घेऊन चंद्रशिला नगरीला जायचे म्हणजे राजधानीतली पोरं रस्त्यावर दगड मारतील त्यांचा मार खाऊन मरण्यासाठीच जाण्यासारखं होणार आहे! आणि मालकांना पण धरून न्यायचं आहे, म्हणे!"



कालीवर्मा चांडाळाला तलवारीचा हलक्या हाताने स्पर्श करून म्हणाला– "चांडाळ भल्लूका, मी तुझ्या स्वामिभक्ती-बद्दल तुझी पाठ थोपटतो. आपण प्रथम या किल्ल्यात शिरायचे आहे. त्या मायावी मर्कटाला हुडकून त्याचा समाचार घ्याव-याचा आहे आणि आतापर्यंत राजा दुर्मुख प्राण घालवून बसला नसेल तर त्याला वांचवायचे आहे. जितकेतू राजाशी तुलना करून पाहिले तर हा दुर्मुख कितीतरी पटीने चांगला दिसतो आहे. आता जित-केतूच्या प्रधानाच्या निरोपाचे उत्तर विचारशील तर, परशूने तू त्याचे डोके उडविणार की त्याच्या तलवारीचे तुकडे करून तू त्याला पळवून लावणार, ते मी तुझ्या इच्छेवर सोडतो!"

तत्क्षण चांडाळ भल्लूकाने घोष केला– "शिरीषवन भैरवा!" आणि एक गर्जना करून दूताच्या अंगावर तुटून पडला आणि त्याच्या हातातली तलवार हिसकावून घेऊन ती तोडून तिचे तुकडे दूर फेकून देत म्हणाला–"ए, दूताधमा! मी जितकेतू महाराजांचे मीठ खाल्ले आहे आणि चांडा-ळाचे काम केले आहे! हा मंत्री मध्ये कोण? मुकाटयाने मंत्री महाशय येथून निघून गेले नाहीत तर त्यांचे डोके शिरीष-वन भैरवाच्या चरणी अर्पण करीन असे त्यांना जाऊन सांग!"

जीवगुप्ताचा घोडेस्वार एक किंकाळी फोडून फिरला आणि घोडयाला मागे वळवून पळू लागला तेवढयात किल्ल्याच्या बंद फाटकाच्या बाजूने 'खणखण' आवाजा-पाठोपाठ "कालीवर्माचा जय असो" चा जयघोष ऐकू आला.

भल्लूक मांत्रिकाबरोबर इतर सर्व त्या बाजूला आश्चर्यचकित होऊन पाहू लागले. किल्ल्याचे फाटक भगभग जळू लागले होते. त्याच्या समोर रानटी शिकारी, नागमल्ल व त्याचे दोघे अनुयायी जळकी लाकडे हातात धरून विजयोल्हासाने नाचत नाचत असलेले दिसले.

(कल्पित)





# अक्षम्य अपराध

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजा, या जगात इमान, नम्रपणा ही सर्व फुटक आहेत! इमानदार सोशिक माणसांना या जगात जागाच नाही. अशा माणसांना विश्वासघातकी, मित्रद्रोहीदेखील म्हणवून घ्यावे लागते. याचे एक उदाहरण म्हणून मी तुला रवींद्रची गोष्ट सांगणार आहे, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

एका गावात पद्मनाभ व वासुदेव नावाचे दोघे मित्र रहात असत. दोघे समवयस्क होते. एकाच वेळी दोघांची लग्ने झाली आणि दोघांनी गृहस्थाश्रमात प्रवेश केला. दोघांपैकी वासुदेवाच्या भाग्याने पाठ फिर-

विली. त्याची बायको रवींद्र नावाचा मुलगा झाल्यावर थोड्याच दिवसांनी मरण पावली. नातेवाईकांनी वासुदेवाचा जो थोडा जमीनजुमला होता तो लुबाडला. शेवटी वासुदेवाला दारिद्र्यात दिवस काढावे लागले. त्यानंतर आणखी काही दिवसांनी तो स्वतः रोगग्रस्त होऊन अंथरुणाला खिळला. मरणसमयी त्याने पद्मनाभाला बोलावून मुलाचा हात त्याच्या हातात दिला व म्हणाला—"बाबा रे, आतां याचा सांभाळ तूच कर."

पद्मनाभने आपल्या मित्राला दिलेले वचन पाळले आणि रवींद्राला आपला मुलगा शेखर याच्याबरोबर पालनपोषण करून वाढविले. शेखर व रवींद्र सख्ख्या भावासारखे लहानाचे मोठे झाले आणि आपल्या गावातल्या शाळेतला विद्याभ्यास त्यांनी पुरा केला.

त्यानंतर पद्मनाभने दोघांना उच्च शिक्षणासाठी राजधानीच्या शहरात पाठविले आणि दोघांना लागणारा खर्च आपला मुलगा शेखर याच्याकडे पाठवू लागला.

परंतु घरातल्या वातावरणातून बाहेर पडल्यावर शहराची हवा लागताच शेखरच्या स्वभावात बदल होत गेला. विद्याभ्यासावरचे लक्ष कमी होऊन अमोदविनोदाकडे त्याचे लक्ष जास्त जाऊ लागले. बाप पाठवी त्या पैशातला बराचसा भाग तो पिण्यात व जुगारीत खर्च करू लागला. रवींद्र मात्र आपल्या अभ्यासात गर्क असे. त्याने शेखरला सरळ मार्गावर आणण्याचा खूप प्रयत्न केला, परंतु काही उपयोग झाला नाही. शेखर वाईट मार्गावर जाऊ लाग-ल्याची गोष्ट पद्मनाभाला कळवावी असे त्याला वाटले, परंतु तसे केले तर शेखर आपल्यावर व आतांपर्यंत जी थोडी पैशाची मदत करतो आहे, तीसुद्धा बंद करील या भीतीने रवींद्र गप्प राहिला.

एकदा दोघे आपल्या गावी सुट्टीत म्हणून गेले. पद्मनाभने त्यांच्या अभ्यासाविषयी चवकशी केली तेव्हां शेखरने विद्याभ्यास उत्तम चालत असल्याचे सांगितले. त्या वेळीसुद्धा रवींद्रने शेखरमध्ये झालेला बदल पद्मनाभच्या कानावर घातला नाही.

दोघं मुलं राजधानीला पुन्हां निघण्या आधीच्या दिवशी पद्मनाभचे पैसे नाहीसे झाले. पद्मनाभने सर्वांना बोलावून त्या विषयी विचारले तेव्हां शेखरने शंका व्यक्त केली—"रवींद्रने उचलले नसतील ना?"

पद्मनाभाला रवींद्रवर संशय आला नाही. कारण तो मुलापेक्षा जास्त दुःखी दिसला. तरी त्याने रवींद्रलासुद्धा बोलावून विचारले. रवींद्र चकित झाला. कारण ते पैसे शेखरने उचलल्याची गोष्ट त्याला चांगली माहीत होती. त्याने पैसे उचलले होते आणि वर वडिलांसमोर रवींद्रला म्हणाला—"तुला पैशाची तेवढीच गरज होती तर बाबांच्या जवळ मागून कां नाही घेतलेस? चोरी कशाला केलीस?"







स्वत: चोरी करून शेखरने ती गोष्ट पित्याला सांगितली नाही व त्यानेच चोरी केली असल्याचे ओळखूनही पित्याच्या व मुलाच्या मध्ये भांडण लावणेबरोबर न वाटल्याने रवींद्राने, त्यानेच पैसे उचलल्याचे कबूल केले. पद्मनाभच्या मनात अगदी पहिल्यानेच रवींद्राविषयी घृणा उत्पन्न झाली. म्हणाला–“मी तुला शिकवून मोठा करीन असे तुझ्या बापाला मी वचन दिले आणि ते पालन करण्यासाठी यथाशक्ती मी प्रयत्न केला, त्याचा असा दुष्परिणाम झाला. जगात आता कोणाचा भरंवसा करावयाचा ?”

रवींद्र मान खाली घालून एक शब्दही बोलल्याशिवाय तेथून निघून गेला.

त्यानंतर काही दिवसांनी राजधानीतल्या एका जुगारीच्या अड्ड्यावर शेखरने कोणावर तरी संतापून त्याला ठोकून काढले. त्यात तो माणूस मेला. शेखर पळून गेला. परंतु खुनी शेखरच असल्याचे कळल्यावरून राजाच्या शिपायांनी त्याला अटक केली. ते कळल्यावर पद्मनाभ राजधानीच्या गावी धावत पळत आला.

शेखरची न्यायालयात चौकशी सुरू झाली. रवींद्रने शेखरला वांचविण्यासाठी साक्ष दिली तीत, शेखर खून झाला त्या वेळी घरीच होता, असे सांगितले. परंतु त्याच्या साक्षीकडे न्यायाधिशाने लक्षच दिले नाही. कारण शेखरने केलेला खून ज्यांनी प्रत्यक्ष पाहिला होता त्यांच्या साक्षीवर विश्वास करून शेखरला काळ्या पाण्याची शिक्षा झाली.

शहरात आला तेव्हांपासून शेखर निरनिराळ्या व्यसनात फसत गेला व अशा तऱ्हेने तो पूर्णपणे बिघडला ही गोष्ट पद्मनाभच्या लक्षात आली. तो रवींद्रावर संतापून म्हणाला–“तूच मित्रद्रोही निघालास, तू माझ्याशीही द्रोह केलास, तू समाजद्रोही आहेस! विश्वासघातकी आहेस! यापुढे मला तोंडसुद्धा दाखवू नकोस!” असे सांगून पद्मनाभ आपल्या गावी निघून गेला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–“राजा, पद्म 

बोलला? त्याचा मुलगा त्याच्याजवळ राहू शकला नाही तर स्वत:च्या मुलासारखाच रवींद्राला मानून त्यांत समाधान मानण्याऐवजी त्याला त्याने दूर कां लोटले? त्याच्या मनात स्वत:चा मुलगा व परक्याचा मुलगा असा भेदभाव होता का? या शंकाचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.”

विक्रमादित्य म्हणाला–“पद्मनाभच्या मनात भेदबुद्धी नव्हती. प्रेम व जबाबदारी ही काय असतात ही त्याला चांगली माहीत होती. रवींद्राला त्या दोन्हीची कल्पनादेखील नसल्यामुळे एका द्रोह्यासारखा वागला. आपल्या मित्राचे हित व्हावे असेच त्याच्या मनात होते तर त्याने त्याच्या बापाला, शेखर वाईट मार्गावर जात असल्याचे सांगायला हवे होते. कारण माणूस लोक म्हणतील या तरी सरळ भीतीने मार्गावर चालतो. शेखर शहरात जाऊन राहू लागल्यावर तो कशा तऱ्हेने वागतो आहे व कसे त्याने वागले पाहिजे हे सांगू शकणारा एकटा रवींद्रच होता. परंतु त्याने स्वत:च्या हिताकडेच पाहिले आणि शेखरच्याविषयी त्याच्या पित्याला खरी गोष्ट सांगायला कचरला. तसे त्याने वेळीच सावध केले असते तर पद्मनाभाने आपल्या मुलाला सरळ मार्गावर ठेवण्याचा वेळीच प्रयत्न केला असता. परंतु स्वत:च्या स्वार्थासाठी तो शेखरच्या जास्त पतनाला अप्रत्यक्षपणे कारण झाला. त्याने, शेखरने केलेली चोरी व नंतर खून लपविण्यासाठी खोटे बोलण्यात कमी केले नाही. त्यात त्याला स्वत:चा स्वार्थ तेवढाच दिसला. म्हणून तो समाजद्रोही ठरला. शेवटी पितापुत्रांची कायमची ताटातूट होण्यास त्याच्याशिवाय कोणाला जबाबदार म्हणावयाचे?”

अशाप्रकारे राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# पुतळा

वंग देशाचा राजा धर्मवीर प्रजेची वाहवाही संपादन करण्याच्या हेतूने राज्य कारभारात जास्त लक्ष घालू लागला. त्याने प्रत्येक गावाच्या अधिकाऱ्याला राजाचा प्रतिनिधी म्हणून किताब दिला. दरवर्षी तो ग्रामाधिकाऱ्यांना बोलावून प्रत्येकाकडून अहवाल ऐकत असे.

ग्रामाधिकारी आपल्या अहवालात राजाची खूप प्रशंसा करीत आणि आपल्या गावाच्या गरजांची यादी त्यात देत. राजा त्यांच्या सर्व मागण्या पुऱ्या करून त्यांना खूष करी.

काही दिवसांनी राजा धर्मवीर याच्या मनात, प्रजेच्या मनात किती राजभक्ती आहे, हे स्वत: जाऊन पहावे असे आले. त्यासाठी त्याने प्रत्येक गावात आपला एक पुतळा स्थापन केला. त्याचे हेर येऊन पुतळ्याची राखण व पुतळ्याचा आदर प्रजा कसा करीत आहे हे येऊन राजासमोर निवेदन करीत. राजा स्वत:ची स्तुती ऐकण्याचा भुकेला असला तरी प्रजेच्या हिताची कामे करण्यात त्याने कुचराई केली नाही. म्हणून प्रत्येक गावात प्रजेने राजाच्या पुतळ्याच्या चारीबाजला एक उत्तम ओटा बांधला व त्या ओटयाच्या आत फुलझाडे लावली. प्रजा फुलाच्या माळा करून दररोज राजाच्या प्रतिमेच्या गळयात घालीत व प्रतिमेला नमस्कार करीत.

राजाला ही गोष्ट अनेक हेरांकडून अनेक वार कळली. प्रजेची ही राजभक्ती ऐकून राजा आनंदाने व स्वाभिमानाने फुलून गेला.

वंगदेशाच्या सर्व खेडेगांवाची स्थिती फार चांगली होती. परंतु विक्रमपुरी नामक गावाची स्थिती मात्र अनेक प्रकारे चिंता करण्यालायक होती. सर्वात जास्त गैरसोय होती ती पाण्याची. त्या विषयी त्या गावचा ग्रामाधिकारी वीरदास याने आपल्या वार्षिक प्रतिवेदनात उल्लेख केला होता. राजाने म्हणूनच विक्रमपुरीच्या रहिवाश्यांसाठी गाडया भरभरून नदीचे पाणी पोचविण्याची खास व्यवस्था केली होती. तरी सर्व गांवकऱ्यांना पुरेसे पाणी मिळत नसे. गावातल्या प्रतिष्ठित कुटुंबांना भरपूर पाणी मिळाल्यानंतर बाकी कुटुंबाना एकेक घागरभर पाणी मिळत असे.

दुसऱ्या वर्षी जेव्हां ग्रामाधिकारी राजाकडे वार्षिक निवेदन द्यायला गेला तेव्हां त्याने निवेदन केले–"महाराज! आपण मोठी कृपा करून आमच्या गावात गाडया भरभरून नदीचे पाणी पोचविण्याची व्यवस्था केली आहे, ही गोष्ट खरी असली तरी आमच्या गावातली पाण्याची गैरसोय दूर झालेली नाही. आपण आमच्या गावांत जमिनीत कोठे कोठे खोल पाणी आहे याची माहिती सांगणाऱ्या तज्ञ माहीतगारांना पाठविण्याची कृपा करावी. तेथे विहीर खणवून देण्याची व्यवस्था केल्यास पाण्याची ही गैरसोय कायमची नाहीशी होईल."

वीरदासने केलेल्या निवेदनाप्रमाणे राजाने दहा तज्ज्ञांना विक्रमपुरीला पाठविले. त्यांनी गांवभर फिरून निरीक्षण केले आणि कोठेही पाणी मिळण्याची शक्यता नसल्याचे सांगितले. परंतु पुन्हां एकदा त्यांनी जास्त लक्षपूर्वक निरीक्षण केले तेव्हां गावाच्या



मध्यभागी राजाचा पुतळा होता त्याच्या खाली पाणी असल्याचे सांगितले.

तज्ज्ञ वीरदासाला म्हणाले—"हे पहा, या जागे शिवाय इतर कोठेही पाणी मिळणे शक्य नाही. राजाच्या पुतळ्या खाली विहीर खणली तर पाणी भरपूर मिळेल."

त्यानंतर वीरदासने, तज्ज्ञांनी सांगितले ते राजासमोर जाऊन निवेदन केले आणि पुतळ्याच्या जागी विहीर खणण्याची परवानगी मागितली.

ते ऐकून राजाला राग आला. "हे निवेदन करण्याची हिंमत तुला झालीच कशी?" असे सांगून राजाने वीरदासाला त्याच्या पदावरून काढून टाकले आणि त्या दहा तज्ज्ञांना तुरुंगात टाकले.

त्यानंतर राजाने विक्रमपुरीला पहिल्यापेक्षा दुप्पट पाणी पाठविण्याची व्यवस्था करून दिली. तशी त्याने आज्ञा काढली.

काही दिवसांनी राजा विक्रमपुरीच्या प्रजेच्या मनात राजाविषयी आदरभाव किती आहे व प्रजा राजाविषयी काय म्हणते हे ऐकण्यासाठी स्वतः वेष पालटून गेला. तेथे जाऊन पाहिले तर त्याच्या पुतळ्यावर धुळीचे थर जमलेले आणि चारीबाजूच्या जागेत फुलझाडांऐवजी कांटेरी झाडे उगवलेली दिसली. गावकरी त्या पुतळ्याकडे ढुंकूनसुद्धा पहात नव्हते. कारण प्रजेला राजापेक्षा पाण्याचे प्राधान्य वाटत होते.

तेव्हां राजाच्या मनात ज्ञानोदय झाला. त्याने तज्ज्ञांना तुरुंगातून सोडवायला आज्ञा केली आणि आपला पुतळा होता त्या जागी एक मोठी विहीर खणविली. त्याने वीरदासाला पुन्हां त्या गावचा ग्रामाधिकारी म्हणून नेमले.

काही दिवसांनी राजा पुन्हां विक्रमपुरीला वेष पालटून गेला. तेव्हां तेथे जाऊन पाहल्यावर त्याला आश्चर्याचा धक्का बसला की विहिरीजवळच एका सुंदर फुलवाडीत त्याच्या संगमरवरी पुतळ्याची स्थापना करण्यात आली होती. तो पुतळा विक्रमपुरीच्या प्रजेने चंदा वसूल करून तेथे उभा केला होता.





# प्रवासात सोबत

रामूची आई साठ वर्षांची म्हातारी होती. ती थोरल्या मुलीकडे जाऊन यावे, म्हणून कित्येकदां म्हणाली, परंतु रामूला बरोबर जायला वेळच मिळाला नाही. बरोबर कोणाची तरी सोबत पाहून पाठवून द्यावे म्हणावे तर सोबत मिळेना. एकूण बरेच दिवस तिच्या मनातली इच्छा मनातच राहून गेली. सुदैवाने अनपेक्षितपणें शेजारचा राजू त्याच गावी जाणार असल्याचे कळल्यावरून रामूने तिच्या निघण्याची सर्व तयारी केली.

रामूच्या आईने एका गाठोड्यात सर्व कपडे बांधून घेतले. रामूने स्वतः तयार केलेली तपकीर एका डबीत घालून आपल्या मेहुण्याला द्यायला सांगून आईला दिली. म्हातारीने नातवंडासाठी खाऊ म्हणून लाडू करून एका डब्यात घेतले. रामूने प्रवासात खर्चाला थोडे पैसेसुद्धा दिले.

राजूला बरोबर म्हातारीला घेऊन जाणे म्हणजे एक ओझेंच डोक्यावर पडल्यासारखे वाटले. परंतु शेजारी म्हणून त्याला होकार द्यावा लागला होता. गावाच्या वेशीबाहेर आल्याबरोबर तो म्हातारीला म्हणाला—"आजी, जवळ पैसे असतील ते माझ्याजवळ द्या ठेवायला. मी संभाळून ठेवतो." म्हातारीने पैसे दिले. त्याने आपल्या पिशवीत ठेवून पिशवी कनवटीला खोचून ठेवली.

दुपारच्या सुमारास दोघं कोणत्यातरी वाटेतल्या गावी पोंचली. एकाएकी आकाश भरून आले व पाऊस पडू लागला. गावाबाहेर काही झोपड्या दिसल्या. त्यांमध्ये एक कौलारू घर होते, राजूने त्या घराच्या पुढच्या अंगणात जाऊन दार जोरजोराने वाजविले. खिडकीतून एका बाईने डोकावून पाहून थोड्याशा रागाच्या स्वरांत विचारले—"कोण रे तू? काय पाहिजे तुला?"



"पाऊस पडू लागला आहे. तुमच्या घरात थोडा वेळ थांबायला आसरा द्याल का?" राजूने विचारले.

"शक्य नाही. घरांत पुरुष मंडळी नाहीत. आणखी जा कोठे तरी!" म्हणाली ती बाई स्पष्ट शब्दात.

तेव्हां म्हातारी खिडकी समोर येऊन म्हणाली–"पावसांत भिजतो आहों हो, ताई! तुला मी आईसारखी आहे की ग! आमचा मुलगा तुला थोरल्या भावासारखा आहे! दार उघड बाई, घाबरू नकोस!"

म्हातारीला पाहतांच ती बाई उठून धावत आली आणि दार उघडून 'आत या', म्हणाली. आत पाऊल टाकताच म्हातारी जुनी ओळख असल्यासारखी बोलू लागली आणि आपल्या पूर्वीच्या चार पिढ्यांचे आणि पुढल्या पिढ्यांचे चऱ्हाट सांगू लागली. म्हातारी 'नको नको' म्हणत असतां त्या घरच्या गृहिणीने चूल पेटवून स्वैपाक केला व दोघां पाहुण्यांना जेवायला वाढले.

त्यानंतर पाऊस थांबला.

"बरं येतो, मुली! दूर जायचं आहे." असं सांगून म्हातारी निघाली तर ती गृहिणी म्हणाली–"परत येतांना एक दिवस राहून जा." म्हातारीकडून तसे वचन घेऊन तिने त्यांना निरोप दिला.

"आपण गोड बोलून परक्या माणसांना आपलं करून घ्यावं लागतं." म्हातारी म्हणाली.

दोघं एका बांधावरून जात असतां एक काळा साप आडवा आलेला दिसला. त्याला पाहून राजू घाबरून गेला व मोठमोठ्याने ओरडू लागला, परंतु साप जागचा हलला नाही.

म्हातारीने आपल्या हातातली काठी जमिनीवर जोराने आपटली, त्याबरोबर साप फडा करून क्षणभर उभा राहिला आणि लगेच शेजारच्या झुडपात निघून गेला.

"सांपाला कान नसतात. जमिनीचा हादरा भासला की त्याला कळते." म्हातारी राजूला म्हणाली.

काळोख पडायची वेळ झाली तेव्हां दोघं एका टेकडीच्या बाजूने जात असता कोणी तरी चोर की लुटारू एकदम उडी मारून आडवा उभा राहिला व सुरा दाखवून राजूला म्हणाला–"तुझ्याजवळ जे असेल ते मुकाट्याने समोर ठेव!"

राजू वरपासून खालपर्यंत थरथर कापत होता. तो कनवटीची पिशवी काढून देण्याच्या प्रयत्नात असलेला पाहून म्हातारी म्हणाली–"थांब रे बाबा! पैशासाठी कोणी जीव घेतो का? पैसे माझ्याजवळ आहेत. त्याला धमकावून काय फायदा?" असे म्हणत तिने बोचके सोडून त्यातली तपकिरीची डबी काढली व झांकण काढतांच चिमूटभर तपकीर घेऊन चोराच्या डोळ्यांत फेकली. चोर मोठ्याने ओरडू लागला व हातातला सुरा टाकून दोन्ही हातांनी डोळे चोळू लागला.

सुरा उचलून म्हातारी राजूला म्हणाली–"त्याला नको रे सुरा भोसकूस! पैशासाठी बिचाऱ्याने स्वतःचा जीव धोक्यात घातला! त्याचा जीव घेऊन आपल्याला काय मिळणार?"

चोर डोळे झोंबत असून व डोळे उघडणे अशक्य असूनही रस्ता दिसत नव्हता तरी पळाला आणि अदृश्य झाला.

"संकट आले की फार विचार करीत बसायचं नाही की भ्यायचं नाही. प्रसंगावधान राखायचं!" म्हातारी म्हणाली. राजूने मान हलवून म्हातारी म्हणाली ते मान्य केले.



दिवे लागणीला ते कोणत्यातरी गावी पोचले. आणखी पुष्कळ पुढे जायचं होतं.

"आपण आपल्या ठिकाणावर पोचू, तो पर्यंत एक प्रहर रात्र उलटून गेलेली असणार. मला भूक लागली आहे. मी दुकानातून काहीतरी घेऊन खातो व तुमच्यासाठी फळं घेऊन येतो." म्हणत राजू निघून गेला.

म्हातारी एका घराच्या ओटीवर बसून राहिली. बराच वेळ झाला तरी राजू आला नाही. काय झालं बुवा, असा विचार करीत ती दुकानं होती त्या बाजूला गेली.

"तू खाऊनपिऊन घेतलेस आणि कोणी पैशाची पिशवी लांबविली म्हणतो आहे, लबाड! तुझ्यासारख्या कित्येकांना पाहिले आहे, मी! तू पैसे दिले नाहीस तर तुझ्याकडून हमाली करवून पैसे वसूल करून घेईन." दुकानदार राजूला म्हणाला.

म्हातारीला घडलेली गोष्ट कळायला वेळ लागला नाही. तिने बोचके सोडून राजूने खाल्ले होते तेवढ्याचे पैसे दिले आणि म्हणाली–"चल आतां!"

"माझी पिशवी वाटेत कोठेतरीं निसटून पडल्यासारखी वाटते आहे. परंतु तुम्ही तर आपल्या जवळचे पैसे मला दिले होते, नाही का? मग तुमच्याजवळ हे पैसे कोठून आले?" राजूने म्हातारीला विचारले.

"पैसे कधी एकाच जागी ठेवतात का रे, बाळा! चार निरनिराळ्या जागी ठेवावेत!" म्हातारी म्हणाली.

आई मुलीकडे आठवडाभर तरी राहील, असे रामूला वाटले होते, बरीच आधी परतलेली पाहून त्याने चकित होऊन विचारले–"आई, इतकी लौकर परतलीस की?"

"काय करू बाबा! मुलीला भेटले! बिचारा राजू परत येते वेळी 'एकटा कसा जाऊ', म्हणून कुरकुर करू लागला व बरोबर सोबत चला म्हणून हातापायां पडू लागला. 'बरं म्हटलं' आणि निघाले!" म्हातारी म्हणाली.







# अत्रि ऋषी

ऋषीत देवर्षी, ब्रह्मर्षी, राजर्षी, विप्रर्षी असे अनेक प्रकार आहेत. काहीराक्षस ऋषीसुद्धा आहेत. यांपैकी अत्री ऋषी हे ब्रह्मदेवाचे मानसपुत्र होते.

अत्रि ऋषींच्या पत्नीचे नाव अनसूया होते. तिने मोठी तपःचर्या करून तपोबल प्राप्त केले होते. म्हणून एकदा ब्रह्मा, विष्णू आणि महेश आपापल्या वाहनांवर बसून अत्री मुनींच्या आश्रमाच्या वाटेने मेरुपर्वतावर जात असतां त्यांची वाहने आश्रमाजवळ अडली. म्हणून त्यांना दुसऱ्या वाटेने जावे लागले होते, म्हणे.

एकदां पृथ्वीवर भयंकर दुष्काळ पडला असतां अनसूयेने आपल्या तपोबलाने गंगेला पृथ्वीवर आणून प्रवाहित केले आणि दुष्काळ नाहीसा केला.

आणखी एकदां कौशिक नावाच्या एका माणसाला उजाडतांच मरण येईल असा शाप लागला होता. कौशिकाची बायको अनसूयेची मैत्रीण होती. तिला वैधव्य येऊ नये यासाठी अनसूयेने ती रात्रच नव्हे तर आणखी दहा रात्री आपल्या तपोबलाने लांबविल्या होत्या, म्हणे.

अत्रि मुनी पुत्रप्राप्तीसाठी तपश्चर्या करीत असतां, ब्रह्मा, विष्णू व महेश प्रगट झाले, म्हणे. तेव्हां "मी फक्त एका मुलासाठी तपश्चर्या करीत होतो, मग तुम्ही तिघे कशाला आलात?" असे अत्री मुनींनी त्यांना विचारले.

"आम्ही तिघे आमचा अंश असलेला मुलगा तुला द्यायला आलो आहे," असे तिघे म्हणाले.

त्याप्रमाणे अत्रीला ब्रह्मदेवाचा अंश म्हणून सोम, विष्णूचा अंश म्हणून दत्तात्रेय आणि शंकराचा अंश म्हणून दुर्वास नावे पुत्र जन्मले. परंतु अत्रीला पुष्कळच मुले

होती असे सांगतात. अत्रीची मुले तीच आत्रेय झाली. अत्री हे एक कुलपती झाले.

श्राद्धविधी कसा करावा, ही गोष्ट सर्व प्रथम अत्री मुनींनीच सांगितली. पितृपक्षांत पिंडदान हे दर वर्षी पित्याला, पितामहाला आणि प्रपितामहाला करावयाचे असते व प्रत्येक महिन्यात अमावस्येला करावयाचे ते तर्पण फक्त पित्याला असे अत्रींनी निमीला सांगितले होते.

राजा हा देवांशसंभूत असतो हे अत्री मुनींनीच सर्वांत प्रथम पाहिले होते.

ब्रह्मावर्त देशात पृथू नावाचा चक्रवर्ती राजा होता. त्याने नव्याण्णव यज्ञ केले आणि सरस्वती नदीच्या काठी शंभरावा अश्वमेध यज्ञ करण्याचा प्रयत्नात असतां इंद्राने ईर्ष्यावश यज्ञाचा अश्व चोरून नेला. पृथू राजा यज्ञ करीत असतां अत्रीमुनी तेथेच होते.

नंतर अत्री सर्वसंगपरित्याग करून तपश्चर्या करण्यासाठी निघाले तेव्हां 'कुटुंब पोषणाची व्यवस्था केल्याशिवाय तुम्हांला तपश्चर्येला जातां येणार नाही' असे पत्नीने सांगितले. भूभार वहन करण्याची सर्व जबाबदारी क्षत्रियाची आहे असा विचार करून अत्री मुनी पृथू राजाकडे गेले व त्याची स्तुती करीत म्हणाले–"तू देवांश असलेला इंद्र आहेस!"

त्याला विरोध केला तो गौतम मुनींनी. ते त्यावेळी तेथेच उपस्थित होते. दोघांचा जो वादविवाद झाला त्या विषयी शेवटी सनत्कुमारांनी "अत्री मुनींनी पृथूची स्तुती केली ती युक्तच होती." असा निर्णय दिला.

पृथू राजाने अत्री मुनींनी अपार धन दिले. त्याचा पिता वेन अत्यंत दुष्ट होता, म्हणून त्याच्या प्रजेने त्याचा "पिसाळलेल्या कुत्र्या" सारखा वध केला होता. अशा परिस्थितीत अत्री व सनत्कुमार यांच्या-सारख्यांकडून 'देवांशसंभूत' असे म्हणवून घेण्यात त्याला साहजिकच आनंद झाला.

"सुवर्णदान करणारा सर्व इच्छित देतो!" असे अत्रि मुनींनीच प्रथम पाहिले. अत्री हे कुबेराच्या गुरूंपैकी एक होते.



# तुलसीचा जन्म वृत्तांत



एकदां इंद्र शंकराच्या दर्शनासाठी कैलासपर्वतावर गेला असता त्याला एक व्यक्ति एका शिळेवर निश्चळ बसलेली दिसली. शंकराला भेटायला जायची वाट त्या व्यक्तीला विचारतां ती व्यक्ती काहीच बोलली नाही. म्हणून इंद्राने आपले वज्रायुध त्या व्यक्तीच्या डोक्यात हाणले.



तत्काळ त्या व्यक्तीच्या डोक्यातून अग्निज्वाळा भगभग करीत बाहेर आल्या कारण ती व्यक्ती म्हणजे स्वतः शंकरच होता. इंद्राने शंकरा-जवळ क्षमा मागितली व भस्मीभूत न होता वाचला.



शंकराच्या डोक्यातून निघालेल्या ज्वाळा आकाशापर्यंत पोचल्या व त्यांनी समुद्रात पडून एका मुलाचे रूप धारण केले.



कोपाग्नीतून जन्मलेला तो मुलगा एक भयंकर राक्षस झाला. समुद्राने त्याला ब्रह्मदेवाला दिला. त्याचे पालन करणे ब्रह्मदेवाला शक्य झाले नाही. तोच जलंधर नामे प्रसिद्ध राक्षस झाला.

काही दिवसांनी जलंधर राक्षसांचा राजा झाला. त्याने पृथ्वीवरच्या सर्व राजांना जिंकून देवलोक जिंकण्याचे ठरविले.





त्याने राक्षसांच्या सैन्यानिशी इंद्राच्या अमरावतीवर स्वारी केली. इंद्रावरचा शंकराचा राग यारूपे पुन्हा प्रगट झाला. देवांची दाणादाण उडून गेली.

त्या युद्धात इंद्राचा व सर्व देवांचा पराभव झाला आणि जलंधराने अमरावती काबीज केली. इंद्र कैलास पर्वताकडे धावला आणि जलंधरला आवरण्यासाठी शंकराची मनधरणी केली.





'आपली ही कुकर्मे आतां पुरी कर' असे शंकराने जलंधराला बजावून सांगितले, परंतु काही उपयोग झाला नाही. आतां जलंधराचा संहार करण्याची जबाबदारी स्वतः शंकरावर येऊन पडली. परंतु विचित्र गोष्ट अशी की शंकर त्याचे काही करू शकला नाही. त्याचे एक कारण होते.

जलंधराचे रक्षण करणारी अद्भुत शक्ती एक होती ती त्याची बायको वृंदा. ती नित्य नियमितपणे विष्णूची पूजा करीत असे. ती आपल्या पतीच्या संरक्षणासाठी नित्य ध्यान धरून असे. त्या अवधीत जलंधरच्या जिवाला कोणताही अपाय घडणे शक्य नव्हते.





देवांनी विष्णूकडे जाऊन मदतीसाठी त्याची मनधरणी केली. विष्णु संकटात पडला. वृंदाच्या भक्तीमुळेच जलंधरचे रक्षण होत होते. परंतु जलंधरचा शेवट होणे आवश्यक होते.



विष्णू जलंधरचे रूप घेऊन वृंदाकडे आला. पती विजयप्राप्ती करून परतला, असे वाटून वृंदाचे ध्यान भंग झाले व ती उठून उभी राहिली. तत्क्षण शंकराने जलंधराचा वध केला.



चूक लक्षात आल्यावर वृंदाने पतीच्या देहाबरोबर चितेवर बसून सहगमन केले. तिच्या चितेच्या भस्मातून तुलसीचे रोपटे उगवले व ते विष्णूला अत्यंत प्रिय पात्र ठरले. म्हणून सर्व तुलसीची पूजा करतात व तुलसी-दल वाहून विष्णूची पूजा करतात.



# प्रल्हाद

हिरण्यकश्यपूने ब्रह्मदेवाचे स्मरण करून तपश्चर्या सुरू केली. त्यावेळी त्याची बायको गरोदार होती. त्याच वेळी देवा-दानवांचे युद्ध झाले आणि दानवांना कोणी योग्य पुढारी न मिळाल्याने त्यांचा त्या युद्धात पराभव झाला.

राक्षसांवर विजय मिळाला त्या वेळी इंद्राच्या हातात लीलावती बंदी म्हणून आली. नारदाने इंद्राला समजावून सांगितले की लीलावती एक साध्वी स्त्री आहे, तेव्हां तिला सोडून द्यावे.

लीलावती गरोदर असल्यामुळे तिला मुलगा झाला तर त्याला ठार करून लीला-वतीला सोडून दिले जाईल, असे इंद्राने वचन दिले.

"लीलावतीच्या पोटी जन्मलेला मुलगा एक थोर भक्त होणार आहे, तेव्हां त्याचा वध करू नकोस!" असे इंद्राला बजावून सांगून व त्याच्याकडून ती गोष्ट करून घेऊन नारद लीलावतीला आपल्या आश्र-मात घेऊन गेला. तेथे त्याने लीलावतीला भगवद्भक्तीचा उपदेश केला. त्या उप-देशाचा ठसा लीलावतीच्या पोटातल्या प्रल्हादाच्या मनावर बसला. तो जन्मतः विष्णु भक्त झाला.

नंतर हिरण्यकश्यपूच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन ब्रह्मदेवाने दर्शन दिल्यावर त्याने ब्रह्मदेवाकडून कोणत्याही परिस्थितीत त्याला मरण येणार नाही असा वर प्राप्त केला. त्याने आपल्या बायकोला व मुलाला नारदाच्या आश्रमातून बोलावून नेले आणि शुक्राचार्यांच्या चंडामर्क नावाच्या मुलाकडे विद्याभ्यासाठी ठेवले.

प्रल्हादाने लौकरच सर्व वेदशास्त्रांचा अभ्यास पूर्ण केला आणि आपल्या सहपाठी मुलांना वेदांत व विष्णुभक्ती शिकवू लागला.

चंडामर्कने तसे न करण्याबद्दल किती सांगून पाहिले. परंतु प्रह्लादाने तिकडे दुर्लक्ष केले.

एकदा हिरण्यकश्यपूने आपल्या मुलाचा विद्याभ्यास कोठवर आला आहे, या गोष्टीची चौकशी करण्यासाठी प्रह्लादाला बोलावून घेतले व त्याला मांडीवर घेऊन लाडिक-पणे एकादा श्लोक म्हणायला सांगितले.

लगेच प्रह्लाद विष्णुभक्तीचे एक गीत म्हणू लागला.

"विष्णू हा देवांचा देव आहे; आपला शत्रू आहे. आतां त्रिलोकाचा स्वामी मीच आहे. म्हणून तू विष्णूचे स्तवन करण्याची गरज नाही." असे हिरण्यकश्यपू प्रह्लादाला म्हणाला.

तरी प्रह्लाद विष्णुभक्ती सोडायला तयार झाला नाही. पिता किंवा गुरु त्याला त्या मार्गापासून वळवू शकले नाहीत. प्रह्लाद हा आपल्या वंशाला कलंक लावणारा मुलगा आहे असे मनाशीं ठरवून हिरण्य-कश्यपूने त्याला ठार करण्यासाठी अनेक प्रयत्न करून पाहिले. त्याने त्याला डोंगराच्या कड्यावरून खाली ढकलून पाहिले. त्याच्या अंगावर साप सोडून त्यांच्या करवी त्याला ठार करण्याचा प्रयत्नही करून पाहिला. हत्तींच्या पायाखाली देऊन पाहिले. परंतु काही एक उपयोग झाला नाही. हिरण्यकश्यपूने गोड बोलून, भीती दाखवून अनेक प्रकारे मुलाचे मन विष्णुभक्तीपासून दूर वळविण्याचा प्रयत्न करून पाहिला, परंतु निरुपयोग. तो मेला नाही व त्याने हरिभक्ति सोडली नाही.

प्रह्लादाच्या समोर, तो हरि म्हणून मानतो त्याचा वध करून आपला थोरपणा दर्शविण्यासाठी हिरण्यकश्यपू मुलाला एक खांब दाखवून "तुझा हरि यात आहे का रे?" असे विचारले.

"तो सर्वव्यापी आहे!" प्रह्लाद म्हणाला.

हिरण्यकश्यपूने आपली गदा घेऊन तिचा प्रहार त्या खांबावर केला. खांब दुभंगला व त्यांतून नरसिंह प्रगट झाला आणि ब्रह्मदेवाने दिलेल्या वराविरुद्ध न करतां हिरण्य-कश्यपूचे पोट फाडून त्याचा वध केला.






फार पूर्वी नेपाळ देशाला लागून शाक्यांचे राज्य होते. शाक्य देशाची राजधानी कपिलवस्तू. हे शक्य त्या काळच्या कोशल देशाचा राजा प्रेसनजित याचे सामंत राजे होते. तसे अधीन राजे असूनही त्यांना आपल्या जातीचा दुरभिमान होता. म्हणून ते इतर जातींच्या लोकांशी विवाह संबंध ठेवीत नसत.

कोशलदेशाच्या राजवंशीयांची गौतम बुद्धावर अपार भक्ती होती. बुद्ध हा शाक्यवंशीय होता. म्हणून गौतम बुद्धाशी आपले आणखी जवळचे नाते व्हावे, या हेतूने शाक्य वंशीय राजकन्येशी विवाह करून तिला आपली पट्टराणी करून घ्यावे असे कोशलचा राजा प्रसनजित याने ठरविले.

त्या प्रमाणे प्रसनजिताने आपला एक दूत पाठवून आपली इच्छा शाक्य वंशीय राजांना कळविली. शाक्य राजे पेचात पडले. कोशल राजाच्या इच्छेप्रमाणे केले नाही तर कोशलराज शाक्य राज्य नष्ट केल्याशिवाय राहणार नाही. केले तर त्यांच्या कुळाच्या परंपरेविरुद्ध त्यांची मान खाली होईल. म्हणून शाक्य राजांनी राज्य सभा बोलाविली. दरबाऱ्यांचा सल्ला घेतला. पुष्कळ उहापोह झाला.

तेव्हा महानाम नावाचा प्रमुख शाक्य म्हणाला—"तुम्ही कोणी घाबरण्याचे कारण नाही. माझी मुलगी वासवक्षत्रिय ही दासीला झालेली मुलगी आहे, रुपवती आहे. ती शाक्य राजकन्या आहे असे सांगून कोशल राजाकडे तिला पाठवू या." ती गोष्ट सर्वांना मान्य झाली. संकट टळले असे सर्वांना वाटले.

कोशल राजाच्या दूताला बोलावून महानाम म्हणाला—"आम्ही कन्यादान




करीत आहों, तुम्ही या मुलीला आपल्या देशात घेऊन जावे. परंतु वंशाचा अभिमान शाक्य राजांना फार असल्याचे दूताला चांगले माहीत होते. तेव्हां इतक्या सहजी शाक्य राजे तयार कसे झाले हा संशय दूताच्या मनात राहून गेला. 'ही मुलगी शाक्यकन्या नसणार. आपल्याला शाक्यांनी नक्कीच फसविले आहे', असा संशय त्यांच्या मनात राहून गेला.

म्हणून दूतप्रमुख म्हणाला—"एक अट आहे, तुमच्या बरोबर एकाच ताटात ही मुलगी जेवली तर आम्ही या मुलीला घेऊन जाऊ, नाहीतर नेणार नाही." शाक्य राजे पुन्हा पेचात पडले. पुन्हा विचार केला. काय वाटेल ते करून कोशल राजाच्या दूताला फसवून पाठविले पाहिजे, असे ठरवून त्यांनी एक युक्ती काढली.

त्या दिवशी महानाम जेवायला बसला. थोडे वाढून झाल्यावर दूत व इतर लोक येऊन बसले. महानाम एका दासीला बोलावून म्हणाला—"मुलीला घेऊन ये, माझ्या बरोबर ती जेवणार आहे." लगेच वासवी आली व बापाबरोबर त्याच्या ताटात जेवायला बसली. महानामने एक घास तोंडात घातला. वासवक्षत्रियनेसुद्धा त्याच्या ताटात हात घातला. महानाम दुसरा घास घेऊ लागला.

इतक्यात एका सैनिकाने येऊन एक पत्र आणून दिले व म्हणाला—"प्रभो! अवंतीच्या राजाने हे पत्र पाठविले आहे. आतांच्या आतां उत्तर मागतो आहे."

महानामाचा उजवा हात ताटातच होता. डाव्या हाताने पत्र घेऊन त्याने वाचले व मुलीला म्हणाला—"तू खात रहा, मुली!" वासवी जेवत राहिली. महानाम अत्यंत गंभीर होऊन पत्र वाचीत राहिला. एकदां, दोनदां, तिनदां त्याने पत्र वाचले. मुलीचे जेवण झाल्यावर बापाने व मुलीने उठून हात धुतले.

कोशलराजाच्या दूतांना या सर्व नाटकातले रहस्य कळले नाही. वासवी महानामाची मुलगीच असल्याची त्यांची खात्री झाली. महानामाने आपल्या मुलीची थाटामाटाने पाठवणी केली.

कोशल राजाने अत्यंत आनंदाने वासवीशी लग्न करून तिला आपली पट्टराणी केले. काही काळ लोटल्यावर वासवक्षत्रियेला एक सुंदर मुलगा झाला. त्याचे नाव विरूढप असे ठेवले.

विरूढप लहानाचा मोठा झाला. एके दिवशी तो आईजवळ गेला व म्हणाला—"आई, सर्व माझे सवंगडी मित्र आपापल्या आजोळी जातात येतात. मी सुद्धा माझ्या आजोळी जाऊन येतो." ते ऐकून वासवक्षत्रियेला डोक्यावर वीज पडल्यासारखे झाले. तिने त्याला "कशाला रे? येथे गंमत कमी आहे का?" असे सांगून अनेक प्रकारे त्याचे मन फिरविण्याचा प्रयत्न करून पाहिला. परंतु ती जितके 'नको' म्हणे तितका त्याचा हट्ट वाढतच गेला.

शेवटी ती मुलाला आजोळी पाठवायला तयार झाली व गुप्तपणे तिने आपल्या वडिलांना पत्र पाठविले—"तुमचा नातू कपिलवस्तूला येतो आहे. त्याला हे आपले गुपित कळणार नाही, याची काळजी बाळगावी."

विरूढप येणार असल्याचे कळताच राजधानीतल्या सर्व शाक्यांनी आपापल्या



सर्व मुलांना जवळपासच्या खेडेगावांतून पाठवून दिले. कारण दासीपुत्र विरूढपला कोणी शाक्यवंशीयाने नमस्कार करू नये हा त्यांचा हट्ट होता.

विरूढप कपिलवस्तुला आला. त्याच्या सत्कारार्थ सर्व शाक्यांनी एक मोठी सभा केली. तेथे सर्व क्रमाने बसले व राजकुमाराची ओळख करून देण्यात आली. विरूढपाने प्रत्येकाला नमस्कार केला, परंतु शाक्यांपैकी ऐकाने देखील परत नमस्कार केला नाही. विरूढपला त्या गोष्टीचे आश्चर्य वाटले.

काही दिवस कपिलवस्तूला राहून विरूढप कोशल देशाच्या राजधानीला

परत जायला निघाला. त्याच्या सैनिकांपैकी एकजण ते उतरले होते तेथे काहीतरी वस्तू विसरून आला होता. म्हणून तो परत गेला. तेथे त्याला एक विचित्र दृश्य पहायला मिळाले. विरूढप ज्या आसनावर बसला होता ते आसन एक दासी दुधाने धूत होती आणि काहीतरी गुणगुणत होती.

सैनिकाने त्या दासीला विचारून मुख्य गोष्ट काढून घेतली. ती गोष्ट त्याने आपल्या बरोबरच्या सैनिकांना सांगितली. एक गोंधळ उडून गेला. शेवटी ती गोष्ट विरूढपच्या कानावर गेली. "मी बसलो होतो ते आसन शाक्यांनी दुधाने धुवून शुद्ध केले का? हे एवढ्याने भागणार नाही. ते आसन शाक्यांच्या रक्ताने धुवून काढतो. त्याशिवाय ते पवित्र होणार नाही!" अशी त्याने प्रतिज्ञाच केली.

विरूढप कोशल देशात पोचताच कोशल राजाला हे कपटनाटक कळले. तो संतापला. परंतु गुरु गौतमबुद्धाचा अपमान होईल असे काही करता कामा नये असा विचार करून त्याने शाक्य राजांच्या विरुद्ध काही केले नाही.

परंतु विरूढपने बापाचे मानले नाही. उलट तो बंड करून बापाच्या जागी कोशल राज्याच्या सिंहासनावर बसला. राजा होताच त्याने शाक्य वंशाचा नाश करण्याचे ठरविले. वासवक्षत्रियेने डोळ्यात पाणी आणून मुलाचे मन वळविण्याचा खूप प्रयत्न केला. परंतु तो आपल्या निश्चयापासून ढळला नाही.

एक मोठे सैन्य घेऊन त्याने शाक्य राज्यावर स्वारी केली. शाक्यांना विरूढपासमोर टिकाव धरून राहणे अशक्य झाले. विरूढपने दयामाया सोडून सर्व शाक्यांची कत्तल केली. रक्ताचे पाट वाहू लागले.

त्या रक्ताने तो ज्या जागी बसला होता ती जागा त्याने धुवून काढली. अशा तऱ्हेने विरूढपने शक्यांवर सूड उगवला. शाक्य राज्य आणि शाक्य वंशाचा नाश झाला.



# धडा मिळाला

सोनूशेट सावकाराकडे कोणी नोकरी करायला तयार नसे. कारण सोनूशेट काहीतरी कारण सांगून नोकराला महिन्याचा पगार देत नसे. काममात्र भरपूर करवून घेई. एकदा भीमू नावाचा नोकर त्याच्याकडे नोकरीला लागला. सोनूशेटने भीमूला बजावून सांगितले की सांगेन ते काम करावे लागेल, आणि सांगितलेले काम केले नाही की पगार मिळणार नाही. भीमू त्या गोष्टीस कबूल झाला. एक महिना झाल्यावर भीमू पगार मागू लागला.

"हे पहा, सांगतो ते काम आधी कर. मी पगार देतो." असे सांगून सोनूशेटने दोन काचेचे ग्लास भीमूच्या हातात दिले व म्हणाला–"तू या लहान ग्लासात मोठा ग्लास घालून दे." भीमूने विचार केला की पगार न देण्यासाठी काही तरी कारण शोधण्याचा हा प्रयत्न दिसतो आहे. म्हणून विचार करून त्याने मोठा ग्लास फोडून त्याचे तुकडे लहान ग्लासात घालून दिले व आपला पगार मागितला.

सोनूशेट चिडला. त्याला कारण पुरले व त्याने पगार दिला नाही. उलट फुटलेल्या ग्लासाची किंमत भीमूकडून मागितली. भीमूने न्यायाधिशाकडे तक्रार केली.

न्यायाधिशाने दोघांना बोलविले व सर्व ऐकून घेऊन सोनूशेटला विचारले–"तुम्ही भीमूला मोठा ग्लास फोडल्या शिवाय धाकट्या ग्लासात घालायला सांगितले होते का? तुम्ही सांगितलेत तसे त्याने काम केले." नंतर त्याने भीमूला सोनूशेट कडून पगार देवविला.





# तोच की हा !

राजूला उनाडक्या करीत असलेला पाहून त्याचा बाप त्याला रागावला. तेव्हां राजू रात्री घरातलेच पैसे चोरून पळून गेला. हिंडत फिरत बरेच दिवसांनी तो काशीला आला.

काशीच्या गल्लचांतून गंमत पहात हिंडत तो एका गल्लीच्या वळणावर आला तेव्हां त्याला एक माणूस पंचा अंथरून रस्त्याच्या किनाऱ्याला बसलेला दिसला. तो जादुगार होता. राजूचा नवखा चेहरा पाहून मांत्रिकाने त्याला जवळ बोलावून विचारले–"काय रे मुला, काय रे तू कोठून दक्षिणेकडून आल्यासारखा दिसतो आहेस? माझी मंत्रविद्या पाहणार आहेस का?" असे म्हणत त्याने एक हातचलाखी करून दाखविली.

राजू ती जादू पाहून थक्क झाला व त्याने आपले आश्चर्य बोलून व्यक्त केले.

"तू मला पांच रुपये दिलेस तर तुला मी ही जादू शिकवीन." जादुगारने त्याला आपल्या जाळ्यात फसविण्यासाठी म्हटले.

राजू विचार करू लागला की ही जादू शिकवून घेतली तर सर्व लोक त्याची पाठ थोपटतील व एका योग्य गुणी माणसात त्याची गणना होऊ लागेल. त्याने लगेच मांत्रिकाला पांच रुपये काढून दिले व ती जादू शिकून घेतली. त्याने विचार केला की जादू ही दाखवून आपल्याला दुसऱ्याजवळून पैसे मिळविता येतील.

दुसऱ्या दिवशी राजू पुन्हा त्या बाजूने जाऊ लागला तेव्हां तो जादुगार चारी बाजूला जमलेल्या लोकांना दुसरी एक जादू करून दाखवीत असलेला त्याला दिसला. सर्व लोक निघून गेल्यावर राजूने जादुगाराला दहा रुपये दिले आणि त्याच्याकडून ती नवी जादू शिकून घेतली.

अशा तऱ्हेने राजूने जादुगाराला सुमारे शंभर रुपये थोडेथोडे करून दिले व त्याच्याकडून निरनिराळी हातचलाखीची कामे शिकून घेतली परंतु एकदां त्याच्या गावचे लोक त्याला अचानकपणे भेटले व त्याला समजावून सांगून आपल्या घरी बोलावून घेऊन गेले.

आपल्या गावी आल्यावर राजूला आपण मोठी किमया शिकून आलो आहो व एक गुणी माणूस झालो आहो हे सिद्ध करून दाखविण्याची इच्छा झाली. त्याने आपली जादूची पोतडी बरोबर घेतली आणि गावात सर्व लोक जमत त्या ओटीवर जाऊन बसला. त्याने, ती मंत्रविद्या शिकून आल्याचे सांगितले व म्हणाला–"मी पैज लावतो, जो कोणी माझी जादू करून दाखवील त्याला मी पन्नास रुपये देईन. परंतु जर कोणी प्रयत्न करून हारला तर त्याने मला फक्त पांच रुपये दिले पाहिजेत. एका दोघांनी त्याचे आव्हान स्वीकारले व प्रयत्न करून हारले. म्हणून पांचपांच रुपये देऊन तेथून निघून गेले. त्यानंतर कोणी ते आव्हान स्वीकारण्याचे धाडस केले नाही. तरी दुसऱ्या गावातले लोक येत आणि पैज हारून पांच रुपये देऊन निघून जात.

म्हणून राजूची हिंमत वाढली. त्याने आतां पैजेची रक्कम पन्नासावरून शंभरावर नेली. हारणाऱ्याने मात्र पांचच रुपये द्यावेत असे त्याने सांगितले. तेव्हां एक भिकारी आपल्या भाग्याची परीक्षा पाहा-



यला समोर आला. त्याने राजूने केलेली जादू करून दाखविली आणि शंभर रुपये जिंकले.

राजू रडकुंडीला आला. हातचे शंभर रुपये गेले आणि त्यांबरोबर गावातल्या लोकांवर त्याने जी छाप पाडली होती ती घालवून बसला. त्याला वाटत होते की तो जे चमत्कार करून दाखवीत होता ते त्याच्याशिवाय कोणाला दाखविता येणेच शक्य नाही. परंतु ते चमत्कार एक म्हातारा भिकारीसुद्धा करून दाखवू लागला. ज्या इच्छेने ही मंत्रविद्या शिकून घेतली होती तीच त्याला धोक्याची वाटू लागली.

राजू त्या भिकाऱ्याच्या पाठोपाठ बराच दूर गेला गावाबाहेर त्या भिकाऱ्याला गाठून राजूने विचारले–"काय रे, तू ही विद्या काशीत शिकलास का?"

"काय म्हणतां? हे सामान्य जादूचे प्रयोग शिकायला काशीपर्यंत जायची गरजच काय?" भिकाऱ्याने उलट प्रश्न विचारला.

राजूने त्याचा आवाज ओळखला. त्याला काशीत ज्या मांत्रिकाने मंत्रविद्या शिकविली होती तोच मांत्रिक भिकाऱ्याच्या वेषात आला होता. राजूने तत्काळ त्याची मान धरली व दटावून विचारले–"बोल, कोण आहेस तू?"

त्या माणसाने आपली मान हिसका देऊन सोडविली व म्हणाला–"मी उदर-निर्वाहाचे एक साधन म्हणून ही हातचलाखी शिकून घेतली होती. परंतु मी तुझ्या पाठोपाठ हा विचार करून आलो की तुझ्यासारख्या श्रीमंताच्या मुलाला या मंत्रविद्येची गरज का असावी? मी ते स्वतःच्या डोळ्यांनी पाहण्यासाठी आलो होतो. तुझ्या बापाने पुष्कळ पैसे मिळवून ठेवले आहेत. तू काही कामधंदा कर, नाहीतर व्यापार कर. जादूमंत्र करून तू कितीसे पैसे मिळविणार?"

ते ऐकल्यावर राजूचे डोके ठिकाणावर आले. त्या दिवसापासून त्याने पित्याच्या धंद्यात लक्ष घालायचे ठरविले. पुढे तो आपल्या धंद्यात वाकबगार झाला.



# मारुती अवतरला

रामशास्त्री नांवाच्या एका वैद्यबुवांकडून दामू नावाच्या त्यांच्या मित्राने एक हजार रुपये उसने मागून घेतले. त्यांनी रामूकडून कर्जरोखा वगैरे लिहून घेतला नाही की कोणी त्यावेळी तेथे साक्षीदारही नव्हता. म्हणून शास्त्रीबुवांनी दामूजवळ उसने दिलेले हजार रुपये मागितले तेव्हां त्याने घेतलेच नसल्याचे साफ सांगून टाकले. ती गोष्ट शास्त्रीबुवांनी बायकोला सांगितली. तेव्हां बायको म्हणाली–"तुम्ही एवढी काळजी कशाला करतां? तुम्ही मारुतीची एवढी आराधना करतां, तोच वसूल करून देईल."

रामशास्त्रीने उसने पैसे वसूल करण्याचा विचार सोडल्याची दामूला खात्री झाली तेव्हां त्याने एक हजार रुपयांचे सोने विकत घेतले आणि शंकर सोनाराला त्याचे बायकोसाठी बिलवर करून द्यायला सांगितले. शंकर सोनाराने पितळी बिलवर त्यांवर सोन्याचे पाणी देऊन ते दामूला आणून दिले. दामूना जेव्हां ते पितळी असल्याचे कळले तेव्हां तो भांडायला आला. शंकर सोनार ते बिलवर त्याने केलेले नाहीत असे सांगून मोकळा झाला.

शंकर सोनाराने रघुनाथरावांकडून एक एकर जमीन पंधराशे रुपयाला ठरवून दामूचे एक हजार रुपये अगाऊ रक्कम म्हणून पुढे केले. उरलेले पांचशे द्यायला शंकर सोनार गेला तेव्हां रघुनाथराव म्हणाले–"वा रे, मी अडीच हजाराला देतो म्हणालो होतो."

रघुनाथराव सावकारीसुद्धा करीत. एकदा विश्वनाथभटाने रघुनाथरावांकडून एक हजार रुपये कर्जाऊ घेतले आणि गाव सोडून रात्रीच्या रात्री पळून गेला. वाटेत चोरांनी त्याला धरले आणि त्याच्याजवळचे हजार रुपये काढून त्याला सोडून दिले.

चोरांनी ते पैसे रानात एका वडाच्या ढोलीत लपवून ठेवून दिले. एकदा रामशास्त्री औषधी वनस्पतींच्या शोधार्थ त्या रानात फिरत असतां एका माकडाने वडाच्या ढोलीतली हजार रुपयांची नोट काढली व निरुपयोगी समजून फेकून दिली. रामशास्त्रींना अज्ञातऱ्हेने एक हजार रुपये मारुतीचा अवतार घेऊन आलेल्या माकडाने दिले.





# भूतवैद्य

पार्वतीपूरच्या शेजारच्या एका गावी धोंडीबा नावाचा एक लबाड माणूस रहात असे. गावातले लोक त्याला एक सज्जन माणूस समजत. परंतु होता तो वस्ताद, लोकांना फसवून पैसे उकळी.

एकदा त्याने करीमला एक नवी छत्री विकत घेत असतां पाहिले. दुसऱ्या दिवशी पाऊस पडू लागला तेव्हां करीमकडे जाऊन त्याने छत्री घेतली. नंतर कित्येक दिवस लोटले तरी त्याने ती परत दिली नाही.

एकदां धोंडिबाला एकटा पाहून करीमने छत्री परत मागितली व म्हणाला—"वा रे वा, विसरलास की रे?"

करीमचा भुतांखेतांवर विश्वास होता. ही गोष्ट धोंडिबाला चांगली ठाऊक होती.

एके दिवशी एकाएकी धोंडिबा आणि करीम दोघांची भेट झाली. तेव्हा इकडच्या तिकडच्या गप्पा मारीत धोंडीबा म्हणाला—"करीम! मी त्या दिवशी तुझ्याकडून छत्री घेतली खरी, परंतु पाऊस इतका पडत होता की रात्री घरी परत जात होतो, तेव्हां काय झालं, माहीत आहे का? आपल्या गावाबाहेर एक वडाचे झाड आहे ना? त्या झाडावरून एक भूत अकस्मात् उडी मारून माझ्यासमोर दत्त म्हणून उभे राहिले आणि छत्री घेऊन पळू लागले. मी त्याला किती सांगितले की 'बाबा रे ही छत्री करीमची आहे! तू घेऊन गेलास तर तो गप्प राहणार नाही.' तेव्हां भूत म्हणाले—"तो तुझ्या वाटेला गेला तर ती बातमी झाडाच्या ढोलीत येऊन सांग, मी पुढे काय करायचं ते पाहून घेईन.' मी अगदी गळ्या-शपथ सांगतो, तीन दिवस अंथरूण धरून होतो. कालपरवांपासूनच घराबाहेर पडलो आहे. मी काय करू?"

भुताचे नाव ऐकल्याबरोबर करीमची बोबडी वळली. तो म्हणाला—"जाऊ दे रे, भुतानेच उचलून नेली तर तू तरी काय करणार?"

पार्वतीपूरला खंडोबा नावाचा एक भूत वैद्य होता. एकदां बोलतांबोलतां करीमने खंडोबाला त्याची छत्री धोंडीबाच्या हातातून भुताने काढून नेल्याचे सांगितले.

खंडोबा म्हणाला—"माणसाच्या मानेवर भूत बसले म्हणजे मी उतरवितो. परंतु मी तुझी छत्री कशी आणून देऊ, बाबा? तरी त्या वडाच्या झाडावर भूत असेल तर मी कधी न कधी त्याचा समाचार घेतल्या-शिवाय राहणार नाही."

धोंडीबा व खंडोबा यांचे आपसात जुने वैर होते. कारण धोंडीबाने गावात असा प्रचार केला होता की भूत प्रेत या सर्व गप्पा आहेत. खंडोबा लोकाना फसवून पैसेमात्र उकळतो. म्हणून धोंडिबाची खोड मोडण्याचे खंडोबाने मनाशी ठरविले होते.

एका आठवड्यानंतर दुपारच्या सुमारास धोंडीबा पुरी, भजी वगैरे विकायला एका गावाहून दुसऱ्या गावी जात होता. एका जागी करीम अचानक त्याला भेटला. धोंडीबाच्या हातात छत्री होती व ती करीमची होती. करीमने विचारले—"ही छत्री तर माझीच दिसते आहे!"



"होय, ही तुझीच आहे." धोंडीबा म्हणाला.

"परंतु तू तर म्हणालास की भूत हिसकावून घेऊन गेले होते म्हणून?" करीमने विचारले.

धोंडीबा अंगात भूत आल्यासारखा डोळे गरागरा फिरवीत म्हणाला—"मग, तू मला काय समजलास? धोंडीबाच्या हातावून हिसकावून घेणारे भूतच आहे मी!"

ते ऐकून करीमला कांपरे भरले आणि तेथून त्याने पळ काढला. पळत असतां समोरून येणाऱ्या खंडोबावर तो आदळला. खंडोबा कोठून तरी भुताटकी उतरवून परत येत होता.

"काय झालं रे? तू असा कांपतो आहेस कां?" खंडोबाने करीमला विचारले.

"तो छत्री घेऊन जातो आहे ना, तो धोंडीबा नाही, भूत आहे! त्यानेच हे सांगितले." करीम म्हणाला.

"अस्सं!" म्हणत खंडोबाने कडु-लिंबाची एक लांब फांदी तोडून घेतली व धोंडिबाच्या मागून धावत जाऊन ओरडला–"अरे ए भुता! थांब!"

धोंडिबाने त्याच्यावर येणारा प्रसंग ओळखला आणि पळू लागला. तेव्हां खंडोबा ओरडला–"अरे, तो चोर आहे, त्याला पकडा, पळून जाऊ देऊ नका." ते ऐकून शेतात काम करणाऱ्या शेतकऱ्यांनी पळत जाऊन धोंडिबाला धरले.

तितक्यात खंडोबा आला आणि कडू लिंबाच्या काठीने धोंडीबाला फटाफट मारीत म्हणाला–"हा खंडू भुतांना कसा ताळ्यावर आणतो, माहीत आहे का? तू कोणत्या तरी झाडाच्या ढोलीत पडून राहायचे सोडून पावसात कशाला आलास? आणि तुला छत्री हवी, नाही का?"

धोंडीबा करीमला छत्री परत देत म्हणाला–"बाबा रे, मी भूत नाही की पिशाच्च नाही. मी धोंडीबा आहे. मला सोड!"

परंतु खंडोबाने धोंडीबाच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले व म्हणाला–"बेट्या! तू मला शिकवितोस की भूत कोण व माणूस कोण? तू माझ्या समोर ही सोंग करू नकोस. मी आज तुझा मारण होम करणार आहे!"

"ह्राम्! 'ह्रीम्'! फट!" म्हणत खंडोबाने धोंडीबाला झोडपून काढले.

धोंडीबा तेथून जीव घेऊन पळाला.

"करीम, चल घरी, ते भूत आयुष्यभर तुझ्या वाटेस जाणार नाही!" खंडोबा म्हणाला.

करीमच्या मनात धोंडीबाला भुताकडून त्याला खंडोबाच्या मदतीने छत्री परत कशी मिळाली, हे भेटून सांगावेसे होते. परंतु त्यानंतर धोंडीबा त्याला गावात कधी भेटलाच नाही.






युधाजित म्हणाला त्याचे उत्तर न देऊ शकल्यामुळे काशीचा राजा मान खाली करून अंत:पुरात गेला व बायकोला म्हणाला–"आपल्या मुलीने सुदर्शन सोडून आणखी कोणत्या तरी राजकुमाराशी विवाह करायचे मान्य केल्याशिवाय आपलं मानरक्षण होणे अशक्य."

राणी मुलीकडे गेली व तिला म्हणाली–"मुली, तुझ्याशी लग्न करण्याचे ठरवून इतके राजकुमार आले असतां तू सुद-र्शनशीच लग्नाचा हट्ट धरून बसली आहेस, त्यामुळे आमच्यावर केवढा मोठा प्रसंग ओढवणार आहे, याची तुला कल्पना तरी आहे का? युधाजित सुदर्शनाबरोबर तुझा, माझा व तुझ्या वडिलांचा वध केल्याशिवाय राहणार नाही." असे सांगून तिने मुलीचे मन वळविण्याचा यत्न करून पाहिला.

त्याच वेळी पित्याने येऊन शशिकलेचे मन वळविण्याचा प्रयत्न करून पाहिला.

शशिकलेने शेवटी सांगून टाकले की आत्महत्या करून घेईन, परंतु आणखी कोणाशी विवाहाला तयार होणार नाही. म्हणाली–"तुम्हांला या राजांची एवढी भीती वाटत असेल तर माझे सुदर्शनशी लग्न लावून द्या आणि गावाच्या वेशीबाहेर आम्हांला पोचती करा. युद्ध झालेच तर तो शत्रूंचा पराभव करील."

"माझे आई! एकाच वेळी कित्येकां-बरोबर युद्ध करणे कोणाला शक्य आहे का? उगाच असा हट्ट धरून बसू नकोस. तुम्हांला



नगराच्या वेशीबाहेर पोचविलेच समज, ते सर्व येऊन तुम्हांला घेरून मारतील.तेव्हां तुमचे रक्षण कोण करील? मला युक्ती सुचली आहे. सीतेच्या लग्नाला एक परीक्षा ठेवली होती तशी एक परीक्षा तुझ्या लग्नाला ठेवू या. त्यात जो जिंकेल त्याच्याशी तू लग्न कर."

"परंतु प्रश्न थोडाच सुटणार आहे? त्या परीक्षेत कोणीतरी जिंकेल व माझ्याशी लग्न करील. तेव्हां तरी इतर लोक स्वस्थ बसतील का? काय वाटेल ते झाले तरी युद्ध हे होणारच! महादेवीवर भरंवसा ठेवून माझे लग्न सुदर्शनशी करून

तिने म्हटले तेच बरोबर असे मानून सुबाहू सभेत आला व म्हणाला–"महाराज हो! आज सभा बरखास्त करू या. उद्यां तुमच्या सर्वांच्या मताप्रमाणे स्वयंवर होईल. आपण सर्वांनी कृपा करून आपापल्या निवासस्थानी जाण्याची कृपा करावी."

सर्व राजे आपापल्या शिबिरात परतले आणि राजधानीच्या चारीबाजूला पाहारा देण्यासाठी त्यांनी सैन्य उभे केले.

सुबाहूने गुप्तपणेच सुदर्शनला बोलावून घेतले व मुलीशी त्याचा विवाह करून देऊन शास्त्रोक्त कन्यादान केले. त्यावेळी त्याने आपल्या जांवयाला दोनशे रथ, हजारो घोडे, शेकडो दासी व इतर भेटीच्या वस्तू दिल्या. तो मनोरमेला म्हणाला–"ताई! आता माझी मुलगी तुझी सून झाली. तिचा प्रेमाने सांभाळ कर."

मनोरमा आनंदाने म्हणाली–"दादा, तू एका राज्याचा अधिपती असूनही सिंहासन-पदच्युत अशा माझ्या मुलाला आपली मुलगी दिलीस. ती मुलगी म्हणजे रत्नाची पेटी आहे. तुझ्या सारखा थोर मनाचा माणूस कोठेही मिळणे शक्य नाही. तुझ्या मुलीला संभाळण्याचा भार आमच्यावर आहे. तसा आम्हांला संभाळण्याचा भार

तेव्हां सुबाहू म्हणाला–"तुझा मुलगा राज्य चालवून बसला असे तू कां मानतेस? माझे राज्य हे त्याचे नाही का? माझे सर्व सैन्य मी देतो. आपण न्यायाने वागत असतां एक राजा आणि एक सेवक हा भेद येणारच कोठून? इतर राजे ते सरळ मार्गाने मानायला तयार नसतील तर मी सुद्धा युद्धाला तयार आहे! जगदंबेची कृपा असल्यावर आपण काळजी करण्याचे कारणच काय?"

"दादा! तू म्हणालास ते ऐकून मनाचे किती समाधान झाले म्हणून सांगू? तुझे सर्वदा शुभ होवो! तुझे राज्य तू व तुझ्या मुलांनी सुखाने उपभोगावे. जगन्मातेचा अनुग्रह असेल तर माझा मुलगा आपल्या वडिलांचे राज्य पुन्हा मिळवू शकेल. माझ्या मुलाचे भाग्य यावेळी चांगले दिसते आहे. त्याला चांगले दिवस पहायला मिळणार आहेत. आतां त्याच्यावर कोणतेही संकट येणार नाही." मनोरमा म्हणाली.

मध्यंतरी जागोजागी शिबिरांत उतरलेल्या राजे रजवाड्यांना मंगलवाद्ये ऐकू आली. ते म्हणू लागले–"ही मंगलवाद्ये कसली बुवा? ही तर लग्नसमारंभाची मंगल वाद्येच दिसताहेत!" या राजाने आपल्या डोळ्यात धूळ फेंकून गुप्तपणे मुलीचे लावून दिले की काय?" असे निरनिराळ्या प्रकारे ते आपसात विचार



करू लागले. त्याच वेळी सुबाहू येऊन त्यांना निमंत्रण देत म्हणाला–"महाराज हो, आपण सर्वांनी लग्नाच्या मेजवानीला येण्याची कृपा करावी."

ती बातमी निमूटपणे ऐकायला राजे रजवाडे तयार नव्हते. काशीचा राजा त्यांना म्हणाला–"मी तरी काय करणार? मी मुलीला किती समजावून सांगितले, परंतु ती ऐकायला तयार नाही, आणि त्या सुदर्शनशीच तिने लग्न करून घेतले. आपण सर्वांनी माझ्यावर कृपा करून या मेजवानीला यावे व माझी अब्रू राखावी."

"राजा, आमचे जेवण झाले. मध्यरात्रीच्या वेळी लग्न वगैरे कामात



गेला असशील. जेवणाचं काय रे? तू जा! आम्हीसुद्धां जातो!" सर्व राजे म्हणाले.

सुबाहू ते म्हणाले त्यावर विश्वास न झाल्यामुळे संशय करीतच परतला.

तो निघून गेल्यावर राजांपैकी काहीजण म्हणाले, त्या सुदर्शनाला यमसदनाला पाठवून राजकन्येला घेऊन जाऊ या. आणखी काहीजण म्हणाले, ते बरोबर होणार नाही. लग्न झाले. आपण आपल्या वाटेने निघून जाऊ या.

तिकडे सुबाहूने लग्नसंस्कारातले जे विधी उरले होते ते पुरे केले व मुलीला सासरच्या मंडळींना सोपवून त्यांना निरोप देत असतां काही राजे आले व म्हणाले— "वधुवरांना आताच निरोप देऊ नका. वाटेत शत्रू त्यांचा वध करायला टपून बसले आहेत."

राजे म्हणाले त्यात तथ्य असल्याचे ओळखून सुबाहू पाठविणीचा संस्कार करावा की करू नये या विचारात पडला.

तेव्हां सुदर्शन त्याला म्हणाला—" राजा! आपण इतकी काळजी करण्याचे मुळीच कारण नाही. स्वतः देवी माझ्या पाठीशी उभी असतां हे सर्व राजे माझ्या केसालाही धक्का पोचवू शकणार नाहीत. आम्ही आमच्या आश्रमात जाऊन सुखाने आनंदाने राहू. आश्रमात गृहस्थाश्रम कसा हा विचारही करण्याचे मुळीच कारण नाही. त्या नैसर्गिक सौंदर्यासमोर नगर आणि राजधानीची शोभा कुचकामाची ठरेल!"

काशीच्या राजाने आपल्या जावयाला अपार धन दिले आणि सपरिवार व ससैन्य निरोप द्यायला स्वतः निघाला.

वाटेत वाट पहात बसलेले राजे त्यांना येत असलेले पाहून म्हणाले—" तो पहा रथ! तोच तो सुदर्शन! बायकोबरोबर निघाला आहे. धरून ठोकून काढू या, चला!" म्हणाले व निघाले.

सुबाहू त्यांना आडवा आला. सुदर्शनाने जगदंबेचा मंत्रजाप सुरू केला आणि ध्यान मग्न झाला. त्याच वेळी शत्रुजित व युधाजित त्याच्यावर चालून आले. सुबाहूला स्फुरण चढले व त्याने शंख फुंकला आणि युधाजितवर शरवृष्टी सुरू केली. दोघांत घोर युद्ध सुरू झाले.

इतक्यात जगदंबा एका दिव्य रूपात प्रगट झाली. तिच्या हातात अनेक शस्त्रास्त्रे होती. फुलांच्या माळाही होत्या ती सिंह वाहनावर बसून आली होती. सुदर्शनाला परमानंद झाला. त्याने आपल्या सासऱ्याला देवीकडे पहायला सांगितले व म्हणाला— "आतां आपल्याला भय कसले?" असे म्हणत तो रथातून उतरला. सासऱ्याला व पत्नीलाबरोबर घेऊन देवीच्या पायांवर त्याने लोटांगण घातले.

हत्ती सिंहाला पाहून भयकंपित झाले व 'चीत्कार' करू लागले. सिंह त्यांना पाहून गर्जना करू लागला. त्याच वेळी एक मोठे वादळ सुरू झाले आणि एक उग्र दृश्य दिसू लागले. सर्व राजे थरथर कापू लागले आणि देहभान विसरून जागच्या जागी निश्चेष्ट उभे राहिले.

तेव्हां सुदर्शन सेनापतीला म्हणाला— "महादेवी आपल्या मदतीला धावली आहे. सैन्याला तुटून पडायला आज्ञा करा.

काशीराजाचे सैन्य शत्रूवर चालून गेले.

त्यावेळी निश्चेष्ट उभे असलेल्या राजांना संबोधन करून युधाजित म्हणाला—"कोणती



तरी बाई सिंहावर बसून आल्याबरोबर तुम्हांला बुद्धिभ्रम झाला वाटते? एक पोरगा एका बाईला बरोबर घेऊन आल्याबरोबर इतके तुम्ही घाबरून निश्चेष्ट पहात उभे राहलात का? एका क्षणात त्याचा वध करून राजकन्येला पकडून नेऊ या. चला, व्हा पुढे!" असे म्हणत आपला नातू शत्रुजित याला बरोबर घेऊन सुदर्शनाशी युद्धाला निघाला.

तेव्हां जगदंबाने त्याच रूपात सर्व राजांसमोर एकदम प्रगट झाली व युद्ध करू लागली. क्षणार्धात शत्रुजित व युधाजित बाण लागून रणांगणावर आदळले. सर्व भयकंपित होऊन पाहू लागले. सुबाहूच्या



डोळ्यांतून आनंदाश्रू वाहू लागले. तो त्या पराशक्तीचे स्तोत्र गाऊं लागला–"माते! तुझ्या दर्शनाने धन्य झालो. तू सर्वदा माझ्या हृदयातच वास कर आणि या काशीतच कायमचा निवास कर. मला आणखी कोणाच्या मदतीची गरज नाही. ही पृथ्वी आहे तोपर्यंत काशी राहील असे सांगतात! काशी आहे तोंपर्यंत तू येथेच रहा आणि आम्हांला शत्रुभय राहणार नाही, असे कर."

महादेवी 'तथास्तु!' म्हणाली.

नंतर सुदर्शनने महादेवीचे स्तोत्र म्हटले. म्हणाला–"माते! यापुढे माझे कर्त्तव्य काय? मी कोठे जाऊ, म्हणतेस? मी स्वत: असमर्थ असलो तरी तू पाठीशी असल्यावर मी कोणतेही कठीण काम करू शकेन. म्हणून माझ्या कर्त्तव्याची मला जाणीव करून देण्याची माझ्यावर कृपा कर."

देवी म्हणाली–"आता पुढे काय करायचे हे काय विचारतोस? बायकोला घेऊन अयोध्येला जा आणि राज्याभिषेक करून घे. आणि योग्य तऱ्हेने राज्य कर. मी वरून तुझे रक्षण करीन. प्रत्येक अष्टमीला, नवमीला व चतुर्दशीला माझी पूजा कर. मला शरत्काल प्रिय आहे. नवरात्रीची पूजा कर. माघ, चैत्र, आश्वीन व आषाढ महिन्यात माझा उत्सव कर." असे सांगून देवी अंतर्धान पावली.

त्यानंतर राजे एकामागून एक आले व इंद्राची देव जशी स्तुती करतात तशी सुदर्शनाशी स्तुती करून देवीचे स्तोत्र म्हणू लागले. सुदर्शनला आपला चक्रवर्ती मान्य करून म्हणाले–"महाराजाधिराज! आपण आमच्यावर कृपा दृष्टी असू द्यावी. आमच्या हातून काही अपराध घडला तर क्षमा करावी. आपल्या कृपेमुळेच तर आम्हांला जगदंबेचे दर्शन घडले!"

नंतर सर्व राजे आपापल्या देशात निघून गेले. काशी राजाने आपल्या जावयाला व मुलीला निरोप दिला.

सुदर्शन अयोध्येला पोचला त्या आधीच त्याच्या आगमनाची वार्ता तेथे पोचली

होती. म्हणून सर्व मंत्री मंगलवाद्ये वाजवीत त्याला सामोरे आले आणि अत्यंत आदरपूर्वक सुदर्शनला व राणीला राजधानीत घेऊन गेले.

सुदर्शन आपल्या सावत्र आईला भेटायला गेला. मुलगा निवर्तल्याचे ऐकून ती रडत होती. तिला नमस्कार करून तिचे सांत्वन करीत म्हणाला–"माई! तुझ्या मुलाचा व वडिलांचा वध मी केला नाही, देवीने केला. मी हे तुझ्या पायाची शपथ घेऊन सांगतो आहे. मला आपलाच पुत्र मान. माझ्या आईपेक्षा ज्यास्त प्रेमाने तूच मला आईसारखी हो! मी कोणत्याही प्रकारे भेदभाव मनात बाळगणार नाही. मी नित्य मातृसेवा करीन. मी तान्हेला असतां तुझ्या वडिलांनी दुष्टपणाने मला राज्यच्युत केले ते मी आपले प्रारब्धच मानीत आलो, त्याबद्दल मी कोणाला दोष दिला नाही. तुझ्या वडिलांनी माझ्या आजोबांचा वध केला तेव्हां माझी आई मला माहेरी घेऊन जात असतां वाटेत चोरांनी आम्हांला लुटले. नंतर गंगातीरी ऋषींच्या आश्रमात आम्ही आश्रय घेतला. देवीच्या कृपेनेच ही स्थिती प्राप्त झाली. आजही माझ्या मनांत कोणाविषयी द्वेष नाही."

तो म्हणाला ते ऐकून लीलावती लज्जित होऊन म्हणाली–"मी 'नकोनको' म्हणत असतां माझ्या वडिलांनी दुर्लक्ष करून तुझ्यावर अन्याय केला. त्यामुळे शेवटी ते स्वतः यमसदनी गेलेच, माझ्या मुलालासुद्धा बरोबर घेऊन गेले. तुझी आई मला मोठ्या बहिणीसारखी आहे. तू मला मुलासारखा आहेस. मी दुःखी होण्याचे कारणच नाही. माझे वडील व मुलगा मरण पावले त्याला तू कारण नाहीस, हे मला माहीत आहे."

नंतर सुदर्शनाने आपल्या मंत्र्याकरवी एक सोन्याचे सिंहासन तयार करविले आणि त्यावर जगदंबेची प्रतिष्ठा करून तिला बसविले. दररोज तिची पूजा करीत राहून स्वतःचा राज्याभिषेक करून घेतला आणि सुखाने राज्य केले.





# मूळ अपराधी

जनप्रिय महाराजांच्या मनात प्रामाणिक नोकरांना पारितोषिक देऊन त्यांचा विशेष सत्कार करण्याची इच्छा उत्पन्न झाली. म्हणून त्यांनी आपल्या दोघां मंत्र्यांची नेमणूक केली. त्यांनी सर्व कर्मचाऱ्यांची वागणूक पाहून आपापले मत महाराजांना निरनिराळे कळवायचे असे ठरले. दोघांच्या दृष्टीने जे चांगले कर्मचारी ठरतील त्यांचा सत्कार एक महिन्याचा पगार पारितोषिक म्हणून देऊन करण्याचे महाराजांनी ठरविले.

दोघां मंत्र्यांनी एक महिनाभर सर्व राजकर्मचाऱ्यांच्या कामाची पाहाणी केली आणि आपापले मत दिले. राजाने दोघांची मते लक्षपूर्वक वाचली.

एकूण राजकर्मचारी सुमारे दोनशे होते. गोविंद मंत्र्याच्या मते फक्त पन्नास जणच प्रामाणिक निघाले. परंतु ईश्वर मंत्र्याच्या दृष्टीने दीडशे लोक प्रामाणिक असल्याचे कळले. दोघांच्या दृष्टीने जे प्रामाणिक निघाले ते फक्त पांच जणच होते.

जनप्रिय राजाने अत्यंत आनंदाने त्या पांच जणांना बोलावून त्यांना एक महिन्याचा जादा पगार देऊन त्यांचा सत्कार केला.

तो सत्कार झाल्यावर बाकीचे राजकर्मचारी महाराजांच्या दर्शनास हे विचारायला आले की त्या पांच जणांचीच निवड महाराजांनी कशी केली.

महाराज म्हणाले–"मी दोघां मंत्र्यांना या कामावर नेमले आणि दोघांही मंत्र्यांनी ज्या पांच जणांच्या नावाची शिफारस केली, त्यांना मी पारितोषिक दिले.

"तरमग बाकीच्या सर्वांच्या विषयी हे प्रामाणिकपणे काम करीत नाहीत असा एक मताने दोघांनी निर्णय दिला आहे का?" असे राजकर्मचाऱ्यांनी विचारले.

"नाही. एका मंत्र्याने काही जणांची निवड केली आणि दुसऱ्याने सुद्धा काही निवड केली. परंतु ज्यांच्या नावांची दोघांनी निवड केल्याचे दिसले त्यांना पारितोषिक देण्यात आले." महाराज म्हणाले.

"हा अन्याय आहे, महाराज!" एक राजकर्मचारी म्हणाला. "एकाने निवड केली व दुसऱ्याने केली नाही, तर त्यात चुकले काय?" राजाने विचारले.

सर्व समाधान न झाल्यासारखे परतले.

दुसऱ्याच दिवशी चिरंजीवी देशाटन करीत त्या राजधानीत आला. चिरंजीवी हा विचारवंत ज्ञानी पुरुष असल्याचे ऐकून जनप्रिय महाराजांनी खास निरोप पाठवून त्यांना राजवाड्यात आदरपूर्वक बोलावून घेतले. त्यांचा योग्य अतिथिसत्कार करून त्यांचा सल्ला विचारला. म्हणाले–"एका माणसावर दोघां जणांना नजर ठेवून त्याच्या विषयी आपले मत द्यायला सांगितल्यावर दोघांनी निरनिराळे मत दिले असतां कोणाचे मत स्वीकारावे?"

चिरंजीवी स्मित करून म्हणाला– "नजर ठेवणाऱ्या दोघांपैकी एक शिक्षेस पात्र असावा अशी मला शंका आहे!"

चिरंजीवी म्हणाला त्यात महाराजांना सत्याचा अंश दिसला व त्यांनी खोल चवकशी केली तेव्हां, ईश्वर मंत्रीने राजकर्मचाऱ्यांना आधीच सूचना देऊन त्यांच्याकडून लांच घेतल्याचे व त्यांच्याच नावांची शिफारस केल्याचे कळले. ज्यांनी लांच दिली होती त्यांना ती गोष्ट महाराजांच्या कानावर घालायला भीती वाटत होती. त्यांच्यावर गोविंद मंत्र्याचीपण नजर होती, ती गोष्ट त्यांना ठाऊक नव्हती.

ही सारी गोष्ट आपल्याला कळू नये, याबद्दल राजाला वाईट वाटले. त्याने गोविंद मंत्र्याची पाठ थोपटली व बाकीच्या पंचेचाळीस जणांना पण एक महिन्याचा पगार पारितोषिक म्हणून दिला. ईश्वर मंत्र्याला व त्याला लांच देणाऱ्या कर्मचाऱ्यांना शिक्षा करून चिरंजीवीचा सत्कार करून त्याला निरोप दिला.





# बदल

अमरावतीचा राजा शिवसेन एके दिवशी राजवाड्यावरून खाली पहात असतां रस्त्यावरून जाणाऱ्या भिकाऱ्यांना पाहून त्याला त्यांची कींव आली. आपल्या राज्यात कोणी भिकारी असू नये, असे काहीतरी केले पाहिजे, असे त्याने ठरविले. सर्व जमिनदार असण्याची गरज नाही, परंतु पोट भरण्यापुरते अन्न आणि अंगभर कपडासुद्धा काही जणांजवळ असू नये हे बरोबर नाही!

देशात आवश्यक बदल घडवून आणला पाहिजे व त्यासाठी आवश्यक उपाय योजना केली पाहिजे असे शिवसेन राजाने आपल्या प्रधानाला बोलावून सांगितले.

प्रधान थोडा वेळ विचार करून म्हणाला– "महाराज, आपल्या मनातला विचार फार चांगला आहे. परंतु दारिद्र्यामुळे भिकाऱ्यांची निर्मिती होते, त्या दारिद्र्याचे मूळ कारण काय, हे पाहिले पाहिजे. फक्त दारिद्र्यामुळे भिकारी झालेल्या प्रत्येकाला, पैशाची मदत केली गेली तर सर्व पैसे फुकट वाटल्या सारखे होईल व प्रयत्न फुकट गेल्यासारखे होईल."

"दारिद्र्याचे मूळ कारण काही असले तरी दारिद्र्य हे असह्य नव्हे का? ते नाहीसे केले तर केव्हांही बरेच होईल नाही का?" राजाने उलट प्रश्न करून आपली बाजू मांडली.

"महाराज, पैशाने कोणताही प्रश्न सुटत नसतो. पैसा मिळाल्याने चांगले झालेले लोक आहेत व बिघडलेले लोक सुद्धा या जगात आहेत. फक्त दरिद्री लोकांत नव्हे, तर श्रीमंतातही पैशामुळे बिघडलेले लोक पुष्कळ आहेत." मंत्री म्हणाला.

"ती गोष्ट सर्व गरीबांना व भिकाऱ्यांना लागू होत असेलसे वाटत नाही. पाहिजे



तर काही गरिबांना पैशाची मदत करून त्यांची स्थिती सुधारते की बिघडते हे पाहू या." राजा म्हणाला.

त्या दिवशी रात्री राजा व प्रधान वेष पालटून नगराबाहेरच्या धर्मशाळेत गेले. तेथे चार जण गरीब बसून गप्पा मारीत असलेले दिसले. राजा व मंत्री त्यांच्या जवळ जाऊन बसले व त्यांच्याशी बोलू लागले.

त्यांच्यापैकी पहिला भिकारी होता व तो एका भिकाऱ्याचा मुलगाही होता. तो दहा वर्षांचा होता तेव्हां त्याचे आईवडील वारले. तेव्हांपासून तो आपल्या बापाच्या पावलावर पाऊल टाकून भीक मागू लागला. तो पिढीजात भिकारी होता.

दुसरा गरीब शेतकरी होता. त्याचे शेत लहान होते. त्यात गेल्या वर्षी आलेल्या पुरात ते बुडून गेल्यामुळे त्याला अन्नाची ददात भासू लागली व बैलांना चारा मिळेना. शेतीची कामे करायला लागणारे भांडवल सुद्धा त्याच्याकडे नव्हते. म्हणून त्याने आपले शेत खंडाने दिले आणि स्वतः मजुरी करून उदरनिर्वाह चालविण्यासाठी तो त्या शहरात आला असल्याचे कळले.

तिसरा होता फळांचा व्यापार करणारा. त्याने बरेच दिवसांपासून जमविलेले पैसे बहिणीच्या लग्नात खर्च झाले. त्यानंतर वडील आजारी पडले. व्यापार करायचा सोडून गावोगाव फिरू लागला. उरलेले पैसे खर्च झाले व करवंटी हाती आली. वडील तर वारलेच. त्याला आई आणि लग्नाची एक बहीण असून त्यांच्या उपजीविकेची चिंता त्यालाच करावी लागत होती. स्वतःचे घर होते, परंतु उन्हाळ्यात गावात कामे मिळत नव्हती. म्हणून कामाच्या शोधार्थ तो त्या गावी आला होता.

चवथा वडील वारले तेव्हां त्याच्याकडे जमीन व स्वतःचे घर होते. परंतु त्याला कोणतेही काम करण्याची इच्छा नव्हती. आणखी वर दारूत व जुगारीत त्याने सर्व पैसे उधळून टाकले. त्याची बायको त्याला सोडून माहेरी निघून गेली. म्हणून भीक मागून उदरनिर्वाह चालविण्यासाठी तो त्या गावी आला होता.

सर्वांना झोपा लागल्यावर राजा व प्रधान उठले व त्या चौघांच्या खिशात एकेक मोहोर टाकून निघून गेले. उजाडल्यावर चौघांनी उठून पाहिले तर त्यांना खिशात एकेक मोहोर मिळाली. त्यांना आनंद झाला. त्यांच्यापैकी शेतकरी व फळांचा व्यापारी आपापल्या गावी परत जाऊन सोने विकून जे पैसे मिळाले त्याचा उपयोग करून आपली वृत्ती चालू करण्याच्या प्रयत्नाला लागले. दारुड्याने सोने विकून जे पैसे मिळविले ते उधळून टाकले. तो धर्मशाळेतच कायम राहिला.

भिकाऱ्याला मात्र कळेना की हे सोन्याचे नाणे घेऊन करायचे काय? कारण त्याची वृत्ती भिकाऱ्याची! त्याला त्या सोन्याचा काय उपयोग? तो दहा घरे फिरून आपले पोट भरणार. सोने विकायचा विचार करावा तर हजार प्रश्न उभे राहणार. त्याला चोर म्हणायलासुद्धा लोक मागेपुढे पाहणार नाहीत. म्हणून धर्मशाळेच्या भिंतीजवळ ती मोहोर पुरून ठेवायचे ठरवून तो खड्डा खणू लागला.

इतक्यात राजाचे शिपाई चोराचा पाठलाग करीत त्या बाजूला आले व तो भिकारीच चोर असला पाहिजे असे समजून व त्याच्याजवळ सोन्याचे नाणे पाहून व तेच प्रमाण मानून त्याला धरून राजाकडे आले. राजाने व प्रधानाने त्याला सोडून द्यायला सांगितले. बाकी तिघांच्या विषयी चवकशी केल्यावर कळले की वृत्ती करणाऱ्या दोघांना वेळेवर पैसे मिळाल्याने त्यांची स्थिती सुधारली. ज्यांना काहीच वृत्ती नव्हती त्यांना पैशाची मदत मिळूनही काही फायदा झाला नाही.

प्रधान राजाला म्हणाला—"महाराज, खरा गरीब, हा खर्च करायला पैसे नसणारा नसतो, उत्पादन करायला जवळ पुरेसे पैसे नसल्यामुळे असतो. फक्त अशा लोकांनाच पैशाची मदत करावी."

राजाला ती गोष्ट पटली.






**आय. वेंकटेश्वरराव, नायुडुपेटा (आंध्रा)**

प्र. : जन्मांधाचे सर्व आयुष्यच अंधःकारमय असते ना? मग त्याला स्वप्ने पडतात का? निदान स्वप्नात तरी त्याला निसर्ग सौंदर्य अनुभवायला मिळते का?

उ. : जन्मांधालासुद्धा स्वप्ने पडतात. त्याला डोळ्यांनी दिसणारी दृश्ये स्वप्नात दिसत नाहीत. ध्वनि, रुची, स्पर्श इत्यादी चक्षुरिंद्रियाव्यतिरिक्त जी कर्मेंद्रिये आहेत त्यांनी अनुभवायला मिळणारी स्वप्ने पडतात. स्वप्नात नैसर्गिक सौंदर्य बघणे जन्मांधाला शक्य होत असेल असे वाटत नाही. जन्मांध स्वप्नात काही पाहिल्याचे क्वचितच सांगताना आढळतात. त्यांनी सांगितलेच तर प्रत्यक्ष पाहिलेल्या दृश्यासारखे असणे कठीणच.

सामान्यपणे स्वप्न पडते तेव्हां डोळे असणाऱ्या सामान्य माणसाच्या डोळ्याच्या पापण्या जोराने हालू लागतात. (Shasmodic, conjugate, rapid eye movements). तशा पापण्या जन्मांधाच्या सुद्धा हालताना दिसून आलेल्या आहेत. परंतु डोळस माणसाच्या पापण्या हालण्यात व जन्मांधाच्या पापण्या हालण्यात फार फरक असतो. 'इलेक्ट्रो ऑक्युलोग्रॅम' (Electro oculogram) नावाच्या यंत्राने रेकॉर्ड झालेल्या 'कॉर्नियो-फौण्डल पोटेंशल्स' (Corneo Foudal potenstials) या जन्मांध व्यक्तीत मुळीच नसतात किंवा कमी असतात. जन्मांध माणसाच्या दृष्टीच्या कोणत्या भागाला अपाय झाला आहे, त्यावरही डोळ्याच्या पापण्यांच्या हालण्याशी संबंध असतो. काही काळ दृष्टी चांगली असून नंतर दृष्टी गेली असल्यास अशा अंध व्यक्तींस स्वप्नात दृश्ये दिसतात. वय वाढल्यावर म्हातारपण जवळ आल्याने काही जणांना स्वप्नात दृश्य दिसणे कमी होते.

डोळ्याच्या पापण्या हालणे व स्वप्नात बघणे यांचा परस्पर संबंध असतो, असे सांगता येईल.

[चांदोबाच्या वाचकांना ही माहिती श्री पी. व्ही. कृष्णराव, लेक्चरर, सायकॉलजी व पॅरा




[७४]

"मित्रा! सर्व काळ असं उभं रहावं लागलं तर भूक व तहान कशी भागायची? लौकरच जीव जाईल की?" अत्यंतलोभीने विचारले.

"तसं नाही. लोभी माणसाच्या लालचीपणाला, पैसापैसा म्हणून तो रात्रंदिवस मरतो त्या वृत्तीला कायमची दहशत बसावी या हेतूने कुबेराने ही व्यवस्था केली आहे. चक्र डोक्यावर फिरत असेपर्यंत भूक लागत नाही की तहान लागत नाही. जरामरण दोन्ही नसतात. परंतु कष्ट मात्र फार सहन करावे लागतात. 'बरं तर, बराच वेळ झाला, मी येतो आता." तो माणूस म्हणाला.

"इतका काळ लोटल्यावर तुझं घर आणि कुटुंबातली माणसं तुला कोठे भेटणार रे? तुझी सर्व नातेवाईक मंडळी केव्हाच इहलोक सोडून गेलेली असणार. तू आतां कोठे जाणार?" अत्यंत लोभीने विचारले.

"मी त्या गोष्टीचा कधी विचारच केला नाही, म्हणा! तरी काय? हे जग मोठे आहे. जीवनात माधुर्य आहे. युगे बदललीं, आप्तबंधू सर्व निघून गेले असले तरी जीवन आनंदात घालविता येईल." असे सांगून तो माणूस निघून गेला.

तिकडे अतिलोभी अनेक दिवस अत्यंतलोभीची वाट पहात राहिला व आपल्या मित्राचा शोध काढीत शेवटी अत्यंत लोभी डोक्यावर चक्र घेऊन जेथे उभा होता तेथे आला. त्याने अत्यंतलोभीच्या डोक्यावर चक्र फिरत असलेले पाहिले. त्याचे सर्वांग रक्ताने माखलेले त्याला दिसले. ते दृश्यच भयंकर होते.



आपल्या मित्राला त्या स्थितीत पाहून अतिलोभीचे डोळे पाणावले. त्याने अत्यंत-लोभीला विचारले–"मित्रा, हे काय रे?"

"विधिलिखित!" अत्यंत लोभी म्हणाला.

"हे असं कसं झालं?" अतिलोभीने विचारले. अत्यंतलोभीने घडलेला वृत्तांत सांगितला.

सर्व ऐकून घेतल्यावर अतिलोभी म्हणाला–"मित्रा! लोभाला बळी पडून तू आपली ही दशा करून घेतलीस! पूर्वी मंथरक नावाचा एक कोष्टी न्हाव्याने सांगितले ते न ऐकल्यामुळे जसा कष्टी झाला तसा तू माझे न ऐकल्याने झालेस!"

"कोणती ती गोष्ट? ऐकू दे तरी." अत्यंतलोभी म्हणाला. अतिलोभीने ती गोष्ट सांगितली.

**मंथरकाची गोष्ट**

एका गावी मंथरक नावाचा एक कोष्टी रहात असे. एकदां त्याच्या मागाचे खुंटे मोडले. तेव्हां माग दुरुस्त करण्यासाठी खुंटा जोगत्या लाकडाच्या शोधार्थ कुऱ्हाड घेऊन निघाला. त्याला समुद्र किनाऱ्यावर एक मोठे झाड दिसले. त्याने विचार केला हे झाड तोडले तर वाटेल तितके खुंटे करून घेता येतील.

परंतु त्या झाडात राहणारा देव त्याला म्हणाला–"बाबा रे, तू या झाडाच्या वाटेला जाऊ नकोस. हे माझे निवास-स्थान आहे. समुद्रावरची थंडगार हवा खात मी येथे निश्चितपणे राहातो आहे."

"तरमग मी काय करू म्हणतोस? माझा माग दुरुस्त झाला नाहीतर माझा उदरनिर्वाह कसा व्हायचा?" कोष्ट्याने विचारले.

"एक काम कर. तू या झाडाजवळ आला नाहीस तर तूं मागशील ते मी तुला देईन." देव म्हणाला.

"बरे तर तू म्हणतोस तसं करू या. मी घरी जाऊन मला काय हवं ते बायकोला व मित्राला विचारून येऊन सांगतो." असे सांगून कोष्टी आपल्या घरी निघून गेला. तो त्याचा मित्र एक न्हावी होता त्याला भेटला व त्याने त्याचा सल्ला विचारला.

न्हावी म्हणाला–"एक राज्य मागून घे. तू राजा हो आणि मी तुझा मंत्री होईन. दोघे सुखाने राहू!"

"बायकोचे काय म्हणणे आहे, विचारतो." कोष्टी म्हणाला.

न्हावी म्हणाला–"नको! तू बायकोला तुला हवं तितके खायला घाल. दागिने कपडे हवे ते दे! सल्ला मात्र विचारू नकोस."

"नाही बुवा, तिलासुद्धा विचारले पाहिजे." असे सांगून कोष्टी बायकोला सल्ला विचारायला गेला. न्हाव्याने जो सल्ला दिला होता तोही त्याने तिला सांगितला.

"न्हाव्याचं काय ऐकता? हजामत करायची सोडून त्याला काय कळते? राजा म्हणजे काय आणि राज्य म्हणजे काय हे त्याला काय कळणार? राज्य करायचं म्हणजे गप्पा आहेत का? युद्ध, संधी आणखी कायकाय करावं लागतं. नसता ताप! राज्यलोभाने भाऊ, मुलं सर्व राजाचा जीव घ्यायला कमी करीत नाहीत!" बायको म्हणाली.

"तू म्हणतेस ते खरे आहे. तरमग काय मागावे म्हणतेस?" कोष्ट्याने विचारले.

"तुम्हाला दोन हात आहेत व एक डोके आहे. त्यांचा उपयोग करून तुम्ही दररोज



एक ठाण विणतां. तेवढ्यावर आपला उदरनिर्वाह होतो. तुम्हांला आणखी दोन हात व आणखी एक डोके आले तर दुप्पट कापड विणून होईल. एक कापड उदरनिर्वाहाला पुरे होईल. दुसरे विकून थोडी चैन करता येईल. म्हणून आणखी दोन हात व एक डोके मागून घ्या." बायको म्हणाली.

"छान!" कोष्टी म्हणाला आणि झाडाजवळ जाऊन त्याने बायकोने सुचविल्याप्रमाणे देवाकडून आणखी दोन हात व एक डोके मागितले.

देव म्हणाला—"तथास्तु!" आणि कोष्टयाची इच्छा पूर्ण झाली.

परंतु तो दोन डोक्यांनी व चार हातांनी घरी परत येऊ लागला तेव्हां लोक "भूत आलं हो, भूत!" म्हणून ओरडू लागले व दांडक्यांनी त्याला मारू लागले. त्यातच तो मरण पावला.

अतिलोभीने अत्यंत लोभीला ही गोष्ट सांगितली व म्हणाला—"सोन्यावर तुझ्या मनाचे समाधान झाले नाही. तुला हिऱ्या माणक्यांची हाव होती. आतां काय झालं? जास्वंदीच्या फुलांहून लाल रक्ताने तू माखला गेला आहेस. रक्ताच्या चिळकांड्या उडत आहेत. तू हाव धरली होतीस त्या हिऱ्यांच्या पेक्षा तुझ्या डोळ्यांतून गळणारे पाण्याचे थेंब जास्त लकाकत आहेत. मित्रा, सोन्याहून हिऱ्यांची किंमत जास्त असल्याचे तुला कळले, एवढ्यावरून तू सूज्ञ झाला नाहीस. पुढे येणारी संकटे व परिणाम कळण्या इतकी बुद्धी व विवेक माणसाजवळ असावा लागतो. तसे नसेल तर माणूस किती का बुद्धिमान असो, की थोर कुळात जन्मलेला असो, त्याच्यावर संकटे कोसळतात. माणसामध्ये व्यवहारज्ञान असावे लागते. ते नसेल तर सिंहाला पुनर्जीवित करणाऱ्या ब्राह्मणांसारखे स्वतःचा जीव घालवून बसावे लागते."

"ऐकू दे तरी ती गोष्ट!" अत्यंतलोभी म्हणाला. अतिलोभी गोष्ट सांगू लागला.





# भल्लूक मांत्रिक

[ १४ ]

[भल्लूक मांत्रिक व कालीवर्मा मायावी मर्कटाचा पाठलाग करीत किल्ल्याजवळ येऊन पोचले. किल्ल्याच्या आत असलेल्या युद्धासंबंधी चांडाळ भल्लूकाने त्यांना कळविले. जितकेतूचा मंत्री जीवगुप्त तेथे आला व त्याने एका सैनिकाला कालीवर्मांकडे पाठविले. नागमल्लने व त्याच्या अनुयायांनी किल्ल्याच्या फाटकाला आग लावली. पुढे—]

किल्ल्याच्या फाटकाला आग लागून त्या ज्वाळा भगभग करू लागल्याचे पाहून चांडाळ भल्लूक आनंदातिरेकाने धावत जाऊन सोंड तुटलेल्या हत्तीवर चढला व कालीवर्माला म्हणाला—"मालक, चला, आपण किल्ल्यात शिरू या. तेथे आपल्याला तो मायावी मर्कट सापडल्या शिवाय राहणार नाही." असे सांगून तो जळती लाकडे घेऊन नाचत असलेल्या आपल्या सेवकाला, म्हणजे रानटी शिकाऱ्याला म्हणाला—"अरे, रानटी सेवका! लौकर ये आणि हत्तीला किल्ल्यात घेऊन चल."

रानटी शिकाऱ्याने हातातली जळती लाकडे दूर फेकून दिली व चोरांचा नायक नागमल्लला सावध करून चांडाळ भल्लूकाला म्हणाला—"आलोच भल्लूक मालक!" आणि हत्तीकडे जाऊ लागला, परंतु तेवढ्यात



नागमल्लाने त्याला म्हटले–"मला व माझ्या बरोबरच्या दोघांना येथे काय काम आहे? हे दोघां मांत्रिकामधले भांडण दिसते आहे. आम्ही आपल्या वाटेने निघून जातो आणि जंगलात राहून आपला धंदा सुरू करतो."

किल्लघाच्या फाटकाजवळ पोचतापोचता कालीवर्माने ते ऐकले व संतापून आपली तलवार नागमल्लावर उगारून म्हणाला–"अगदी शेवटच्या क्षणालाही वाटमारीचा आपला धंदा तू सोडायला तयार नाहीस, नाही का? लक्षात ठेव. निःशस्त्र यात्रेकरूंना लुटण्यापुरतेच शौर्य व पराक्रम तुझ्या अंगात दिसतो आहे. समोर उभा राहून शत्रूशी युद्ध करण्याची हिंमत तुझ्यात नाही!"

नागमल्लाने एकदा चिडक्या दृष्टीने सर्वांच्याकडे पाहिले व म्हणाला–"मी अट्टल चोर असलो तरी मला शत्रू कोण व मित्र कोण कळत हे. आपल्या पोटापुरता ज्या कोणाजवळ पैसा अडका सापडेल त्यांना मी लुटतो. किल्लघात दुर्मुख राजाचा जय झाला काय किंवा त्याचा शत्रू सामंत सूर्यभूपतीचा जय झाला काय, मला काय मिळणार आहे?"

नागमल्ल त्यांच्या बाजूने राहण्यासाठी काही पगार किंवा प्रलोभनाच्या आशेने असे बोलतो आहे, हे ओळखून व चिडून जाऊन भल्लूक मांत्रिक आपल्या तलवारीचे टोक नागमल्लाच्या खांद्याला लावून त्याला दरडावून म्हणाला–"हे बघ रे, नागमल्ला! बजावून ठेवतो, ही तलवार मंत्रदंडासारखी असती तर तुला या क्षणी येथल्या येथे एक कोल्हा करून टाकले असते. राजा दुर्मुख सोडून आज कोणीही दुसरा जिंकला तर एखाद्या क्रूर रानटी जनावरासारखी तुझी शिकार केल्याशिवाय राहणार नाही. ही गोष्ट विसरलास वाटते?"

तत्क्षण नागमल्लला वाटले की राजा दुर्मुखाच्या बाजूस राहण्यातच आपले हित आहे. त्याच्या रक्षणासाठी मांत्रिकासारखे आणि राक्षसासारखे तयार असतां नक्कीच तो राजा उदयगिरीचा पुन्हा राजा होणार. त्याच्या मनात तो विश्वास उत्पन्न झाला. नागमल्ल आपल्या दोघां अनुयायांकडे वळून म्हणाला–"हे पहा रे, आज आपण झाडावरच्या मुंग्यासारखे आयुष्य घालविण्याच्या संकटातून वांचलो. दुर्मुख महाराजांच्या बाजूने युद्ध करून आपण शत्रूचा संहार केला की ते आपल्याला सैन्यात मोठ्या पगाराची नोकरी दिल्याशिवाय राहणार नाहीत."

त्यांच्या नायकाने म्हटल्याबरोबर दोघां अनुयायांनी तलवार आकाशात उभी धरून "दुर्मुख महाराज की जय!" असा जयघोष केला आणि तलवारीने फाटकाची जळती लाकडे दूर सरकावून आत शिरायला वाट तयार करू लागले.

भल्लूक मांत्रिक व कालीवर्मा आपापल्या वाहनांवर बसले व चांडाळ भल्लूकाला म्हणाले–"आपण सर्व मिळून दहा जणांहून जास्त नाही. आपण करावयाचे मुख्य काम म्हणजे मायावी मर्कटाच्या हातात असलेला मंत्रदंड काढून घ्यायचा. त्यानंतर दुर्मुख राजाला वांचवायचे. त्यासाठी तुमच्यापैकी प्रत्येकाने साहस व पराक्रमाची शिकस्त करून दाखविली पाहिजे."

सर्वांनी आपापली शस्त्रे उडवीत या खेपेस "कालीवर्मा की जय!" असा जयघोष केला.



कालीवर्मा घोड्यावर बसून किल्लघात वाट काढीत पुढे निघाला, परंतु तितक्यात काहीतरी आठवल्यासारखा घोडा मागे वळवून म्हणाला–"तो उग्रदंड राक्षस कोठे आहे?"

त्यावेळी उग्रदंड राक्षस एका हत्तीची सोंड धरून त्याला बरोबर चालवीत जितकेतूचा मंत्री जीवगुप्त होता त्या बाजूला जाऊ लागल्यासारखा दिसला. ते पाहून कालीवर्मा आश्चर्यचकित होऊन भल्लूक मांत्रिकाला म्हणाला–"गुरुवर्य! असं दिसतं आहे की उग्रदंड राक्षस आपला शत्रू जितकेतू याच्या पक्षात जाण्याच्या विचारात दिसतो आहे!"



"तसे असेलसे मला वाटत नाही. त्याला माझ्याशी काहीतरी काम असल्याचे कळले आहे. म्हणून लौकर जाऊन पाहून ये, काय तो म्हणतो ते!" भल्लूक मांत्रिक म्हणाला.

ते ऐकताच चांडाळ भल्लूक दुसऱ्या एका हत्तीवर बसलेल्या दुर्मुखाच्या अंगरक्षकांना म्हणाला–"अरे, अंगरक्षक वीर हो! तो राक्षस कालीवर्मा मालकाच्या विरुद्ध उलटला की काय, न जाणे! आपण त्याच्या मागे त्याच्या रक्षणाला जाणे बरोबर होईल की नाही, विचार करा." असे सांगून त्याने रानटी सेवकाला त्या बाजूला आपला हत्ती वळवायला सांगितले व कालीवर्माच्या हत्तीला नेवविले.

घोड्यावर कालीवर्मा, एका हत्तीवर चांडाळ भल्लूक व दुसऱ्यावर अंगरक्षक या सर्वांना आपल्याकडे येत असलेले पाहून उग्रदंड चकित झाला आणि काय वाटेल ते असो सावध राहणे बरे असा विचार करून त्याने आपली दगडी गदा उजव्या हातात घेऊन वर उचलून धरली व हत्तीची सोंड ओढून त्याला वळविली व उभा राहिला.

कालीवर्मा उग्रदंडाच्या जवळ पोचताच म्हणाला–"उग्रदंडा! हे काय चालविले आहेस रे? आमच्याबरोबर किल्लयात जाऊन सूर्यभूपतीच्या हातातून दुर्मुखाला वांचवू या असे नव्हते का ठरले?"

"कालीवर्मा! राजा दुर्मुख अद्याप जिवंत आहे असेच का वाटते आहे तुला?" उग्रदंड राक्षसाने कालीवर्माला विचारले.

"तो जिवंत नसेल, असे तुला कसे काय वाटले? किल्ल्यात त्या बाजूने काही सैनिक आहेत, हे दिसत नाही का? तसे नसते तर किल्लयाच्या आत जे युद्ध चालू असल्याचा ओरडा ऐकू येत आहे, ते युद्ध कोणामध्ये चालू असेलसे वाटते, तुला?" कालीवर्माने विचारले.

उग्रदंड राक्षस दूर उभे असलेल्या मंत्री जीवगुप्ताकडे व त्याच्या सैनिकांकडे बोट दाखवून म्हणाला–"कालीवर्मा! तुम्ही सर्व



किल्लयाच्या फाटकासमोर उभे राहून भांडणात वेळ घालविलात. अजून काही बिघडले नाही. लगेच किल्लयात शिरून दुर्मुख राजाला वांचवित असतां त्या मायावी मर्कटाच्या हातात गेलेला मंत्रदंड-सुद्धां मिळवायचा आहे!"

"आम्ही तेच काम करायला निघालो आहो. परंतु तू ह्या हत्तीला बरोबर घेऊन कोठे निघालास?" कालीवर्माने विचारले.

उग्रदंड राक्षस आपली दगडी गदा जीवगुप्त व त्याच्या अनुयायांकडे फिरवून म्हणाला–"तो मंत्री आणि त्याच्या बरोबरचे सैनिक तुमच्या पाठोपाठ किल्लयात शिरण्याचा प्रयत्न करू लागले तर त्यांना थोपवून धरण्यासाठी!"

ते ऐकल्यावर कालीवर्मा त्याच्या मनाचे समाधान झाल्यासारखा किल्लयाच्या फाटकाकडे परतला. त्यानंतर सर्व जयघोष करीत किल्लयात शिरले. एका हत्तीवर तलवारी घेऊन अंगरक्षक आणि दुसऱ्या हत्तीवर परशु घेऊन चांडाळ भल्लूक, घोड्यावर कालीवर्मा, रेड्यावर भल्लूक मांत्रिक आणि त्याच्या मागून मोठ्याने ओरडत चोरांचा नायक नागमल्ल व त्याचे अनुयायी या सर्वांना आत शिरत असलेले पाहून त्या वेळपर्यंत सामंताच्या बाजूने दुर्मुख राजाच्या बाजूने लढणाऱ्या सैनिकांशी युद्ध करणारे सैनिक भयभीत झाले व ओरडू लागले–"सूर्यभूपती महाराज! भल्लूक मांत्रिक हत्तींचे सैनिक घेऊन आपल्यावर चालून येतो आहे. तूर्त पळून जाण्यातच आपले हित आहे!"

त्या पाठोपाठ एका लहानग्या घराच्या पाठीमागून सामंत सूर्यभूपती घोड्यावरून पुढे आला. त्याच्या हातात रक्ताने माखलेली तलवार होती. म्हणाला–"तुम्ही भिण्याचे मुळीच कारण नाही. दुर्मुखाच्या बाजूने लढणाऱ्या जवळजवळ सर्वांचा फडशा झाला आहे. हा भल्लूक मांत्रिक आपल्याला काय करणार? मर्कटाच्या रूपात आपल्या



बाजूने जो आहे तो भल्लूक मांत्रिकांहून जास्त मंत्रबळ प्राप्त असलेला दुसरा मांत्रिकच आहे!"

सामंत भूपतीला पाहतांच कालीवर्माला त्वेष चढला व तो दात ओठ चावून म्हणाला—"काय रे सामंता! माकडांच्या मदतीने तुला सिंहासन मिळणार आहे का रे? कोठे आहे, राजा दुर्मुख? त्याच्याच हाती मी तुझे डोके उडवतो, पहा!"

इतक्यात त्या घराच्या छोट्या भिंतीवर मायावी मर्कट उडी मारून बसला व किच किच करू लागला. मान वर करून सर्वांनी त्याला पाहिले. त्या मर्कटाच्या उजव्या हातात मंत्रदंड होता. तो आपल्या डाव्या हातात कोणाचे तरी मुंडके शेंडी धरून लोंबत ठेवून म्हणाला—"अरे, कालीवर्मा! तू राजा दुर्मुख कोठे आहे, विचारीत होतास नाही का? हे पहा, त्याचे मुंडके! त्याचा देह कोठे आहे तो तू शोधून काढण्यापूर्वीच तुझे मुंडके राजा सूर्यभूपती कापून जमिनी-वर लोळवील!"

तत्क्षण भल्लूक मांत्रिक तलवार व आपले वाहन रेडयाला त्या बाजूला हाकीत म्हणाला—"अरे मायावी मर्कटाचे सोंग करणाऱ्या भ्रांतिमती! तू माझा मंत्रदंड चोरलास यासाठी तुला एवढया उडया मारण्याचे कारण नाही. माझ्या हातातली ही तलवार त्या मंत्रदंडाच्या मानाने कोण-त्याही तऱ्हेने कमी नाही, हे लक्षात ठेव! तुझा गुरु तांत्रिक मिथ्या मिश्रसुद्धा ब्रह्मपुत्रा नदीकाठचा प्रदेश सोडून या जंगलातली धूळ खात फिरतो आहे वाटते?"

त्या प्रश्नाचे उत्तर देण्याऐवजी मायावी मर्कट दांत काढून दाखवीत किचकिच करीत थट्टेत म्हणाला—"भल्लूक मांत्रिका! तू आपल्या मंत्रबळाने डोळयात अंजन घालून पहा ना, माझा गुरु कोठे आहे तो! कदाचित् ते तुझा गुरु भल्लूकपाद याचे मुंडके कापण्यासाठी हिमालय पर्वतातल्या शिळेवर आपली तलवार घासून तिला धार चढवीत असावेत."

ते ऐकून भल्लूक मांत्रिक संतापला व दांत ओठ चावून कालीवर्माला म्हणाला—"कालीवर्मा व चांडाळ भल्लूका! तुम्ही या फाटकावर कडक नजर ठेवा! किल्ल्या-तून सामंताच्या बाजूचा एकदेखील सैनिक बाहेर जाता कामा नये. या मायावी मर्क-टाला व सामंताला धरून यांच्या अंगांची खांडकी उडवून टाका!"

भल्लूक मांत्रिकाच्या तोंडून ते बोलणे पुरते बाहेर पडण्याच्या आत चांडाळ भल्लूकाच्या हत्तीवर बसलेल्या रानटी शिकाऱ्याने सोडलेला बाण मायावी मर्क-टाच्या उजव्या हाताला लागला आणि त्याच्या हातातले ते मुंडके जमिनीवर लोळू लागले.

ते मुंडके खाली पडतांच दुसऱ्या हत्तीवर बसलेले दुर्मुखाचे अंगरक्षक उडी मारून त्या बाजूला धावले व मुंडके उचलून पहात म्हणाले—"हे महाराज दुर्मुख यांचे डोके नाही! हा मायावी मर्कट आपल्याला फस-वीत होता."

दुसऱ्या क्षणाला चांडाळ भल्लूकाने "शिरीषवन भैरवा!" असा घोष केला व आपल्या सेवकाची पाठ थोपटीत म्हणाला—"शाबास सेवका! तू हा बाण मारून त्या मायावी मर्कटाची घमेंड जिरविलीस! आम्ही राजा दुर्मुखाच्या शोधार्थ हा सर्व



किल्ला चाळून काढू. जो कोणी समोर येईल त्याचे मुंडके हा परशू उडवील. कोणी निसटलाच तर तू त्याला आपल्या बाणाने टिपून काढ!" असे म्हणत त्याने परशूच्या दांडयाने हत्तीला पुढे व्हायला खुणावले.

हत्ती चीत्कार करून पुढे निघाला. मायावी मर्कट भिंतीवरून उडी मारून कोठे तरी पळाले. तेव्हां कालीवर्मा मांत्रिकाला म्हणाला—"गुरुवर्य! आपण प्रथम सामंत भूपती व त्याच्या सैनिकांचा समाचार घेतला पाहिजे! दुर्मुख राजा निःसंशय या किल्ल्यातच कोठेतरी जिवंत असला पाहिजे."

"भल्लूकपाद गुरुवर्य! असा घोष करून व तलवार उगारीत भल्लूक मांत्रिक दुर्मुखाच्या सैनिकांना संबोधन करीत म्हणाला– "राजा दुर्मुखाच्या बाजूने लढणाऱ्या सैनिक हो, ऐका! तुम्ही सर्व आमच्याबरोबर चला. जो कोणी आम्हांला आडवा येईल त्याचे डोके ही मंत्रवलेली तलवार जमिनीवर लोळवील."

सामंताच्या सैनिकासमोर उभे राहू न शकल्यामुळे आजूबाजूला लपून बसलेले राजा दुर्मुखाचे सैनिक धावत पुढे आले आणि मांत्रिकाला म्हणाले–"आमचे महाराज! सभा मंडपानजिक सिंहासन आहे त्या दालनात स्वतःला वांचवून लपून बसले आहेत."

"तरमग तुम्ही वाट दाखवायला पुढे व्हा! तुम्हांला भिण्याचे मुळीच कारण नाही. आम्ही शत्रूला थोपवून ठेवतो." कालीवर्मा दुर्मुखाच्या सैन्याला धीर देत म्हणाला.

कालीवर्मा व भल्लूक मांत्रिक सभामंडपाच्या दिशेने निघाले. वाटेत त्यांना शत्रूचा एकही शिपाई आडवा आला नाही. कारण ते सर्व किल्ल्याच्या दुसऱ्या टोकाला सामंत राजा व मायावी मर्कट यांच्या जवळ जमा होऊन पुढे काय करावयाचे या विचारात होते.

कालीवर्मा व भल्लूक मांत्रिक सभामंडपाजवळ पोचणार तेवढ्यात हत्तीवर चांडाळ भल्लूकही तेथे आला. त्याच वेळी सभामंडपानजिकच्या दालनाचे दार उघडले. सर्व चकित होऊन पाहू लागले. राजा दुर्मुख सिंहासनावर बसलेला होता.

सर्वांना उद्देशून दुर्मुख हात वर करून म्हणाला–"चांडाळ भल्लूका! पुन्हां सिंहासनावर बसण्याची माझी इच्छा पूर्ण झाली. आतां तू पाहिजे तर माझे मुंडके कापून आपल्या गुरूला दे. मी काही एक म्हणणार नाही."

चांडाळ भल्लूक ते ऐकताच आनंदातिरेकाने हत्तीवरून उडी मारून खाली उतरला आणि परशू घेऊन सभामंडपाच्या दिशेने निघाला. (क्रमशः)



# दिव्यज्ञान

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही, तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले व नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजा, मनुष्य हा स्वतः अज्ञान तर असतोच त्याच बरोबर कोणी ज्ञानी असेल तर तो त्याचा योग्य गौरव देखील करीत नाही. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला, एका दिव्यज्ञानी व्यक्तीशी कसा अन्याय्यपणे व्यवहार करण्यात आला त्याची गोष्ट सांगणार आहे. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

कांचनपुर नावाच्या देशावर दिवाकर नावाचा एक राजा राज्य करीत असता राजधानीच्या बाहेर रानात एक आश्रम बांधून एक साधू येऊन राहू लागला. ती बातमी कळल्यावर राजधानीतले नागरिक



साधूच्या दर्शनाला जाऊन आपले भविष्य त्याला विचारू लागले. तो साधू लोकांना त्यांच्यावर केव्हां व कोणत्या प्रकारचे संकट येणार आहे ते सांगे व त्यांना सावध करी. तो सांगे ते खरे होई. म्हणून लोक त्याला दिव्यज्ञानी म्हणू लागले.

दिव्यज्ञानीच्या अपूर्व ज्ञानाची कीर्ती राजाच्या कानापर्यंत पोचली. परंतु राजाचे दिवाकरचे असे ठाम मत होते की, माणसाचे जसे प्रारब्ध असते तसेच होते. ते बदलण्याची शक्ती कोणातही नसते. म्हणून दिव्यज्ञानीकडून काही कळले तरी काय फायदा? कारण जे विधिलिखित असते ते पुसण्याची शक्ती मानवाच्या हातात नाही."

परंतु राजाचा मंत्री सुदर्शन याचे मत निराळे होते. त्याला वाटे की भविष्यकाळात काय होणार हे पहिल्यानेच कळले तर नक्कीच फायदा होईल. प्रधानाचा मुलगा जन्मल्यापासून आजारीच होता. मोठेमोठ्या वैद्यांनी औषधपाणी करून हात टेकले. म्हणून सुदर्शनला वाटले की दिव्यज्ञान्याकडून मुलाच्या नशिबांत काय आहे विचारून कदाचित मुलाला निरोगी करायला काहीतरी मार्ग निघेल. प्रधानाच्या तोंडून मुलाविषयी सर्व माहिती विचारून घेऊन दिव्यज्ञानी म्हणाला–"तुमच्या मुलाला ग्रहांची पीडा आहे. मी सांगतो तशी ग्रहशांती केल्यावर मुलगा चांगला बरा होईल."

दिव्यज्ञानीने सांगितल्याप्रमाणे प्रधानाने ग्रहशांती केली व एका महिन्याच्या आत मुलाची प्रकृती सुधारली. सुदर्शनला फार आनंद झाला व तो दिव्यज्ञानीला काहीतरी भेटवस्तू द्यायला गेला.

परंतु दिव्यज्ञानी त्याला म्हणाला– "प्रधान, मी सर्वसंगपरित्याग केला आहे. मला कोणत्याही वस्तूची गरज नाही." त्याने उलट प्रधानालाच एक औषध देऊन सांगितले की, साप चावल्यावर त्या औषधाचे सेवन केले तर सापाचे विष उतरते.

सापाची भीती कोणाला बरे असेल, असा विचार करीत घरी तो गेला.

दुसऱ्या दिवशी तो पहाटे उठला व अंधुक प्रकाशात त्याचा पाय चुकून सापावर पडला. साप त्याला चावला. तेव्हां त्याने दिव्यज्ञानीने दिलेले औषध घेतले व त्याच्या जिवावरचा धोका टळला. ती गोष्ट कळल्यावर राजा दिवाकर याच्या मनात औत्सुक्य थोडे वाढले. त्याला वाटले की कदाचित् दिव्यज्ञानी फक्त भविष्यच वर्तवीत नसावा. त्याच्या अंगात भविष्य बदलण्याची शक्तीसुद्धा असावी. म्हणून तो एक दिवस शिकारीला जंगलात निघाला असतां दिव्यज्ञानीच्या कुटीत गेला आणि दिव्य ज्ञानीचे दर्शन करून त्याने त्याला विचारले–"महात्मन्, आज मी शिकारीला निघालो आहे. आज मला कशा स्वरूपाचे सावज सांपडेल?"

"आज आपल्याला एकही सावज मिळणार नाही!" दिव्यज्ञानी म्हणाला.

राजा त्या पूर्वी शिकारीला गेला आणि एकही शिकार त्याच्या हाती आली नाही असे कधी झाले नव्हते. म्हणून तो जंगलात असा विचार करीत निघाला की या दिव्यज्ञानीचे भविष्य खोटे ठरणार. परंतु दिव्यज्ञानीचे भविष्य खरे ठरले. त्या दिवशी राजाला एक ससादेखील शिकार करण्यास सापडला नाही.

ही गोष्ट घडली त्यानंतर थोड्याच दिवसांनी शेजारच्या राजाने कांचनपुरावर स्वारी केली. घनघोर युद्ध झाले. शेजारचा राजा



फार शूर होता व त्याचे सैन्यसुद्धा मोठे होते. म्हणून राजाने दिव्यज्ञानीकडे जाऊन विचारले–"या युद्धाचा परिणाम काय होईल?" तेव्हां दिव्यज्ञानी म्हणाला–"महाराज, या युद्धात आपल्याला सहजीविजयप्राप्ती होईल.

या खेपेला सुद्धा दिव्यज्ञानीने वर्तवलेले भविष्य खरे ठरले. स्वत:ला शक्तिशाली मानून शत्रूने घमेंडीत कांचनपुराच्या राज्यात शिरून कांचनपूरच्या सैन्याची धुळदाण उडवून देण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याचा अंदाज चुकला आणि त्याच्या सैन्याचा पूर्ण विमोड झाला.

त्यानंतर राजा दिवाकर व प्रधान सुदर्शन यांचे दिव्यज्ञानी विषयी बोलणे झाले.



राजा म्हणाला–" दिव्यज्ञानी भविष्य सांगण्यात निपुण आहे. परंतु ते बदलण्याची शक्ती त्याच्यात नाही. त्याने तुझ्या मुलाला आजारात बचावले. तुला सर्प दंशातून वाचविले. म्हणून तुला वाटते आहे की त्याच्यात भविष्य बदलण्याची शक्तीसुद्धा असली पाहिजे. परंतु माझ्या पाहण्यात आल्याप्रमाणे दिव्यज्ञानी कित्येकांना त्यांचा आजार बरा होणे अशक्य आहे, असे सांगून परत पाठवतो व त्यांचा आजार खरोखरच बरा होत नाही. त्यांना ही गोष्ट नक्कीच माहीत होती की तुमच्या मुलाचा आजार नक्की बरा होणार व तुम्हांला साप चावला तरी तुम्ही निश्चित वाचणार. तुमच्या जिवाला धोका नाही."

राजाचे ते मत ऐकल्यावर सुदर्शनने स्वत: दिव्यज्ञानी जे भविष्य वर्तवितो त्या संबंधी बारकाईने चौकशी सुरु केली. शेवटी राजा म्हणाला ती गोष्ट खरी असल्याचे त्याला पटले. कारण दिव्यज्ञानी काही लोकांना सांगे की त्यांच्यावर कशा स्वरूपाची संकटे ओढवणार आहेत? आणखी काहीजणांना त्याने सांगितले की त्यांच्या प्रयत्नात त्यांना यश येणे शक्य नाही. काही लोकांना त्याने भविष्यकाळात त्यांच्या हिताच्या गोष्टी घडण्याचे भविष्य वर्तविले. अशा तऱ्हेने दिव्यज्ञानीच्या भविष्यावर अवलंबून राहून की त्यांना त्यांच्या प्रयत्नात यश मिळणार नाही, लोकांनी प्रयत्न करण्याचे सोडले. ज्यांना भविष्यकाळात लाभ होणार-असे कळले त्यांनीसुद्धा काम करायचे सोडले. या सर्व गोष्टी कळल्यावर एके दिवशी रात्री सुदर्शन आपल्या दोघां विश्वासपात्र नोकरांबरोबर दिव्यज्ञानीच्या कुटीत आला. दिव्यज्ञानी झोपलेला होता. त्याला उठवून एका रथात बसवून एका नोकराबरोबर दूर परदेशात त्याला पोचता करविला आणि दुसऱ्या नोकराला दिव्यज्ञानीचा वेष करून कुटीत सोडले.

दुसऱ्या दिवसापासून तोतया दिव्यज्ञानी जे भविष्य सांगे ते खोटे ठरू लागले. काही दिवसांनी जनतेचा दिव्यज्ञानीवरचा विश्वास उडाला. प्रजेने त्या कुटीकडे जाणे सोडले. त्या[illegible] दिव्यज्ञानीचा वेष टाकून देऊन परतला.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले– " राजा, दिव्यज्ञानीने प्रधानावर केवढा उपकार केला होता? त्याने प्रजेचे अनेक प्रकारे हित केले होते. अशा दिव्यज्ञानीला प्रधानाने परदेशात कां पाठविले? त्याने कोणाचे कधी वाईट केले नव्हते? या शंकाचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

राजा विक्रमादित्य म्हणाला–" दिव्यज्ञानीला भविष्य वर्तवून ते बदलण्याची शक्ती असती तर त्याच्या हातून प्रजेचे नक्कीच कल्याण झाले असते. परंतु राजाने प्रत्यक्ष पाहून सिद्ध केल्याप्रमाणे त्याच्या अंगात फक्त भविष्य वर्तवण्याचीच शक्ती होती. म्हणून प्रजेचे हित होण्याऐवजी अहितच होण्याची शक्यता जास्त होती. कारण ज्या कोणाला आपले भविष्य कळले त्यांनी स्वत: प्रयत्न करणेच सोडून दिले व आळशासारखे स्वस्थ बसून राहाले. मानवाला कर्म करणे आवश्यक आहे. त्याचे फळ हे त्याने भविष्यावर सोडावयाचे असते. परंतु भविष्य आधी कळल्यावर त्याने कर्म करायचेच सोडले व आळशासारखा स्वस्थ बसून राहला तर जगाच्या व्यवहार कसा चालावयाचा? प्रयत्न करीत असतां अपयश पदरी पडले तर पुढच्या प्रयत्नाला लागताना मानव जुन्या चुका करण्याचे टाळतो. ज्ञानवृद्धीसाठी प्रयत्न करणे आवश्यक आहे. चुका झाल्यातरी त्या पुढच्या प्रयत्नात अनुभव म्हणून उपयोगी पडतात व ज्ञानाची वृद्धी होते. परंतु जर माणसाला प्रयत्नाचे फळ प्रथमच कळले तर तो प्रयत्नच करायला तयार होणार नाही. मानव उन्नतीच्या दृष्टीने भविष्य कळणे धोक्याचे आहे. देशाला देखील ते धोक्याचे आहे, असा विचार करून प्रधानाने जे केले ते राज्यावरचे संकट टाळण्यासाठी, प्रजेच्या हितासाठी केले. त्यांत त्याला दोषी ठरविता येणार नाही."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळ लागला. (कल्पित)



# वंश व गुण

फार प्राचीन काळची गोष्ट आहे. सिंध देशात सोमनाथ नांवाचा एक ब्राह्मण रहात असे. त्याला वज्रनाभ नावाचा मुलगा होता. त्याचे एका धीवराच्या मुलीवर प्रेम होते. ती मुलगी दिसायला फार सुंदर होती व सद्‌गुणीपण होती. तिच्या अंगावरचे कपडे पाहूनच ती ब्राह्मणकन्या नसल्याचे कळे.

परंतु वडिलांना कळले की मुलगा एका धीवरकन्येच्या नादी लागून तिच्याशी लग्न करणार आहे तर ते त्यांना मान्य होणार नाही. म्हणून वज्रनाभाने आपल्या एका मित्राचा सल्ला घेतला. मित्राने सल्ला दिला–"तू त्या मुलीला ब्राह्मणासारखे लुगडे नेसायला सांगून वडिलांना दाखव आणि ती ब्राह्मण कन्या असल्याचे सांग. तू तिच्याशीच लग्न करणार असल्याचे ही सांग. लग्न झाल्यावर खरी गोष्ट कळली तरी विशेष बिघडणार नाही.

वज्रनाभ त्या धीवरकन्येला ब्राह्मणांसारखे लुगडे वगैरे नेसवून वडिलांकडे गेला. म्हणाला–"बाबा! ही ब्राह्मणाची मुलगी आहे, मी हिच्याशी लग्न करणार आहे."

ते ऐकून ती मुलगी घाबरून म्हणाली–"नाही हो, हे खरं नाही. मी ब्राह्मण जातीची नाही, मी धीवर जातीची आहे." तत्क्षण सोमनाथाने वज्रनाभाच्या मुस्कुटात एक दिली व म्हणाला–"मूर्खा! खोटे बोलायला तुला लाज वाटली नाही! अशी सत्यभाषिणी इमानदार मुलगी माझी सून झाली तर त्याबद्दल मला अभिमानच वाटेल. परंतु तू त्या मुलीला विचार की ती तुझ्यासारख्या खोटे बोलणाऱ्याशी लग्नाला तयार आहे की नाही?"





# शेजारणीची नक्कल

जानकी आणि पार्वती शेजारी शेजारी रहात. पार्वती फार हुशार व धोरणी बाई होती. ती उत्तम गृहिणी होती. म्हणून तिचा संसार सुखाचा होता. परंतु जानकी तिचा हेवा करी. ती पार्वतीच्याहून तिचा संसार जास्त सुखाचा व वैभवसंपन्न आहे, हे दर्शविण्याचा सतत प्रयत्न करी. ती श्रीमंताचा थाट दाखविण्यासाठी मूल्यवान वस्तू खरेदी करून त्याचे प्रदर्शन करी. परंतु पार्वती हुशार होती. म्हणून तिचा संसार साधा असूनही नीटनेटका असे.

ते जानकीला जाणवत होते. म्हणून तिचा ईर्ष्याग्नी जास्त पेटे. तिने आपल्या पतीला काहीतरी उपाय सुचवायला सांगितले. तिच्या पतीला बायकोची ती दिखाऊ वृत्तीच पसंत नव्हती. म्हणाला–"शेजारणीहून तू वरचढ असल्याचे दाखवितेस व माझ्या डोक्यावर कर्ज वाढत चालले आहे. यापुढे तू कोणतीही जास्त किमतीची वस्तू विकत घेण्याच्या भानगडीत पडू नकोस. शेजारणी काय विकत घेतात ते प्रथम पहा व त्यानंतर तू विकत घे." पतीचा सल्ला जानकीने मान्य केला त्या वेळेपासून तिला थोडी मनःशांती लाभू लागली.

जानकी व पार्वती दोघींना मूलबाळ नव्हते. त्यांना गावात कोणी थोर साधुबुवा आल्याचे कळले. ते लोकांच्या इच्छा पूर्ण व्हाव्या म्हणून आशीर्वाद देतात व त्याप्रमाणे त्या पूर्णही होतात, अशी वदंता होती. ते कळल्यावर पार्वती त्या साधूबुवांच्या दर्शनाला गेली. पार्वती गेल्याचे कळल्याबरोबर जानकीसुद्धा त्या बुवांच्या दर्शनाला धावली. दोघींनी त्या बुवांची पादपूजा केली. बुवांनी दोघींना एक मंत्र सांगून म्हटले–"तुम्ही दोघी या मंत्राचा जप करा. तुमची इच्छा पूर्ण होईल."

त्यानंतर दोघी आपापल्या घरी परतल्या. पार्वती तिला एक सुंदर मुलगा व्हावा अशी इच्छा मनात बाळगून मंत्राचा जप करू लागली.

आता जानकी विचार करू लागली की, पार्वती कोणती इच्छा मनात बाळगून मंत्र जपते आहे? हे परंतु तिला एवढे मात्र वाटे की पार्वतीसारखेच आपल्याला आयुष्य घालवायला मिळावे. तोच सल्ला तिला तिच्या पतीने दिला होता. म्हणून तिने ही इच्छा मनात ठेवून मंत्र जपायला सुरवात केली की, पार्वतीला जे काही आयुष्यात होत राहील, तेच आपल्याला होत रहावे.

काही महिन्यांनी पार्वतीला एक सुंदर मुलगा झाला. कदाचित मंत्राचा परिणाम म्हणूनच की काय जानकीलासुद्धा एक सुंदर मुलगा झाला. ते कळल्यावर जानकीच्या पतीला परमानंद झाला. त्यांत बायकोने किती हुशारीने बरोबर इच्छा करून मंत्र जपला याबद्दल त्याने बायकोचे कौतुक केले. या उलट जानकीला वाटले की पतीने दिलेल्या सल्ल्याप्रमाणे ती वागली म्हणून तिला पुत्रप्राप्ती झाली व तिने पतीची खूप वाखाणणी केली.

एके दिवशी अचानक पार्वतीच्या घरात चोर शिरले आणि घरातली चीजवस्तु उचलून निघून गेले. त्याच दिवशी रात्री जानकीच्या घरातही चोरी झाली. या चोरीत पार्वतीचेच जास्त नुकसान झाले. कारण तिला मदत करायला कोणी श्रीमंत गृहस्थ नव्हते. नुकसान भरपाई व्हायला तिला कित्येक वर्षे लागणार होती. परंतु जानकीची गोष्ट तशी नव्हती. कारण तिला मदत करणारे पुष्कळ लोक होते. तिचं नुकसान भरून काढणारे अनेक नातेवाईक होते. परंतु मंत्राचा प्रभावच की काय तिच्या मदतीला कोणी आलं नाही. त्या दिवसापासून पार्वतीला कष्ट सहन करावे लागले तेच जानकीलासुद्धा सहन करावे लागले. ती देवाजवळ मागणे मागू लागली की देवा, यापुढे पार्वतीवर कोणते ही संकट येऊ देऊ नकोस!





# भोळा बाळू

बाळू हा अगदी भोळा होता. लहानपणीच आईवडील वारले, तेव्हांपासून त्याला त्याच्या आजीनेच वाढविले. तो स्वभावाने फार चांगला होता. परंतु त्याला बरे-वाईट, शुभअशुभ काहीच कळत नव्हते, म्हणून तो काही तरी चूक करायचा आणि लोकांच्या शिव्या खायचा.

एकदां त्यांच्या गावातल्या सर्व विहिरी आटल्या, तेव्हां सर्व गावकरी दूर नदीवर जाऊन पाणी आणू लागले. एकदा बाळू एका गल्लीतून जात असतां एक म्हाताऱ्या बाई नदीवरून घागर भरून पाणी घेऊन येत होत्या. वय जास्त झाल्यामुळे त्यांना ती घागर उचलून आणणे जड वाटत होते. त्यांनी घागर एका ओटयावर ठेवली. पुन्हां उचलू लागल्या तर उचलता येईना. बाळू धावत पुढे गेला आणि घागर उचलून देऊ लागला.

त्या बाई ओरडल्या–"मूर्खा! सोवळयाचे पाणी घेऊन आले होते, शिवलास की रे!" त्या बाईनी ते पाणी त्याच्या अंगावर ओतले आणि पाणी आणायला, पुन्हा नदीवर निघाल्या. बाळू ओल्या कपडयांनी घरी गेला आणि आजीच्या तोंडच्या खूप शिव्या खाल्या.

असाच एकदा बाळू बाजारातून भाजी घेऊन घरी येत होता. तेव्हां एक मुलगा पळत येत असलेला दिसला. त्याच्या पाठी-मागून एक म्हातारा माणूस ओरडत येत होता–"थांबरे, लबाडा! दोन थपडा पडल्याशिवाय तुझे डोके ठिकाणावर येणार नाही!"

बाळूने त्या म्हाताऱ्याला मदत व्हावी म्हणून त्या मुलाला धरला आणि दोन थपाटे मारून म्हाताऱ्याला म्हणाला–"आजोबा, तुम्ही घाबरू नका! मीच

दिले दोन याला! आतां त्याचे डोके ठिकाणावर आले असेल!"

धपाटे पडताच मुलगा मोठ्याने किंकाळी फोडून रडू लागला.

कोणी तरी रस्त्यावर चालणाऱ्याने नातवाला दोन धपाटे मारलेले पाहून म्हातारा संतापला व ओरडला—"कोण रे तू? लहानशा मुलाला मारायला तुझे हात पुढे झालेच कसे?" असे म्हणत म्हाताऱ्याने नातवाला पोटाशी धरून शांत केले. चार चौघे तेथे जमा झाले होते. त्यांनी बाळूला खूप शिव्या हासडल्या.

बाळू एवढेसे तोंड करून घरी गेला व घडलेली गोष्ट आजीला सांगितली. तिच्या तोंडी त्याने आणखी शिव्या खाल्ल्या.

एकदा कुंभ मेळ्याची वेळ होती. नदीवर स्नानासाठी लोक येत होते. बाळू दररोज नदीवर आंघोळीला जात असे. तो नदीत स्नान करून काठावर काही वेळ गंमत पहात बसे.

एके दिवशी तो असाच बसला असता एक जोडपे स्नान करून त्या बाजूला आले व काठावर चढू लागले. पुरुष कठडा चढून वर आला. बायकोने नवरा हात देईल म्हणून हात पुढे केला. परंतु नवऱ्याचे लक्ष तिकडे गेले नाही. बाळूने ते पाहिले आणि चटदिशी पुढे होऊन त्या बाईचा हात धरला व त्या बाईला वर ओढले.

नवऱ्याने मागे वळून पाहिले व बाळूला दोन तीन मुस्कुटात देऊन वर शिव्या देत निघून गेला.



बाळूची आजी आजारी पडली व तिने खाट धरली होती. मार खाऊन बाळूला घरी आलेला पाहून तिच्या डोळ्यांना पाणी आले. म्हणाली—"अरे बाळचा! तू चांगलाच आहेस रे! परंतु मी गेले तर तुझ्याकडे पाहणारा कोणी मिळणार नाही या गावात. तुझा हा भोळेपणा कोणालाही खपणार नाही. मला स्मशानात पोच-विल्यावर तू या गावात राहू नकोस. आणखी कोठेतरी जाऊन दिवस काढ. कोठेही कोणी तुला बोलावून मदत मागि-तल्याशिवाय कोणालाही कोणतीही मदत देण्याच्या भानगडीत पडू नकोस."

त्यानंतर लौकरच आजी वारली. बाळूने तिची सर्व उत्तरक्रिया केली आणि आजीने सांगितल्याप्रमाणे उदरनिर्वाहाच्या शोधार्थ दुसऱ्या गावी जायला निघाला.

तो एका रानातल्या वाटेने जात असतां रस्त्याच्या बाजूच्या एका जुनाट विहिरीतून त्याला "वांचवा हो वांचवा!" असा आवाज ऐकू आला.

बाळू त्या बाजूला लगेच धावला. त्याला आजीने सांगितले होते ते आठवले. हाक मारणाऱ्या व्यक्तीने त्याचे नाव घेऊन हाक मारल्याशिवाय व 'वांचव' म्हणून म्हटल्याशिवाय मी मदत करणार नाही!

इतक्यात राजाचे दोन शिपाई त्या बाजूला आले. त्यांनी विहिरीतून येत असलेल्या हाका ऐकल्या. जवळच मागे पुढे करीत असलेल्या बाळूला पाहून त्यांना



संशय आला व त्यांनी त्याला एका झाडाला बांधून ठेवले आणि विहिरीत पडलेल्या व्यक्तीला रानटी वेलींच्या मदतीने बाहेर काढले.

तो माणूस म्हणाला–"व्यापारासाठी शहराकडे जात होतो. मला खूप तहान लागली होती. विहिरीत पाणी असेल असे समजून वाकून पहात असतां कोणीतरी चोराने माझ्या हातातली पैशाची पिशवी ओढून घेतली व मला विहिरीत ढकलले. माझे नशीब, विहिरीत जास्त पाणी नव्हते. म्हणून वांचलो."

"तुला विहिरीत ढकलणारा माणूस हाच असला पाहिजे!" असे म्हणत शिपायांनी त्या माणसाला बाळूला दाखविले.

बाळू रडत म्हणाला–"मी आजपर्यंत कोणतेही पाप केले नाही हो! मी त्याला वांचवायचा विचारही केला होता. परंतु तसं न करण्याचे एक कारण होते." असे सांगून बाळूने आपला जीवन वृत्तांतच सांगून टाकला.

विहिरीत पडलेल्या माणसाला बाळूचा भोळेपणा कळला. तो शिपायांना म्हणाला–"मला विहिरीत ढकलणारा माणूस हा नाही. तो चांगला दांडगा होता. शिवाय विहिरीत पडून बराच वेळ झाला. मला ढकलणारा इतका वेळ इकडे कशाला रेंगाळत राहील?"

"बरे तर, खऱ्या चोराच्या शोधार्थ जातो!" असे सांगून शिपाई निघून गेले.

नंतर विहिरीत जो माणूस पडला होता तो बाळूला म्हणाला–"तुझं पोट कोठे ही भरणे शक्य नाही, तू माझ्याबरोबर चल. माझ्या मळ्यात काम कर व मळ्यातच रहा. तुझ्या वाटेला कोणी येणार नाही. मुकी झाडे तुझ्याकडे तुझे नाव घेऊन तुझी मदत मागणार नाहीत. तुझ्या पोटा पाण्याची जबाबदारी आजपासून मी घेतो."

बाळूने आनंदाने ते काम करण्याचे मान्य केले व त्या माणसाबरोबर निघून गेला.





# दधीची

दधीची हे च्यवन ऋषींचे चिरंजीव. हे सारस्वत तीर्थात् तपश्चर्या करीत असतां इंद्राला भीती वाटू लागली की हे त्याचे आसन बळकावणार. म्हणून त्याने तपोभंग करण्यासाठी अलंबुस नावाच्या अप्सरेला पाठविले.

विचित्र गोष्ट अशी की इंद्राने स्वतःच्या जातीच्या नव्याण्णव जणांचा वध केला आणि इंद्राची पदवी प्राप्त केली होती. त्याच्या सारखे शंभर यज्ञ कोणी केले तर त्याला इंद्रपद प्राप्त होईल अशी त्याला सारखी भीती वाटत होती. या भीतीमुळे इंद्राने अनेक ऋषींची तपश्चर्या भंग करण्यासाठी अप्सरांना पाठविण्याचा प्रघातच ठेवला होता. त्यात त्याला यशही प्राप्त होत राहिले.

दधीची ऋषींच्या बाबतीत मात्र त्याला यश मिळाले नाही, असेच म्हणावे लागेल. कारण अलंबुस अप्सरेने दधीचीची तपश्चर्या भंग तर केलीच व तिच्या पोटी दधीचीला सारस्वत नावाचा एक मुलगाही झाला होता.

इतके असूनही दधीची इतके मोठे तपस्वी होते की इंद्र पदवी एक हजार वर्षे रिकामी पडली तेव्हां त्यांनीच इंद्रासन भूषविले होते. त्याच काळात दक्ष व त्याचा जावई त्रिमूर्ती-मधला शंकर यांचे भांडण झाले. कारण ब्रह्मदेव यज्ञ करीत असतां दक्ष तेथे आला. तेव्हां सर्व अतिथी अभ्यागत त्याच्या सत्कारार्थ उभे राहिले, एकटा शंकर उभा राहिला नाही. म्हणून दक्षाला राग आला व तो राग मनात ठेवून त्याने स्वतः यज्ञ आरंभिला असतां जांवयाला व स्वतःच्या मुलीला यज्ञसमारंभात भाग घ्यायला निमंत्रण पाठविले नाही. बोलाविले नसूनही सती यज्ञसमयी, 'मी माहेरीच तर जाते

आहे, नाही बोलाविले तर काय झाले', असा विचार करून गेली. परंतु पित्याकडून तिचा अपमान झाल्यामुळे तिने अग्निप्रवेश करून आत्महत्या करून घेतली. ते कळल्या-वर शंकराने संतापून वीरभद्राची सृष्टी केली आणि त्याच्या नायकत्वाखाली आपल्या गणांना दक्षयज्ञ मंडपात पाठवून दक्षयज्ञ ध्वंस करविला. दक्षाचे डोके कापण्यात आले. त्यानंतर देवांनी दक्षाच्या देहावर बकऱ्याचे डोके बसविले व त्याला वांचविले.

दक्ष व शिव दोघांच्या मध्ये हे वैर आले त्यात एकट्या दधीचीनेच शंकराच्या बाजूचे समर्थन केले. ते शिवभक्त होते.

दधीचीच्या बायकोचे नाव लोमामुद्रा होते.

देव आपली सर्व अस्त्रे दधीचीजवळ लपवून ठेवीत. राक्षस घेऊन जातील म्हणून देवांना भीती वाटे. बरेच दिवस ते त्या अस्त्रांच्या शोधार्थ आले नाहीत. तरी दधीची ती अस्त्रे घालवूनच बसला. देवांनी आपली अस्त्रे परत मागितली तेव्हां दधीची म्हणाले–"मी अस्त्रे परत देऊ शकणार नाही. मी तीं पिऊन टाकली.

देव म्हणाले–"आमची अस्त्रे दिलीच पाहिजेत."

"तुमची अस्त्रे माझ्या हाडात मिळून गेली आहेत. माझी हाडे नेऊन त्यांचा उपयोग अस्त्रांसारखा करा." दधीची म्हणाले.

"तुम्ही जिवंत असतां तुमच्या हाडांचा उपयोग कसा काय करायचा?" देवांनी विचारले. तेव्हां दधीचीने आपल्या तपो-बलाने अग्नी जागविला आणि त्यात स्वतःला जाळून घेतले. त्यांच्या हाडांचे ब्रह्मास्त्र, वज्रायुध व इतर अस्त्रे तयार झाली.

दधीचीच्या हाडांचे फक्त एक वज्रायुध झाले असें ही सांगतात. इंद्राने याच वज्रायुधाचा प्रयोग करून वृत्रासुराचा वध केला होता.

दधीचीने अग्निप्रवेश केला तेव्हां लोपा-मुद्रा गरोदर होती. नंतर तिला जो मुलगा झाला त्याचे नांव पिप्पलाद होते.





# चंद्रहास

केरळच्या राजाचा त्याच्या शत्रूंनी वध केला. त्याच्या राणीने त्याच्याबरोबर सहगमन केले. त्यांचा मुलगा चंद्रहास अगदी लहान म्हणजे तान्हाच होता. त्याला एका दासीने कुंतल देशात पोंचते केले.

कुंतल देशाच्या राजाला मूलबाळ नव्हते. प्रधान दुष्टबुद्धीला वाटत होते की त्याचा मुलगा राजा होणार. परंतु चंद्रहासाला पाहून दरबारी ज्योति-ष्याने भविष्य वर्तविले की चंद्रहासच राजा होणार.





चंद्रहास जिवंत राहिला तर आपल्या मुलाला राज्य मिळणार नाही, असा विचार करून दुष्टबुद्धीने चंद्रहासचा वध करण्यासाठी मारेकरी नेमले. चंद्रहासाचा वध करण्यास त्यांचा हात उठेना. म्हणून त्यांनी त्याला जंगलात सोडून दिले.



कुलिंदक नावाचा एक राजा शिकारीला त्याच रानात गेला असतां चंद्रहासला पाहून व त्याला मूल नसल्याने त्यालाच स्वत:चा मुलगा मानून वाढवू लागला. चंद्रहास न मेल्याचे कळतांच दुष्टबुद्धीने त्याला आपल्या घरी आणून ठेवले.

दुष्टबुद्धीचा मुलगा मदन एका प्रांतात राजाचा प्रतिनिधीस म्हणून काम करीत होता. दुष्टबुद्धीने एक पत्र लिहून ते चंद्रहासच्याच हाती त्याच्याकडे पाठविले. चंद्रहास राज-प्रतिनिधीच्या वाड्याच्या आवरणात पोचला तेव्हां दमून गेल्यामुळे एका झाडाखाली विश्रांती घेण्यासाठी झोपला.





दुष्टबुद्धीची मुलगी विषया आपल्या भावाबरोबर रहात होती. तिने उद्यानात चंद्रहासाला झोपलेल्या अवस्थेत पाहिले व ती त्याच्या रूपावर भाळली. चंद्रहासाच्या हाता-तले पत्र हळूच घेऊन तिने वाचले. त्यांत चंद्रहासला विष द्यायला लिहिले होते. तिने 'विष' या शब्दाला

नंतर चंद्रहास मदनला भेटला व ते पत्र दिले. त्यात चंद्रहासला विषयाला दे असे वाचून त्याने चंद्रहास व विषयाचे लग्न करून दिले.





पुढे दुष्टबुद्धीला त्याचा बेत फसल्याचे कळले. चंद्रहास मेला तर नाहींच, वर त्याचा जावई झाला. तरी त्याचा वध करण्याचा विचार दुष्टबुद्धीने मनातून काढला नाही.

दुष्टबुद्धी चंद्रहासा म्हणाला–"तू आज मध्यरात्रीच्या सुमारास चंडिकेच्या देवालयात जाऊन तिची पूजा करून ये. तो एक शुभ मुहूर्त आहे." बापाने चंद्रहासला सांगितले ते मदनने ऐकले होते.





मध्यरात्रीच्या सुमारास चंद्रहास देवळात जायला निघाला तेव्हां विषयाला संशय आला व तिने चंद्रहासाला जाऊ दिले नाही. परंतु शुभमुहूर्ताची गोष्ट ऐकून मदन देवालयात गेला. तेव्हां मारेकऱ्यांनी त्याला ठार केले.



त्याचे सर्व प्रयत्न फुकट गेलेले पाहून व त्याचा मुलगासुद्धा मृत झालेला पाहून दुष्टबुद्धी त्या धक्क्याने मरण पावला.



राजाने आपल्या मुलीचे लग्न चंद्रहासाशीच करून देऊन त्यालाच आपल्या राज्याचा वारस केले. चंद्रहासाने अनेक वर्षे राज्य केले व प्रजेची प्रीती संपादन केली.



# कुमारस्वामी

पार्वती शंकराच्या समागमाने गरोदर असतां. तिने आपला गर्भ अग्नीत वाढवायला ठेवला. अग्नीने तो गंगेला वाढवायला सोंपविला. गंगेने तो काठावरच्या गवताच्या बेटात सोडला तेथेच कुमारस्वामीचा जन्म झाला.

अशातऱ्हेने गवताच्या बेटात जन्मलेल्या कुमारस्वामीला सहा कृत्तिकांनी अंगावरचे दूध पाजून वाढविले. म्हणून त्याला सहा तोंडे झाली व षण्मुख किंवा कार्तिकेय ही नांवे पडली. सप्तर्षींच्या पत्नींपैकी वशिष्ठमुनींची बायको अरुंधती हिला सोडून इतर सहाजणींनी कुमारस्वामीला वाढविले अशीही एक कथा आहे. त्याच कृत्तिका असेही सांगतात.

कुमारस्वामीचा जन्म झाला तेव्हां त्याच्या जवळच शंकराने ज्या धनुष्याने त्रिपुरासुराचा वध केला ते धनुष्य पडलेले होते, म्हणे. कुमारस्वामीने त्याची दोरी ओढली तेव्हां एक भयंकर आवाज झाला आणि दोन दिग्गज त्या आवाजाने घाबरून जाऊन कुमारस्वामीच्या अंगावर पडले. त्या हत्तींना चेंडूसारखे फेंकून ते तान्हे मूल खेळू लागले व आनंदाने ओरडू लागले.

कुमारस्वामी जन्मल्यावर ब्रह्मदेवाने त्याला पार्वतीपरमेश्वरांना दाखविले व म्हणाला–"हेच तुझे आईवडील रे, बाबा!" इंद्राने ऐरावताच्या दोन घंटा आणून कुमारस्वामीला प्रेमाने दिल्या.

कुमारस्वामी जन्मला तेव्हां त्रिलोकात खळबळ उडून गेली, म्हणे. अशीही एक कथा आहे की ते पाहून आणि कुमारस्वामीचे तेज पाहून सर्व मुनी भयभीत झाले व इंद्राकडे धावले. त्यांनी इंद्राला सुचविले–"हा कुमारस्वामी तुझा पराभव करून

इंद्रासन बळकावणार. म्हणून तू त्याचा पहिल्याने वध करून टाक." इंद्राने सप्त मातृकांना बोलाविले व कुमारस्वामीचा वध करूनया अशी त्यांना आज्ञा केली. सप्तमाता कुमारस्वामीकडे गेल्या, परंतु त्यांनी तसे न करता मातेसारखे त्याचे लालन पालन केले. कुमारस्वामीने त्यांना बालग्रह केले म्हणे.

सप्तमातृकांकरवी कुमारस्वामीचा वध न होऊ शकल्यावर इंद्र त्याच्याशी युद्ध करायला आला व त्याने त्याच्या वज्रायुधाचा प्रयोग केला. वज्रायुध कुमाराला उजव्या बाजूला लागले. त्यातून बकऱ्याचे तोंड असलेला विशाख जन्मला. विशाखाबरोबर अनेक कन्या व कुमार जन्मले. त्यांना पाहून इंद्र घाबरून गेला व कुमारस्वामीच्या पायावर पडून त्याच्या चरणांपाशी आश्रय मागितला.

"तुला काय पाहिजे, सांग!" कुमारस्वामीने त्याला विचारले. "तू माझ्याशी प्रेमाने व सुखासमाधानाने वाग. माझी इंद्रपदवी तू ग्रहण कर." इंद्र म्हणाला.

"मला तुझ्या इंद्रपदाची गरज नाही." कुमारस्वामी म्हणाला.

"तसं असेल तर तू देवांचे सेनापतित्व ग्रहण कर." इंद्राने विनंती केली.

कुमारस्वामीने अनेक राक्षसांचा वध केला. त्यांतले शूर पद्मासुर, अंधकासुर वगैरे प्रमुख होत. क्रौंच पर्वतावरच राक्षसांची मुख्य वस्ती होती. म्हणून कुमारस्वामीने तो पर्वत छिन्नभिन्न करून टाकला.

कुमारस्वामीने जे सर्वात मोठे कार्य केले ते म्हणजे तारकासुराचा वध. तारकासुराला ब्रह्मदेवाचा वर प्राप्त होता. ते बळ प्राप्त झाल्यामुळे त्याने इंद्राला भयकंपित केले. स्वतः ब्रह्मदेव सुद्धा देवांना काही मदत करू शकला नाही. हे सर्व कुमारस्वामीच्या जन्मापूर्वीच घडले. कुमारस्वामीने जन्म घेऊन देवांच्या सैन्याचे सेनापतित्व ग्रहण केले आणि तारकासुराचा वध केला.





# भय म्हणजे?

एका जंगलातल्या तलावाच्या काठी एका लहानशा घरात एक गरीब बाई रहात असे. तिला एकुलता एक मुलगा होता. त्याचे नाव सुमंत होते. त्याच्या आईने त्याला खूप लाडात वाढविले होते.

एके दिवशी सुमंत व त्याची आई निश्चिंतपणे घरात झोपली होती. एकाएकी जोराचा वारा सुटला, विजा चमकू लागल्या आणि गडगडाट होऊ लागला. थोड्याच वेळाने मुसळधार पाऊस पडू लागला. तुफानाचा आवाज ऐकून आईची झोप मोडली व तिने मुलाला उठविले आणि म्हणाली—"अरे ऊठ! मला भीती वाटते आहे. तू उठून ती खिडकी जरा बंद कर पाहू."

सुमंत चांगला जागा झाला होता. आई म्हणाली ती त्याने ऐकले, 'भीती' हा शब्द त्याने आयुष्य भरात अगदी पहिल्याने ऐकला होता. म्हणून म्हणाला—"खिडकी बंद करतो ग आई! पण तू 'भीती' म्हणालीस ते काय व ती कशी असते?" त्याने विचारले.

मुलाने विचारलेल्या त्या प्रश्नाचे आईने काहीच उत्तर दिले नाही. 'एवढ्याशा पोराला हे सर्व सांगत काय बसायचे' असा विचार करून पुन्हा ती पांघरूण घेऊन पडून राहिली.

परंतु 'भीती' म्हणजे काय व ती कशी असते ती पाहून यायचे सुमंतच्या मनात होते. त्याला झोपावेसे वाटेना.

'असे नाही काम होणार' असे ठरवून तो हळूच दार उघडून बाहेर आला. तो त्या काळोखात पावसात भिजत रानात निघाला आणि "भीती तू कशी आहेस? कोठे राहतेस?" असे विचारीत ओरडत चालू लागला.



"बाळा, आलास का? हा बघ पाळणा बांधून ठेवला आहे व कोणीतरी येईल म्हणून वाट पाहते आहे. तू मला खांद्यावर थोडे उभे राहू दिलेस म्हणजे मी आपल्या मुलाला पाळण्यातून खाली उतरवीन!" असे उत्तर ऐकू आले.

सुमंत 'बरे' म्हणाला व त्या दिशेने निघाला. तेथे एका घरात एक बाई उभी होती. वरच्या तुळईला एक पाळणा टांगलेला होता.

खरोखरी ती कोणी मनुष्यजातीची स्त्री नव्हती. ती एक राक्षसीण होती. ती गोष्ट सुमंतला माहीत नव्हती. त्याने तिला आपल्या खांद्यावर चढविले. त्या राक्षसिणीने सुमंताला आपल्या पायाखाली तुडवून ठार करण्याचा प्रयत्न सुरू केला. त्या बरोबर सुमंतला राग आला व त्याने राक्षसीला खाली पाडण्यासाठी हातांनी ढकलले.

ती ब्रह्मराक्षसी जमिनीवर तोंडघशी पडली व तिचे दोन सुळे तुटले. ती ओरडत किंचाळत तेथून पळून गेली.

सुमंत त्या घरातून बाहेर आला. त्यावेळेपर्यंत सूर्योदय झाला होता. तुफान थांबले होते. तो आणखी चार पावले पुढे गेला.

एका जागी डोंगरावरच्या मोठमोठ्या दगडावर बसलेले काही चोर त्याला दिसले. ते सुमंताला पाहून विचारू लागले—"कोण रे तू? या जागी पक्षीसुद्धा उडायला भितात. राजाचे शिपाई या जागी यायला मागे पुढे करतात आणि तू मात्र निर्भयपणे इकडे येतो आहेस?"

"तू भय म्हणालास ते काय व कसे असते, हे पहायलाच मी इकडे आलो आहे!" सुमंत म्हणाला.

ते ऐकून चोरांना हसू आले. त्यांनी सुमंतला एक तवा, एक उलथणे आणि पीठ दिले आणि म्हणाले—"ती झाडी दिसते आहे ना तिच्यातल्या स्मशानात जा आणि हे पीठ दिले आहे ना, त्याच्या भाकऱ्या भाजून आण."

सुमंत 'बरे' म्हणाला आणि स्मशानात गेला व तेथे जळत असलेल्या ठेवला चितेतले निखारे फुलवून त्यांच्यावर तवा आणि भाकरी भाजू लागला. बाजूच्या एका समाधीतून एक लांब हात बाहेर आला व म्हणाला—"मुला, मला भाकरी कशी झाली आहे पाहू देशील का रे?"

कामात मग्न झालेल्या सुमंताला भयंकर राग आला.

"तुला भाकरी कशी झाली आहे पाहायची आहे का? जिवंत आहेत त्यांची भूक भागविण्यापूर्वी तुझीच भूक प्रथम भागवितो हं!" असे म्हणत त्याने हातातले उलथणे जोराने त्या लांब हातावर मारले. त्या सरशी तो हात समाधीत अदृश्य झाला.

नंतर सुमंतने भाकऱ्या भाजल्या व चोर होते तेथे जाऊन त्याने घडलेली गोष्ट सांगितली. त्याने सांगितलेली हकीगत ऐकून चोरांना सुमंताचीच भीती वाटली. म्हणाले—

"बाबा रे, तुला भय कसे असते हे दाखविणे आम्हांला शक्य नाही. तू लौकर इकडून नीघ कसा. तुझे आमच्यावर उपकार होतील. आम्हांला सुखाने जगू दे!" चोर गयावया करीत म्हणाले.



सुमंत तेथून आणखी थोडे अंतर चालून गेला. त्याला एक म्हातारी भेटली. तिने त्याला विचारले—"कशाला रे बाळा, या जंगलात असा फिरतो आहेस? तुमचं गाव कोठे आहे? तुम्ही काय काम करता?"

सुमंतने सर्व काही सांगितले व म्हणाला—"आजी, भय हे कसं असतं हे पहायची माझी इच्छा आहे, परंतु मला अद्याप ते कोठे आढळले नाही."

ते ऐकून ती म्हातारी हसत म्हणाली—"तुझ्या सारखीच मला एक नात आहे, मुला. ती तुझी इच्छा पूर्ण करील." असे सांगून ती म्हातारी सुमंतला बरोबर घेऊन गेली.

म्हातारीची नात एक वस्ताद मुलगी होती. सुमंत म्हणाला ते सर्व ऐकून घेऊन तिने एक युवती केली. जेवायची वेळ झाल्यावर सुमंतला तिने वाढले आणि थोडी दूर उभी राहली. सुमंत भात कालवून घास तोंडात घालणार इतक्यात ती म्हणाली– "थांब, थांब ! मी भाजी शिजवली आहे, पण भाजीची पातेली आणायला विसरले." असे म्हणत ती सैपाक घरात गेली व एक मोठे पातेले आणून त्याच्या समोर तिने ठेवले.

सुमंतने भाजी काढून घेण्यासाठी पातेली-वरचे झांकण काढले. त्या बरोबर त्यांतून 'टपटप' असा आवाज आला. सुमंत दचकून "अं" म्हणाला आणि मागे सरकला. पातेल्यात एक चिमणी होती. ती 'चिव' 'चिव' करीत उडून गेली. भय म्हणजे काय हे सुमंतला माहीत नव्हते तरी तो त्या चिमणीकडे पहात राहिला.

म्हातारीची नात खदखदां हंसत म्हणाली–"कळले का आतां की भय व भीती म्हणजे कशी असते ती ?"

सुमंतला त्यावेळी मात्र भीती म्हणजे काय हे कळलं त्याला 'ना' म्हणता आले नाही. म्हणाला–"होय, भय म्हणजे काय, हे मला आतां कळले. आतां मी आपल्या आईकडे जातो. तुम्ही दोघी सुद्धां माझ्या-बरोबर आलात तर माझ्या आईला फार आनंद होईल." असे म्हणत तो उठून उभा राहिला.

घरात कोणी पुरुष नव्हता म्हणून म्हातारीला ना म्हणवेना. ती नातीला बरोबर घेऊन सुमंताच्या इच्छेप्रमाणे त्याच्या घरी जायला निघाली.

सुमंत त्या दोघींना घेऊन घरी पोच-ल्यावर त्याच्या आईला परमानंद झाला. सर्व मिळून एकत्र राहू लागली. सुमंत अंग मोडून शेतात व बाहेरचे काम करी आणि सर्व प्रकारे तो कामसू हुशार असल्याचे दिसून आले.

काही दिवसांनी सुमंत व म्हातारीची हुशार मुलगी दोघांचा विवाह झाला व त्यांनी आपापल्या आईला सुखी केले.





# स्तुतीचे गुपित

मगध देशाचा राजा चंद्रसेन याने एकदा आपल्या प्रधानाला बोलावून वेष पालटून देशभर फिरून यायला व प्रजा राजाविषयी काय म्हणते ते चौकशी करून यायला सांगितले. त्याप्रमाणे भ्रमण करून आल्यावर प्रधान म्हणाला–"महाराज, प्रजा सर्वत्र आपली स्तुतीच करीत असलेली मला आढळली. राजाला वाटले की प्रजा खरोखरच सुखी असली पाहिजे.

पुढे काही वर्षांनी राजा चंद्रसेन मरण पावला आणि त्याचा मुलगा इंद्रवर्मा राजा झाला. त्यानेसुद्धा प्रधानाला देशभर फिरून प्रजेचे राजाच्या विषयी काय मत आहे, चौकशी करून यायला सांगितले. दुसऱ्याच दिवशी प्रधान परत आला व म्हणाला– "महाराज, आपल्या राज्याच्या दक्षिणेला विक्रमपूर नावाचे जे गाव आहे त्या गावचे लोक आपली फार स्तुती करीत आहेत."

तिसऱ्या दिवशी राजा स्वतः वेष पालटून विक्रमपुरीला गेला. विक्रमपुरी पर्यंतचा रस्ता चांगला करून दिला व दुतर्फा सावलीसाठी झाडे लावण्याची व्यवस्था करून दिली. जागोजागी विहिरी खणून दिल्या आणि लोकांना विश्रांती घेता यावी, यासाठी धर्मशाळा बांधून दिल्या.

आणखी काही दिवसांनी इंद्रवर्माने पुन्हां एकदा देशभ्रमण करून प्रजेचे मत काय आहे, चौकशी करून यायला प्रधानाला पाठविले.

या खेपेस प्रधानाने निवेदन केले– "महाराज, अवंतीपूरच्या प्रजेच्या मनात आपल्यावर फार श्रद्धा व भक्ती आहे."

राजा वेष पालटून अवंतीपूरला गेला. तेथे गेल्यावर राजाला कळले की अवंती-पूरला पिण्याच्या पाण्याची चांगली व्यवस्था नाही. प्यायचे पाणी आणण्यासाठी प्रजेला











दूर जावे लागते. म्हणून राजाने अवंतीपूरच्या गावकन्यांसाठी गावात मोठमोठ्या विहिरी व एक तलाव खणून पाण्याची व्यवस्था करून दिली.

आणखी काही वर्षे लोटली. राजाने पुन्हां प्रधानाला देशभ्रमण करून आपल्या राज्यकारभाराविषयी प्रजेचे मत विचारून येण्यास प्रधानाला पाठविले. प्रधानाने परतल्यावर निवेदन केले–"महाराज, कांचनपूरची प्रजा सोडून कोठलीही प्रजा आपली आठवण देखील काढीत नाही."

ते ऐकून राजा इंद्रवर्मा वेष पालटून कांचनपूरला गेला आणि तेथील प्रजेला कशा प्रकारचा त्रास अनुभवावा लागत आहे, याची चौकशी केली. तेव्हां राजाला कळले की कांचनपूरला नदीकाठावर जो आठवड्याचा बाजार होतो त्या बाजाराला यायला नदीवर पूल नसल्यामुळे प्रजेला फार त्रास सोसावा लागतो आहे.

राजाने राजधानीत परतल्यावर कांचनपूरच्या नदीवर पूल बांधवून दिला.

आणखी काही वर्षांनी राजाने प्रधानाला पुन्हां देशभ्रमण करून यायला पाठविले.

या खेपेस प्रधानाने परतल्यावर निवेदन केले–"महाराज, देशात कोठेही प्रजा आपली आठवण देखील काढीत नाही."

तेव्हां राजा स्मित करून म्हणाला–"प्रधान, याचा अर्थ असा की आपली प्रजा सुखी व संपन्न आहे. माझ्या प्रजेला माझ्या मदतीची गरज नाही. प्रजेला कोणत्याही प्रकारची गरज असेल तर ती राजावरच अवलंबून राहील. वास्तविक प्रजेच्या मनात सामान्यपणे राजाविषयी चांगलेच मत असते. कधी कोणत्याही मदतीची गरज पडली की लोक देवाची आठवण काढतात तशीच प्रजा गरज पडली की राजाचे स्मरण करते. जे लोक राजाला किंवा देवाला विसरतात ते संकटसमयींच त्यांची आठवण काढतात. माझ्या वडिलांना ही गोष्ट चांगली माहीत नव्हती." इंद्रवर्माने प्रजा राजाची जी स्तुती करते त्या मागचे खरे गुपित प्रधानाला सांगितले.





# औषधावरचा विश्वास

गोपालपूर नावाच्या गावी रामशास्त्री नावाचे एक वैद्यबुवा रहात असत. त्यांच्या हाताला चांगला गुण होता, इतका की लोक म्हणत की रामशास्त्री हे सामान्य वैद्य नसून प्रत्यक्ष धन्वतरीचे अवतारच आहेत. त्यांनी औषध देण्याचीच खोटी रोगी बरा होतो. त्यांनी नाडीवर हात ठेवला की अर्धा आजार बरा होतो." परंतु रामशास्त्री फुलून न जाता, नम्रपणे म्हणत–"अहो, मी कसाला वैद्य? तुमचा माझ्या औषधावर विश्वास आहे, म्हणून आजार बरे होतात.

रामशास्त्रींच्या नम्रपणामुळे त्यांची ख्याती जास्तच वाढत गेली आणि लोक म्हणू लागले–"वैद्य असावा तर असा. स्वतःची किंवा स्वतःच्या औषधाची थोरवी आपल्या तोंडाने हा गृहस्थ कधी गात नाही!"

एकदा रामशास्त्रींनाच जुलाब होऊ लागले आणि ओकाऱ्या येऊ लागल्या. प्रत्येक जण वैद्यबुवांना काही ना काही उपाय औषध सुचवू लागले. एकाने विचारले–"वैद्यबुवा, तुमच्या पेटीतले कोणते औषध काढून देऊ हो?" आणखी एकाने शेजारगावच्या लक्ष्मणशास्त्र्यांचे औषध घेऊन पहावे, असे सुचविले.

लक्ष्मणशास्त्र्यांचे नाव ऐकून रामशास्त्र्यांनापण त्यांच्याकडे जाण्याचा उत्साह वाटला. रामशास्त्री काही वैद्यांनामानीत त्यांपैकी लक्ष्मणशास्त्री एक होते. म्हणून रामशास्त्र्यांनी बैलगाडीत त्या गावची वाट धरली.

परंतु लक्ष्मणशास्त्र्यांच्या गावी जाऊन पाहतात तर त्यांच्या घराला कुलूप लावलेले होते. चौकशी करता कळले की लक्ष्मणशास्त्र्यांना कुत्रा चावला म्हणून ते गोपाळपूरच्याच गोपाळशास्त्री नावाच्या वैद्याकडे गेले आहेत.

राजशास्त्र्यांनी विचार केला की लक्ष्मण शास्त्र्यांचा इतका विश्वास गोपाळ-शास्त्र्यांच्या औषधावर आहे, तर आपणही त्यांच्याचकडे जावे व त्यांच्याचकडून औषध घ्यावे. लक्ष्मणशास्त्र्यांचा आजार बरा करण्याची शक्ती ज्या वैद्यात आहे, तो आपला आजार कां बरा करणार नाही? म्हणून रामशास्त्री पुन्हा गाडीत बसून आपल्या गावी परतले.

परंतु गोपाळशास्त्रींच्या घरापर्यंत जायला गाडी रस्ता नव्हता. म्हणून गाडीत बसून थोडे अंतर गेल्यावर रामशास्त्री गाडीतून उतरून पायीच निघाले लोकांनी त्यांना धरून गोपाळशास्त्र्यांच्या घरापर्यंत नेले. ते गोपाळशास्त्रींच्या घरी पोचले तेव्हां त्या घरातून बायकांच्या रडण्याचा आवाज ऐकू आला. लोकांची मोठी गर्दी जमली होती. त्या गर्दीत लक्ष्मणशास्त्रीसुद्धा एक होते.

रामशास्त्र्यांनी लक्ष्मणशास्त्र्यांना विचारले–"कां हो, लोक रडताहेत कां? गोपाळशास्त्र्यांकडे औषध घेणारा कोणी गेला का?"

लक्ष्मणशास्त्री रामशास्त्र्यांना ओळखत नव्हते. ते रामशास्त्र्यांना म्हणाले–"कोणी दुसरा रोगी नाही हो, स्वतः गोपाळ-शास्त्रीच वारले. काल रात्री एकाएकी त्यांना जुलाब होऊ लागले आणि ओकाऱ्या होऊ लागल्या. ते इतर कोणी आजारी आला की मंत्र म्हणून मंत्रवलेले पाणी किंवा भस्म देऊन लोकांचा आजार बरा करीत. परंतु त्यांचा स्वतःच्या मंत्रावर विश्वास नव्हता. म्हणून ते रामशास्त्री-नांवाच्या या गावच्याच वैद्याकडे औषध घ्यायला गेले होते. परंतु वाटेतच ते वारले."

ते ऐकून रामशास्त्री स्वतः व त्यांच्या बरोबरचे लोक चकित होऊन परस्परांकडे पाहू लागले. रामशास्त्री म्हणाले–"चला, मी आपल्या आजाराचा इलाज स्वतःच करतो. आतां माझ्या औषधावर माझा विश्वास बसला आहे!"



# दगडाची किंमत

सुलोचनशेट रत्नांचे पारखी होते. त्यांच्या शेजारी एक श्रीमंत गृहस्थ रहात असत. सुलोचन शेटनी त्या श्रीमंताच्या घरी एका गरीब माणसाला दररोज फेऱ्या घालीत असतांना पाहिले. म्हणून कुतूहल वाटून त्यांनी त्या गरीब माणसाला बोलावून विचारले.

"मी आपल्या मिळकतीतला थोडा भाग दररोज यांच्याकडे जमा करतो. माझ्या मुलीचे लग्न ठरतं आलं आहे, उद्यां परवां मी त्यांच्याकडे जमा केलेली सर्व रक्कम परत घेणार आहे." तो गरीब माणूस म्हणाला.

सुलोचनला कळले की तो श्रीमंत सावकार त्या बिचाऱ्याला फसविण्याच्या विचारात आहे. म्हणून त्यांनी त्या गरिबाला एक युक्ती सुचविली. त्या गरीब माणसाने, सुलोचनशेटने दिलेले चार दगड नेऊन त्या सावकाराला जपून ठेवायला सांगितले. त्या सावकाराने ते दगड सुलोचनशेटला दाखविले. सुलोचनशेट बारकाईने दगड पाहून म्हणाला–"हे कच्चे दगड आहेत, घासल्यावर प्रत्येक दगडाची किंमत चार-पाच हजार तरी येईल."

त्यानंतर सुलोचनशेट गरीब माणसाला म्हणाला–"आता तू जाऊन आपले पैसे मागून घे." त्याने पैसे मागताच त्या सावकाराने त्याचे सर्व पैसे परत दिले आणि बरोबर आणखी कोठलेतरी चार दगड दिले. गरीब माणसाकडून मिळालेले दगड सुलोचनशेटला देऊन सावकराने घासून द्यायला सांगितले सुलोचन म्हणाला–"अहो, हे हिरे नाहीत! मीच दिले होते हे त्या गरीब माणसाला, असे सांगतात, हजार खोटे बोलावे आणि एक लग्न करावे, म्हणून एकदाच खोटे बोललो." सुलोचन म्हणाला.





# खरे सौंदर्य

एका गावात रघुनाथराव व सदाशिवराव नावाचे दोघे मित्र रहात असत. दोघे लहानपणापासून बरोबर एका शाळेत शिकले आणि मोठेपणी त्याच गावात स्थायिक झाले. प्रत्येक बाबतीत ते परस्परांचा सल्ला घेऊनच सर्व कामे करीत.

रघुनाथरावांना सुंदर वस्तू व सुंदर कपडे आवडत. ते नेहमी कोणासमोर जात तर नीटनेटकेपणाने जात. त्याचप्रमाणे लग्न करायचे एखाद्या सुंदर मुलीशीच, असे त्यांनी मनाशी ठरविले.

दुर्दैवाने त्यांचे वडील अचानकपणे हृदयविकाराने वारले. मरण समयी त्यांनी मुलाला, आपल्या एका मित्राच्या मुलीशी लग्न ठरविले असल्याचे व तिच्याशीच लग्न करायला सांगून त्याच्याकडून वचन घेतले.

रघुनाथरावांच्या वडिलांच्या मित्राची मुलगी रंगाने काळी सावळी होती. परंतु घरकामात फार हुशार होती. तिच्याशी लग्न करण्याची इच्छा नसूनही वडिलांना वचन दिले होते म्हणून व मित्र सदाशिवरावांनी प्रोत्साहन दिले म्हणून वडिलांच्या मित्राची मुलगी रुक्मिणी हिच्याशी रघुनाथरावांनी लग्न करून घेतले.

रुक्मिणी लहानपणापासून गरीब कुटुंबात वाढली होती. म्हणून स्वभावाने सहनशील व नम्र होती. ती सर्व कामे मन लावून करी. रघुनाथराव उठण्यापूर्वीच ती घरातली सर्व कामे उरकून टाकी.

तरी रघुनाथरावांच्या मनांत बायकोबद्दल चांगली भावना नव्हती. त्यांच्या मनात हे दुःख राहून गेले होते की त्यांचे लग्न एका सुंदर मुलीशी होऊ शकले नाही.

कित्येक दिवस लोटले. एके दिवशी सदाशिवराव रघुनाथरावांकडे लग्न ठरत आल्याचे सांगायला आले व दुसऱ्या दिवशी मुलीला पहायला जायचे असल्यामुळे बरोबर एक मित्र म्हणून चलायला आग्रह केला. रघुनाथरावांनी ते मान्य केले. त्या दिवशी मित्राच्या आग्रहावरून सदाशिवराव मित्राच्या घरीच जेवले आणि दुसऱ्या दिवशी दोघे मित्र मुलीला पहायला गेले.

होणारी नवरी मुलगी पार्वती दिसायला फार सुंदर होती. रघुनाथराव तिचे सौंदर्य पाहून थक्कच झाले. मुलगी पसंत असल्याचे सदाशिवरावांनी कळविले व लग्नाचा मुहूर्त ठरला. रघुनाथरावांनी आपल्या मित्राचे अभिनंदन केले, परंतु आपल्या भाग्यात त्या मुलीसारखी सुंदर मुलगी न आल्याबद्दल त्यांना मित्राचा हेवाच वाटला.

पार्वती सासरी येऊन नांदू लागली तेव्हांपासून रघुनाथरावांच्या मनात रुक्मिणीविषयी घृणा वाढत गेली. रुक्मिणी मनोभावे पतीची सेवा करी, त्याला काय हवं नको ते पाही, परंतु रघुनाथरावांच्या मनांत तिच्या विषयी थोडादेखील ओलावा किंवा आर्द्रता नव्हती.

सदाशिवरावांचा संसार थाटल्यावर एकदां रघुनाथरावांच्या मनात मित्राचा संसार पाहून यावेसे वाटले व ते सदाशिवरावांच्या घरी गेले. सूर्य बराच वर आला होता. तरी दारासमोरची झाडलोट झालेली नव्हती. सदाशिवरावांनी अत्यंत प्रेमाने मित्राला घरात बोलाविले. घरातली स्थिती पाहून रघुनाथराव थक्कच झाले.



कपडे अस्तव्यस्त पडलेले होते. नवरा बायको नुकतेच अंथरुणातून उठल्यासारखे दिसले."

इतक्यात पार्वती घरांत जातांना दिसली. तिचे केस विखुरलेले होते, तोंडावर घामाचे ओघळ होते आणि डोळ्यावरची झोप अजून गेलेली नव्हती. तिने रघुनाथरावांकडे दुर्लक्षपणे पहात पतीला घरात बोलाविले.

घरात जातेवेळी सदाशिवराव म्हणाले–"मित्रा! बस हं, मी आलोच!"

रघुनाथरावांना उठावेसे वाटले, परंतु मित्राच्या आग्रहावरून बसून राहिले. त्याला नवराबायकोची कशावरून तरी धुसफुस होत असलेली ऐकू आली. सदाशिवराव बायकोची समजूत घालीत होते व ती जास्त जास्त चिडून बोलत होती.

सदाशिवराव काय म्हणत होते ते रघुनाथरावांना स्पष्ट ऐकू आले नाही, परंतु पार्वती म्हणाली ते मात्र स्पष्ट ऐकू आले. ती म्हणाली–"सर्व गावभरच्या लोकांना तुम्ही जमा करतां, हे घर आहे की धर्मशाळा? हा तर गावातलाच दिसतो आहे, याला जेवायला बोलवायची गरजच काय?"

सदाशिवराव जास्त बाचाबाची न वाढविता बाहेर आले, परंतु रघुनाथराव निघून जात असल्याचे त्यांना दिसले. त्यांना मनापासून फार वाईट वाटले की बायकोचे बोलणे मित्राने ऐकले असावे. परंतु त्यांना कदाचित या गोष्टीची कल्पनाही नसणार की त्यांच्या बायकोने रघुनाथरावांच्या डोळ्यात कसे चांगले अंजन घातले होते.

घरी परत आल्यावर रघुनाथरावांनी विचार केला, मी जे सौंदर्य मानीत आलो ते खरे सौंदर्य होते का? कारण घरात पाऊल टाकल्यावर आपल्या घरातली टापटीप, बायकोची नीटनेटकी वागणूक आणि मित्राच्या घरातली रीत दोन्हींची चित्रे त्यांच्या डोळ्यासभोर उभी राहिली आणि त्यांना वाटू लागले की रुक्मिणीत जे सुंदर नारीत्व आहे ते ओळखण्याचा त्यांनी कधी प्रयत्नच केला नव्हता.






ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांपैकी धर्म नामक व्यक्तीने दक्ष प्रजापतीच्या मुलींपैकी दहा मुलींशी विवाह केला. धर्म याला चार मुलगे झाले. त्यांची नावे अनुक्रमे, हरी, कृष्ण, नर व नारायण अशी होती. त्यांच्यापैकी थोरले दोघे योगाभ्यास करू लागले व योगी झाले.

नर व नारायण हिमालय पर्वतावर चढून गेले व त्यांनी मंदाकिनी नदीच्या काठी हजार वर्षे तपश्चर्या केली. त्यांच्या तपश्चर्येमुळ पर्वत कंपित झाले व पृथ्वी कापू लागली. कोणी घोर तपश्चर्या करू लागला की इंद्राचे आसन डोलू लागे. म्हणून इंद्राने त्या दोघांची तपश्चर्या भंग करण्याचे ठरविले.

तो ऐरावतावर बसून नर व नारायण होते तेथे आला व म्हणाला–"हे मुनिवर्य हो! मी तुमच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन तुम्हाला वर द्यायला आलो आहे. मी इंद्र आहे. आता तुम्ही "आपली तपश्चर्या थांबवा!"

समाधिस्थ नरनारायणांना इंद्र म्हणाला–ते जणुकाही ऐकून आले नाही. त्यांनी त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले.

तेव्हां इंद्राला राग आला. त्याने माया रचली. हजारो सिंह, वाघ, चित्ते, लांडगे आणि नागसाप दिसू लागले. प्रलय काळासारखा महापूर आला आणि दावानल सर्वत्र पसरू लागला. त्याच बरोबर सर्वत्र अंधकार पसरला आणि त्या पाठोपाठ



दगडांची वृष्टी होऊ लागली. परंतु इंद्राच्या या इंद्रजालाचा काही एक परिणाम नर-नारायणांवर झाला नाही. ते तपश्चर्येत लीन होते.

मी वर देतो म्हणालो तर तिकडे लक्ष दिले नाही. हिंस्र पशूंची, अंधकाराची व जल प्रलयाची या दोघांनी पर्वा केली नाही. तेव्हां नरनारायणांची तपःश्चर्या कशी भंग करावयाची? इंद्राला कळेना. शेवटी इंद्राच्या लक्षात आले की वाग्बीज, मायाबीज व कामबीज यापैकी कोणत्याही मंत्राचा जप करून महादेवीला प्रसन्न करण्यासाठी जे तपश्चर्या करीत असतात

इंद्र देवलोकात परतला आणि कामदेव व वसंत यांना बोलावून त्यांना म्हणाला :

"नर व नारायण बदरिकाश्रमात दीक्षापूर्वक तपश्चर्या करीत आहेत, ह्यात आपल्याला धोका आहे. मी त्यांचा तपोभंग करण्यासाठी त्यांना वरदानाचा लोभ दाखविला. परंतु त्यांनी तिकडे लक्ष दिले नाही. मी वादळ, दावानल आणि हिंस्र पशूंची सृष्टी करून त्यांना विचलित करण्याचा प्रयत्न करून पाहिला, परंतु काही एक फायदा झाला नाही. आता त्यांचा तपोभंग करण्याचे काम तुमच्या हातूनच होणे शक्य आहे. म्हणून तुम्हांला मी बोलाविले. कामदेवा, तू वसंत ऋतुला व अप्सरांना बरोबर नेऊन हे काम पुरे करून ये. तू ब्रह्मा, विष्णू व महेश यांचे स्मरण करून तपश्चर्या करणारांनादेखील जिंकले आहेस. मग या सामान्य मानवांना जिंकणे तुला अशक्य नाही. रंभा आदि ज्या अप्सरा आहेत त्यांच्या पैकी एकीला बरोबर नेलेस तरी पुरेल. तरी देखील तू कित्येक अप्सरांना बरोबर घेऊन जा. त्यांच्या समोर किती घोर तपस्वी असला तरी त्याचा तपोभंग निश्चितच होईल."

कामदेव म्हणाला–"हे देवेन्द्र! मी तर तुझा सेवक दास आहे! तुझ्या आज्ञेचे

माझे निवेदन ऐकून घे. तू म्हणालास ते खरे आहे. मी ब्रह्मा, विष्णू व महेश यांचे स्मरण करून जे तपश्चर्या करतात त्यांचा तपोभंग करू शकेन. परंतु जे देवीची आराधना करून तपश्चर्या करीत आहेत त्यांचा तपोभंग करणे मला तरी शक्य नाही. कामबीज मंत्राचा जप करीत ध्यानमग्न असणाऱ्यांच्या वाटेला जाण्याचे साहस मी करणार नाही. नर व नारायण शक्तीचे उपासक आहेत. त्यांच्या जवळपास माझे पुष्पबाण पोंचणे शक्य नाही."

ते ऐकून इंद्र म्हणाला–"जर पुष्पबाणांचा उपयोग करणे तुला शक्य नसेल तर तू काहीतरी माया करून हे कार्य संपन्न कर. हे देवकार्य आहे व ते तू केलेच पाहिजेस."

त्यानंतर कामदेव निरुत्तर झाला. त्याने प्रथम वसंत ऋतुला बदरिकाश्रमात पाठविले. त्यानंतर तो स्वतः रंभावगैरे दासींना घेऊन निघाला.

वसंत ऋतुचा प्रवेश होताच बदरिकाश्रमातल्या वृक्षलतांना नवीन पालवी व फुले आली. सर्वत्र फुलांचा सुवास दरवळू लागला. पोपटांचे थवे या झाडावरून त्या झाडावर उडू लागले. भ्रमर गुंजारव करू लागले. कोकिळा बोलू लागली.



नर व नारायण शिशिर ऋतूत वसंत ऋतूचे ते आगमन पाहून चकित झाले. त्यांना शंका होऊ लागली की त्यांची तपश्चर्या भंग करण्यासाठी इंद्राने ही माया रचली असावी.

त्यांना शंका आली तसेच झाले. कामदेव रंभा, मेनका वगैरे सोळा हजार पन्नास अप्सरांना बरोबर घेऊन कोकिळा, पोपट इत्यादी पक्ष्यांसह आणि हातात धनुष्य व खांद्याला पुष्पबाणांचा भाता घेऊन त्यांच्या समोर येऊन उभा राहिला. नर व नारायण यांनी काही वेळ जप बंद केला व कामदेवाकडे आश्चर्यचकित होऊन काही वेळ पहात राहिले.



अप्सरांनी नर व नारायणांना प्रणाम केला व नृत्य गायन करू लागल्या. त्यांचे ते नृत्य पाहून व गायन ऐकून नर व नारायण थक्क झाले व म्हणाले–"आमची तपश्चर्या भंग करण्यासाठी इंद्राने तुम्हांला कामदेव व वसंत यांच्या बरोबर पाठविले आहे. त्याच्या मनांत भय व भीती उत्पन्न झालेली दिसते आहे. तरी आम्ही म्हणतो ते ऐका. तुम्ही बायका इतक्या दुरून आलात, दमल्या असाल. या बदरिकाश्रमात तुम्ही आमचे आतिथ्य ग्रहण करून विश्रांती घ्या. इंद्राच्या आज्ञेने तुम्हांला इकडे यावे लागले, नाहीतर तुम्ही स्वतः होऊन इकडे कशाला आलां असतां? इंद्राला भ्रम झाला आहे, नाहीतर तुमच्या करवी आमची तपश्चर्या भंग करविण्याचा विचार त्याच्या मनात आला नसता. आतां तुम्ही पहात रहा, तुमच्या सौंदर्याला लाजवतील अशा सुंदर स्त्रियांची सृष्टी आम्ही करतो."

असे सांगून नारायणाने आपली उजवी मांडी थोपटली. तत्काल ऊर्वशी आपल्या सखी बरोबर प्रगट झाली. तिचे सौंदर्य पाहून अप्सरा नर व नारायणांना म्हणाल्या–"आम्हांला क्षमा करा! तुमच्या तपोबलाची कल्पना नसल्यामुळे तुमचा तपोभंग करण्याच्या हेतूने आम्ही आलो होतो. या पूर्वी आम्ही अनेक तपस्वी मुनींची तपश्चर्या भंग केली. परंतु आज आम्ही तुमच्या समोर हात टेकले. आम्ही हे मानून मनाचे समाधान करून घेतो की इंद्राने आम्हांला इकडे पाठवून आमच्यावर उपकारच केले, नाही तर तुमचे दर्शन आम्हांला लाभले नसते."

नर व नारायण स्मित करून म्हणाले–"तुम्ही आता या ऊर्वशीला आपल्या बरोबर घेऊन चला व इंद्राला आम्ही ही भेट पाठविली आहे, असे त्याला सांगा. तुमचे कल्याण होवो, देव व देवेंद्राचे कल्याण होवो आतां तुम्ही स्वस्थ चित्ताने परत निघा!"

तेव्हां अप्सरा नम्रपणे म्हणाल्या–"महात्मन्! आम्हांला येथून जाण्याची आज्ञा करू नका. ऊर्वशी वगैरे ज्या सुंदर स्त्रियांची सृष्टी आपण केली आहे त्या इंद्राकडे जातील. आम्हांला तुमच्या सेवेत येथेच राहण्याची अनुमती द्या."

"तुम्हांला आमच्याकडून काय पाहिजे ते मागून घ्या." नारायण म्हणाला.

"आपल्या सारखे थोर पुरुष" दिलेले वचन भंग करीत नाहीत. आमची इच्छा काय हे विचारलेत तर आमची एकच विनंती आहे, आपण आमचे पती होण्याची कृपा करावी. आपण हे स्वीकार केले नाहीत तर आम्ही स्वतःला अनाथच मानू! आपल्या सान्निध्यात राहल्यावर आम्हांला स्वर्गाची सुद्धा गरज भासणार नाही!" अप्सरा म्हणाल्या.

तेव्हां नारायणाने विचारले–"थंडी, वारा व ऊन सहन करून आम्ही जे तप केले ते सर्व तुमच्या तारुण्यावर अर्पण करू म्हणता? ते बरोबर होईल का?"

"हे मुनिवर्य! आम्हां देवांगनांच्या सहवासात गंधमादन पर्वतावर सुखोपभोग करीत आयुष्य घालविण्यात जो आनंद आहे तो स्वर्गातही प्राप्त होणे शक्य आहे का?" अप्सरांनी विचारले.

ते ऐकल्यावर नारायणाला त्याची चूक लक्षात आली. अप्सरा गोड गोड बोलून आपली तपश्चर्या भंग करण्यासाठीच आल्या



आहेत. तेव्हां आपण मौनच रहायला हवे होते. परंतु आपला धर्म सोडून या अप्सरांहून सुंदर अप्सरेची सृष्टी करण्यातही आपण चूकच केली. त्यांच्याशी बोलण्यात आपण आपल्या मनाचा कमकुवतपणाच प्रकट केला व मोहपाशात व्यर्थच फसलो.

तेव्हां क्रुद्ध होऊन त्या अप्सरांना तेथून पळवून लावण्याचा विचार त्याच्या मनात आला. परंतु तसे करणे म्हणजे हिंसा होईल असा विचार करून तो गप्प राहिला.

त्याच्या मनातील द्विविधा ओळखून नर त्याला म्हणाला–"मित्रा! क्रोध करणे तर कोणत्याही व्यक्तीला उचित नाही



अहंकार केल्यानेच प्राचीन काळी आपले प्रल्हादाशी युद्ध झाले. तेव्हां तू शांतचित्तानेच या अप्सरांना निरोप दे!"

ते ऐकून नारायणाचे मन शांत झाले. तो म्हणाला–"अशा परिस्थितीत मी स्त्रियांबरोबर विहार करणे हे कल्पनेबाहेरच होईल. म्हणून तुम्ही तूर्त स्वर्गलोकी परत जा. माझे व्रत भंग न करण्याचा अनुग्रह तुम्ही केलात तर मी द्वापर युगात तुमच्या इच्छेप्रमाणे तुमची इच्छा पूर्ण करीन. देवांच्या इच्छेला मान देऊन मी द्वापर युगात जन्म घेईन. तुम्ही राजकन्या होऊन जन्म घ्या आणि मी तुमचा सर्वांचा पत्नी म्हणून स्वीकार करीन."

ते ऐकून सर्व अप्सरा ऊर्वशीला बरोबर घेऊन इंद्राकडे गेल्या व इंद्राला घडलेला वृत्तांत सांगितला.

ऊर्वशीचे सौंदर्य पाहून इंद्र चकित झाला व मनातल्या मनांत त्याने नर व नारायणाच्या शक्तिसामर्थ्याची वाखाणणी केली.

त्यानंतर नर व नारायण यांची तपश्चर्या निर्विघ्न चालू झाली.

बराच मोठा काळ लोटल्यावर नरनारायण दोघांनी भृगु ऋषींचा शाप लागल्याने कृष्णार्जुन होऊन द्वापर युगात अवतार धारण केला. कृष्णावतारापूर्वीची कथा अशी :

एकदां भूदेवीने इंद्राकडे जाऊन विनंती केली की तिला भूभार वहन करणे अशक्य झाले आहे. तेव्हां इंद्राने तिला तिच्या दु:खाचे कारण विचारले.

भूदेवी म्हणाली :

भूभार वाढण्याचे मुख्य कारण दुष्ट जरासंघ, शिशुपाल, कंस, रुक्मी, नरक, साल्व, केशी, धेनुक वत्सक इत्यादि आहेत. हे क्रूर व दुष्ट आहेत. ह्यांचे परस्परांशी वैर आहे आणि अधर्माचरण करीत आहेत. यांचा भार वहन करणे मला कठीण झाले आहे. प्राचीन काळी हिरण्याक्ष राक्षसाची पीडा दूर करून माझे रक्षण करण्यासाठी विष्णने वराह अवतार धारण केला होता.

तसाच या वेळी पृथ्वीचा भार हलका करण्यासाठी काही उपाय कर."

इंद्र म्हणाला–"तुझा भार हलका करण्याची शक्ती माझ्या अंगात नाही. तू ब्रह्मदेवाकडे जा. तो तुला काहीतरी उपाय सुचवील. मी सुद्धा तुझ्या बरोबर येतो. दोघे बरोबरच जाऊ."

त्यानंतर इंद्र भूदेवी बरोबर ब्रह्मदेवाकडे गेला. ब्रह्मदेवाने भूदेवीला येण्याचे कारण विचारले.

भूदेवी म्हणाली–"कलियुगाचा आरंभ लौकरच होणार आहे. राजे व भूपती आपला धर्म सोडून चोर व लुटेरे होऊ लागले आहेत. या दुष्टांचा भार मला कसा सहन होईल? या दुष्टांचा संहार करून माझा भार हलका करण्याची व्यवस्था कां करीत नाहीस?"

"भूदेवी तुझी इच्छा पुरी करण्याची शक्ती माझ्यात नाही. ती शक्ती फक्त विष्णूत आहे. तेव्हां चल, आपण विष्णूकडे जाऊ." असे तिला समजावून सांगून ब्रह्मदेव आपल्या हंसवाहनावर बसून भूदेवी व इंद्राबरोबर वैकुंठ लोकात गेला.

विष्णूने सर्वांना प्रेमपूर्वक येण्याचे कारण विचारले. ब्रह्मदेव म्हणाला–"भूदेवी म्हणते की तिला भूभार असह्य झाला आहे. म्हणून तू जर द्वापर युगाच्या शेवटी अवतार धारण केलास तर बरे होईल. अनाथांचे रक्षण करणे तुझ्या शिवाय इतर कोणाला शक्य आहे?"

तेव्हां विष्णू म्हणाला–"योगमायेसमोर तू, मी व शंकर आणि सर्व देव परतंत्र आहोत. म्हणून तिची जशी इच्छा व आज्ञा असेल तसे आपण करू या. तिच्या इच्छेनेच मी या पूर्वी अवतार धारण केले. नाहीतर मत्स्य, वराह व इतर प्राण्यांच्या रूपे अवतार धारण करण्यात काही सुख मिळते का? मी रामावतार घेऊन किती कष्ट सोसले, हे माझे मलाच ठाऊक. मला स्वतःची अशी इच्छा कोठे प्राप्त झाली? म्हणून तुम्ही त्या जगन्मातेची आराधना करा. तुमची इच्छा पूर्ण होईल." विष्णूने त्यांना सल्ला दिला.





# शेरास सव्वा शेर

बाबा सुताराला दोन मुलगे होते. मोठयाचे नाव शिवराम व धाकटयाचे गोविंद होते. शिवराम शहरात एका व्यापाऱ्याकडे हिशोब लिहिण्याचे काम करी. गोविंद बेताचा शिकलेला होता. म्हणून तो बापाला सुतारकामात मदत करी. बापाच्या हाताखाली त्याने सुतारकाम चांगले शिकून घेतले होते.

एकदा गोविंदा आपल्या मोठ्या भावाला भेटायला शहरात गेला असतां घरी बाबा सुतार हृदयाच्या विकाराने आजारी पडला. गोविंद परत येईपर्यंत आपण जगतो की मरतो याची शाश्वती बाबा सुताराला वाटेना. म्हणून शेजारच्या एका श्रीमंत व्यापाऱ्याकडे जाऊन त्याच्या हातात एक पैशाची थैली देत तो म्हणाला–"गोपू शेट! ही माझी आयुष्यभराची कमाई आहे. हे पाच हजार रुपये माझ्या दोघां मुलांना, ते माझी उत्तर क्रिया करायला येतील तेव्हां द्या. मी तुम्हांलाच मोठा मानून मुलांची जबाबदारी तुमच्यावर टाकीत आहे."

गोपूशेटने मान्य केले व पैशाची पिशवी घरात नेऊन ठेवली आणि परत येऊन पाहातो तर, बाबा सुताराने शेवटचा श्वास सोडला होता. लगेच शहरात राहणाऱ्या मुलांकडे बातमी पोचविण्यात आली. दोघां मुलांनी येऊन बापाची उत्तरक्रिया केली. त्यांना घरातल्या एका कपाटात बापाने लिहून ठेवलेली एक चिट्ठी मिळाली. गोपूशेटकडे जाण्यापूर्वी बाबा सुताराने चिट्ठी लिहून कपाटात ठेवली होती. चिट्ठीतला मजकूर असा–

"मी बरीच वाट पाहिली गोविंदा परतेल म्हणून. माझ्या जवळ जे पाच हजार होते ते मी गोपूशेटकडे ठेवले आहेत.



तुम्ही त्यांच्या सल्ल्याप्रमाणे त्या पैशाचा उपयोग करा. आळशासारखे बसून राहू नका, कामधंदा करून सुखाने रहा."

तुमचा बाबा!

बाबा सुताराच्या मुलांनी चिट्ठी नेऊन गोपूशेटला दाखविली. गोपूशेट त्याला काहीच माहीत नसल्यासारखा म्हणाला– "बिचाऱ्याने मरतेवेळी माझ्याकडे पैसे ठेवायचा विचार केला असावा! परंतु मला देण्यापूर्वीच धर्मराजाचे बोलावणे आले. घरात चांगलं शोधून पहा, सांधी कोपऱ्यात कोठेतरी ठेवले असतील."

गोपूशेटने लबाडी केली असल्याचा संशय दोघांनाही आला. कारण मरण आले त्यापूर्वी गोपूशेटला बाबा सुतारा भेटून गेल्याचे व दोघांचे काहीतरी महत्वाचे बोलणे झाल्याचे त्यांनी ऐकले व त्यांना हेही कळले की बाबा सुताराला मरण्यापूर्वीच गोपूशेट त्याच्या घरी पोचवायला गेला होता. गोपूशेटच्या हातात पैसे देण्यापूर्वीच बाबा सुताराने चिट्ठी लिहून ठेवली होती. परंतु मृत्यूपूर्वी त्याने पैसे दिले की नाही, या विषयी संशय करण्यासारखे कारण नव्हते. घरात इतकी मोठी रक्कम कोठेही दिसली नाही.

बाबा सुताराच्या मुलांनी गोपूशेटला चांगला धडा शिकवायचे ठरवून एक उपाय योजला. मात्र गोपूशेट म्हणाला त्यावर त्यांचा विश्वास बसला असल्याचे सोंग केले.

शिवराम गोपूशेटच्या घरी जाऊन म्हणाला–"आमच्या बाबांनी जातेवेळी आम्हांला तुमच्या हातात सोपविले. आतां तुमचाच आधार आहे आम्हांला. गोविंद सुतार काम करून गावातच रहायचे म्हणतो आहे. त्याला एकट्याला सोडून मला शहरात जावेसे वाटत नाही. मला येथेच निर्वाहाचा मार्ग काही तरी दाखवा."

"आमच्या घरचा जमाखर्च पुष्कळ लिहायचा असतो. माझ्याकडेच राहून काम कर. एवढी मदत मी नाही का करणार?" गोपूशेट म्हणाला.

शिवराम गोपूशेटच्या घरी कामाला लागला व त्याने घरच्या सर्व लोकांचा विश्वास संपादन केला. तो त्यांच्याच कुटुंबातला एक मानला जाऊ लागला. त्याला त्या घरातलीं बारीकसारीक सर्व माहीती मिळाली.

गोपूशेट आपले सर्व पैसे एका मोठ्या पेटीत ठेवीत असे. ती पेटी घरात सर्व हिंडत फिरत अशा-जागी ठेवलेली असे. त्यात जुने कपडे, कमी किमतीच्या वस्तू टाकून ठेवलेल्या असत. त्या शिवाय त्यात आणखी काही ठेवलेले नाही हे दाखविण्यासाठी त्या पेटीवर एक जुने कापड टाकलेले असे. परंतु घरात कोणाचा तरी डोळा सतत त्या पेटीवर असे.

तरी शिवरामने त्याला संधी मिळाल्यावर त्या पेटीची लांबी, रुंदी व उंची छान मापून टिपून ठेवली.

एके दिवशी रात्री गोपूशेटच्या घराच्या दाराची कडी कोणी जोराजोराने वाजविली. गोपूशेटला जाग आली व त्याने दार उघडले. बाहेर कोणीतरी राजकुमारासारखा उंची कपडे घालून उभा होता. त्याच्या पाठीमागे काळोखात आणखी काहीजण उभे होते.

त्या राजकुमाराने गोपूशेटला नमस्कार केला व म्हणाला–"या आसपासच्या प्रदेशात तुमच्यासारखा श्रीमंत माणूस कोणी





नसल्याचे ऐकतो. आम्ही शेजारच्या राज्याचे मालक, आमच्यावर एकाएकी एक मोठे संकट कोसळले. मी काही चीजवस्तु उचलून घेऊन निसटून आलो आहे. आमचं सर्व धन व दागदागिने या पेटीत आहेत. तुम्ही ही पेटी मेहरबानी करून आपल्याकडे ठेवून घेतलीत तर चांगले दिवस आल्यावर आम्ही ही परत घेऊन जाऊ. एवढी कृपा आपण केलीत तर आपले उपकार आयुष्यभर विसरणार नाही."

तोपर्यंत गोपूशेटने ती पेटी पाहिलीही नव्हती. ती बाहेरच्या ओटयावर ठेवलेली होती. बिछान्यावर एक मखमली कापड घातलेले होते, काळोखात दिसत नव्हते. गोपूशेटने ती पेटी आपल्या घरात ठेवायला मान्य केल्यावर राजकुमाराच्या माणसांनी ती घरात आणली व गोपूशेटने आपली पेटी बाजूला सरकवून राजकुमाराची पेटी ठेवायला जागा करून दिली.

राजकुमार निरोप घेऊन आपल्या लोकांसह निघून गेला. गोपूशेट आपल्या नशिबाची वाखाणणी करीत झोपला. या राजकुमाराला चांगले दिवस आले नाहीत तर आपल्याला आयुष्य भर या राजकुमाराच्या पेटीचा भरंवसा ठेवायला हरकत नाही, मनांतले मांडे खात गोपूशेट झोपले.

त्यानंतर काही वेळाने राजकुमाराच्या पेटीवरचे मखमली कापड सरकून खाली पडले. पेटीचे झांकण उघडले गेले. पेटीतून गोविंद बाहेर आला. त्याने पेटी बंद केली व गोपूशेटच्या पेटीवरचे जुने कापड तीवर टाकले आणि तो बाहेर निघाला होता त्या पेटीवरचे मखमली कापड गोपूशेटच्या पेटीवर टाकून काही आवाज केल्याशिवाय मागच्या दारानें निघून गेला.

गोपूशेट झोपेत असतां कोणीतरी पुन्हा दार वाजविले. गोपूशेट दचकून जागा झाला. आजूबाजूला काही सशस्त्र शिपाई उभे दिसले. गोपूशेट घाबरून उभा राहिला व म्हणाला– "कोण तुम्ही, आत कसे आलात?"

एक शिपाई करडचा आवाजात म्हणाला– "मी तुला विचारतो त्याचे उत्तर आधी दे. शेजारच्या राज्याचा राजकुमार काही वेळापूर्वी इकडे येऊन गेला होता का? त्याने दोन पेटचा तुमच्या घरात आणून ठेवल्या होत्या का? त्याला धरून आणायला नव्या राजाचा हुकूम आहे."

गोपूशेट थरथर कापू लागला.

"तो राजा लगेच निघून गेला. आमच्या घरात एक पेटी ठेवून गेला. त्या पेटीत काय आहे, मला माहीत नाही. पाहिजे तर ती पेटी घेऊन जा." गोपूशेट म्हणाला. शिपायांनी आजूबाजूला ठेवलेल्या दोन पेटचा पाहून विचारले–"या दोन्ही त्याच्याच ना?"

जुने कापड घातलेली पेटी त्याची स्वतःची असून मखमली कापड घातलेली राजकुमाराची असल्याचे गोपूशेटने सांगितले. म्हणून "बरं तर, तू सरळ माणसासारखा बोलतो आहेस म्हणून तुझ्या शब्दावर विश्वास करून ही एकच पेटी घेऊन जातो." असे सांगून शिपाई मखमल घातलेली पेटी उचलून घेऊन गेले.

त्या पेटीतच गोपूशेटचा सर्व पैका होता.

बऱ्याच वेळानंतर जिवातजीव आल्यासारखा गोपूशेट उठला आणि मोठे संकट टळले असे मनाशी म्हणत ते जुने कापड पेटीवरून काढले. झांकण उघडून पाहिले तर आत काय होते? रिकामी पेटी होती.

उजाडे पर्यंत सर्वस्व लुटले गेल्याबद्दल गोपूशेट व घरातली माणसं रडत राहिली. उजाडल्यावर नेहमीप्रमाणे शिवराम आला व घडलेले वृत्त ऐकून म्हणाला–"आतां तुमच्या घरचा हिशोब काय पहायचा? होते नव्हते ते तर गेले!" असे म्हणत डोळे पुशीत निघून गेला.

काही दिवसांनी बाबा सुताराने ठेवलेले पैसे मुलांना परत मिळाल्याची गोष्ट गावात पसरली. गोपूशेट काय बोलणार? दोघां भावांनी मिळून व्यापार सुरू केला व पुढील आयुष्य सुखाने घालविले.












# प्रश्नोत्तरे

**सी. शेषन्ना, रायचूर (कर्नाटक)**

प्र.: उन्हाळयात काही अंतरावर पाहिले तर गॅसस्टोव्ह जळतांना दिसते तसे भासते. तसं ते फक्त उन्हाळयातच कां दिसते?

उ.: उन्हाळयात जमीन फार तापलेली असल्यामुळे जमिनीलगतची हवा तापून हलकी होते व वर जाते. तितकी न तापलेली वरची हवा जड असल्याने खाली उतरते. या दोन्ही परस्परांसमोर येऊन मिसळतात तेव्हां त्यांच्या मधून जी प्रकाशाची किरणे जातात त्यांचा प्रसार थोडयाफार फरकाने होतो. म्हणून दुरून दिसणाऱ्या वस्तू हालल्यासारख्या भासतात. जळत्या स्टोव्हवर तसे दिसण्याचे कारण सुद्धा तेच. थंड हवेतून येणारी ज्योतिकिरणे उष्ण हवेत प्रवेश केल्याबरोबर एकीकरण होते.

**सी. एच. सुधा, नेल्लूर (आंध्र)**

प्र.: झोप म्हणजे काय? डोळे मिटले तरच का झोप येते?

उ.: आपल्या मेंदूच्या पापुद्रयावर अनेक ज्ञानकेंद्रे असतात. आपण जागे असताना बाहेरच्या वातावरणात जो बदल होत राहातो—दृश्यांत, आवाजांत वगैरे मध्ये—त्यामुळे ते ज्ञानबिंदू स्पंदित होतात. मेंदूतील या वरच्या थरांना विश्रांती मिळाल्याखेरीज आपल्याला झोप येत नाही. म्हणून डोळे मिटल्याशिवाय झोप येत नाही.

**पी. व्ही. सुंदरकुमार, ब्रह्मपूर (ओरिसा)**

प्र.: 'फॅन' (विजेचा पंखा) फिरत नसतांना त्याच्या पंखांमागच्या वस्तू आपल्याला दिसत नाहीत. परंतु विजेचा पंखा फिरू लागला म्हणजे मात्र त्या वस्तू स्पष्ट दिसतात त्याचे कारण काय?

उ.: पंखा फिरत असतांना त्याच्या पंखापंखामध्ये जी रिकामी जागा असते तिच्यामुळे मागच्या वस्तू दिसतात. एकदा दिसलेली वस्तू किंवा पदार्थ एका सेकंदाच्या दहापट काळ डोळयातून नाहीसा होत नाही. तेवढया अवधीत पंखा पुढे सरकतो. म्हणून आपल्याला पंख्यापलीकडच्या वस्तू दिसतात. याचे याहून चांगले उदाहरण म्हणजे आपण वाचीत असतां किंवा काही दृश्य पहात असतां



# अघटित अनपेक्षित

[७५]

## पुनर्जीवित सिंह

चार ब्राह्मण मित्र होते. त्यांपैकी तिघे सर्वशास्त्रसंपन्न विद्वान होते, परंतु त्यांना लोकज्ञान तिळमात्रही नव्हते. चवथ्याला कोणतेही शास्त्र येत नव्हते. लोकज्ञान मात्र खूप होते.

एकदां चौघे एका जागी बसून विचार करू लागले. "आपण सर्व शास्त्रांचा एवढा अभ्यास केला, पण काय उपयोग? आपण देशाटन करून राजदरबारात आपल्या विद्येचे प्रदर्शन करून खूप पैसे मिळवू या." असा विचार करून ते देशाटनाला निघाले.

ते थोडे अंतर चालून गेल्यावर त्यांच्या पैकी एक जण म्हणाला—"आपल्या पैकी एकाला लोकज्ञान पुष्कळ आहे, परंतु शास्त्रज्ञान थोडे देखील नाही. पांडित्य नसेल तर केवळ लोकज्ञान असल्याबद्दल कोणता राजा खूष होईल? बक्षिस पारितोषिक कायते आपल्यालाच मिळणार. त्यातला वाटा याला नाही मिळणार. याला आपण परत पाठवू या."

दुसरा म्हणाला—"आपल्या पैकी एकाला घरी पाठविणे, हे नाही बरोबर. आपण सर्व लहानपणापासून एकत्र खेळलो, वाढलो आणि आतां त्याला एकट्याला बाजूला सारणे अन्याय होईल."

इतरांनी ते मान्य केले आणि चारही मित्रांनी पुढला प्रवास सुरू केला.

काही दिवस चालत राहल्यावर त्यांना एक मोठे अरण्य लागले. तेथे त्यांना सिंहाची हाडे पडलेली दिसली. ती पाहून शास्त्रज्ञ म्हणाला—"आपण आपापल्या शास्त्रज्ञानाचे प्रत्यक्ष प्रदर्शन करायला चांगली संधी मिळाली आहे. मी सर्व हाडे



जुळवून सिंहाच्या हाडांचा पूर्ण सांपळा तैयार करतो.

दुसरा म्हणाला–"मी त्याच्यावर मांस, रक्त, ज्ञानतंतू लावून कातडे बसवितो."

"मी त्याच्या अंगात प्राण ओतून त्याला पुनर्जीवित करीन." तिसरा म्हणाला.

म्हटल्याप्रमाणे पहिल्याने सिंहाच्या हाडांचा सांपळा उभा केला. दुसऱ्याने त्याच्यावर रक्तमांस चढवून कातडे बसविले व तिसरा प्राण ओतायला तयार होताच केवळ लोकज्ञान असलेला चवथा म्हणाला–"हा आहे सिंह! याच्यात प्राण ओतल्याबरोबर हा आपणां सर्वांना खाऊन टाकील की? म्हणून प्राण ओतण्याचा प्रयत्न करू नकोस."

तिसरा म्हणाला–"तू आहेस मूर्ख! दोघांनी आपल्या ज्ञानाचे प्रदर्शन केल्यावर मी स्वस्थ बसू म्हणतोस का?"

चवथा म्हणाला–"माझी ना नाही. तुला काय वाटेल ते कर, परंतु त्या पूर्वी मी झाडावर चढून बसतो!"

त्यानंतर तिसऱ्याने सिंहाच्या अंगात प्राण ओतलं. पुनर्जीवित होताच सिंह गरजला व त्याने तिघांना खाऊन टाकले. सिंह तेथून निघून गेल्यावर लोकज्ञानी झाडावरून उतरला व निर्विघ्नपणे घरी परतला.

अतिलोभीने अत्यंतलोभीला ही गोष्ट सांगितली व म्हणाला–"एक कमळ असले तर तळ्याला कोणी पुष्करणी म्हणत नाही. तसेच फक्त एका गोष्टीवरून नीतिबोध होत नाही. अशा अनेक गोष्टी आहेत." असे सांगून त्याने आणखी एक गोष्ट सांगायला सुरवात केली.

**पढतमूर्ख**

फार पूर्वी उज्जयिनी येथे चौघे ब्राह्मण मुलगे परस्परांचे जीवश्च कंठश्च मित्र होते. त्यांनी कोठल्या तरी मोठ्या गुरुकुलात शिकायचे ठरविले आणि कन्याकुब्ज येथे जाऊन तेथे एका सुप्रसिद्ध गुरूच्या घरी जाऊन त्याच्याजवळ बारा वर्षे अध्ययन केले.

विद्याभ्यास पुरा झाल्यावर त्यांनी गुरूचा निरोप घेतला आणि सर्व ग्रंथ बरोबर घेऊन उज्जयिनीला जाण्यासाठी निघाले. नवे देश पाहतां येतील या विचाराने ते नव्या वाटेने चालू लागले. आपण एवढा अभ्यास केला आहे, एखादा कठीण प्रसंग आलाच तर त्याला तोंड द्यायला आपल्या जवळ भरपूर ज्ञान आहे असा त्यांच्या मनात आत्मविश्वास होता.

ते काही अंतर चालून गेले. तेथे वाट दोन दिशांना फुटलेली होती. पुढे कोणत्या वाटेने जावे हा प्रश्न उभा राहिला. तेव्हां त्यांच्या पैकी एक जण म्हणाला–

"कोणत्या वाटेने जावे हा प्रश्न उभा राहिला तर मी वाचलेल्या पुस्तकात असे सांगितले आहे की शिकलेल्या सवरलेल्या माणसाला त्याचे काय कर्तव्य आहे हे त्याला आत्मस्फूर्तीनेच कळते. त्याने कोणाला विचारण्याची गरजच नसते. मूर्ख अशिक्षित माणसे इतरांना विचारीत बसतात व इतरांच्या मदतीनेच आपली कामे पुरी करतात. म्हणून आपण कोणाला विचारण्याची गरजच नाही. आपण ठरवू या कोठल्या वाटेने जायचे ते." दोन्ही रस्ते जेथून फुटत होते तेथे



चौघे जण बसले व आपापले ग्रंथ उघडून पाहू लागले. तेवढ्यात दोन्ही पैकी एका वाटेने चार जण एक मढे नेत असलेले व त्यांच्या बरोबर आणखी काही लोक जात असलेले दिसले.

लगेच एक जण म्हणाला–"प्रश्न सुटला! चार चौघे जातात त्या वाटेने जावे असे माझ्या ग्रंथात लिहिले आहे. तेव्हां हे लोक जात आहेत त्या वाटेने जाऊ या.

प्रश्न इतका सहजी सुटल्याबद्दल सर्वांना आनंद झाला. ते प्रेतामागून चालू लागले. आणि थोड्याच वेळात स्मशानात पोचले. ती वाट तेथेच संपत होती.

हे चौघे विद्वान चितेपासून थोड्या अंतरावर उभे राहून विचार करू लागले की पुढे काय करायचे? त्यांना तेथे गाढव उभे असलेले दिसले.

एक जण म्हणाला–"यात काही तरी अर्थ असला पाहिजे. नाहीतर हे गाढव आपल्या बरोबर येथे उभे कां बरे राहिले असते?"

लगेच आणखी एकाने आपला ग्रंथ उघडून वाचून पाहिले व म्हणाला– "कळलं! हे गाढव आपला मित्र आहे! 'राज द्वारे, स्मशानेच यस्तिष्ठति स बांधव:' असं माझ्या ग्रंथात लिहिले आहे. तेव्हां आपण प्रेमाने याच्याशी बोलले पाहिजे."

एकाने चटदिशी उठून गाढवाच्या गळ्याला प्रेमाने कवटाळले. दुसरा त्या गाढवाचे मुके घेऊ लागला. आणखी एक त्या गाढवाचे पाय धुवू लागला. चवथा कित्येक दिवसांनी मित्र भेटला म्हणून आनंदाश्रू ढाळू लागला.

[illegible] अंत्यसंस्कार करा-यला आलेले शोकग्रस्त लोकही हंसू लागले.

इतक्यात एक उंट मालकाची नजर चुकवून तेथे पळून आला. "याचा अर्थ काय बरे असावा?" एका विद्वानाने विचारले.

'धर्मस्य त्वरिता गति:' असे माझ्या ग्रंथात लिहिले आहे. पळत धावत हा आला आहे, तेव्हां हा धर्म असला पाहिजे." असा आणखी एक विद्वान म्हणाला.

तिसरा विद्वान म्हणाला–"'इष्टं धर्मेण योजयेत' असे माझ्या ग्रंथात लिहिले आहे. म्हणजे आपल्यावर काही संकट आले तर त्याचा संबंध धर्माशी जोडावा. म्हणून आपण या गाढवाला व उंटाला परस्परांशी बांधून ठेवू या."

चौघांनी मिळून खूप प्रयत्न करून उंटाला व गाढवाला परस्परांशी बांधले. तेव्हां त्यांना गाढवाच्या खूप लाथा खाव्या लागल्या. स्मशानातले लोक स्वत:ला आवरू शकले नाहीत व हसू लागले.





# भल्लूक मांत्रिक

[ १५ ]

[कालीवर्मा आपल्या अनुयायांसह किल्ल्यात शिरला. मायावी मर्कटाने त्यांना एक मुंडके दाखवून ते दुर्मुखाचे असल्याचे सांगितले. परंतु ते त्याचे नसल्याचे ओळखून ते त्याच्या शोधार्थ फिरत असतां सभामंडपातल्या सिंहासनावर तो बसलेला त्यांना दिसला. लगेच चांडाळ भल्लूकाने हत्तीवरून मंडपात उडी मारली. पुढे–]

चांडाळ भल्लूकाला सभामंडपात उडी मारतांना पाहून कालीवर्माने पुढला धोका ओळखला व रानटी सेवकाला हाक मारून म्हणाला–"अरे, पळ आणि भल्लूकाला राजा दुर्मुखाचे डोके उडवू देऊ नकोस." नंतर लगेच मोठ्याने ओरडून म्हणाला–"अरे भल्लूका! थांब, मी येतो आहे, राजाला ठार करू नकोस." असे म्हणत सभामंडपाच्या पायऱ्या झपझप चढून जाऊ लागला.

कालीवर्माने सावध केल्याबरोबर रानटी शिकारी हत्तीवरून उडी मारून पळत गेला आणि चांडाळ भल्लूकाच्या व दुर्मुखाच्या मध्ये आडवा उभा राहून म्हणाला– "भल्लूक मालक! घाई करू नका. कालीवर्मा मालकांनी राजाचे डोके कापू नका असे सांगितले आहे."

चांडाळ भल्लूक चकित होऊन म्हणाला– "भल्लूक मांत्रिकांनी, ज्या राजाने त्यांचा



अपमान केला होता, त्याचे डोके कापून आणायला सांगितले होते ना? त्यांच्या आज्ञेचे पालन केले नाही तर मला पुन्हां पूर्ण अस्वल करून टाकतील की?"

तितक्यात तेथे कालीवर्मा आला व राजा दुर्मुखाला हालल्याडुलल्याशिवाय निश्चळ सिंहासनावर बसलेला पाहून चकित झाला व म्हणाला—"याला झाले आहे तरी काय? डोळे मिटून बसला आहे, जिवंत आहे की मेला? आहे तरी काय?"

चांडाळ भल्लूक आपला परशू खांद्यावर ठेवून म्हणाला—"कालीवर्मा मालक, आपली काय आज्ञा आहे? आज डोके कापू नको म्हणता?"

कालीवर्मा दुर्मुख राजाच्याजवळ जाऊन म्हणाला—"भल्लूका! अरे तू डोके कापायच्या आधीच हा दुर्मुख गतप्राण झाल्यासारखा दिसतो आहे. काय बरे झाले असेल? मला वाटते, तू परशु घेऊन येत होतास, ते पाहूनच त्या भीतीने याची हृदयक्रिया थांबली की काय?"

"चांडाळ भल्लूकाने दुर्मुखाचे डोके तर कापलेले नाही ना?" असे म्हणत भल्लूक मांत्रिक तेथे आला आणि सिंहासनावर हालल्या डुलल्याशिवाय स्वस्थ बसलेल्या दुर्मुखाला पाहून म्हणाला—"बहुतेक हा जिवंत असावा, आतां जीव जाणार या भीतीने मूर्छित झालेला असावा." असे म्हणत तलवार दुर्मुखाच्या खांद्याला लावीत म्हणाला.

"दुर्मुखा! शुद्धीवर ये. तुझ्या जिवाला कसलेच भय नाही!"

लगेच दुर्मुखाने डोळे उघडले आणि हाताने डोके धडावरच आहे ना, हे पाहून व मनाची खात्री झाल्यासारखा म्हणाला—"तरमग माझे डोके अजून धडावरच आहे तर! चांडाळ भल्लूकाच्या परशूने ते उडविलें गेले नसून अजून जागेवर आहे आणि जमिनीवर लोळू लागलं नाही, म्हणावयाचे! हा..."

ते ऐकून सर्व मोठ्याने हसू लागले. दुर्मुख घाबरून जाऊन सिंहासनावरून उडी मारून खाली आला व म्हणाला—"ओ...हो! कालीवर्मा, भल्लूक मांत्रिक वगैरे सर्व येथेच आहेत तर? पुन्हां एकदां सिंहासनावर बसण्याची माझ्या मनाची इच्छा पुरी झाली. आतां माझे डोके उडविलें गेले तरी मला फिकीर नाही."

कालीवर्मा दुर्मुखाचे दोन्ही खांदे धरून त्याला सिंहासनावर बसवीत म्हणाला—"राजा दुर्मुखा! तू आतां आमचा मित्र झाला आहेस रे. झालं गेलं सर्व विसरून जा. तुझा किल्ला बळकावणारा सामंत सूर्यभूपती आणि माझे गुरु भल्लूक मांत्रिक यांचा मंत्रदंड चोरून नेणारा तो मायावी मर्कट हे दोघे एक झाले आहेत. आपण आता सर्व जण मिळून त्या दोघांना हुडकून काढून कैद केले पाहिजे."

कालीवर्मा म्हणाला ते ऐकून दुर्मुखाला परमानंद झाला व तो सिंहासनावरून उतरून वेगाने सभामंडपात आला आणि तलवार उपसून मोठ्याने ओरडून म्हणाला—"अरे, सर्वजण, किल्लयात जे कोणी असतील, सैनिक हो, ऐका! उदयगिरीचा राजा मी हुकूम देतो आहे, माझे स्वामिभक्त असे जे कोणी असतील त्यांनी तावडतोब इकडे समोर यावे. तसे जे येणार नाहीत त्यांना मी राजद्रोही ठरवून त्यांचा शिरच्छेद करवीन."



चांडाळ भल्लूक सभामंडपाच्या कठड्यावर उभा राहून आपला परशू आकाशात फिरवीत मोठ्याने ओरडून म्हणाला—"किल्लयात कानाकोपऱ्यात लपून बसलेल्या सैनिकांनो, राजा दुर्मुखाची आज्ञा ऐकलीत का? सर्वांनी इकडे येऊन हजर व्हावे."

ती आरोळी ऐकल्याबरोबर किल्लयात चहूकडे लपलेले सैनिक धावत सभामंडपाकडे येऊ लागले. पांच दहा मिनिटांनी कालीवर्माने जमा झालेल्यांची संख्या मोजून पाहिली व राजा दुर्मुखाकडे वळून म्हणाला—"काय रे दुर्मुखा! तुझे सैनिक सर्व मिळून पन्नासावर दिसत नाहीत. उदयगिरीच्या राजाचे हेच का ते मोठे सैन्य?"



राजा दुर्मुख अपमान झाल्यासारखा मान खाली करून म्हणाला–"कालीवर्मा! माझ्या सर्व सैनिकांना लांच देऊन त्या सामंत भूपतीनें आपल्याकडे वळवून घेतले आहे. प्रथम आपण त्या राजद्रोही बंडखोरालाच धरले पाहिजे."

कालीवर्मा भल्लूक मांत्रिकाकडे वळून म्हणाला–"गुरुवर्य, आपली काय आज्ञा आहे?"

भल्लूक मांत्रिक मंडपाच्या कठड्याला टेकून उभा राहून किल्ल्याच्या भिंतीकडे पहात होता. मंत्रदंड गेल्याबद्दल फार वाईट वाटत होते. शिवाय त्या कठीण परिस्थितीत तो किल्ला सोडून जायचं ठरविलं तर राजा दुर्मुख आणखी जास्त संकटात सापडण्याची शक्यता आहे. आणखी त्याला असेही वाटलं की त्याचे गुरु भल्लूकपाद यांच्याकडे आपण जाऊ असे सुचविले तर आपल्यावर गुरुभक्ती दर्शविणारा कालीवर्मा सुद्धा कदाचित त्या गोष्टीस नकार देईल...

भल्लूक मांत्रिक अशा विचित्र मनःस्थितीत कालीवर्माला म्हणाला–"काली, माझ्या शिष्या! माझा हुकूम काय तो तूर्त राहू दे. तुला काय करणे बरोबर होईल, हे तूच सांग!"

ते ऐकून कालीवर्मा आश्चर्यचकित होऊन म्हणाला–"हा काय प्रश्न करतां आहां? एकदां आपण मला आपले गुरु भल्लूकपाद राहतात त्या पर्वताकडे घेऊन जातो असे म्हणाला होतां. ती गोष्ट विसरलात का?"

तो प्रश्न ऐकून भल्लूक मांत्रिकाला आनंद झाला. म्हणाला–"काली, माझ्या शिष्यवर्या! तुझी गुरुभक्ति पाहून मी तुझी पाठ थोपटतो. माझे गुरु भल्लूकपाद हे एका तांत्रिकामुळे संकटात सापडले आहेत. त्यांना तुझ्यासारख्या शूर साहसी व्यक्तीची गरज आहे. ती मदत दिल्याबद्दल तुला काय हवे, सांग!"

कालीवर्मा क्षणभरच विचारात पडला. नंतर म्हणाला–"मला काय हवे आहे ते नंतर पाहू. राजा जितकेतून मला शिरच्छेदाची शिक्षा करायचे ठरवून शिरीषवनात पाठविले. त्यावेळी आपण माझ्या मदतीला धावलात. आणि मी आपल्याला वाटेल ती मदत द्यायचे मान्य केले. तेव्हां आतां काय करायचे ते आपणच सांगावे."

"तसं असेल तर तू माझ्याबरोबर ब्रह्मपुत्रा नदी उगम पावते त्या प्रदेशात चल. माझे गुरुवर्य भल्लूकपाद राहतात त्या पर्वतीय प्रदेशात आले पाहिजेस!" भल्लूक मांत्रिक म्हणाला.

"ठीक, चला तर!" असे म्हणत कालीवर्मा निघायला तयार झाला.

राजा दुर्मुख थरथर कापत म्हणाला–"मांत्रिक प्रभू! आपण मला विसरलात का? आपल्या या छोटेखानी सैन्याच्या मदतीने मला आपले राज्य परत जिंकणे अशक्य आहे. म्हणून मीसुद्धा आपल्या बरोबर येतो."

भल्लूक मांत्रिक काही बोलणार इतक्यात चांडाळ भल्लूक आपली कुऱ्हाड जमिनीवर आपटीत रडक्या आवाजात म्हणाला–"आणि मी मालक? तुम्ही सर्व इकडून निघून गेल्यावर माझे जुने मालक जितकेतू महाराज, मी त्यांची आज्ञा मोडल्याबद्दल जंगली जनावरासारखी माझी शिकार करतील की! म्हणून मला सुद्धा बरोबर घेऊन चला."



भल्लूक मांत्रिकाने चांडाळ भल्लूकाच्या खांद्यावर हात ठेवून म्हटले–"भल्लूका, तू घाबरू नकोस. मी तुला व राजा दुर्मुखाला विसरून गेलो असे समजू नकोस. मी तुमचे दोघांच्या हिताचे जे असेल ते करून नंतरच हा प्रांत सोडून जाणार आहे. चंद्रशिला नगरीचा राजा जितकेतू याने कालीवर्माबरोबर माझा अपमान केला आहे. म्हणून आपण प्रथम तिकडे जावयाचे आहे व त्या राजाचा समाचार घेऊन पुढे काय ते करावयाचे आहे."

"त्या घमेंडखोर राजाचा मंत्री जीवगुप्त काही सैनिकांना बरोबर घेऊन किल्ल्याबाहेर वेढा दिल्यासारखा पाहारा देतो आहे.



त्याला अकस्मात् आपल्यावर हल्ला करता येऊ नये म्हणून त्याला आडवा उभा आहे तो उग्रदंड राक्षस. नंतर हा सामंत भूपती आणि मायावी मर्कट किल्ल्यात कोठे दडी मारून बसले आहेत नकळे!" कालीवर्मा म्हणाला.

कालीवर्मा ते म्हणतांच चांडाळ भल्लूक खांद्यावर आपला परशू ठेवून म्हणाला—"कालीवर्मा मालक, मी पहिल्याने हत्तीवर बसून किल्ल्याबाहेर जाऊन परिस्थिती कशी आहे, पाहून येतो. उग्रदंड राक्षसाच्या मदतीला मला आलेला पाहून तो मंत्री व सैनिक चंद्रशिला नगराकडे कदाचित् पळून-ही जातील."

"बरे तर तू जा. आम्ही त्या सामंताला आणि त्या मायावी मर्कटाला, या किल्ल्यातच ते कोठे आहेत का पाहातो आणि तुझ्या पाठोपाठ येतो." कालीवर्मा म्हणाला.

लगेच चांडाळ भल्लूकाने रानटी सेवकाला हाक मारून हत्तीला सभामंडपाजवळ आणायला खूण केली.

रानटी सेवकाने हत्तीला सभामंडपाजवळ आणून उभा केल्यावर चांडाळ भल्लूक त्याच्यावर चढला. तोपर्यंत ते सर्व निमूटपणे पहात व ऐकत शेजारी उभा असलेला दुर्मुख राजा म्हणाला—"मांत्रिक प्रभो! मी या थोड्याशा सैनिकांसह या किल्ल्यात राहणे धोक्याचे आहे. मीसुद्धां तुमच्या-बरोबर चंद्रशिला नगरीला येतो."

"मी तरी तुला तेच सांगणार होतो. तुझ्या फक्त चाळीस एक सैनिकांना बरोबर नेऊन तू एक नवीन राज्य जिंकायला निघाला आहेस, समजले का तुला?" भल्लूक मांत्रिक म्हणाला.

नंतर सर्व सभामंडपांतून खाली उतरून आले व सामंत राजा आणि मायावी मर्कट दोघांच्या शोधार्थ ते सैनिकांना आज्ञा करणार इतक्यात किल्ल्याच्या भिंतीवर उभे राहून राजा दुर्मुखाचे अंगरक्षक जोराने ओरडून म्हणाले—"महाराज, आपला सामंत राजा आणि मायावी मर्कट दोघे जितकेतू राजाच्या [illegible] किल्ल्याबाहेर उभे आहेत. ते राक्षसाजवळ काहीतरी बोलत आहेत."

"तसे होणार असा एक संशय माझ्या मनात आल्याशिवाय राहिला नाही. आपण किल्ल्याच्या जळून गेलेल्या फाटकावर जरूर तेवढा पाहारा ठेवला पाहिजे. बहुतेक त्या दोघा दुष्टांचा प्रयत्न उग्रदंडाला त्यांच्या बाजूने वळवून घेण्याचा प्रयत्न चालू असणार." कालीवर्मा म्हणाला.

"काली, त्या प्रयत्नात त्यांना मुळीच यश मिळणार नाही. कारण त्या राक्षसाला माझ्या मदतीची कशासाठी तरी गरज आहे. तरमग चला, आपण निघू या." भल्लूक मांत्रिक म्हणाला.

कालीवर्माला वाटले होते तसा जितकेतू राजाचा मंत्री जीवगुप्त उग्रदंड राक्षसाला मोठमोठी प्रलोभने दाखवीत होता आणि त्याला आपल्या बाजूला वळवून घेण्याची खटपट करीत होता. मायावी मर्कटाच्या रूपात असलेला भ्रांतिमती त्या प्रयत्नाला दुजोरा देत होता.

उग्रदंड राक्षस आपली दगडी गदा उगारून त्यांना दरडावून सांगत होता—"मला तुमच्यापैकी कोणाच्या मदतीची गरज नाही. भल्लूकपाद पर्वतावर माझा एक नातेवाईक राहतो. त्याला बंदीमुक्त करावयाचे आहे मला."



ते ऐकून मायावी मर्कट दात काढून हंसत थट्टा उडवीत ओरडून म्हणाला—"तो नातेवाईक कोण, तुझा भाऊच नाही का? आतां बंदीमुक्तच काय, जीवनमुक्त झाला आहे! माझे गुरु तांत्रिक मिथ्या मिश्र यांनी त्याला केव्हांच जमिनीत गाडून पुरून टाकले आहे. तू शहाणपणाने जितकेतू महाराजांच्या आश्रयाला राहून पुढील आयुष्य सुखाने घालव."

"माझ्या मोठ्या भावाला त्या तांत्रिकाने खरोखरच ठार केले आहे का? की तू खोटे बोलतो आहेस?" असे म्हणत उग्रदंड राक्षस दांत ओठ चावू लागला.

मायावी मर्कट त्याला काही उत्तर देणार इतक्यात मंत्री जीवगुप्त त्याला अडवून म्हणाला—"उग्रदंडा! जुन्या गोष्टी सर्व विसर! आमच्या राज्यात कोणी एक राक्षस राहतो आहे, या गोष्टीचा आमच्या महाराजांना फार मोठा अभिमान वाटेल. तू आपले पुढील आयुष्य यासाठीच आमच्या महाराजांच्या आश्रयाला राहून सुखाने काढ."

"म्हणजे, माझ्याकडून कोणत्याही मदतीच्या अपेक्षा ठेवल्याशिवाय तुमचे महाराज माझा सर्व आतिथ्य सत्कार करणार म्हणतोस?" उग्रदंड राक्षसाने विचारले.

"तुझ्या एकाच एका मदतीची अपेक्षा आहे. आम्ही आतां किल्लयात शिरण्याच्या विचारात आहो. तेथे भल्लूक मांत्रिकाला, आमचा पळून गेलेला एक आरोपी कालीवर्मा याला आणि राजा दुर्मुखाला ठार करून त्यांच्या ठिकऱ्या उडवायला आम्हांला तू मदत कर, म्हणजे झाले!" मंत्री जीवगुप्त म्हणाला.

उग्रदंड काही उत्तर देणार इतक्यात किल्लयातून रेड्यावर बसून भल्लूक मांत्रिक व त्याच्याबरोबर इतर सर्व एकदम बाहेर आले. त्यांना पाहून भयकंपित झालेला मंत्री किंकर्तव्य विमूढ होऊन जागच्या जागी उभा राहिला. त्याने बाजूला घोड्यावर उभे असलेल्या सामंताकडे व मायावी मर्कटाकडे पाहिले.

उग्रदंड राक्षस फक्त एकदांच जोराने हुंकार करीत म्हणाला—"मंत्र्या! तुला व तुझ्याबरोबरच्या या सर्व दुष्टांना मी ही पहा, कोणती मदत करावी म्हणत आहे ते!" असे म्हणत त्याने दगडी गदा हाताजवळच असलेल्या मायावी मर्कटाच्या टाळक्यात मारायला म्हणून नेम धरून फेकली.

मायावी मर्कटाने वार चुकविण्यासाठी विद्युत वेगाने घोड्याच्या पाठीवरून उडी मारली आणि तो बसला होता त्या घोड्याच्या डोक्यात उग्रदंडाची गदा आदळली. (क्रमशः)





# फसवणूक

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तू स्वतःचे हिताहित न ओळखून वागतो आहेस, असे मला वाटते आहे. काही जणांना अनपेक्षितपणे प्रारब्ध अनुकूल झाल्यासारखे होते, परंतु ते ओळखू न शकल्यामुळे ते नशिबाला पाठ दाखवितात. त्याचे उदाहरण म्हणून तुला मी एक गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

मालव देशाचा युवराज कल्याणवर्मा याचा वीरवर्मा नावाचा एक जीवश्च कंठश्च मित्र होता. तसा वीरवर्मा हा मालव राज्याच्या दरबारातल्या एका अधिकाऱ्याचा मुलगाच होता. तरी कल्याणवर्मा



भेदभाव न मानता मित्रत्वाच्या नात्याने त्याच्याशी वागे. त्यांचे पूर्वजन्मीचे काही तरी नाते असावे, असे सर्वांना वाटे.

एकदा वीरवर्मा शिकारीला गेला असतां भटकून निर्जन स्थानी गेला. तेथे त्याला आकस्मिकपणे एका स्त्रीचा आर्तनाद ऐकू आला. त्याने आपला घोडा त्या बाजूला वळविला. त्याला एक स्त्री असाह्य अवस्थेत एका घोड्यावर बसलेली दिसली. घोडा बिथरलेला होता व मागच्या पायांवर उभा राहून तिला पाडण्याच्या बेतात होता.

वीरवर्माने आपला घोडा त्या बिथरलेल्या घोड्यासमोर नेला आणि त्याचा लगाम धरून त्याला पुढच्या पायावर उभे करण्यासाठी त्याला ओढले आणि त्याला मानेवर थोपटून त्याला धीर दिला.

घोड्यावर बसलेली स्त्री घोड्यापेक्षांही जास्त भ्यालेली दिसली. तिने, ती त्या अरण्यापलीकडच्या उदयपूरची राजकन्या स्वर्णकेशी असल्याचे व वनविहारासाठी आली असल्याचे सांगून तिच्या बरोबरचे लोक कोठेतरी राहून गेल्याचे आणि वाघाची डरकाळी ऐकून घोडा घाबरून गेल्यामुळे त्याला आवरणे अशक्य झाल्याचे सांगितले व म्हणाली—"आपण आल्यामुळे वाचले. याबद्दल मी आपली अत्यंत आभारी आहे." तिच्या बोलण्या वागण्यावरून तिचे मन त्याच्यावर प्रथम दर्शनीच बसल्याचे वीरवर्माने ओळखले.

नंतर तिचे वडील तिच्यासाठी योग्य वर शोधीत असल्याचे व कालपर्यंत कोणी वर पसंत न पडल्याचे सांगून म्हणाली—"माझे बाबा बहुतेक स्वयंवर रचतील. त्या स्वयंवराच्या वेळी आपण अवश्य रहावे. होय, परंतु तुम्ही कोण हे मी विचारायलाच विसरले."

"मी मालवदेशाचा युवराज आहे. माझे नांव कल्याणवर्मा आहे." वीरवर्माने तिला सपशेल खोटे सांगितले.

"ठीक, आपण माझ्या स्वयंवराला यायला विसरू नका!" स्वर्णकेशी त्याला म्हणाली व तिच्या बरोबरचे लोक भेटल्यावर ती उदयपूरला निघून गेली. जातांना तिने वीरवर्माकडे कित्येकदां वळून पाहिले.

नंतर वीरवर्मा राजधानीत परतल्यावर कल्याणवर्माला भेटला व त्याला अरण्यात घडलेले वृत्त सांगून स्वर्णकेशीला त्याने स्वतःचे नाव कल्याणवर्मा असल्याचे सांगितले, ती गोष्टही सांगितली.

कल्याणवर्मा क्षणभर स्तब्ध राहिला व मित्राचे प्रेम यशस्वी व्हावे यासाठी प्रयत्न करण्याचे त्याने ठरविले. वास्तविक कल्याणवर्माच्या मनात स्वर्णकेशीशी विवाह करण्याची इच्छा होती. परंतु ती गोष्ट त्याने कोणासमोर ही व्यक्त केली नव्हती. आतां स्वर्णकेशीचे प्रेम त्याच्या मित्रावर असल्याचे कळल्यावर त्यांच्या प्रेमाच्या आड न येण्याचे ठरवून तो म्हणाला—"मित्रा, तुझे व स्वर्णकेशीचे लग्न व्हावे यासाठी माझ्याकडून होईल ती सर्व मदत मी करीन." असे कल्याणवर्माने वीरवर्माला वचन दिले.

स्वर्णकेशीने घरी गेल्यावर आपल्या वडिलांना अरण्यात घडलेले सर्व वृत्त सांगितले व तिचे रक्षण करणाऱ्या मालवदेशाचा युवराज कल्याणवर्मा याच्याशीच तिने लग्न करण्याचे ठरविले असल्याचेही सांगून टाकले. तिच्या वडिलांनी तिच्या



मनासारखेच होईल असे आश्वासनही दिले. कारण आपल्या मुलीचे लग्न कल्याणवर्माशी व्हावे असे दोघां आईबापांच्याही मनात होते. स्वर्णकेशीच्या मनात काय आहे, हे कळल्याशिवाय बोलण्यात अर्थ नाही, असा विचार करून ते आजपर्यंत तिच्याशी त्या विषयी बोलले नव्हते. आतां तिने स्वतःचा त्या गोष्टीचा उल्लेख केल्यावर त्यांनी लगेच आपला होकार दिला.

"मी स्वतःच तुझे लग्न मालवदेशाच्या युवराजाशी करून द्यायचा विचार करून त्याचे चित्रसुद्धा आपल्या वाड्यात आणून ठेवलेले आहे. ते तुझ्याच महालात लावण्याची व्यवस्था करतो." असे म्हणत



त्याने ते चित्र मागवून स्वर्णकेशीला दिले. ते चित्र पाहून स्वर्णकेशी दचकली. कारण त्या चित्रातली व्यक्ती व तिला अरण्यात वाचविणारी व्यक्ती दोघां काहीच साम्य नव्हते.

ती वडिलांना म्हणाली—"बाबा, मालव राजाला दोन मुलगे आहेत का?"

"नाही ग मुली! मालव राजाला एकुलता एक मुलगा आहे. तोच कल्याण-वर्मा व तोच युवराजही आहे!" तिचे बाबा म्हणाले.

"तरमग काही नाही. माणसात व त्याच्या चित्रात थोडा फरक असतोच नाही का थोडा?" स्वर्णकेशी म्हणाली.

"असेल, मी सुद्धा त्या मुलाला पहावे म्हणत होतो. तर मग मी त्याला एकदा बोलावतोच भेटून जायला." स्वर्णकेशीचे वडील म्हणाले.

थोड्याच दिवसांनी उदयपूरच्या राजा-कडून कल्याणवर्माला उदयपूरला येऊन जाण्यासंबंधी निरोप गेला. कल्याणवर्माने वीरवर्माला बोलाविले व म्हणाला—"तूच माझ्या ऐवजी उदयपूरला जाऊन ये. तू स्वर्णकेशीच्या वडिलांना कल्याणवर्माच असल्याचे सांगून त्याच प्रमाणे वागलास तरी स्वर्णकेशीला मात्र खरे काय ते सांगून टाक. तू माझे नाव सांगण्यापूर्वीच तिचे तुझ्यावर प्रेम जडले असल्याकारणाने तुझे प्रेम यशस्वी होईल. लग्न झाल्यावर खरी गोष्ट जगाला कळली तरी हरकत नाही." या शब्दांत कल्याणवर्माने वीरवर्माला सर्व नीट समजावून सांगितले.

वीरवर्मा युवराजाच्या सर्व लव्याजम्या-सह उदयपूरला आला आणि राजाला भेटला. कल्याणवर्माचे चित्र व वीरवर्मा यांच्यात फरक असल्याचे राजालाही कळले. म्हणूनच स्वर्णकेशी चित्रातल्या व्यक्तीला ओळखू शकली नाही! चित्रकाराचीच चूक असली पाहिजे, असे मनाचे समा-धान करून घेऊन उदयपूरचा राजा गप्प राहिला.

त्यानंतर वीरवर्मा स्वर्णकेशीच्या महालात गेला, तेव्हां ती त्याला म्हणाली—"माझ्या वडिलांनी तुमची भेट व्हावी म्हणून तुम्हांला बोलाविले. माझ्या वडिलांनी व तुमच्या वडिलांनी फार पूर्वीच आपला विवाह व्हावा यासाठी बोलणी केली होती. परंतु मला ती गोष्ट मुळीच माहीत नव्हती."

"आपलं लग्न लौकरच होईल अशी अपेक्षा करू या!" वीरवर्मा म्हणाला.

स्वर्णकेशी उठून शेजारच्या दालनात गेली व कल्याणवर्माचे चित्र घेऊन आली. तिने वीरवर्माला "हे चित्र कोणाचे हो?" म्हणून विचारले.

वीरवर्माने दचकून विचारले—"हे चित्र तुमच्याकडे कसे काय आले?" त्यावेळी त्याचा आवाज थोडा कापरा झाला होता.

"माझ्याशी विवाह करणारा राजकुमार कोण, हे कळावे म्हणून हे चित्र आमच्या-कडे पाठविण्यात आले होते." स्वर्णकेशी म्हणाली.

वीरवर्मा संतापल्या सारख्या म्हणाला—"केवढी लबाडी? कल्याणवर्मा मला वचन देऊन असे फसवायला तयार झाला काय?"

"लबाडी कल्याणवर्माची नाही, तुझीच! माझ्या बाबांना तुझ्या विषयी खरी गोष्ट कळण्यापूर्वीच तू चालता हो कसा! नाहीतर नसत्या संकटात सापडशील!" स्वर्णकेशीने त्याला निरोप दिला.

त्याप्रमाणे वीरवर्मा कोणाला काही कळविल्याशिवाय निघून गेला. त्यानंतर



थोड्यात दिवसात कल्याणवर्मा व स्वर्णकेशी दोघांचा विवाह थाटामाटाने पार पडला.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला–"राजा, स्वर्णकेशीने प्रथम वीरवर्माशी विवाह करण्याचे ठरवून त्याला कां पाठमोरा पाठवून दिले. तो युवराज नव्हता म्हणून का? की चित्रातला कल्याणवर्मा जास्त रूपवान होता म्हणून? या शंकाचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"कल्याणवर्माला वाटत होते, त्याप्रमाणे स्वर्णकेशीने वीरवर्मा एक राजकुमार होता म्हणून त्याला मनाने वरले नव्हते. ती गोष्ट कळण्यापूर्वीच तिने त्याला वरले होते. तिच्या प्रेमावर त्याचा विश्वास होता म्हणूनच कल्याणवर्माने वीरवर्मालाच आपल्या जागी पाठविले व बजावून सांगितले होते की तिच्याजवळ खरे ते सांगून टाक. नंतर कल्याणवर्माचे चित्र पाहिल्याबरोबर स्वर्णकेशीने वीरवर्मा राजकुमार नसल्याचे ओळखले होते. तिने राजकुमाराशीच विवाह करावयाचे ठरविले असते तर वीरवर्माशी तिला काही बोलण्याची गरजच नव्हती. तो आपल्या प्रेमाला पात्र आहे की नाही, हे कळावे म्हणून त्याला बोलवून त्याने खरे काय ते सांगावे यासाठी तिने संधी दिली होती. परंतु त्याने तो स्वत: कल्याणवर्मा नसल्याचे तर सांगितले नाहीच, शिवाय कल्याणवर्माच्या सल्ल्याप्रमाणेही वागला नाही. आणखी वर कल्याणवर्माने त्याच्यासाठी केलेल्या त्यागाबद्दल ऋणी होण्याऐवजी त्याने लबाडी केल्याचे बोलायला सुद्धा कचरला नाही. अशा परिस्थितीत स्वर्णकेशी त्याच्याशी विवाह कसा काय करणार?"

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# सूक्ष्म परीक्षा

महेंद्रपूरचा राजा मार्तंडवर्मा याने आपल्या मंत्र्यांपैकी मणिमंत हा अधिक कुशाग्रबुद्धीचा असल्याचे ओळखून त्याला आपला प्रधानमंत्री नेमण्याचे ठरविले.

परंतु शुक्र नावाचा दुसरा मंत्री राणीच्या जवळच्या नात्यातला होता. म्हणून राणीने त्यालाच प्रधान मंत्री नेमावे असा हट्ट केला. तिने राजाला विचारले–"शुक्र मणिमंताहून कोणत्या बाबतीत कमी आहे? तो सुद्धा फार हुशार आहे, म्हणून त्यालाच प्रधान मंत्री नेमावे."

"मणिमंताहून शुक्र जास्त बुद्धिमान असल्याचे सिद्ध झाल्यास मी त्यालाच आपला मंत्री म्हणून नेमीन!" असे राजाने वचन दिले.

इतक्यात एक समस्या राजापर्यंत आली, राजधानीतला एक प्रमुख कोट्याधीश

लग्न करावयाचे होते. तिला तिघां जणांनी मागणी घातली. तिघे तरुण सर्व तऱ्हेने योग्य होते. शिवाय तिघे एकाच गुरूचे शिष्य होते. तिघांचे वय एक व तिघेही रूपवानही होते.

त्या तिघांत कोण सर्वोत्तम वर होईल, याचा निर्णय करणे त्या कोट्याधीशाला शक्य झाले नाही, म्हणून त्याने त्या तिघांच्या गुरूलाच ती गोष्ट विचारली. गुरूने योग्य व्यक्तीला ओळखण्यासाठी तीन सूचक वस्तू तिघांना दिल्या. एकाला माती, दुसऱ्याला धान्य व तिसऱ्याला पाणी.

या वस्तूंपैकी कोणतीं वस्तू मुख्य आहे हे ओळखणारा परीक्षक हवा. तरच माती उत्तम म्हणणारा, धान्य मुख्य म्हणणारा की पाणी मुख्य म्हणणारा, कोणता खरो-

परीक्षक योग्य असेल तरच हा परीक्षा होणार. म्हणून सल्ला घ्यायला राजाकडेच तो कोटीश्वर आला.

राजाने तिघां तरुणांना राजसभेत बोलाविले व विचारले–"तुमच्या गुरूने तुम्हांला एकेक वस्तू दिली आहे. ती सर्वांत उत्तम कशी हे सांगा."

एका तरुणाने मातीचे महत्व सांगितले. म्हणाला–"मातीच सर्वात श्रेष्ठ. मातीत बी पेरून पाणी घातले तरच पीक निघते. माती नसेल तर उत्तम बी व पाणी असून काय उपयोग ?"

दुसरा तरुण धान्याचे महत्व सांगुन म्हणाला–"प्राणिमात्राला धान्य आवश्यक असते. नुसत्या मातीने कोणती उत्पत्ती होऊ शकेल का? म्हणून गुरुवर्यांनी दिलेले धान्यच सर्वात श्रेष्ठ आहे!"

तिसऱ्या मुलाने पाणी श्रेष्ठ असल्याचे सांगितले. म्हणाला–"शेत किती चांगले असले, बीसुद्धां चांगले असले आणि पाणीच नसले तर बी कसे रुजेल ?"

राजाने शुक्राला विचारले–"तुमचे काय मत आहे, यांच्यापैकी तुला कोण श्रेष्ठ वाटतो ?"

शुक्र म्हणाला–"सर्वात श्रेष्ठ पाणीच आहे, यात शंका करण्याचे कारणच काय ?" त्याने तिसऱ्या तरुणाच्या बाजूने मत दिले.

राजाने मणिमंताला विचारले–"तुमचे काय मत आहे ?"

मणिमंत म्हणाला–"गुरूने दिलेल्या तिन्ही वस्तूंची परीक्षा केल्याशिवाय मी याचे उत्तर देऊ शकणार नाही." असे सांगून त्याने पाणी चाखून पाहिले. ते खारट होते. ते निरुपयोगी असल्याचे सांगून त्याने धान्य पाहिले. ते भाजलेले होते. ते बी म्हणून लावले तर उगणे शक्य नाही असे सांगितले व म्हणाला–"मातीच उत्तम आहे! गुरूने सूचक वस्तू देऊन कोणता शिष्य श्रेष्ठ आहे, हे न बोलतां सुचविले."

कोटीश्वरासमोरच्या समस्येला तोड निघाली. त्यानंतर राणीने शुक्रालाच प्रधान मंत्री नेमण्यासाठी हट्ट धरला नाही.



# सर्व सोंगच!

एका गावात रामू व सोमू नावाचे दोघे नट रहात असत. रामूचा देवावर थोडा देखील विश्वास नव्हता. सोमू नीती अनीतीचा फारसा विचार करीत नसला तरी देवावर मात्र त्याचा कमालीचा विश्वास होता. सोमूला रामूचा देवावर विश्वास नाही, हे चांगले माहीत होते. तो म्हणून रामूचा थोडासुद्धा आदर करीत नसे.

परंतु एकदां असं झालं की कोणतातरी सण गावात होता आणि गावकऱ्यांनी एक नाटक बसविले. त्यात रामूला एका मोठ्या भगवद्भक्ताचे व सोमूला एका अत्यंत इमानदार व नीतिवान नागरिकाचे पात्र धारण करावे लागले. दोघे उत्तम नट होते, हे सांगायलाच नको. दोघांची कामें फारच छान झाली.

दुसऱ्या दिवशी पिंपळाच्या पारावर सर्व जमले तेव्हां रामूने सोमूला विचारले–"मी विचारतो, प्रथम हे सांग, देव आहे कोठे? सर्व खोटे आहे, खोटे!"

सोमूने संतापून त्याला विचारले–"काय रे तुझा देवावर विश्वास नाही आणि तू तर भक्ताचा पार्ट छान केलास की?" सर्व रामूकडे पाहून खदखदां हसू लागले.

रामू जरासुद्धा न कचरता म्हणाला–"त्यात काय रे, सोमू? ते सर्व सोंगच नाही का रे? तू नाही का मोठ्या नीतिवानाचे सोंग केलेस ?"

या खेंपेस सर्व सोमूकडे पाहून हसले.





# कष्टाचे काम

चिरंजीवी नावाचा एक विद्वान ज्ञानी पुरुष देशाटन करीत चंद्रसेन महाराजांच्या दरबारात आला. त्यावेळी दरबारात या प्रश्नावर चर्चा चालू होती की–"या जगात सर्वात कष्टाचे काम कोणते ?"

प्रत्येक जण उठून उत्तर देत होता. काही म्हणाले–"स्वर्गप्राप्ती ही सर्वात कठीण !" आणखी काही म्हणाले–"अमरत्व सर्वात कठीण !" काही जण म्हणाले–"देवाचं प्रत्यक्ष दर्शन सर्वात कठीण !"

राजा ती सर्व उत्तरे ऐकून चिडून म्हणाला–"स्वर्ग, अमरत्व आणि देव, या सर्वांची आपल्याला काही माहीती नाही. आपल्यापैकी कोणी त्यांना पाहिलेले नाही. काही जण त्यांचे अस्तित्व मानतात, तर काही जण मानीत नाहीत. कोणी पाहिल्याचे सांगितलं तर त्याचा खरेपणा त्यांना सिद्ध करता येणार नाही. तेव्हां आपल्याला माहीत असलेल्या बाबतीत कोणती गोष्ट सर्वात कष्टसाध्य आहे, सांगा."

नंतर एक म्हणाला–"खरे बोलणे सर्वात कठीण काम आहे." दुसरा म्हणाला–"एक पत्नीव्रत", तर आणखी एकजण म्हणाला–"दान करणे कठीण काम आहे."

राजाला यांपैकी एकही उत्तर रुचले नाही. त्यावेळी चिरंजीवी उठून आपला परिचय देऊन म्हणाला–"स्वतःच्या इच्छा वासना जिंकणे सर्वात जास्त कष्टसाध्य काम आहे, असे माझ्या मनाला वाटते."

राजाने उलट प्रश्न केला–"कां ?"

चिरंजीवी म्हणाला–"हरिश्चंद्र सत्यवादी होता, रामाने एक पत्नीव्रताचे पालन केले. शिबी, दधीची व कर्ण दानी होते. परंतु हे सर्व गुण त्यांच्या इच्छेनुरूप होते म्हणून ते यशस्वी झाले. या जगाच्या मुळाशी इच्छा असते. महापुरुष किंवा पापी माणूस सर्व तिचे गुलाम असतात."

राजा चिरंजीवीचे उत्तर ऐकून खूष झाला व त्याने त्याला काही पारितोषिके दिली.

दरबारात दुर्जय नावाचा एक दरबारी होता. त्याला, एका अनोळखी व्यक्तीला पारितोषिके दिलेली खपली नाहीत. तो म्हणाला–"प्रभो! इच्छा वासनांना जिंकणे मुळीच कठीण नाही. वासनांना काबूत ठेवणारी एक व्यक्ती जवळच्या अरण्यात राहते आहे. महाराजांची परवानगी मिळाल्यास मी त्याच्या करवी आपले म्हणणे सिद्ध करून दाखवीन."

"तू सिद्ध करून दाखवू शकलास तर चांगले पारितोषिक देण्याचे मी वचन देतो. नाही तर तुला तुरुंगवास भोगावा लागेल." राजा म्हणाला.

दुर्जयने आपल्या ओळखीच्या एका माणसाला ऋषीचे सोंग करायला लावून त्याने दरबारात गेल्यावर काय बोलायचे व कसे वागायचे हे नीट समजावून सांगितले आणि दरबारात घेऊन आला. राजाला म्हणाला–"मी म्हटले ते थोर पुरुष हेच."

त्या माणसाच्या मनात इच्छा वासना आहेत की नाहीत याची परीक्षा घ्यायला



जीवीने त्या व्यक्तीस अनेक वस्तूंची प्रलोभने दाखविली. परंतु त्याला कोणत्याही वस्तूची गरज नसल्याचे आढळले.

चंद्रसेन राजा म्हणाला–"तुम्हांला मी हे सर्व राज्य देतो. ते संभाळा."

तो म्हणाला–"मी सर्वसंगपरित्याग केला असतां मला तुमचे राज्य किंवा राज्य-वैभवाची गरजच काय ?"

चिरंजीवी म्हणाला–"महात्मन् ! आपल्यासारखी थोर माणसे या जगात क्वचितच भेटतात. आपण उद्या पुन्हां एकदां दरबारात आलात तर आपल्याला इच्छा वासना आहेत की नाहीत, हे मी सिद्ध

आपल्या मनांत इच्छा आहेत हेच सिद्ध होईल."

चिरंजीवीने कोणत्या हेतूने तो डाव टाकला होता, कोणाला कळले नाही. उघड-पणे काही नको असे सोंग करीत असला तरी त्याच्या मनात इच्छा आहेत हे दाखविणे शक्य आहे, असे चिरंजीवीला वाटत असावे, तो सोंगाड्या ऋषी फार सावधगिरीने वागला. कोणी व्यक्ती त्याच्याकडे आली की त्याला वाटे की चिरंजीवीनेच त्या व्यक्तीला पाठविले असावे आणि तो फार सावध राहिला.

दुसऱ्या दिवशी दुर्जय त्या सोंगाड्या साधूला बरोबर घेऊन दरबारात आला. चिरंजीवी त्या व्यक्तीस पाहतांच म्हणाला—"तुमच्या मनात इच्छा आहे की नाही हे सिद्ध करण्यासाठी मी बोलाविले होते. तुम्ही कशासाठी आलात?"

"तू कसे सिद्ध करणार, हे पाहण्या-साठी आलो आहे!" तो ढोंगी साधू म्हणाला.

राजसभेत सर्व चकित होऊन चिरंजी-वीच्या चातुर्याची वाट पहात होते. चिरंजीवी म्हणाला—"महात्मन्, तुम्हांला इच्छा नाही, कसे म्हणता? तुम्हांला इच्छा नाही, हे सिद्ध करण्यासाठीच नाही का तुम्ही ठरल्या वेळी अरण्यातून येथवर आलात? एका दिवसानंतर या म्हटलं तर आपण कबूल झालात. तुमच्या मनात इच्छा होती हेच तर सिद्ध होते!"

चंद्रसेन राजा दुर्जयकडे वळून म्हणाला—"तू हारलास म्हणून तुला आतां तुरुंगवास भोगावा लागेल."

चीरंजीवीने निवेदन केले—"महाराज, यात दुर्जयची चूक मुळीच नाही. इच्छा वासनांना जिंकणे हे आत्ताच तर सिद्ध झाले. मी म्हटले ते बरोबर नाही असे वाटल्यानेच दुर्जयने आपली बाजू सिद्ध करण्याचा प्रयत्न केला होता. म्हणून त्याला माफ करून सोडून द्यावे."

राजाने दुर्जयला माफ केले व चिरंजी-वीच्या चातुर्याची वाखाणणी केली.





# दुर्वास ऋषी

दुर्वास या शब्दाचा अर्थ आहे, ज्याला घरदार नाही अशी व्यक्ती. या ऋषीला घरदार काही नव्हते, असेच दिसते.

दुर्वास हे अत्री अनुसूयेच्या पोटी शंकराचा अंश म्हणून जन्मले. या दंपतीला त्रिमूर्तीचे अंश म्हणून तीन मुलगे झाले. उरलेल्या दोघांपैकी ब्रह्मदेवाचा अंश चंद्र जन्मला व विष्णूचा अंश म्हणून दत्तात्रेयाचा जन्म झाला.

शंकराने त्रिपुराचा वध केला आणि बाण घेऊन परत येत असतां तो बाण एका मुलाच्या रूपात दिसला. तेव्हां देवांनी शंकराला विचारले—"हा कोण?"

तेव्हां शंकर म्हणाला, म्हणे—"दुर्वास!"

गंधमादन पर्वतावर दुर्वास ऋषी तप-श्चर्या करीत असता साहसिक नांवाचा एक गंधर्व तिलोत्तमा नामक एका अप्सरेबरोबर प्रेमलीला करीत असलेला दुर्वासाला दिसला. तेव्हां आपणही लग्न करून संसार करवा, असे दुर्वासाला वाटले.

त्याच वेळी और्व नावाचा एक गृहस्थ भेटला. त्याने कंदली नावाच्या आपल्या मुलीला दुर्वासाला देऊन तिचे लग्न करून द्यायचे मान्य केले.

दुर्वासाने काही दिवस तिच्याबरोबर संसार केला. परंतु कंदलीसुद्धा दुर्वास ऋषीसारखीच फार तापट होती. अर्थातच दोघांचे पटले नाही. दुर्वासाने संसाराचा वीट आल्यामुळे पुन्हां जंगलात जाऊन तपश्चर्या सुरू केली.

पांडवांचा जन्म व्हायला दुर्वास ऋषीच मुख्य कारण होते. एकदां कुंती कन्या असता दुर्वास ऋषी कुंतीभोज राजाकडे गेले. तेथे कुंतीनें दुर्वास ऋषींची जी सेवा केली त्याबद्दल त्यांनी खूष होऊन तिला एक मंत्र दिला. त्या मंत्राचा प्रयोग करून

कुंतीने सूर्याचे आवाहन केले व तिच्या पोटी कर्णाचा जन्म झाला.

लग्न झाल्यावर तिने तिचे पती पांडुराजा यांच्या अनुमतीने तिने अनुक्रमे यम, वायू, इंद्र यांचे आवाहन केले व त्यांच्या कृपेने धर्मराज, भीम व अर्जुन जन्मले. तो मंत्र कुंतीने माद्रीला दिला व त्याच मंत्राच्या सहाय्याने माद्रीला अश्विनीकुमारांच्या कृपेने नकुल व सहदेव झाले. अशातऱ्हेने दुर्वास ऋषी हे महाभारत कथेचे मूळ कारण झाले असे म्हणतां येईल.

परंतु दुर्वास ऋषीला तो गौरव देणेसुद्धा उचित होणार नाही. कारण पांडव अरण्यवास करीत असतां त्यांची मान खाली व्हावी यासाठी दुर्योधनाने चिथवल्यावरून दुर्वास ऋषी शेंकडो ब्राह्मणांसह पांडव अरण्यवास करीत असतां तेथे गेले. धर्मराजाने सर्वांना जेवणाचे आमंत्रण दिले. परंतु त्या पूर्वीच सर्व पांडवांची जेवणे झाली होती. द्रौपदीने अक्षयपात्र धुवून ठेवून दिले होते.

इतक्या ब्राह्मणांना जेवायला कसे वाढायाचे ही चिंता द्रौपदीला पडली. परंतु तिने धावा करतांच कृष्णाने येऊन तिने धुवून ठेवलेल्या अक्षयपात्रात एक शीत राहून गेले होते ते खाल्ले. लगेच स्नानाला नदीवर गेलेल्या दुर्वास ऋषी व इतर ब्राह्मणांची पोटे भरली. आता जेवायचे कसे, या विचारात दुर्वासासह सर्व ब्राह्मणमंडळी पडली आणि पांडवांचा निरोप न घेता परस्पर निघून गेले.

दुर्वास ऋषींची मान आणखी अशीच एकदां इंद्रामुळे खाली झाली होती. दुर्वास ऋषी संचार करीत असतां एका विद्याधरीने त्यांना एक पुष्पमाला दिली. ती पुष्पमाला घेऊन दुर्वास ऋषी इंद्रलोकी गेले आणि त्यांनी ती माळा इंद्राला दिली. इंद्राने ती माळा आपले वाहन ऐरावत याला ती दिली. ऐरावताने ती माळा सोंडेत धरून तोडून फेंकून दिली. अशातऱ्हेने दुर्वास ऋषींचा तो फार मोठा अपमान झाला.





## स्यमंतक मणी

सत्राजित नावाच्या राजाने इंद्राला प्रसन्न करून त्याच्या कडून स्यमंतक नावाचा मणी संपादन केला. तो दररोज आठ भार सोने देत असे.



एकदा कृष्णाने सत्राजिताला स्यमंतक मण्याविषयी विचारले आणि द्यायला सांगितले. परंतु सत्राजिताने त्याला साफ नकार दिला.



काही दिवसांनी सत्राजिताचा भाऊ प्रसेन तो मणी धारण करून शिकारीला निघाला.



अरण्यात प्रसेन शिकार करीत असतां एका सिंहाने त्याला ठार केले व मणी घेऊन गेला.

त्याच वेळी जांबुवंताने त्याला वाटेत अडविले व त्याला ठार केले आणि स्यमंतक मणी नेऊन आपली मुलगी जांबुवतीला दिला.





स्यमंतक मणी कृष्णानेच चोरला असल्याची अफवा सर्वत्र पसरली. तो आरोप जावा म्हणून कृष्ण प्रसेनचा शोध काढीत अरण्याच्या वाटेने जांबु-वंताच्या गुहेपर्यंत पोचला. त्याच्याशी युद्ध करून कृष्णाने त्याचा पराभव केला.

जांबुवंताने कृष्णाला स्यमंतक मणी देऊन आपली मुलगी जांबुवती हिचे लग्नही त्याच्याशी करून दिले. ती कृष्णाच्या आठ राण्यांपैकी एक होती.





कृष्णाने स्यमंतक मणी सत्राजिताला नेऊन दिला. सत्राजिताने त्याबद्दल खूष होऊन आपली मुलगी सत्यभामा हिचे लग्न कृष्णाशी करून दिले.

खरोखरी सत्यभामेचे लग्न शतधन्वा याच्याशी व्हायला पाहिजे होते. कृतवर्मा व अक्रूर वगैरे यादवांनी शतधन्व्याला चिथविले व सत्राजिताचा वध करायला सांगितले.












त्यामुळे शतधन्वाने सत्राजित झोपलेला असता त्याचा वध केला.



सत्यभामेला वडिलांच्या मरणाचे फार दुःख झाले व तिने श्रीकृष्णाला शतधन्व्याचा वध करण्यासाठी पाठविले. त्या युद्धात शतधन्वा मरण पावला.



परंतु स्यमंतक मणी शतधन्व्याजवळ नव्हता. तो त्याचा मुलगा भोज याच्याकडे गेला होता. अक्रूराने तो आणून कृष्णाला दिला. स्यमंतक मण्यामुळे जी हिंसा झाली त्याबद्दल अक्रूराने कित्येक यज्ञ केले.



# भद्रायू

दशार्ण देशाच्या राजाचे नाव वज्रबाहू होते. त्याला सुमती नावाच्या बायको बरोबर आणखी अनेक होत्या. त्यात सुमती एकटीच गरोदर झाली. ते पाहून इतर बायकांचा मत्सराग्नी पेटला आणि त्यांनी तिला काहीतरी औषध खायला दिले.

कालक्रमाने सुमतीला एक मुलगा झाला. परंतु बाळबाळंतीण त्या औषधामुळे रोगी झाली. दोघं नेहमी रडत कण्हत असलेली पाहून वज्रबाहूला ते असह्य झाले आणि त्याने दोघांना अरण्यात पोचते केले.

तेथून सुपती आपल्या मुलाला घेऊन वैश्यपूरला गेली. तेथे एका वैश्याच्या बायकोने सुमतीला प्रेमाने बोलावून आपल्या घरातच ठेवून घेतले. परंतु काही दिवसांनी तिचा मुलगा मरण पावला. ती पुत्रशोकाने रडत असतां तेथे ऋषभयोगी आले व त्यांनी तिचे सांत्वन केले. तरी तिचे रडणे थांबले नाही. तेव्हां त्या योग्याने त्या मुलाच्या मृतदेहावर भस्म टाकून त्याला जिवंत केले. त्याचे नाव भद्रायू.

त्यानंतर भद्रायू वैश्यकुमाराबरोबरच लहानाचा मोठा झाला. काही काळ लोटल्यावर ऋषभ योगी पुन्हा आले व त्यांनी चंद्रहास नावाची एक तलवार व एक शंख दिला.

आणखी काही काळ लोटला. मगधच्या राजाने वज्रबाहूचा पराभव करून दशार्ण देश बळकावला. ती बातमी भद्रायला कळली. लगेच भद्रायू आपली चंद्रहास तलवार व शंख घेऊन युद्धाला निघाला. त्याने वैश्यकुमाराला आपला सारथी केला व मगध देशावर चालून गेला. त्याने मगध राजाला जिंकले आणि दशार्ण देश त्याच्या पित्याला सोंपवून तो परत वैश्यपुराला आला. परंतु मदत करणारा हा तरुण

वीर आपलाच मुलगा असल्याचे मात्र बभ्रुवाहूला कळले नाही.

ऋषभयोगीने भद्रायूच्या हिताचे आणखी एक कार्य केले. तो चंद्रांगद नावाच्या राजाकडे गेला आणि भद्रायूच्या शौर्य पराक्रमाचे वर्णन करून त्याला म्हणाला– "तू आपली मुलगी कातिमालिनी हिचे लग्न भद्रायूशी करून दे."

चंद्रांगदने अत्यंत प्रेमपूर्वक भद्रायूला निरोप पाठवून बोलाविले आणि त्याच्याशी आपल्या मुलीचे लग्न करून दिले. त्या लग्नाला त्याने सर्व राजेरजवाड्यांना निमंत्रणे पाठविली. अर्थात् त्या लग्नाला बभ्रुवाहूसुद्धा हजर होता. त्याने नवऱ्या मुलाला ओळखले. आपले राज्य परत मिळवून देणारा शूर पराक्रमी वीर तोच होता. म्हणून त्याने त्याला विचारले–"तू कोणाचा मुलगा ?"

"आपलाच मुलगा!" असे सांगून चंद्रांगदने सर्व पूर्वेतिहास त्याला सांगितला. बभ्रुवाहूला त्याने केलेल्या दुष्टपणाबद्दल फार पश्चात्ताप वाटला. त्याने भद्रायूला व त्याची आई सुमतीला अत्यंत आदरपूर्वक दशार्णदेशाला बोलावून नेऊन त्याचा राज्याभिषेक करविला.

राजा होताच भद्रायूला एक विचित्र सत्वपरीक्षा द्यावी लागली. तो आपल्या बायकोबरोबर वनविहार करून काही वेळ एका झाडाखाली विश्रांती घेत बसला असता एक ब्राह्मण "पाहि माम् पाहि माम्" ओरडत आला व म्हणाला–"एक वाघ माझ्या बायकोला धरून नेत आहे." भद्रायूने शरवृष्टी करून वाघाला मारण्याचा प्रयत्न केला. परंतु काही फायदा झाला नाही.

"कोठे आहे तुझा तो शंख आणि ती तलवार? तू इतका बलहीन राजा असशील असे नव्हते वाटले मला."

भद्रायू म्हणाला–"माझी बायको, माझा देह, माझे राज्य यांपैकी काय वाटेल ते घे!"

"तू थोर वीर व साहसी आहेस. तुझी परीक्षा घेण्यासाठीच मी हे केले!" असे सांगून ब्राह्मण निघून गेले.



# सूक्ष्म भेद

एकदां एक राजा व त्याचा मंत्री वेष पालटून देशाची स्थिती स्वत: पाहून येण्यासाठी म्हणून निघाले. तसे ते दोघे देशस्थिती पहायला जात व कोणाला थोडी फार मदत हवी असली तर ती करीत. एकदा ते रामपूर नावाच्या गावी रघुनाथराव नावाच्या गृहस्थाकडे गेले व म्हणाले–"आम्ही प्रवासी आहो, जेवायची व्यवस्था होऊ शकेल का ?"

"तुम्ही कितीजण आहांत ?" रघुनाथरावांनी विचारले व दोघेच असल्याचे कळल्यावर व्यवस्था करण्याचे मान्य केले आणि रात्री दोघांना पंचपक्वांन्नांचे जेवण वाढले.

त्यानंतर राजा व मंत्री कृष्णपूर नावाच्या गावी किसनराव नावाच्या गृहस्थाकडे गेले व रघुनाथरावांना विचारले तसेच विचारले–"जेवायची व्यवस्था होऊ शकेल का ?"

"करतो की, तुम्ही किती जणं आहां ?" किसनरावांनी विचारले. दोघे असल्याचे कळल्यावर उत्तम जेवण करून वाढले.

राजधानीत पोचल्याबरोबर राजाने किसनरावांकडे दर महिन्याला शंभर रुपये पाठविण्याची व्यवस्था करायला मंत्र्याला सांगितले. तेव्हां मंत्र्याने विचारले–"रघुनाथरावांनी सुद्धा आपला चांगला पाहुणचार केला होता की ? त्यांनाच कां वगळलेत ?"

"रघुनाथरावांनी आपण दोघेच असल्याचे कळल्यावर जेवणाची व्यवस्था करण्याचे मान्य केले. वीस जण असते तर मान्य केले असतेच असे नाही. किसनरावांनी जेवण वाढायला प्रथम मान्य केले व किती जणांसाठी सैंपाक करावा लागेल हे कळावे म्हणून 'किती जणांसाठी' म्हणून विचारले. त्यांनी केलेला पाहुणचार उच्च कोटीचा होता.





# अपशकून भोंवला

रामराव सावकारांचा शकुनापशकुनांवर फार विश्वास होता. ते बाजाराच्या दिवशी शहरात जायचे ठरवून पहाटे उठले व दार उघडतात ते समोर व्यंकटरावांच्या घरचं पाळलेले मांजर दिसले.

उजाडतांच या दरिद्री मांजराचे तोंड पाहिले, आजचा दिवस कसा जातो की काय, असं मनात म्हणत रामराव घरात गेले आणि पडून राहिले. गोंधळलेल्या मन:स्थितीत अंथरुणावर ते पडले आणि म्हणून दार लावून घ्यायला विसरले. तेवढ्यात एका चोराने बाहेरून दार उघडे असल्याचे हेरले आणि आत शिरला. सावकारांची पैशाची पेटी डोक्याजवळ होती ती त्याने उचलली.

चाहूल लागतांच रामराव उठून बसले व "चोर, चोर" म्हणून ओरडले आणि चोराला धरायला धावले. चोराने ती पेटीच रामरावांच्या डोक्यात एकदां हाणली आणि पेटी घेऊन काळोखात पसार झाला.

पेटी गेलीच. उठल्याबरोबर मांजराचे तोंड पाहिले त्याचाच हा परिणाम झाला, असा विचार करीत रामरावांनी मांजराला मनांत खूप शिव्या दिल्या आणि चोरीचा रिपोर्ट कोतवाल चावडीवर देण्यासाठी शहराकडे निघाले.

तो कोतवाल म्हणजे दुसरा तिसरा कोणी नव्हता. रामरावांचा मेहुणाच, म्हणजे धाकट्या बहिणीचा नवरा भीमराव होता. रामराव सावकारी करीत म्हणून भीमरावाने आपले पैसे मेहुण्याकडे विनव्याजी ठेवून दिले होते. त्याने कितीदा पैसे परत मागितले, परंतु रामराव, "देतो रे!" "देतो रे!" म्हणून सांगत टाळीत आले होते.

म्हणून भीमरावांनी जास्त लक्ष द्यावे यासाठी रामराव चोरीची गोष्ट सांगून म्हणाले—"हे पहा, भीमराव, त्या पेटीत तुला देण्यासाठी साठवून मोजून ठेवलेलेच पैसे होते. तेव्हां तुला थोडा त्रास झाला तरी चोराला तू पकडलंस तर तुझे पैसे अनायासे फिटतील. नाहीतर तुला द्यावयाचे पैसे जमा व्हायला आणखी किती दिवस लागतील, सांगणे कठीण आहे, बुवा! हा सर्व प्रकार त्या दरिद्री मांजरामुळेच घडला, पहा."

रामराव म्हणाला ते भीमरावाने सगळे ऐकून घेतले व म्हणाला—"मी चोराला पकडायचा चांगला प्रयत्न करीन समजा. परंतु चोरीशी मांजराचा संबंध कसा काय बुवा? मी पहाटे उठल्याबरोबर एका मांजराचे तोंड पाहिले, माझ्या घरात चोरी झाली का? बरं ते सोड, घरी जाऊन जेवून घे, पाहू. तुझी धाकटी बहीण पुष्कळ दिवसांनी भाऊ आला म्हणून तुला भेटली तर तिला बरं वाटेल."

रामराव जेवून खाऊन बहिणीशी चार गप्पा गोष्टी करून कचेरीत गेले. तोपर्यंत पोलीस शिपायांनी बाजारात एका चोराला मुद्देमालासह पकडून आणलेले होते. त्याने कोणाचा तरी खिसा कापला होता.

भीमराव त्या चोराला दरडावून चवकशी करीत होते त्याच वेळी रामराव आले. आल्याबरोबर चोराला पाहून ते म्हणाले—"हाच रे तो, हाच, भीमराव! यानेच आमच्या घरात शिरून चोरी केली व मला मारहाण करून सटकला. किती



हुशारीने काम केलेस, भीमराव! चोरीची फिर्याद केल्यावर दोन तासांच्या आत चोराला पकडलेस!" रामराव आनंदाच्या भरात मोठमोठ्याने बोलत होते, जणुंकाही त्यांची फिर्याद नोंदविल्यावर लगेच भीमरावाने चोराला धरले होते!

चोर सुद्धा रामरावांना पाहून चपापला. आपण खोटे बोललो तर कोतवाल बडवायला कमी करणार नाही या भीतीने त्याने विचारल्याशिवायच रामरावांची पेटी त्याने कोठे लपवून ठेवली आहे, ते सांगून टाकले. नंतर तो पुढे म्हणाला—"मी चोरी करून जन्मभरात आजपर्यंत पोलीसांच्या हाती सांपडलो नाही. आज उठल्याबरोबर मांजराचे तोंड पाहिले. 'आज चोरी करायला जाऊ नका!' असे बायकोने तीनतीनदां सांगितले, पण मी दुर्लक्ष केले व तो अपशकून असा भोंवला."

परंतु भीमराव म्हणाला—"रामराव, मला मात्र उठल्याबरोबर मांजराचे तोंड पाहाल्याचा फायदाच झाला. तुला दिलेले पैसे वसूल काय होतात, असे वाटले होते, परंतु पहा कसे वसूल झाले ते!" रामराव त्याच वेळी निघायला उठले.

भीमरावाचे कर्ज फिटल्याचा त्याला आनंद झाला खरा, परंतु रामरावाला मात्र वाटले की ते पैसे त्याला आणखी काही दिवस वापरायला मिळाले असते ते मिळाले नाहीत. त्याच विचारात ते घरी गेले.

गल्लीच्या तोंडावरच त्यांना व्यंकटराव उदास चेहऱ्याने येत असलेले भेटले.

रामरावांनी व्यंकटरावांना विचारले—"काय हो, असे उदास दिसतां आहां?"

"काय सांगू हो रामराव? निर्विघ्नपणे गेली दोन वर्षे वाटेल तिकडे हिंडणारे माझे मांजर आज अकस्मात् मेले की रे, गाडी खाली येऊन! आज बिचारीने उठल्याबरोबर कोणाचे तोंड पाहिले, न जाणे?" व्यंकटराव म्हणाले.

त्या मांजराने उजाडण्यापूर्वी आपलेच तोंड पाहिले होते, हे आठवून रामरावांच्या तोंडाला खीळ बसली.





# आडपडदा

लखुजी पाटलांनी पुष्कळ पैसे मिळविले. ते सर्व त्यांनी स्वतःचा घाम गाळून मिळविले. म्हणून ते पैसे उधळणे त्यांना मुळीच खपत नसे. घरात खर्च होणाऱ्या पै पै चा हिशोब ते ठेवीत व सर्व खर्च त्यांच्या नजरेखालूनच जाईल अशी त्यांनी घरात रीत ठेवली होती. बायकोला सुद्धा ते पैसे वापरायला देत नसत.

एकदां सैंपाक करणारी बाई तिच्या मुलाला चांगलीशी नोकरी कोठेतरी मिळाली असे सांगून निघून गेली. म्हणून त्यांना एका नव्या सैंपाकिणीची गरज होती.

कोणीतरी पाठविल्याचे असे सांगून एक मध्यम वयाची बाई येऊन म्हणाली—"माझे नाव सावित्री. तुमच्या घरात सैंपाक करायला आले आहे. तुमच्या जुन्या सैंपाकिणीनेच तुमच्या घरात गरज सांगून पाठविले आहे."

ती बाई तशी नीटनेटकी व स्वच्छ दिसली. म्हणून लखुजींनी तिला विचारले—"दररोज उरलेला भात तू घेऊन जाशील का?"

सावित्री स्मित करून म्हणाली—"मी सैंपाक केला की भात उरणेच शक्य नाही. घरात कमी माणसे असोत की जास्ती सैंपाक सर्वांना पुरेल व उरणार नाही, असा बेतानेच मी करते."

तिचे बोलणे वागणे पाहून लखुजींच्या मनाचे समाधान झाले व ते सावित्रीला म्हणाले—"या वेळचा सैंपाक कर. उद्यापासून नियमित कामाला लाग." असे सांगून त्यांनी तिला बायकोकडे पाठविले आणि स्वतः कामाला निघून गेले.

"कामावर ठेवून घेण्यापुरता त्यांचा अधिकार, त्यानंतर माझा, बरं का! घरातल्या गोष्टी तू बाहेर कोठे बोललीस तर